M: 2712

| शिर्षक | ग्रंथकार | विषय | विस्तार (पुर्ण/ अपूर्ण) | टिकाकार | आकार | पृष्ठे | लिपी | सामग्री | Lines per page | Letters per line | Condition & age (शके/विक्रम सवंत) | Additional Particulars / Remark |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| हरिरामविजय | | पुराण | पूर्ण | | 6/12 | ६०० | मराठी | कागद | 17 | 47 | काळे १२१२ | |

श्रीगणेशायनमः ॥ ॥ श्रीसरस्वत्यैनः । श्रीगुरुभ्योनमः । श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । ॐनमोजीपुराणपुरुषा । श्रीमद्भीमातटनिवासा । दिगंबराअविनाशा । ब्रह्मानंदाजगद्गुरू १ जयजयजगद्वंद्यापूर्णब्रह्मा । अजअंजितआत्मारामा । नीलग्रीवमनविश्रामा । पूर्णानंदापरेशा २ जयजयमायाचक्रचाळका । मायातीताविरिंचिजनका । सकळचित्तपरीक्षका । निजजनकासुखाब्धी ३ कमलोद्भववैकुंठकर्पूरगौरा । अंबिका गजवदनदिनकरा । हींस्वरूपेंतुझींसाचारा । तूंनिर्विकारसर्वदां ४ मंगळकारकनामगजवदन । मंगळारंभींतुझेंचिनमन । मंगळजननींवरीक रितांलेखन । तुझेगुणनसरती ५ रातोत्पलसुकुमारबहुत । पदपद्मेंगौरनेपुरेंसहित । वांकीरुणझुणवाजत । ध्यातीभक्तहृदयांतरीं ६ क्षीरार्णवअ तिश्वेतांबर । कींकांसेलागलाक्षीरसागर । कींनिर्दोषयशपवित्र । वसंतरूपेंआकारलें ७ अरुणसंध्यारागमिश्रित । तैसीउटीदिसे आरक्त । कींमंदराचळसिंदूरचर्चित । चारीहस्तविराजती ८ भक्तांचामनोवारणअनिवार । नावरेकदांसाचार । तोआकर्षावयानिर्धार । वि वेकांकुशधरियेला ९ भावेंजेशरणयेतीअज्ञानजन । त्यांचेंछेदावयाअविद्याविपिन । यालागींऊर्ध्वपरशकरून । सिद्धगजाननसर्वदां १० हातींझळ केलीलाकमळ । जेंअम्लांननविटेसार्वकाळ । तेणेंपूजूंइच्छीभक्तप्रेमळ । जेंकांनिर्मळअंतर्बाह्य ११ जैसेकल्पांतविजांचेउमाळे । तैसेअलंकारअंगींमि रवले । नक्षत्रपुंजंगुणींवोविले । तेवीमुक्ताहाराडोलतो १२ हृदयावकाशींसुरेख । पदकझालातोमृगांक । क्षयरहितनिष्कलंक । निजसुखेंसुरवाडला १३ भक्तांसिविघ्नेंयेतीप्रचंडें । तोकांआकळीशुंडादंडें । कल्पांतविजूचेनिपाडे । एकदंतझळकतसे १४ दिक्चक्रींतेजनसमाय । तैसींकुंडलेंझळकती मणिमय । किंवाचंद्रआणिसूर्य । कुंडलरूपेंतळपती १५ मुकुटींझळकतीरत्नकळा । तेणेंनभमंडपउजळला । आदिपुरुषहासाकारला । वरदानद्या वयाकवीतें १६ ऐसामहाराजगजवदन । वरदहस्तेंदावीचिन्ह । करीरामकथाबीजारोपण । त्यासिजीवनघालीनमी १७ ऐसाउगवतांवरदचंद्र । तेणेंउल्हासेकविहृदयसमुद्र । साहित्यभरतेंअपार । असंभाव्यदाटलें १८ जयजयगजवदनानिरुपमा । अगाधनवर्णवेतवमहिमा । तुझियागुणाची पावावयासीमा । कैसामतिमानहोईनमी १९ कांखेसिमेरूघेऊनिदेखा । कैसीनृत्यकरीलपिपीलिका । कैसेंब्रह्मांडउचलेलमशका । भूगोळम क्षिकाकेविहालवी २० चंद्रासिकर्पूराचेंउटणें । वासरमणीसदर्पणदावणें । कींहिमनगासिवाराघालणें । मेघासिअर्पणउदकांजुळी २१ सुरतरूपुढेंठेविजेबदरीफळ । मलयाचळासिधूपनिर्मळ । कामधेनूसिशुष्ककवळ । आणोनियांसमर्पिलें २२ क्षीरसिंधूसीअजाक्षीर ।

---

१ जन्मरहित व अजिंक्य. २ शंकर. ३ विष्णु. ४ पृथ्वी, ५ मनरूप हत्ति. ६ विचाररूप अंकुश. ७ अज्ञानरूप अरण्य. ८ कुऱ्हाड. ९ ताजें. १० समदाय.

कनकाद्रीपुढेंठेविलीगार । तैसेंप्राकृतबोलणेंअपार । तुझेंमहत्त्वकेविवर्णूं २३ परीजोछंदघेतबाळक । तोस्नेहेंपुरवीजनक । तरीहारामविजयसुरेख । सिद्धीपावोतवकृपें २४ आतांनमूंजलजोद्भवकुमरी । जेविलसेसदांकविजिव्हाग्रीं । जीच्यावरदेंमुकाहीकरी । वाचरुपतीसींसंवाद २५ जेआनंदसरोवरमराळिका । जेचातुर्यचंपककळिका । जेनिजकृपेचीकरूनिनौका । कविबाळकनेतपैलतीरा २६ तुझेकृपेंविरिंचिकुमरी । जन्मांधहोयमहाजोहरी । अतिमूढवेदार्थकरी । शक्रपदींबैसवीरंकं २७ अंबेतूंकविहृदयाब्जभ्रमरी । कींनिजानंदसागरींचीलहरी । वाग्वल्लीतूंबसोनिजिव्हाग्रीं । विरूढेंसुफळसर्वदां २८ विवेकहंसशुद्धधवळ । त्यावरीतुझेंआसनअचळ । तप्तकांचनसुढाळ । तैसेंनिर्मळनिजांगतुझें २९ शुभ्रकंचुकीशुभ्रअंबर । दिव्यमुक्तनगअलंकार । निजबोधविणाघेऊनिसुस्वर । गायनकरिसीसुस्वरें ३० ऐकतांशारदेचेंगायन । तन्मयविधिविष्णुईशान । अंबेतुझेंसौंदर्यपाहून । मीनकेतनतटस्थ ३१ रंभाउर्वशीतिलोत्तमा । सावित्रीअन्नपूर्णामुख्यरमा । तुझ्याचातुर्याचीसीमा । त्याहीकदानपावती ३२ अंबेतुझेगुणकेविवर्णावे । कायअर्कासअर्कीपुष्पेंपुजावें । अंबरमुष्टींतकेवीसांठवावें । पल्लवींबांधवेवायुकेसा ३३ नकरवेउर्वीचेंवजन । नगणवेसिंधूचेंजीवन । सप्तार्णवभेदोन । मशककेवीजाऊंशके ३४ ऐकोनिबाळकाचींवचनें । जननीहृदयींधरीप्रीतीनें । तैसेंसरस्वतीनिजकृपेनें । घालींठाणजिव्हाग्रीं ३५ माझेंमनमूढचकोर । कुहूमाजींइच्छीरोहिणीवर । तरीसरस्वतीकृपाळूथोर । शुद्धबीजप्रगटली ३६ बीजेपासूनचढत्याकळा । तोंतोंचकोरासिहोयसोहळा । तैसीयेथेंरघुनाथलीला । चढेआगळाफळारस ३७ ज्ञानाचेअनंतडोळे । उघडिलेएकेचिवेळे । आतांवंदूंश्रीगुरूचींपाउलें । ज्यांचेनिप्रकटेशुद्धज्ञान ३८ जोअज्ञानतिमिरच्छेदक । जोप्रकटेवेदांतज्ञानार्क । तोब्रह्मानंदमहाराजदेख । परमअद्भुतमहिमाज्याचा ३९ जोज्ञानपांडुरंगगिरीविख्यात । जोभक्तभीमातीरींसमाधिस्थ । तोयतिराजमहिमाअद्भुत । कवणवर्णूंशकेल ४० जागृतीस्वप्नसुषुप्तीतुर्यापूर्ण । याचारअवस्थांवरज्याचेंआसन । उन्मनीहीनिरसोन । स्वसुखेंपूर्णसमाधिस्थ ४१ चांदिणेंकैंचेंनसतांमृगांक । किरणेंकैंचींनउगवतांअर्क । जीवनावांचूनिबीजादेख । सहसाअंकुरफुटेना ४२ जरीनेत्रेंवीणदिसेपदार्थ । मंथनाविणजरीनिवटेनवनीत । तरीसद्गुरूवांचोनिपरमार्थ । ठायींनपडेजीवासी ४३ वरनसतांव्यर्थवऱ्हाड । शीरनसतांकायसेंधड । तैसेंगुरुकृपेविणव्यर्थकाबाड । तपेंव्रतेंसाधनें ४४ अंजनेंवीणनसांपडेनिधान । गायत्रीवीणब्राह्मणपण । सीमा

१ सरस्वती २ बृहस्पति ३ सरस्वती ४ दरिद्री ५ काम ६ आकाश ७ उदक ८ अमावास्या ९ चंद्र

केचीग्रामावीण । तैसेंगुरुविणज्ञाननघडे ४५ ह्मणोनितनमनधनेसीअनन्य । ब्रह्मानंदस्वामीसशरण । आरंभींश्रीरामकथागहन । ग्रंथसं
पूर्णसिद्धीपावो ४६ ऐसेऐकतांसप्रेमबोल । बोलिलाश्रीगुरुदयाळ । चकोराकारणेंउतावेळ । मृगांकजैसाउगवेपैं ४७ कींचातकालागींधांवेजलधर
कींक्षुधितापुढेंक्षीरसागर । कींकल्पतरूशोधीतआलाघर । दरिद्रियाचेंसाक्षेपें ४८ तैसाश्रीगुरुदयासागर । तेणेंदिधलाअक्षयवर । ह्मणेसिद्धीपा
वेलसाचार । रामविजयग्रंथहा ४९ आतांवंदूंसंतसज्जन । जेवैराग्यवनीचेपंचानने । कींज्ञानांबरींचेचंडकिरण । उदयअस्तनसेजयां ५० जेभक्त
सरोवरींचेराजहंस । जेकांअविद्यारण्यहुताश । कींतेपद्महस्तीविशेष । भवरोगावैद्यहोती ५१ कींजीवपावेआपलेस्वपदासी । ऐसामुहूर्तदे
णारज्योतिषी । कींतेपंचाक्षरीस्वप्रतापेंसी । पंचभूतांसीपळवीतजे ५२ कींतेदैवीसंपत्तीचेभाग्यवंत । मुमुक्षाकरितीदारिद्ररहित । कींतेदयेचींअ
द्भुत । गोपुरेंकायउंचावलीं ५३ संतचतुरश्रोतेपंडित । माझेंबोलणेअरुषबहुत । जैसासरस्वतीसमूढअत्यंत । वाँग्विलासदावितसे ५४ सूर्या
पुढेंदीपदेख । जान्हवीसन्हाणीथिल्लरोदक । कींकर्नकाद्रीअतिसुरेख । त्यासीअळंकारपितळेचे ५५ कामधेनूसिअर्पिलेंअजाक्षीर । कींचंद्रा
सिशीतळउपचार । कल्पतरुकल्पिलेंदेणार । त्यासीनिंबोळ्यासमर्पिल्या ५६ कींरत्नांकरासकांचसमर्पिली । तैसीमाझीहेअरुषबोली । परितु
ह्मीप्रीतबहुठेविली । प्राकृतशब्दींनवलहें ५७ श्रीविष्णूसभूषणेंअपार । परितुळसीवरीप्रीतीफार । कींपार्वतीपतीसबिल्वपत्र । भक्तीनेंवाहतांआ
वडे ५८ रायेंदासीपाठीसघालितां । तिचीसर्वांवरीचालेसत्ता । मोलथोडेंप्रभुअळंकारलेतां । जनासमस्तांथोरदिसे ५९ ह्मणोनितुह्मीसंतप्रभु
थोर । महिमानवर्णवेअपार । मोटेंतबांधवेलसमीर । चरणींअंबरक्रमवेलपैं ६० गणवतीलपृथ्वीचेरजःकण । मोजवेलसिंधूचेंजीवन । कनका
द्रीचेतुकडेकरून । उडविजेलसर्वथा ६१ भोगींद्रमस्तकींचामणी । आणवेलएखादेक्षणीं । सूर्यजातांधरवेलगगनीं । नक्षत्रेंठायींबांधिजेती
ल ६२ काढवेलशशिमंडळींचेंअमृत । मोडवतीलऐरावतीचेदांत । कींदिग्गजअणोनिसमस्त । एकेठायींबांधिजेतील ६३ तुरंगकरूनि
प्रभंजन । करवेलसर्वत्रींगमन । परीनकळेसंतांचेंमहिमान । जेब्रह्मानंदेंपूर्णसदां ६४ तोंसंतबोलतीआनंदघन । मननिवालेंतवबोलऐको
न । आह्मींइच्छितोंश्रीरामकथाश्रवण । वरीदृष्टांतगोडतुझे ६५ मेरूसुंदररत्नेंकरून । कींनक्षत्रेंमंडितगगन । कींवृक्षफळींपरिपूर्ण । तैसादृ
ष्टांतेंग्रंथशोभे ६६ कींशांतीक्षमादयाविशेष । तेणेंमंडितसत्पुरुष । कींपरिवारसमवेतनरेश । दृष्टांतसुरसग्रंथींतैसे ६७ आधींचभूकला

१ सिंह, व्याघ्र २ ज्ञानरूपआकाश ३ सूर्य ४ आज्ञानरूपी अरण्यास जाळणारा अग्नि. ५ ज्ञानसंपदा ६ ओबडधोबड ७ वक्तृत्व ८ मेरुपर्वत ९ शेळीचेंदुध १० समुद्र

गलीबहुत । त्याहीवरीवाढिलेंपंचामृत । कींदुर्बळासिअकस्मात । कल्पतरूभेटला ६८ कन्यार्थीहिंडतांभूमंडळ । राजकन्याघालीत्यासमाळ
कींरोगियासीरसायणनिर्मळ । अकस्मातजोडलें ६९ आतांबहुटांकोनिशब्दजाळें । बोलेरामकथारसाळ । जैसीसिंकतासांडोनिमराळ । मु
क्ताफळेंसेविती ७० कींकोशगृहंप्रवेशोनी । भांडारीरत्नेंकाढीनिवडोनी । कींदोषटाकूनसज्जनीं । उत्तमगुणस्वीकारिजे ७१ ऐसेसंतांचे
बोलपरिकर । ऐकोनिब्रह्मानंदेंश्रीधर । साष्टांगघालोनिनमस्कार । ह्मणेसादरपरिसिजे ७२ असंभाव्यश्रीरामचरित्र । शतकोटिग्रंथविस्तार ।
वाल्मीकिबोलिलाअपार । कथासमुद्रअगम्य ७३ जोसत्यवतीहृदयरत्न । कथीजगद्गुरूपराशरनंदन । तेंव्यासोक्तरामायण । कोणासीपू
र्णवर्णवेल ७४ वसिष्ठेंकथिलेंनिश्चिती । तेंवसिष्ठरामायणह्मणती । शुकेंकेलेंनानारीती । शुकरामायणबोलतीतया ७५ जोअंजनीहृदया
रविंदभ्रमर । तेणेंपाहूनिश्रीरामचरित्र । कथीनाटकरामायणसाचार । अपारचरित्रनिजमुखें ७६ जोपरमविश्वासेंश्रीरामासीशरण । शक्रां
रिजनकबंधूविभीषण । तेणेंरामचरित्रकथिलेंपूर्ण । विभीषणरामायणह्मणतीतया ७७ कमलोद्भवविष्णुसुत । तेणेंनारदासिकथिलेंहेंचरि
त्र । तेंब्रह्मरामायणअद्भुत । उमेसिसांगेशिवरामायण ७८ जोकलशोद्भवमहामुनी । जेणेंजलधीप्राशिलाआचमनेंकरुनी । तेणेंरामकथाठेवि
लीविस्तारुनी । अगस्तिरामायणह्मणतीतया ७९ भोगींद्रेंकथिलेंसर्पांप्रती । तेंशेषरामायणबोलती । अध्यात्मरामायणसमस्तीं । ऋषीनींनिव
डूनिकाढिलें ८० एकशैवरामायणसत्य । आगमरमायणबोलत । कूर्मरामायणयथार्थ । कूर्मपुराणींबोलिलें ८१ स्कंदरामायणअपार ।
एकपौलस्तिरामायणपरिकर । कालिकाखंडींसविस्तर । रामकथाकथियेली ८२ रविअरुणसंवाद । तेंअरुणरामायणप्रसिद्ध । पद्मपुराणीं
अगाध । पद्मरामायणकथियेलें ८३ भरतरमायणचांगलें । एकधर्मरामायणबोलिलें । आश्चर्यरामायणकथियेलें । बकदालभ्यऋषीत्र
तीं ८४ मूळापासूनइतुक्याकथा । कैशावर्णवतीलतत्वता । त्यामाजीवाल्मीकिनाटकथोरग्रंथा । रामविजयालागींकथूं ८५ समस्तकवीं
सनमस्कार । जोजगद्गुरूआर्यश्रीशंकर । जेणेंकुमतेंउच्छेदोनिसमग्र । शुद्धमार्गवाढविला ८६ पूर्वीसत्यवतीकुमर । तैसाकलियुगींश्रीशंकर
जोज्ञानाचासागर । जगदोद्धारकेलाजेणें ८७ सकळमतेंउच्छेदून । सन्मार्गवाढविलापूर्ण । सकळवादीजंबुकपूर्ण । शंकरसिंहगर्जतसे
८८ सकळमतवादीदरिद्री । शंकरसमर्थपृथ्वीवरी । संन्यासदीक्षानिर्धारीं । स्थापिलीजेणेंविधियुक्त ८९ अवघेमतवादीरजनीचर ।

१ कल्पवृक्ष. २ पृथ्वी. ३ समुदाय. ४ वाळू. ५ राजहंस. ६ भांडारगृह. ७ गोड. ८ व्यास. ९ मारुति. १० इंद्रजिताचा बाप रावण.

शंकरत्यावरीरघुवीर । कींकारववधायादवेंद्र । अतिउदितसाक्षेपें १० तैसाशंकराचार्यसकळ । कुमतेंछेदीतत्काळ । त्याआचार्यांचेंपदकमळ । श्रीधरभ्रमरेंवंदिलें ११ श्रीधराचार्यटीकाकार । त्यासिनमस्कारीश्रीधर । मधुसूदनादिककवींद्र । ग्रंथअपारजयांचे १२ जोशृंगारवनींचावि हंगमजाण । जोजयदेवपद्मावतीरमण । त्याचीकाव्यरचनापाहून । पंडितजनतटस्थ १३ जोवेदांतक्षीरार्णवींचामीन । जेणेंविवेकसिंधुरचिलापूर्ण तोमुकुंदराजगुणनिधान । तयाचेचरणवंदिले १४ तारावयाजनसमग्र । पुनःअवतरलारामअवतार । गीतार्थकेलासाचार । तोज्ञा नेश्वरजगद्गुरू १५ जोभानुदासकुळभूषण । प्रतिष्ठानवासीपरिपूर्ण । त्याएकनाथेंग्रंथसंपूर्ण । बहुसालकथियेले १६ जेचातुर्यराजधानी चेकळस । मुक्तेश्वरमुद्गलदास । ज्यांचेग्रंथपाहतांविशेष । ब्रह्मानंदउचंबळे १७ जैसेंचंडांशतेजव्योमीं । तैसेकेवळवामनस्वामी । जयांची श्लोकरचनायाभूमी । मंडळावरीअपूर्व १८ कृष्णदासजयराम । जोशांतिदयेचेंनिजधाम । ज्याचेंग्रंथज्ञानपरम । जोनिःसीमब्रह्मचारी । १९ श्रीरामउपासककेवळ । जोभक्तसरोवरींचामराळ । तोरामदासमहाराजनिर्मळ । भक्तीप्रबळलावीजनां १०० ब्रह्मानंदस्वामी चाबंधूसत्य । नामतयाचेंरंगनाथ । ज्याचीकवितासमग्र । अपारजनउद्धरले १ आतांअसोतसमस्तकविवर । अवघेब्रह्मानंदरूपसाचार । त्यांसिअनन्यशरणश्रीधर । द्यावावरश्रीग्रंथासी २ रविकुळींअवतरोनिश्रीरघुवीर । कैसेंकेलेंलीलाचरित्र । धन्यतेंवाल्मीकाचेंवक्त्र । कथा अपारबोलिला ३ हेंवर्णितांश्रीरामचरित्र । तरलावाल्मिकिसाचार । पापेंआचरलाअपार । ऐकासादरगोष्टीते ४ वाल्मीकपूर्वींद्विजसुत । त्य जोनिआपलाआचारउपवीत । किरातसंगेंवाटपाडित । अतिउन्मत्तविषयांध ५ महादुर्धरकानेंन । देखतांभयाभीतहोयमन । पर्वतदरीमाजी स्थळकरून । सहपरिवारेंसीवसेतेथें ६ भोंवतेद्वादशगांवेंपर्यंत । पाळथीराखोनीवाटपाडित । केल्याब्रह्महत्याअसंख्यात । नाहींगणितइतर जीवां ७ मत्स्यधरावयालागींबक । जैसेहोऊनिसात्विक । कींमूषकालागींबिडालक । बैसेजपततयापरी ८ कींअंगसंकोचेंपारधी । जपोनित त्काळमृगवधी । तैसावाल्मीकिजीववधी । पापनिधीनिर्दय ९ अपारजीवमारिले । पापाचेपर्वतसांचले । जैसेअंत्यजगृहाभोंवतेपडिले । ढीगबहूतअस्थींचे १० ऐसेंकरितांपापाचरण । तयासींआलेंवृद्धपण । पुत्रझालेअतिदारुण । तरीआंगवणनसोडी ११ शस्त्रघेऊनिहातींवाळा । मार्गरक्षीतजोंबैसला । तोंअकस्मातनारदमुनीप्रगटला । पूर्वपुण्येंकरूनियां १२ चंद्रवेष्टितनक्षत्रेंजैसीं । त्याभोंवतींऋषीचीमादीतैसी । तोंपाळ

---

१ पैठण. २ सूर्य. ३ आकाशीं. ४ हंस. ५ अनेक ६ सूर्यवंशी, ७ ब्राह्मण. ८ यज्ञोपवीत. ९ भिल्ल. १० रान. ११ गुहा. १२ चांडाळ.

तीसांगतीवाळियासी । जातीतापसीबहुसाल १३ वाटेसिधांवूनआलावाळा । शस्त्रउभारूनतेवेळां । दटावोनिऋषींचामेळा । उभाकेलाक्षणभ
री १४ कींस्वर्गपंथेंजातांनेटें । जैसीयमपुरीलागेवाटे । कींतपेंआचरतांउद्धटें । कामक्रोधअडविती १५ असोवाळाह्मणेतयांसी । मात्राआणारे
मजपासीं । नाहींतरीमुकालप्राणासी । माझियाहस्तेंयेकाळीं १६ मगपुढेंहोऊनब्रह्मनंदन । ह्मणेऐकएकमाझेंवचन । तुजआलेंवृद्धपण ।
पापेंअपारघडलींकीं १७ द्रव्यजोडिलेंतुवांअपार । झालेदुष्कृताचेसंभार । तुझेपापासीवांटेकर । कोणआहेतविचारीं १८ तुझेंआलेंजवळी
मरण । यमजेव्हांगांजीलदारुण । तेव्हांतुलासोडवीलकोण । पाहेंविचारूनअंतरीं १९ दारापुत्रयौवन । बंधुसेवकआप्तस्वजन । शस्त्रें
अस्त्रेंचतुरंगसैन्य । नयेकामातेवेळीं १२० जेजेप्राणीकर्मेंकरिती । तितुकींदेवविलोकिती । सकळत्वेंव्यापूनिवर्त्तती । मगसाक्षदेतीपरत्रींते २१
यमपुरासचित्रगुप्त । पत्रेंकाढूनिवाचित । मगत्यासारिखादंडकरित । कोणतेथेंसोडवील १२२ जोपुण्यपंथेंनचालेनर । निंदीतीर्थया
त्रासमग्र । त्यासताम्रभूमीतप्तअपार । त्यावरीलोळवितीहळूहळू २३ जेपरोपकारनकारती । त्यांसिअसिपत्रवनींहिंडविती । इकडूनतिकडेश
स्त्रेंटोंचिती । कोणसोडवीलतेस्थानीं २४ तप्तलोहाचास्तंभदारुण । त्यासीभेटवितीनेऊन । देवद्विजांजोनकरीनमन । त्यासिजाणअधोगती
२५ जोसंतांसीदेखोंनशकेअपवित्र । त्याचेगृध्रफोडितीरागेंनेत्र । जोकीर्त्तनस्मरणनकरीअणुत्र । जिव्हातोडितीतयाची २६ गुरुदेव
ब्राह्मणसांडूनी । जोषड्रसजेवीपापखाणी । महानरकींचेंपाणी । तयाचेवदनींओतिती २७ तीर्थस्नाननिंदीजोखळ । त्यासितप्तकढयी
मार्जातेल । त्यांतघालोनितळितीतात्काळ । कोणसोडवीलपैंतेथें २८ जेसाधुसंतांसीपीडिती । त्यांचेआंगाचींसालेंकाढिती । गुरुद्विजाअव्हेरि
ती । त्यांचेतोंडींघालितीनरकमूत्र २९ धर्मवाटरोधूनहरितीजेअधम । त्यांसिकुंभीपाकींघालोनिपरम । खालींचेतवितीमहाकृशानें । माजीआ
क्रंदोनीचरफडती ३० लोहदंडकरूनतप्त । कानींखोवितीयमदूत । जोनायकेकथामृत । गतीनिश्चितत्यासीही ३१ ऐसेंबोलतांनारद
ऋषी । अनुतापझालामानसीं । वेगेंआलानिजसदनासी । स्त्रीसुतादिकांसीपुसतसे ३२ पापेंघडलींमजलागीं । कोणीहोतांकायविभागी
तंवतेह्मणतीआमुचेआंगीं । नलागतीपापेंसहसाही ३३ आह्मीभाग्याचेवांटेकरीयथार्थ । पापेंतुझींतूंभोगींसमस्त । वाळाझालासद्गदित । कैसा
अर्थकरूंआतां ३४ हानरदेहउत्तमपूर्ण । केवळभगवत्प्राप्तीचेंकारण । म्यांआत्महितकरून । बुडालोंकींअधोगतीं ३५ पुण्यक्षेत्रसरसावलें ।



१ नारदऋषि. २ पातक. ३ राशी. ४ मनामध्यें. ५ बायको. ६ तारुण्य. ७ तापलेला लोखंडाचाखांब. ८ ब्राह्मणास. ९ अग्नि.

तेथेंकैनकबीजपेरिलें । कानेंकाचेंताटघडिलें । त्यांतवाढिलेंतृणबीज ३६ सुधारसकुंभदैवेंजोडला । तोनेऊनउकरडांवोतिला । चिंतामणीफोडूनि
घातला । पायरीसअभाग्यें ३७ सुरभीशोधीतआलीघर । तीसमारूनिकाष्ठप्रहार । निर्दैवेंघातलीबाहेर । तैसाप्रकारमजलाझाला ३८ व
ळेंकल्पवृक्षतोडून । वाढविलेंकंटकवन । राजहंसदवडून । दिवाभीतपाळिले ३९ रंभातोडूनिमहामूर्ख । अर्कीवाढवीतदेख । वोसंडोनीस
तेजमुक्त । सिंकताहरळभरियेले १४० असोअनुतापेंवाळा । नारदापासींपरतोनिआला । सद्गदकंठअश्रुडोळां । साष्टांगघातलानमस्कार ४१
तनुमनधनेसीअनन्य । स्वामीतुजआलोंशरण । कृपेचीनौकाकरून । तारींमजभवसागरीं ४२ महाराजतूंधन्वंतरी । माझाभवरोगदूरकरीं । जळतों
वणव्याभीतरी । मेघझडकरींवर्षेंतूं ४३ पडिलोंमायेचेमेळीं । पंचभूतेंमजझोंबलीं । वासनाविवशीगळांपडिली । कदाकाळींसोडीना ४४ अहंबुद्धी
देहबुद्धीडाकिण । ममतासटवीदारुण । लोभझोटिंगएकक्षण । मजउमजघेऊंनेदी ४५ क्रोधमहिषासुरदारुण । कामवेताळेंझडपिलेंपूर्ण । तृ
ष्णामायराणीअनुदिन । सर्वदाहीनसोडी ४६ झालोंमींअत्यंतक्षीण । पंचाक्षरीतूंब्रह्मनंदन । सकळभूतेंटांकींतोडून । ह्मणोनिचरणधरीतसे
४७ अष्टभावेंझालासद्गदित । मगमनींविचारीब्रह्मसुत । रोगपाहूनिवैद्यनिश्चित । दिव्यमात्राकाढीजेवीं ४८ ह्मणेहाअनधिकारीपरम ।
रामऐसेंसांगेनाम । आतांहेंतूंजपेंसंभ्रम । मुख्यवर्मजाणपां ४९ तेंजीवननामजपत । तेथेंचिबैसलाध्यानस्थ । आंगावरीवारूळवाढत
ध्वनीउमटतआंतोनी ५० टोणपियाचावृक्षझाला । तोंनारदबहुकाळेंपातला । त्यातरुवराखालींउभाराहिला । श्रवणींऐकिलानामघोष
५१ वारुळाचेछिद्रामधुनी । रामनाममधुरध्वनी । चातुर्यसमुद्रनारदमुनी । जाणिलेंतेंवृत्तसर्व ५२ मगउकरोनिवारुळ । बाहेरकाढिलातोपुंण्य
शीळ । वर्मकळापाहूनितत्काळ । सावधकेलातेधवां ५३ जैसाभूमीवरीअर्कउतरला । तैसानारदश्रीगुरुदेखिला । धांवूनिचरणकमळालागला ।
पापझालेंसंहार ५४ नामजपतांश्रीरामाचें । दोषगेलेअनंतजन्माचे । जैसेपर्वततृणाचे । अग्निसंगेंभस्महोती ५५ पापेंजळावयासमस्त । ना
माचाप्रतापबहुत । नामाचेनिनजळेनिश्चित । ऐसेंपापनसेची ५६ वाल्मीकेंकेलेंजेंपाप । तेतेंभस्मजाहालेंनामप्रताप । नामापुढेंकायसेंतप ।
तुच्छसर्वसाधनें ५७ जैसापर्वतहोतांसंतप्त । मगद्विजगणनराहतीतेथ । तैसेंनामाग्निपुढेंसमस्त । पापारण्यदग्धहोय ५८ स्वप्नींघडलींदुष्कृतेंब
हुत । तींजागृतींअवघींमिथ्याभूत । तैसेंरामनामसत्य । पापासमूळनाशकरी ५९ तोंवरीतमाचीदाटणी । जोंनुगवेवासरमणी । तोंवरीमदकुंजे

१ धुतऱ्याचें, २ सोन्याचें: ३ कामधेनु. ४ घुबड. ५ केळ. ६ रुई. ७ वाळु. ८ गलबत. ९ स्तंभ. स्वेद. रोमांच. लय. वैस्वर्य. वेपथु. ( कंप. ) अश्रु. वैवर्ण्य.

वारणीं । जोंवरीसिंहदेखिलानाहीं १६० सिंहगर्जेतोंवरीचपाहीं । जोंकलशोद्भवेंदेखिलानाहीं । तोंवरीभूतांचीघाई । जोंमंत्रवादीनदेखिला ६१ तोंवरीपापांचासंभारं । जोंनामींनधरीआदर । नामप्रतापअद्भुतथोर । तरलासाँचारवाल्मीक ६२ असोवाल्मीकह्मणेगुरुनाथा । मीकाळ कैसाक्रमावाआतां । नारदह्मणेरघुनाथकथा । सविस्तारेंवर्णनकरावी ६३ सहस्त्रवरुषांवरी । विष्णुअवतरेलदशरथउदरीं । तयाचेंतूंभाष्यकरीं । शतकोटीसविस्तार ६४ जन्मकाळलीलासर्व । जेजेतूंवदसीलभाव । तैसाचवर्तेलराघव । अवतारठेवअभिनवपैं ६५ शतकोटीग्रंथवाल्मीकेंनि र्मिला । सुरसदिव्यवोतिला । तिहींलोकांसिकलँहलागला । व्यवहारगेलाशिवापासीं ६६ परमचतुरकैलासनाथ । तींठायींसमानवांटिलाग्रंथ । शेवटींदोनअक्षँरेंराहिलींयथार्थ । कंठींधरीउमावर ६७ शीतळउपचारपूर्वीकेले । परितेनाहींसफळझाले । चंद्रबिंबशिरींधरिलें । जटेंतआकळि लीगंगेसी ६८ हिमनगकन्याशीतळसुंदर । अर्धांगींधरीकर्पूरगोर । ठायींठायींवेष्ठिलेफणिवर्र । शीतळथोरह्मणोनियां ६९ गजचर्मअत्यंतशीतळ तेंहीपांघरेजाश्वनीळ । परीनराहेहळाहळ । जाहलेंप्रबळअधिकची १७० महाग्रंथनिवडितांथोर । दोनअक्षरेंनिवडिलींसाचार । तींकंठींधरितांउ मावर । शीतळशरीरजाहलें ७१ हृदयींआठवलारघूत्तम । मुखींस्मरतांराममनाम । मध्येंहळाहळपरम । भयाभीतजाहलें ७२ मुखींरामहृदयींरा म । धाकेंकरूनिझालेंशम । भूषणरूपहोऊनिपरम । शिवकंठींमिरवलें ७३ नामेंतरलावाल्मिक । नामेंतरलेब्रह्मादिक । शीतळझालाकैलास नायक । महिमाअद्भुतनवर्णवे ७४ कितीगोडह्मणावासुधारस । कितीवाढह्मणावेंआकाश । तेजस्वीपरमचंडांश । कितीह्मणोनिवर्णावा ७५ पृथ्वी सउपमाकायद्यावी । पाताळखोलीकितीसांगावी । कितीकनकाद्रीचीउंचीवर्णावी । तैसीनामाचीपदवीअपार ७६कितिवर्णावाविष्णूचाप्रताप । कायसां गावेंशंकराचेंतप । तैसारामममहिमाअमूप । नवर्णवेचिसर्वथा १७७ प्राकृतभाषाह्मणोनी । अव्हेरनकरावापंडितजनीं । जैसींकृष्णावेणींचीतीरेंदोनी । परिउदकएकचिजाणिजे १७८ तैसेंचप्राकृतभाषेंतनिवाडे । श्रीधरवर्णीसंतांपुढें । जैसेंबाळककरीचाळेवेडे । परीआवडतीजननीसी १७९ अ सोवाल्मीकेंरचिलाग्रंथ । भारद्वाजाचेमुखेंसमस्त । असंख्यऋषिश्रवणकरित । ब्रह्मानंदेंकरूनियां ८० हेचिकथाकैलासीं । शिवसांगेहिमवतीसी । पाताळींऋषिकद्रवेयकुळासी । भोगींद्रसांगेहेचिकथा ८१ घटोद्भवाचेमुखेंदिवसरजंनीं । ऋषिश्रणकरितीकर्दळीवनीं । कींपुरुषखंडींस्वमुखेंकरूनी । वानरांसिसांगेहनुमंत ८२नाराप्रतिसरसिजोद्भव । सांगेरामकथाअभिनव । बदरिकाश्रमींऋषिसर्व । व्यासमुखेंऐकती ८३ तैसेंप्राकृतआणिसंस्कृत ।

१ अगस्ति. २ पंचाक्षरी. ३ समुदाय. ४ खरा. ५ अभिप्राय. ६ कलह, तंटा. ७ राम हीं दोनअक्षरें. ९ विश्रांति. १० रात्रदिवस.

दोनीमाजीएकचिअर्थ ।जैसादोनीस्त्रियांचाएकनाथ दोनीहस्तएकाचेची ८४ दोनीदाढाएकचिस्वर । पाहाणारएकदोननेत्र । किंवादोनपात्रांतप
वित्र । एकचिदुग्धघातलें ८५ जैसेंत्रिवेणीभरलेंउदक । दोनपात्रींगोडीएक । एकसुवर्णकूपिकाअलोलिक। एकताम्रधातूचीघाडियेली ८६दोनी
कूपिकानेऊनिउदक । श्रीरामेश्वरासिकेलाअभिषेक । दोनीधातूमाजीउदक । देवासिसमचिआवडे ८७ अबळांनकळेसंस्कृतवाणी । जैसेंआड
तीलपाणी । परीदोरपात्रावांचुनी । अशक्तजनाकेविनिंघे ८८ तेंतडागासियेत्वरें । तात्काळचितृषाहरे। भोळेजनतारावयाईश्वरें । प्राकृतग्रंथनिर्मि
ले ८९ मुख्यसंस्कृतपाहावे । परितेंअबळांनेणवे । महागजकैसाबांधवे । कमळतंतुघेऊनी १९० सर्वांसमान्यगीर्वाण । जरीअसेलपूर्वपुण्य ।
तरीतेथींचेंहोयज्ञान । तरीअबळाजनकेवितरती १९१ उत्तमवस्त्रेंलेतनृपती ।तींदुर्बळासिप्राप्तनहोती । मगघोंगडीपांघरती । शीतउष्णानिवारण १९२
जैसेंमाथितांदुग्धबहुत । त्यांतूनिनिघेनवनीत । कींस्वातीजळापासोनिअद्भुत । मुक्ताफळेंनिपजती १९३ कींइक्षुदंडाचेपोटींशर्करा । रसनेसगोडीते
चिविचारा । कींराजापासूनिराजपुत्रा । मान्यताहोयबहुतची १९४ माहाराष्ट्रींचेंवचननिश्चित । परीअत्यंतरसभरित । मधुमक्षिकांचेमुखींस्त्रवत ।
मधुसुरसजैसाकां १९५ गीर्वाणहेंशशिमंडळअद्भुत । त्याचीप्रभाहीप्राकृत । संस्कृतग्रंथवर्णितीपंडित । अर्थप्राकृतकरितीकीं १९६ अर्कीवृक्षींमधुघट
जरीभरतीलयथेष्ट । तरीगिरिकंदरींकरावयाकष्ट । कायकारणधांवावें १९७ सिकतेमाझीदिव्यरत्न । जरीसांपडेनकरितांप्रयत्न । तरींचतुरेंकरावें
जतन । किंवाअव्हेरकरावा१९८ कष्टेंवीणराज्यआलेंहाता । तरीकांहोसोडावेंतत्वता । प्राकृतभाषाऐकोनिकथा। लाभश्रोताघेइजेतेवी १९९ मुक्ता
फळांचीउत्तममाळा । वरीसुगंधहीसुटलाआगळा । तरीचतुरींकांनघालवीगळां। अतिआवडीकरूनी २०० आधींचइक्षुदंडगोडे । वरीआलेसाख
रेचेखडे । तैसीरघुनाथकथारससुवाडे । त्यावरीसाहित्यपुरविलें १ आतांश्रोतींव्हावेंसावधान । वाल्मीकमाहाराजगेलेकथून। तेचिश्रीरामकथासं
पूर्ण । मूळापासूनिऐकिजे २ दृष्टींनपाहतांअवघाग्रंथ । उगाचदोषठेवितीअद्भुत । तेशतमूर्खजाणिजेनिश्चित । नव्हतीपंडितविवेकी ३ ग्रंथनामरा
मविजय । श्रवणेंसदापाविजेजय । चिंतितमनोरथसिद्धहोय । एकआवर्तनकरितांची ४ आदिपुरुषश्रीअवधूत । तोचब्रह्मानंदयथार्थ । श्रीधरव
रदेंअद्भुत । महिमाकोणानवर्णवे ५ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मिकीनाटकाधार । सदांपरिसोतभक्तचतुर । प्रथमोध्यागोडहा
॥ २०६ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु । अध्याय १ ओव्या २०६ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

---

१ लोक. २ मोत्यें. ३ ऊंस. ४ जिव्हा. ५ मधुमाशी.

श्रीगणेशायनमः । श्रीसीतारामचद्राभ्यांनमः । जैसेमानससरोवरवेष्टित । मराळदिसतीशोभिवंत । तैसेश्रवणासिबैसलेसंत । लोचनअनंतज
यांसी १ श्रवणाबैसतांसंतसज्जन । वाचेसिपारणेंहोयपूर्ण । जैसाइंदुविलोकून । सँरितानाथउचंबळे २ कींवर्षाकाळींगंगेसिपूर । कींघन
गर्जतांनाचतीमयूँर । कींवसंतदेखोनिसुंदर । कोकिळागर्जेंआनंदें ३ कींरवींदेखतांकमळेंविकाशती । कींदातादेखोनियाचकहर्षेंचित्तीं । तैशा
देखोनिसंतमूर्ती । वाग्देंवीसआनंद ४ जैसीइंद्रापुढेंरंभा । दावीनृत्यकौतुकशोभा । तैसींदेखतांसंतसभा । वाग्वल्लीआनंदे ५ कैसेद्या
वेंदृष्टांत । हेंमीनेणेंनिश्चित । परिमाझेअन्यायसमस्त । संतींपोटांतघालावे ६ शिवकंठींहाळाहळ । कींसागरापोटींवडवाँनळ । कींसृष्टीचा
भारसकळ । पाताळींकूर्मेंधरियेला ७ सकळांप्रकाशेजैसाशँशी । परिद्बितीयेसिलोकवाहातीदशी । कींहिमनगजामार्तासी । धरत्तूपुष्पेंसमर्पि
ती ८ तैसेंचिहेशब्दनिश्चित । सज्जनींहृदयींधरिलेसत्य । असोप्रथमाध्यायींगतकथार्थ । उद्धरिलावाल्मिकनारदें ९ श्रीरामकथेचाआरं
भयेथुनी । जेंविमूळसंकीर्णकृष्णावेणी । परीपुढेंविशाळसमुद्रगामिनी । जाणिजेसज्जनींकथातैसी १० कमळोद्भवापासूननिश्चिती । पुत्रझाला
त्यानामपौलस्ती । महातपस्वीजैसागभस्ती । चारीवेदज्यासीमुखोद्गत ११ तृणबिंदुकन्यादेववर्णी । तेपौलस्तीचीजाणगृहिणी । विश्रवातिजपा
सुनी । पुत्रझालाविख्यात १२ भारद्वाजकन्यामहासती । तीदीधलीविश्रव्याप्रती । तिचेपोटींनिश्चिती । कुबेरपुत्रजन्मला १३ विश्रव्यापा
सूनजन्मपूर्ण । म्हणोनिनामवैश्रवण । तेणेंतपकरूनदारुण । चतुराननवशकेला १४ कमळासनसंतोषोन । पौत्रपुत्रह्मणोन । लंकापुरतया
देऊन । सागरोदरींस्थापिला १५ पूर्वीविधीनेंलंकानिर्मिली । तीदानवेंबळेंचिघेतली । मागुतीनिर्जरींसोडविली । मगदीधलीकुबेरातें ।
१६ तोंपाताळींचादैत्यसुमाळी । विप्रवेषेंआलाभूमंडळीं । लंकादेखोनितयेवेळीं । मनामाजीआवेशला १७ ह्मणेहीलंकाआमुचीनिश्चित ।
हाकोणयेथेंराज्यकरित । समाचारघेतांझालेंश्रुत । सर्ववृत्ततयाचें १८ कुबेरदेखोनिसुंदर । दैत्यकरीमगविचार । याचेपित्यासिसाचार ।
कन्यादेऊंआपुली १९ तिजपासूनिजेहोतीसुत । तयांसाह्यहोऊनिसर्वदैत्य । हेंलंकाराज्यसमस्त । हिरोनिघेऊंक्षणार्धें २० ऐसासुमाळी
दुर्जन । विप्रवेषअवलंबून । आलालटिकीचशांतीधरून । कपटीपर्णदुरात्मा २१ कींगोरियाचेंगायन । कींदांभिकाचेंवरीवरीभजन । कींधन
लब्धाचेंतत्वज्ञान । परधनहरणार्थ २२ जैसानटाचावेषजाण । कींविषाचेंशीतळपण । कींसावचोराचेंगोडवचन । परप्राणहरणार्थ २३ कीं

---

१ राजहंस. २ चंद्र. ३ नद्यांचा पति समुद्र. ४ मोर. ५ सरस्वतीस. ६ वडवाग्नि. ७ चंद्र. ८ शंकर. ९ लहान.

वरिवरीसुंदरवृंदावन । किंवाःबकाचीशांतीपूर्ण । कींवेश्येचेंमुखमंडण । कामिकमनहरणार्थ २४ कींसाधुवेषधरूनशुद्ध । यात्रेसिफिरतीजैसे मैंद । कींवाटपाडेरजनीशुद्ध । सिद्धहोऊनिबैसती २५ असोऐसासुमाळीपापराशी । आपुलीकन्याकैकसी । घेऊनिआलाविश्रव्यापासीं । प्रार्थूनित्यासीदीधली २६ ह्मणेमीअकिंचनब्राह्मण । एवढेंध्याजीकन्यारत्न । ऋषीनेंकापटचनेणोन । लाविलेंलग्नतियेसी २७ दैत्यगेले स्वस्थानासी । एकेदिवसींतेपतीसी । सूर्यजाताझालाअस्तासी । भोगमागतीपैंझाली २८ जीसंध्याकाळींहोतगर्भिणी । तरीमहातामसी जन्मेप्राणी । तोहोमकाळसाधुनी । भोगदेईह्मणतसे २९ स्वस्त्रीसभोगनेदीजरी । तरीबाळहत्यापडेत्याचेशिरीं । परीहोमद्यावयादुराचारी । जाऊंनेदीऋषीतें ३० परमक्षोभोनियांऋषी । अंगसंगकेलातियेसीं । ह्मणेतूंविप्रकन्यानव्हेसी । महातांमसीपापरूपे ३१ ब्रह्मराक्षसतु झेउदरीं । पुत्रहोतीलदुराचारी । तीपतीचेचरणधरी । एकसुपुत्रदेइंजे ३२ रावणआणिकुंभकर्ण । तिसराभक्तराजविभीषण । जोपिर्तृवरदेंकरून साधुपूर्णपैंझाला ३३ कुंभकर्णजेव्हांजन्मला । मुखपसरोनीटाहोफोडिला । तेणेंभूगोळथरारिला । प्रळयगमलाजीवांसी ३४ ताटिकाशूर्पणखाभगिनीजाण । त्यांततोरत्नविभीषण । जैसाकागविष्ठेंतअश्वत्थपावन । केवळस्थानविष्णूचें ३५ वायसांतकोकिळाश्रेष्ठकेवळ । कींशिंपीमाजीमुक्ताफळ । कींदैत्यकुळींभजनशीळ । प्रऱ्हादपूर्वीजन्मला ३६ यावरीगोकर्णक्षेत्रींजाऊन । तिघेकरितीअनुष्ठान । रावणेंआराधिलापार्वतीरमण । कुंभकर्णेंकमळोद्भव ३७ श्रीविष्णूचेंआराधन । करिताझालाविभीषण । ब्रह्मदेवयेऊनवरदान । देताझालातिघांतें ३८ रावणमागेवरदान । इंद्रादिकदेवसंपूर्ण । यांसींबंदिशाळेरक्षीन । वर्तावेंतिहींममआज्ञें ३९ संपत्तीसंततीविद्याधन । व्हावेंसकलकलाप्रवीण । यावरीकुंभकर्ण । वरमागेअपेक्षित ४० तोंदेवझालेउद्विग्न । कायमागेलकुंभकर्ण । कींहेंचराचरभक्षिन । ऐसेंवरदानमागेलकाय ४१ किंवागिळीनह्मणेलभूगोळ । कींदाढेघालीलऋषिमंडळ । मगसरस्वतीतेंदेवसकळ । प्रार्थितेझालेतेधवां ४२ तूंजिव्हाग्रींवससीदेवी । तरीत्यादुष्टासिभ्रांतीघालावी । लोकसुखीराहिजेसर्वी । ऐसेंवदवावेंसरस्वती ४३ कुंभकर्णआधींचराक्षस । वरीसरस्वतीभ्रांतीघालीविशेष । तोंविधीह्मणेघटश्रोत्रास । अपेक्षितमागकांहीं ४४ मगबोलेकुंभकर्ण । मजनिद्रादेकांसंपूर्ण । अखंडकरीनमीशयन । चतुराननअवश्यह्मणे ४५ तत्काळनिद्रायेऊन । पडिलाजैसाप्राणहीन । सुषुप्तीमाजीसर्वज्ञान । बुडोनगेलेंतयाचें ४६ मंदराचळआडवापडिला । कींमहावृक्षउन्म

१ कंवडळ. २ मुखशोभा. ३ कामातुर लोक. ४ रात्र. ५ दरिद्री. ६ विषयभोग. ७ तमोगुणानें युक्त. ८ बाप.

ळिला । निद्राभरेंघोरूंलागला । तेणेंदिशाघुमघुमिती ४७ ह्मेसहस्तीश्वापदेंकानीं । श्वासासरसींप्रवेशतीघ्राणीं । उश्वासटाँकितांधरणीं । बाहे
रपडतीआरडत ४८ निद्रादेहाचीसमाधीजाण । निद्राजीवात्म्याचेंआवरण । कींभ्रांतीचेंविश्रांतिस्थान । कींअज्ञानमूर्तिमंत ४९ निद्रातस्करा
चीसाहकारी । ध्यानअनुष्ठानाविघ्नकरी । चातुर्यविद्याकळाकुसरी । निद्रेमाजीबुडतीपैं ५० निद्रामरणाचीसांगातिणी । निद्राजीवाचीविश्रांति
कारिणी । निद्रासकळकार्यनाशिनी । आयुष्यहिरूनिनेतसे ५१ स्थूळसूक्ष्मकारणेंपाहीं । बुडोनिजातीसुषुप्तीडोहीं । असोकुंभकर्णासशुद्धनाहीं
जागाकधींनव्हेची ५२ कुंभकर्णनिद्रासागरीं । बुडोनिगेलाअहोरात्रीं । पितांदेखोनिचिंताकरी । ह्मणेव्यर्थजन्मयाचा ५३ मगतेणेंप्रार्थिला
कमळासन । मागतसेवरदान । षण्मासझालियाएकदिन । सर्वसुखभोगील ५४ असोविभीषणासिचतुर्दक्र । ह्मणेमागइच्छितवर । तंवतोसत्व
शीळपवित्र । कायबोलताझालापैं ५५ ह्मणेसत्समागमसच्छास्त्रश्रवण । दयाक्षमाउपरतीभजन । निंदावादद्वेषगाळून । विष्णुचिंतनकरीनमी
५६ आशामनशातृष्णाकल्पना । भ्रांतीभुलीइच्छावासना । यांचात्यागहोऊनिमना । विष्णुचिंतनकरीनमी ५७ कामक्रोधमदमत्सर । मोह
लोभअहंकार । हेदूरकरूनिसाचार । विष्णुचिंतनकरीनमी ५८ धन्यधन्यविभीषणाचीस्थिती । केवळवोतिलीसुखमूर्ती । कींभक्तिरूपश्रीराम
कीर्ती । विस्तारिलीआधींपुढें ५९ सूर्याआधींउगवेअरुण । कींज्ञानाअगोदरभजन । कींभजनाआधींवैराग्यपूर्ण । तैसाविभीषणजन्मला ६०
कींतपाअगोदरशुचित्वपूर्ण । कींबोधाआधींसत्वगुण । कींसत्वाआधींअद्भुतपूर्ण । पुंण्यजैसेंप्रकटलें ६१ कींसाक्षात्काराआधींनिदिध्यास । म
ननाआधींश्रवणविशेष । श्रवणाआधींसुरस । आवडीपुढेंठसावे ६२ कींशमदमाआधींविरक्ती । कींआत्मसुखाआधींशांती । कींशमवि
विषमप्राप्ती । पुढेंजैसीठसावे ६३ तैसाआधींजन्मलाविभीषण । जैसेंफळाअगोदरसुमन । विधीसंतोषलाऐकोन । ह्मणेवंशधन्ययाचेनी ६४
रामउपासकजेसंत । तयांचींलक्षणेंहींचनिश्चित । अमानित्वअदंभित्व । अहिंसादिसर्वगुणजेथें ६५ अंतरनिग्रहकरून । शांतिरसेंभरलेंपूर्ण ।
आत्मस्तुतीमनांतून । स्वप्नींजयानावडे ६६ दोषगुणदुजयाचेकरिती । हेंकधींनावडेजयांचेचित्तीं । परांचेउत्तमगुणवानिती । नविसंबतीकदाही
६७ गर्वनेणेअणुमात्र । कोणासिनबोलेनिष्ठुर । आपुलीनिंदाऐकतांसाचार । तिरस्कारनउपजेची ६८ जैसेमेघक्षारजळप्राशिती । परीपृथ्वीव
रीगोडवर्षती । धेनुतृणभक्षोनिदेती । क्षीरअमृतासारिखें ६९ इक्षुदंडासिघालितीखात । तरीगोडहोयरसभरीत । गंगापापजाळूनदेत । पुंण्यतैसे

१ चार. २ विश्रवा. ३ मन. ४ दुसऱ्याचें.

संतजाणावे ७० परिसलोहकाळिमाझांकून । तत्काळकरीसुवर्ण । तैसेचिमहाराजसज्जन । परदोषानलिंपती ७१ जैसीकुळवंतकामिनी । अ
वयवझांकीक्षणोक्षणीं । तैसेंआपुलेंसुकृतझांकोनी । सज्जनजनठेविती ७२ ऐसेजेलक्षणयुक्त । तैसाविभीषणपरमभक्त । तयासिविष्णुनोंभसत्य
वरदेताजाहला ७३ विरिंचीह्मणेसाचार । तुजभेटेलश्रीरघुवीर । तोचिरंजीवकरीलनिर्धार । शशीमित्रअसतीजों ७४ रावणकुंभकर्णतेवेळे
मेळवूनअपारदळें । प्रहस्तमहोदरपातले । प्रधानझालेरावणाचे ७५ विद्युज्जिव्हजंबुमाळी । वज्रदंष्ट्रविरूपाक्षबळी । खरदूषणत्रिशिरासक
ळी । विद्युन्मालीमाल्यवंत ७६ मत्तमहामत्तयुद्धोन्मत्त । शुकसारणदुर्धरसमस्त । बळमहाबळधांवत । रावणावेष्टितसर्वही ७७ सकळ
दळभारघेऊन । लंकेवरीगेलारावण । कदांनाटोपेवैश्रवण । बहुतयुद्धकरितांपैं ७८ मगरावणेंकायकेलें । पितयाचेंपत्रआणविलें। कुबेरासिपा
ठविलें । येरेंवंदिलेंमस्तकीं ७९ उकलोनिवाचीवैश्रवण । आंतलिहिलेंवर्त्तमान । तुझासापत्नबंधुरावण । लंकाभुवनयासदीजे ८० पितृआ
ज्ञातेवेदवचन । मानूनिनिघालावैश्रवण । सकळसंपत्तिपुष्पकींघालून । विरिंचीपासींगेलापैं ८१ मगकनकाद्रीचेपाठारीं । निर्मूनिअलकानंदन
पुरी । कुबेरतेथेंतेअवसरीं । विष्णुसुतेंस्थापिला ८२ मयासुरेंमंदोदरीआणिशक्ती । देताझालारावणाप्रती । दीर्घज्वालाबळीचीनाती । ती
दीधलीकुंभकर्णा ८३ सरमानामेंगंधर्वकन्याजाणा । तीदीधलीविभीषणा । सकळभूपशरणरावणा । लंकेसियेतीभयेंची ८४ रावणें
सर्वदेशजिंकिले । गायीब्राह्मणासिधरूनिबळें । मुखींघालोनियांसगळें । दाढेखालींरगडित ८५ कोठेंलपावयानाहींस्थान । सांपडतीतेथेंभ
क्षीजाण । मगकुबेरेंस्वर्गींहून । सांगोनिपाठविलेंरावणा ८६ कुबेराचेसेवकबोलतीवचन । तुह्मींऋषिपुत्रवेदसंपन्न । टांकिलींवेदाचींखंडेंकरून ।
शास्त्रज्ञाननसेतुह्मां ८७ आह्मींजाणतेयासर्वसृष्टीं । ऐसाअभिमानवाहतांपोटीं । गोब्राह्मणदेखतांदृष्टीं । मारितांहाअधर्म ८८ समजोनियां
शास्त्रार्थ । मगकर्मकरीअनुचित । त्यानाहींपरत्रयथार्थ । भोगीलअनर्थअनेकतो ८९ अवलक्षणीकुरूपदेख । दर्पणींनपाहेआपुलेंमुख । तोंवरी
अभिमानअधिक । स्वरूपाचावाहतसे ९० तैसेदोषआचरती । मगधर्मशास्त्रविलोकिती । वीटमानूनियांचित्तीं । नवलरीतीहेवाटे ९१
ऐसेंबोलतांकुबेरदूत । रावणक्रोधावलाअद्भुत । व्याघ्रमुखींमुष्टिघात । ताडितांजेविखवळेपैं ९२ असोसक्रोधझालारावण । सकळदळभारसिद्ध
करून । रात्रीमाजीजाऊन । घालाकुबेरावरीघातला ९३ पदींताडिलामहाउरग । कींशुंडापिळितांमातंग । कींघृतेंशिंपितासवेग । पावकजैसा

१ स्त्री. २ ब्रह्मदेव. ३ चंद्र. ४ सूर्य. ५ कुबेर. ६ विश्रवा. ७ पुष्पक या नामें विमान.

खवळेपैं १४ तैसापरमक्रोधावलारावण । त्यांतकेलेंमद्यपान । सर्वद्रव्यहिरून । कुबेराचेंघेतलें १५ गजरथआणिपुष्पक । वस्तुहरिल्या सकळिक । मगतोकुबेरतात्काळिक । गेलाशरणशक्रातें १६ मगतयाकुबेराला । शक्रेंकोशगृहींठेविला । असोरावणापुत्रझाला । मेघनादप्रथ मची १७ एकलक्षपुत्रसंतती । सवालक्षपौत्रोत्पत्ती । ऐशींसहस्त्रयुवती । भोगितांरावणनधाये १८ अठराक्षोणीवाजंत्री । गर्जतातिअहोत्री । पृथ्वीचेभूपमहाद्वारीं । करजोडोनिउभेसदा ९९ अस्ताजातांदिनकर । कर्पूरदीपिकांआठसहस्त्र । पाजळोनिसभेसमोर । निशाचरतिष्ठतो १०० इंद्राचियाभयेंपर्वत । रावणासिशरणयेत । शक्रआमुचेपक्षछेदित । रक्षींत्वरितआह्मासी १ लंकेशतयांसीअभयदेत । तुह्मीगजव्हाअवघेपर्वत । समस्तअचळांमामलीमात । झालेउन्मत्तवारण २ रावणदेवावरीचालिला । मेघनादेंइंद्रतेवेळां । ऐरावतीसगटपाडिला । निजबळेंरणांगणीं ३ ऐसा सहस्त्रवेळासहस्त्रनेत्र । जिंकीमंदोदरीचापुत्र । मगइंद्रजितनामथोर । ब्रीदद्दढबांधिलें ४ पाशघालोनिपाकशासन । इंद्रजितेंआणिलाबांधोन मगविरिंचीआलाधांवोन । होयप्रसन्नशक्रजिता ५ अपेक्षितदेऊनिवर । सोडविलातेव्हांपुरंदर । मगरावणेंदेवसमग्र । सेवेलागींठेविले ६ शक्रेंआणावेनित्यहार । छत्रधरीरोहिणीवर । रसाधिपतीनिरंतर । वाहेनीरधांवतची ७ गभस्तीहोयद्वारपाळ । कुबेरआणिअनिळ । यांहींसडासंमार्जनसकळ । गृहामाजीकरावें ८ वस्त्रेंधूतवैश्वानर । पुरोहितजाहलाविष्णुपुत्र । पांडित्यकरीअंगिरापुत्र । नारदतुंबरगातीसदां ९ दाहावेळशिवपूजिला । रावणदशवक्त्रेंपावला । वीसहस्तपैंलाधला । शिवहीकेलावशतेणें ११० कोणेएकेसमयींरावण । पुष्पकविमानींबैसोन । कैलासगिरींचढतांपूर्ण । तोंनंदीरक्षणमहाद्वारीं ११ ह्मणेनकोजाऊंलंकापती । शिवउमाआहेतएकांतीं । ऐसेंऐकतांमयजापती । परमक्षोभपावला १२ नंदीसह्मणेतेवेळे । तुजमर्कटाचेनिबोलें । मीनराहेंकदाकाळें । जाईनबळेंकरूनियां १३ ऐसेंबोलतांदशकंधर । कोपलातेव्हांनंदिकेश्वर । शापशस्त्रेंताडिलेंसत्वर । दशकंठासीतेधवां १५ ह्मणेउन्मत्ततूंमूढमती । तुजनरवानररणींवधिती । तुवांदशरुद्रकेलेनिश्चिती । अकरावामारुतीप्रकटेल १५ तोवानररूपेंकरून । करीलतुझेंगर्वमोचन । ऐकतांक्रोधावलारावण । ह्मणेहाउपडीनकैलासगिरी १६ उचलोनियांशिवपर्वत । लंकेंतनेयीनक्षणांत । ह्मणोनितळींघातलाहात । सहमूळउचलावया १७ तेंजाणोनिहिमनगजामात । निजपदेंरगडिलापर्वत । सहस्त्रवर्षेंपर्यंत । आक्रंदतरावण १८ मगकरितांशिवाचेंस्तवन । प्रसन्नझालात्रिनयन । दशवक्त्रदीधलासोडून । आलापरतोनीलंकेसी १९ एकदांरेवातीरींध्यानस्थ । बैसताझालामयजाकांत

---

१ राजे. २ सूर्य. ३ मशाली. ४ राक्षस. ५ इंद्र. ६ हत्ती. ७ इंद्र.

पुढेंशिवलिंगविराजित। तोंपाणीचढतमाघारें २० सहस्रार्जुनेंनिजभुजेंकरून। कोंडिलेंनर्मदेचेंजीवनें। ध्यानकरितांरावण। आकंठवरीबुडाला २१ परमक्रोधावलादशमौळी। धांवोनिआलातयाजवळी। ह्मणेकोणरेतूंयेस्थळीं। रेवाजळकोंडितोसी २२ सहस्रार्जुनेंकवघालून। ग्रीवेसिधरिलादश वदन। कींमृगेंद्रेंधरिलाहरिण। झालेप्राणकासाविस २३ बहुतकाळबंदींघातला। मगपौलस्तिऋषीधांविन्नला। भिक्षामागोनितेवेळां। सोडविला राक्षस २४ बळीचियानगरादेख। बळेंचिआलालंकानायक। जैसाठ्यांळाचेबिळींमूषकं। चाराघेऊंप्रवेशला १२५ तोंबळीचियामहाद्वारीं। एकपुरुषउभादंडधारी। ज्याचियातेजामाझारी। शशिमित्रझांकोळती २६ तोमहाराजत्रिविक्रम। देखोनिबळीचेंनिजप्रेम। द्वारपाळझालापुरुषोत्तम। अजअजितजगद्गुरू १२७ मगतयासिह्मणेरावण। बळीसआणबोलाऊन। नाहींतरीहेनगरीउचलोन। पालथीघालीनसागरीं। १२८ मगह्मणेवैकुंठविलासी। तूंबळीचाप्रतापनेणसी। आतांचयेईलप्रत्ययासी। जायवेगेंसीआतौता १२९ मगआंतप्रवेशलात्वरित। तों सभेसिबैसलाविरोचनसुत। तयासह्मणेलंकानाथ। करावयासमरपातलोंमी १३० जैसातृणाचाशुष्कपुतळा। धरावयाआलावडवानळा। कीं वृषभंबळेंमाजला। खोंचूंधांवलासिंहासी १३१ व्याघ्रासिधरीनह्मणेबस्त। अंळिकासुपर्णासीधरूंधांवत। ऐरावतीचामोडावयादंत। शलभंजै सासरसावला १३२ वृश्चिकधांवेसत्वर। ताडावयाखदिरांगार। खद्योतह्मणेदिनकर। आसडूनपाडीनखालता १३३ तैसाबळीप्रतिरावण। सांगेआपुलेंथोरपण। कींसरस्वतीपुढेंमतिमंदेंयेऊन। वादविवादआरंभिला १३४ हांसोनिबळीह्मणेतेवेळे। यावैकुंठनाथेंद्वारपाळें। पूर्वी नरसिंहरूपधरिलें। प्रऱ्हादभक्तरक्षावया ३५ नरसिंहेंगदाघायेंकरून। हिरण्यकशिपूचेंघेतलेंकर्णभूषण। तींकुंडलेंपंथींपडिलींउसळोन। तींउचलूनघेईंतूं ३६ तींउचलूंगेलादशकंधर। बळेंलाविलेंवीसहीकर। जैसामशकानउचलेकुंजर। तैसेंझालेंरावणासी ३७ निस्तेजझालातेवेळीं। तोंबळीचीराणीविंध्यावळी। सारिपाटखेळतांप्रीतीमेळीं। फांसाहातींचाउसळला ३८ तोंबळीह्मणेरावणासी। फांसाआणीवेगेंसी। परीतोहीनउचलेतयासी। राक्षसासीखेदवाटे ३९ गदगदांहांसतीदोघेंजणें। बंदींघातलेह्मणतीदेवयाणें। येथेंआलायुद्धाकारणें। तोपाशैंयासीनुचलेची ४० झालापरम अपमान। माघारांचालिलादशवदन। तोंमार्गींबळीचेसेवकर्जन। त्याणींरावणनागविला ४१ घेतलींवस्त्रेंशस्त्रेंहिरून। मुखासितेलमसीलावून। वीसहस्तबांधोन। नगरामाजीहिंडविती ४२ एकआंगावरीधुळीटांकिती। एकदाढीधरूनओढिती। एकबळेंबैसविती। एकउठवितीसवेंची ४३

---

१ उदक. २ सिंह. ३ सर्प. ४ उंदीर. ५ वामन. ६ वडवाग्नि. ७ बैल. ८ बोकड. ९ कीड. १० गरुड. ११ ढोळ. १२ विंचु. १३ काजवा. १४ सूर्य. १५ रावण. १६ हत्ती. १७ फांसा. १८ चाकर

एककरितीशेणमार । काकुळतीयेतदशकंदर । पळोंपाहेजंवबाहेर । तंवद्वारपाळजाऊंनेदी ४४ क्षुद्रद्वारमोरियेमधून । मस्तकघालीजंवरावण ।
तंवसर्वांठाईंवामन । दंडवरीमारित ४५ बळीचेअश्वशाळेंतरावण। क्षुधाक्रांतहिंडेजैसापवन । चणेखातसेवेंचून । मागेकोरान्नघरोघरीं ४६ पो
टासाठींघरोघरजाऊन । ह्मणेमीमल्हारीचाश्वान । कोठचेंचौंडकेंकांखेघेऊन । नाचोनिधान्यमेळवी ४७ तोंदासीनींधरिलाकौतुकें । उदकआणि
तांघातलाकांखे ।काकुळतीयेतदशमुखें । मगसोडिलीसत्वर ४८ मगविश्रंवाधांवोन । बळीसभेटलायेऊन । बंदीसघातलारावण । तोभिक्षेसमजदे
ई ४९ बळीबोलेआणवाहून । येथेंकोणासनाहींबंधन । ग्रामांतहिंडतअसेलरावण । तोशोधूननेईजे १५० तोंबळीचेअश्वंशाळेंतदेखिला। पिता
देखोनिरडूंलागला। मगऋषीनेंवामनस्तविला । सोडवूनिनेलारावण ५१ परमलज्जितअधोवदन । लंकेसिआलापरतोन। मागुतीपराक्रमधरून।
ह्मणेमींजिंकीनवालीतें ५२ तोंसमुद्रतीरींशक्रसुत। बैसलाअसेध्यानस्थ । त्यासिधरावयालंकानाथ । पुष्पकांतूनउतरला ५३ जैसापंचाननापुढें ।
मार्जारदावीआपुलेपवाडे । कींपंडितापुढेंमूढें। वाग्वादआरंभिला ५४ कींरासभेंऐरावतीद बांधोन । नारदापुढेंमांडिलेंगायन । महाव्याघ्रावरीटवकारोन।
जंबुकजैसापातला ५५ तैसावालीपुढेंउभारावण । सावधहोतांशक्रनंदन। दशग्रीवातेंग्रीवेसिधरून । कक्षेमाजीदाटला ५६ चतुःसमुद्रींकरू
निस्नान । किष्किंधेसिआलापरतोन । अंगदाच्यापाळण्यावरीनेऊन । उफराटारावणबांधिला ५७ क्षणक्षणाधरूनिदाढी । अंगदबाळभावेंउप
टी । मगविश्रंवाधांवेतांतेंडी । भिक्षामागेवालीतें ५८ मगमुखासिकाळेंलाऊन । वालीनेंदीधलाभिरकावून । लंकेसिपडलायेऊन । खेदबहुतकरीमनीं
५९ एकदांरावणपुसेविरिंचीतें। आमुचामृत्युकोणाचेहातें। तेंसत्यसांगावेंआह्मांतें। स्नेहचित्तेंकरूनियां १६० विधिह्मणेअजपाळसुत। त्याचेंनामवि
ख्यातदशरथ । त्यासपुत्रहोईलरघुनाथ। तुझाअंतत्याहातें ६१ रावणेंकेलामगपण। तरिमीदशरथासिवधीन। तोंअजपाळपुत्रींचेंलग्न। मांडिलेंअसे
गजरेंसी ६२ नारदसांगेअजपाळा । जतनकरींदशरथकौशल्या । सोहळयामाजीरावणघाला । अकस्मातघालील ६३ ऐसेंसांगतांकमळोद्भवसु
त । मगजाहाजघालूनिसमुद्रांत । लग्नआरंभिलेंतेथ। महागजरेंकरूनियां ६४ सागरामाजीहोतेंलग्न । रावणेंहीगोष्टऐकून । तंवतोअष्टवर्गाचादिन
घातलाघालारात्रींत ६५ जैसेअंतरिक्षपक्षीयेती । तैसेराक्षसजाहाजफोडिती । उड्यामारितीहांकादेती । गदापर्वतघातेंची ६६ वऱ्हाडसर्वबुडवि
लें। रावणेंकौसल्येसिघेतलें । जीचेंस्वरूपनजायवर्णिलें । तीसघातलेंपेटींत ६७ पेटीलंकेसिनेतांरावण। राक्षसेंबोलाविलाएकमीन। तोबाहेरआला

१ दहा. २ रावणाचा बाप. ३ घोड्यांची पागा. ४ वाली. ५ विमान. ६ सिंह. ७ मांजर. ८ गाढव. ९ कोल्हा. १० बाप. ११ सत्वर. १२ पुत्र. १३ दशरथ. १४ नारद.

सागरांतून । त्यासिरावणआज्ञापी ६८ हीपेटीकरावीजतन । कोणासनद्यावीमजवांचून । लंकेंतप्रवेशलारावण । तीवस्तुजतनमत्स्यकरी ६९ समुद्राचेगहनेंबेटीं । जेथेंनपडेकोणाचीदृष्टी । तेथेंमत्स्येंठेऊनिपेटी । गेलाआपणस्वकार्या १७० कैंचासोहळाकैंचेंलग्न । लोकसमग्रगेलेबुडोन । तरीदशरथसमुद्रांतून । उफाळलाअवचिता ७१ त्याचेपोटींयेणारश्रीराम । दुर्गमतोचिहोयसुगम । विषतेंअमृतहोयउत्तम । अपायतोचिउपाय ७२ देवजरीहोयदयाळ । तरीअंतरिक्षचढेपांगुळ । आंगणींच्यालंतासकळ । कल्पवृक्षत्याहोती ७३ दशरथपाहेसमुद्रांत । तोंभंगलेंजाहाजअकस्मात । वाहातवाहातआलेंतेथ । त्यावरीदशरथबैसला ७४ वायुवेगेंजाहाजगेलें । त्याचबेटासीयेऊनिलागलें । दशरथेंपेटीतेवेळे । सहजलीलेंउघडिली ७५ तोंआंतकौसल्यानिर्धान । पाहतांवेधलाअंजनंदन । तोंनारदअकस्मातयेऊन । उभाठाकेतेवेळीं ७६ जयासिभूतभविष्यसर्वज्ञान । तेणेंमुहूर्तवेळापाहून । तत्काळदोघांसिलाविलेंलग्न । विधियुक्तविधिसुतें ७७ वोहरांसिआशीर्वाददेत । जोवैकुंठवासीरमाकांत । तुमचेपोटींअवतरेलसत्य । भयाभीतहोऊंनका ७८ दोघेंपेटींतबैसवून । वेगेंगेलाब्रह्मनंदन । तोंलंकेंतदशवदन । कमळासनाप्रतिसांगे ७९ तुवांजेंभविष्यकथिलें । तेंअवघेंचिअसत्यझालें । जाहाजफोडूनलोकबुडविले । हिरोनिआणिलेंकौसल्येसी १८० मगबोलेचतुरानन । मघांचिदोघांसिलाविलेंलग्न । कदांनटळेब्रह्मवचन । कल्पांतींहीदशवक्त्रा ८१ येरूम्हणेजरिझालेंअसेललग्न । तरीमीतुजइच्छितदेईन । मगपेटीआणिलीबेटांतून । सभेमध्येंरावणें ८२ त्यामाजीनोवरीअसेतत्वतां । ब्रह्मपासिम्हणेहेउघडीआतां । तोंपेटीउघडोनिपाहतां । वोहरेंउभयतांदेखिलीं ८३ परमआश्चर्यकरीरावण । म्हणेखरेंझालेंब्रह्मवचन । तरीमीयादोघांसिवधीन । शस्त्रघेऊनिसरसावला ८४ कौसल्यातेव्हांभयाभीत । पतीचेंवदनविलोकित । परीनिर्भयवीरदशरथ । नभीम्हणेकौसल्येतें ८५ मीसूर्यवंशीमहावीर । हेंमशककायदशकंधर । याचींदाहीशिरेंसमग्र । खंडीनआतांयेथेंची ८६ मगरावणाचाहात । धरिताझालाविष्णुसुत । म्हणेमजदेईंइच्छित । मागम्हणतदशवदन ८७ हींदोघेंवधूवरेंआतां । मजदेयींलंकानाथा । मंदोदरीम्हणेतत्वता । वचनअसत्यनकरावें ८८ गेलातरीजावोप्राण । परीअसत्यनकरावेंवचन । यासिवधितांयेथेंविघ्न । उठेलदारुणआतांची ८९ बुद्धीचाप्रवर्तकभगवंत । ब्रह्मयासिम्हणेनेईंत्वरित । येरेंपेटीउचलोनित्वरित । अयोध्येसिआणिली ९० अयोध्येंतजाहलाजयजयकार । वेगेंपातलाशचीवर । दशरथावरीधरीछत्र । कर्तव्यविचित्रहरीचें ९१ दशरथराज्यींस्थापून । विधिआणिसहस्त्रनयन । वेगेंपावलेस्वस्थान । आनंदेंमनींउचंबळले ९२ पुष्पकींबैसोनिजातांदशवक्त्र । एकदेवस्त्री

१ समुद्र. २ मोठें. ३ सर्व. ४ सुलभ. ५ विघ्न. ६ वेळी. ७ गलबत. ८ रत्न. ९ दशरथ. १० नारदानें. ११ वधुवरें. १२ रावण. १३ ब्रह्मदेव.

देखिलीसुंदर । तिचाबळेंचिधरिलाकर । तिसीअविचारकरूंइच्छी १३ तंवतेआक्रंदतनितंबिनी । रावणेंसोडिलीतेक्षणीं । तीब्रह्मदेवापासींजाउनी । गाऱ्हाणेंसर्वसांगत १४ रावणासशापीसत्यलोकवासी । परस्त्रीवरबलात्कारकरिसी । तरीशतखंडेंनिश्चियेंसी । तुझेतनूचींहोतील १५ जैसासिंह आडांतपढला । कींमहाव्याघ्रसांखळांतगोंविला । तैसारावणबांधला । शापपाशेंकरूनी १६ रावणपापकरीदारुण । गांजिलेगाईआणिब्राह्मण । पृथ्वी आक्रंदलीपूर्ण । गेलीशरणब्रह्मयातें १७ गाईचेरूपेंधरित्री । आक्रंदतब्रह्मयाचेद्वारीं । प्रजाऋषिगणतेअवसरीं । शरणआलेब्रह्मया १८ विधींबाहे रआलातेक्षणीं । तोंसमस्तसांगतीगाऱ्हाणीं । रावणेंयज्ञटांकिलेमोडोनी । सत्कर्मअवनींचालेना १९ एकह्मणेमाझियामखा । विघ्नकरितेताटिका । एकह्मणेसुबाहुमारीचदेखा । क्रतुमाझाविध्वंसिती २०० एकसांगतीऋषीश्वर । आमुचींकुटुंबेंसमग्र । कुंभकर्णेंग्रासिलींथोर । अनर्थमांडिलाविधातया १ त्रिदशआणिपुरंदरँ । ह्मणतीबंदींपडिलेसमग्र । कोणासिनाटोपेदशकंधर । कायविचारकरावा २ मगदेवप्रजाऋषिगण । मुख्यपरमेष्ठीविष्णुनंदन क्षीरसागरासियेऊन । अपारस्तवनमांडिलें ३ शेषशयननारायण । कोटिसूर्यांचीप्रभापूर्ण । साठसहस्त्रयोजन । शेषतल्पकशुभ्रतो ४ लक्षां र्धयोजनेंप्रमाण । वरीपहुडलाभगवान । सच्चिदानंदरमारमण । अलंकारमंडित ५ जेअनंतशक्तीचीस्वामिणी । तेकमळाविलसेंतचरणी । जीचाइच्छा मात्रेंकरूनी । ब्रह्मांडहेंविस्तारलें ६ एकलक्षयोजनेंदेदीप्य । विराजमानमध्यमंडप । तेथींचेंतेजअमुप । चंद्रसूर्यभुललेपैं ७ गरुडपाचूचेंजोतेंस्वयंभ । वरीहिऱ्यांचेविशाळस्तंभ । माणिकांचींउथाळींसुप्रभ । खालींतोळंबेहिरियांचे ८ सुवर्णाचींतुळवटेंप्रचंडें । आरक्तरत्नाचेपसारिलेदांडे । वरीकिलच्याझ ळकतीनिवाडें । पाचूचियासाजिऱ्या ९ असोऐलतीरींदेवसकळी । उभेठाकलेबद्धांजुळी । ह्मणतीपूर्णब्रह्मवनमाळी । भक्तपाळकासर्वेशा १० जयजय अनंतब्रह्मांडनायका । वेदवंद्यावेदपाळका । विश्वंभराविश्वरक्षका । विश्वोद्धाराजगद्गुरू ११ पुराणपुरुषापरात्परा । पंकेजलोचनापयोब्धिविहारा । प रमात्मयापरमउदारा । भुवनसुंदराभवहृदया २१२ कर्ममोचकाकरुणाकरा । कैवल्यदायकाकमलावरा । कर्मातीताकैठभसंहारा । कनकवसना करुणाब्धी १३ जयजयसकळदेवपाळका । जयजयसकळचित्तचाळका । निर्विकारानिरुपाधिका । निर्गुणानिश्चळानिःसंगा १४ केशवाहरीमुर मर्दना । रमावल्लभामधुसूदना । सकळदुरितकाननदहना । तमनाशनाप्रतापसूर्या १५ प्रळयसमुद्रींतूंजनार्दन । विशाळमीनरूपधरून । म हादैत्यविदारून । वेदोद्धारतुवांकेला १६ परमविशाळमंदराचळ । भेदीतचाललापाताळ । तूंकूर्मरूपधरूनतत्काळ । पृष्ठीखालतीदीधली १७

१ पृथ्वी. २ यज्ञ. ३ यज्ञ. ४ इंद्र. ५ संपूर्ण. ६ ब्रह्मदेव. ७ पुत्र. ८ चार कोसांचें एक. योजन. ९ शय्या १० पन्नास सहस्त्र योजनें. ११ लक्ष्मी. १२ शोभते. १३ कमलनेत्र.

हिरण्याक्षदैत्यसबळ । कांखेसिघेऊनभूमंडळ । वराहवेषेंतूंतमाळनीळ । दानवसकळमर्दिले १८ दानवबाळकप्रल्हाद । त्यासतुझाअखंडछंद । मगकरूनिस्तंभभेद । प्रकटलासीनरहरी १९ इंद्राचेकैवारबळी । तोतुवांघातलापाताळीं । त्याचेद्वारींतूंवनमाळी । द्वारपाळअद्यापी २२० न सतांसेनारथसेवक । फरशधरभृगुकुळटिळक । तीनसप्तकेंऊर्वीनिःशंक । निक्षत्रीकलीहरीत्वां २१ आतांरावणकुंभकर्णअसुर । तिहींत्रिभुवन पीडिलेंसमग्र । भक्तकैवारीतूंसर्वेश्वर । रक्षीसत्वरदासातें २२ तोंक्षीरसागरींहूनिअद्भुत । ध्वनीउमटलीअकस्मात । रविकुळींराजादशरथ । अवतारतेथेंघेतोंमी २३ शेषहोईललक्ष्मण । भरतहोईलपांचजन्य । सुदर्शनंतोचिशत्रुघ्न । अवतारपूर्णहेमाझे २४ जनकराजापृथ्वीवरी । कर्मळा जाईलत्याचेउदरीं । तुह्मीदेवसर्वएकसरीं । वानररूपेंअवतरा २५ शिवतोहोईलहनुमंत । ब्रह्मातोहोईलऋक्षजांबुवंत । धन्वंतरीतोसुषेणसत्य । गीष्पतीतोअंगदजाणिजे २६ सुग्रीवतोजाणिजेमित्र । नळतोअनळसाचार । नीळतोअनिळअवतार । यमतोचिऋषभपैं २७ ऐसीआज्ञाहो तांसमस्त । देवजयजयकारेंगर्जत । आनंदनमायेअंबरांत । गेलेत्वरितस्वस्थाना २८ अदितीआणिकश्यप । तेचिकौसल्याआणिदशरथभूप । तेथेंअवतरेलस्वरूप । आत्मारामरघुवीर २९ श्रीरामकथाअतिरसाळ । हेंचिमानससरोवरनिर्मळ । तुह्मींचतुरश्रोतेमराळ । बैसासकळएकपं क्तीं २३० श्रीरामकथाकरितांश्रवण । होयपापाचेंसर्वखंडन । चिंतिलेमनोरथहोतीपूर्ण । भक्तीकरूनवाचितां ३१ श्रोतयांसिपडतांविघ्न । श्री रामनिवारितस्वयेंआपण । सर्वकाळरामचरणींलीन । असतांभवमोचनघडेल ३२ ब्रह्मानंदाआत्मयारामा । भक्तकामकल्पद्रुमा । श्रीधरवर दापूर्णब्रह्मा । अक्षयअनामाअभंगा ३३ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मिकीनाटकाधार । सदांपरिसोतभक्तचतुर । द्वितीयोध्यायगो डहा ॥ २३४ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ अध्याय ॥ २ ॥ ओंव्या ॥ २३४ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

१ दनूपासून उत्पत्ति सबब दानव ( दैत्य ) ही संज्ञा. २ निरंतर. ३ एकवीस वेळ. ४ पृथ्वी. ५ स्वर्ग. मृत्यु व पाताळ. ६ शंख. ७ चक्र. ८ लक्ष्मी. ९ बृहस्पति. १० अग्नि. ११ वायु १२ आकाशांत.

श्रीगणेशायनमः । श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । तुह्मींसंतश्रोतेभाविक । कविमुद्रारत्नपरीक्षक । श्रोतादेखोनिमृगांक । वक्तासोमकांतपाझरे १
तुह्मीबोधसमुद्रींचींमुक्तेंपवित्रें । कींचैतन्यनभींचींदिव्यनक्षत्रें । कींवैराग्यवनींचींसुमनेंविचित्रें । संतरूपेंविकाशलीं २ कींनिश्चळरामकथामृतपात्रें
ज्ञानभरितपिकलींक्षेत्रें । कींभजनपंथींचींसरोवरें । संतरूपेंपसरलींहो ३ तेंभवजाळप्रभंजनं । अज्ञानतिमिरछेदकचंडकिरण । जोगजराजविदारक
पंचाननं । मत्सरकानन दहनजो ४ कींरामविजयग्रंथवैरागर । साहित्यरत्नेंनिघतीअपार । हींतुह्मीअंगिकारावींवारंवार । कासयासिप्रार्थावें ५
कमळकोशींचामकरंदबरा । हेंनलगेसांगावेंभ्रमरा । राजहंसासीमुक्तचारा । ऐसेंकिमर्थप्रार्थावें ६शीतळहोयचंद्रमंडळा । कासयासांगावेंवेळोवेळां
मित्रासिप्रकाशआगळा । पाडींकासयाह्मणावें ७ संतांसिकराक्षमाशांती । ऐसेंवदतोमंदमती । प्रेमळासिकरींभक्ती । सांगावेंहेंचिनवल ८ पंडि
ततुह्मीज्ञानघन । करारामकथासुरंसश्रवण । हेंसर्वथाह्मणतांदूषण । वक्तयासिज्ञगटेल ९ असोपूर्वाध्यायींकथानिश्चिती । सांगीतलीरावणाचीउत्प
त्ती । कौसल्यादशरथअयोध्येप्रती । नेऊनिविधीनेंस्थापिलीं १० सूर्यवंशभूषणअद्भुत । अयोध्येप्रतिराजादशरथ । त्याचीपट्टराणीविख्यात । बहुकु
शलकौसल्या ११ सुमित्राकैकेयीस्वरूपवंत । दोघींसवरीरावदशरथ । आणीकसातशेंपर्णीत । भोगांगनासुंदरा १२ ज्ञानकळाकौसल्यासती । सु
मित्राकेवळसद्भक्ती । कैकेयीतेप्रगटप्रकृती । रंजतमयुक्तसर्वदां १३ केवळविदेकमूर्तिमंत । तोचिअजपाळसुतदशरथ । जोपरमयोद्धारणपंडित । धनुर्वि
द्यासर्वजाणे १४ आंधारामाजीशब्दउठतां । तेथेंचिबाणमारीअवचिता । धन्यतयाचीहस्तकौशल्यता । वीरदशरथाऐसानसे १५ परिपोटींनसेपुत्र
संतान । तेणेंराजेंद्रअसेउद्विग्न । पुत्रावीणशून्यसदन । बोलतीशास्त्रज्ञपंडित १६ शरीरजैसेंप्राणाविण । तारुण्यावीणपंचबाण । दयेवीणव्यर्थज्ञान
शांतीवांचूनवैराग्य १७ संपत्तीजैसीधर्मेंवीण । पंडितावांचूनसभाशून्य । स्मरणाविणव्यर्थज्ञान । दीपाविणमंदिरजेवी १८ वेदांतज्ञानावांचून । को
रडीव्युत्पत्तीजैसीशून्य । कींसत्पात्रावांचूनदान । स्नेहेंवीणबंधूजैसा १९ कींजळेंवीणवापिका । कींनृपावीणपरिवारदेखा । कींनासिकावीणमुखा । शो
भाजैसीनयेची २० कींफळेंवीणतरुवर । कींनामस्मरणावांचूनमंदिर । तैसापुत्रावीणवंशपवित्र । सर्वथापावननव्हेची २१ असोराजादशरथ । सं
ततीलागींचिंताक्रांत । सदांविपिनेंगहनहिंडत । मृगयामिषेंकरूनी २२ नावडेछत्रसिंहासन । नावडेचातुर्यकळागायन । बहुतकेलेप्रयत्न । परी
संताननव्हेची २३ तोंदशरथेंस्वप्नदेखिलें । दोघेपुरुषआपणवधिले । आणिएकेस्त्रियेसीमारिलें । अपराधेंवीणसर्वथा २४ गजबजोनिउठिलाव

१ कवि हींच मुद्रारत्नें यांचा परीक्षक २ चंद्र ३ मोत्यें ४ पुष्पें ५ वायु ६ सूर्य ७ सिंह ८ अधिक ९ अल्पबुद्धि १० गोड ११ भोगास्त्रिया १२ रजोगुण व तमोगुण १३ घर

रित। कोणासिनबोलेमूकवत। वसिष्ठगृहासीजाऊनत्वरित । नमूनिस्वप्नसांगतसे २५ गुरुबोलेहेंदुष्टस्वप्न ।तीनश्वापदेंयेसीवधोन । मगयाचीशांती करून । दोषदूरकरावा २६ गुरुआज्ञेनेंतेदिवसीं । राजेंद्रनिघालामृगयेसी । वासरमणीगेलाअस्तासी ।परीश्वापदनसांपडे २७ पडिलाअत्यंत अंधकार । एकलाहिंडेनृपवर । धनुष्यासिलाऊनशर । शोधीकांतारतेधवां २८ तोंएकासरोवराचेतीरीं। राजागुप्तबैसेवृक्षावरी । कानाडीवोढोनि तेअवसरीं । कर्णीऐकेसांचोल २९ तोंतेमार्गीश्रावण । आलामायबापघेऊन । दिवसाबहुतविघ्नेंआणिउष्ण । ह्मणोनिरात्रींगमनकरी ३० दोघेंवृ द्धेंखांद्यावरीघेउनी । श्रावणडिंडेमेदिनीं। तोंत्यासरोवराचेतीरींयेउनी । उभाराहिलानावेक ३१ तोंतींवृद्धेंह्मणतीश्रावणा । आह्मांकरवींउदकपाना ऐकतांऐसियावचना । कावडखालींठेविली ३२ हातींकमंडलूघेऊन।जीवनींप्रवेशलाश्रावण। दशरथेंसांचोलऐकोन। निर्बाणबाणसोडिला ३३ सप क्षबाणहृदयींभेदला । हातींचाकमंडलुखालींपडिला ।देहभूमीवरीटांकिला। प्राणचालिलाश्रावणाचा ३४ ह्मणेकोणेसभाग्याचाबाण। करीतआला नामस्मरण। हृदयनिवालेंसंपूर्ण। केलेंपावनमजलागीं ३५ ऐकोनिमनुष्याचेंवचन। नृपवरजवळआलाधांवोन ।तंवतोपडिलाअसेश्रावण ।रामस्त वनकरीतची ३६ मगह्मणेकर्मापापकारी । पढलीहत्यामजवरी । श्रावणह्मणेरायानकरीं । खेदकांहींसर्वथा ३७ माझींमायबापेंवृद्धेंदीन । तयां सिकरवींउदकपान। मगमीसोडीनप्राण। सत्यजाणराजेंद्रा ३८ दोघेंवृद्धेंअत्यंतपाहीं । त्यांचेसेवेसिकोणीनाहीं । दशरथगहिंवरलाहृदयीं। शोका वर्तीदडियेला ३९ श्रावणह्मणेदशरथा ।उदकदोघांपाजूनितत्वता ।मगहेसांगावीवार्ता । नाहींतरीप्राणत्यागिती ४० उदकनेतांअयोध्याराणा वृद्धेंह्मणतीबारेश्रावणा ।तंवतोनबोलेचिवचना। कांहींकेल्यासर्वथा ४१ कांरेश्रावणानबोलसी ।उदकमागीतलेंएवढेनिशीं । बारेह्मणोनिकोपलासी शिणलासीपाडसा ४२ उदयाचळींमावळेमित्र । शेषसांडीलभूमिभार । तीव्रतपेलरोहिणीवरं। तरीक्रोधअणुमात्रनयेतूतें ४३ जैसेंगंगेचेंनिर्मळ जीवन । तैसेंश्रावणातुझेंमन । तान्हयाकांरेनबोलसीवचन । राजाऐकोनिगहिंवरे ४४ मगअजपुत्रबोलिला। म्यांअवचितश्रावणवधिला ।तंव त्याणींधरणीवरदेहटांकिला। प्राणझालेकासावीस ४५ आठवोनिश्रावणाचेगुण। दोघेंआक्रंदतीदीनवदन। ऐसापुत्रहेंत्रिभुवन। शोधितांहीनसांपडे ४६ आहारेपुत्राश्रावणा । गंभीरगुणनिधाना । आमुचेप्राणकीरतीप्रयाणा । श्रावणावदनदावीकां ४७ याब्रह्मांडमंडपांत । श्रावणाऐसानाहीं सुत । जैसींलक्ष्मीवैकुंठनाथ। तैसीभावीतमातापितां ४८ जोनकरीमातृपितृभजन। जळोत्याचेंब्रह्मज्ञान। तोषट्शास्त्रेंआलाजरीपढोन। त्याचेंदर्शन

१ क्षणमात्र २ शब्द ३ वृत्तांत ४ रात्रीं ५ हे वत्सा ६ सूर्य ७ चंद्र ८ पाणि ९ पृथ्वी १० दीनवाणी ११ गुणाचा ठेवा १२ भावना करणारा

नव्हावें ४९ त्याचेंजपतपअनुष्ठान । दानअध्ययनश्रवणमनन । कळाचातुर्यव्यर्थज्ञान । जैसेंभाषणमद्यपियाचें ५० तेणेंअभ्यासिल्याचौसष्टी
कळा । त्याअवघ्याचिझाल्याविकळा । जयासिमातापित्यांचाकंटाळा । त्याचांडाळानशिवावें ५१ मातापितागुरुदेवजाण । चारीदैवतेंसमसमान ।
तोचिपरमज्ञाताजाण । नमोडीवचनश्रेष्ठांचें ५२ ह्मणोनिपुत्रएकश्रावण । आठवोनितयाचेगुण । दोघेंपडलींमूर्च्छायेऊन । जावयाप्राणएकवटले ५३
मगतींउभयतांशापदेतीनृपनाथा । ह्मणतीतूंहीपुत्रपुत्रकारितां । प्राणजाऊंदेतुझादशरथा । आमुच्याऐसातत्काळ ५४ मगत्यांणींसोडिलाप्राण । रा
येंकेलेंतिघांचेंदहन । उत्तरकार्यसंपादून । अयोध्येसींपातला ५५ मनींहर्षमानीनृपवर । मजशापझालातोकेवळवर । यांचेशापेंतरीपुत्र । होकांस
त्वरमजलागीं ५६ अयोध्येसियेऊनिदशरथ । वसिष्ठासिसांगेवृत्तांत । पुढेंद्वादशवर्षेंपर्यंत । दुष्काळपडिलापृथ्वीवरी ५७ कदापिनवर्षेंबलाहक । अ
त्यंततीव्रतपेलअर्क । धान्यतृणजीवनसकळिक । नाहींनिःशंकपृथ्वीवरी ५८ गाईब्राह्मणपीडलेबहुत । दैत्यगुरूंकापटयवंत । तेणेंजलदआकर्षि
लासमस्त । वृष्टीएकाक्षहोऊंनेदी ५९ वृष्टीझालियावरीपूर्ण । सुखीहोतीलगोब्राह्मण । तेकरितीलमहायज्ञ । तेणेंबळपूर्णसुरवरां ६० वृषपर्वादै
त्यथोर । परमयोद्धामहाशूर । त्याससाहाकारीझालाशुक्र । युद्धकरीदेवांसीं ६१ बहुतदिवसझालासंग्राम । परीशुक्रकपटियापरिपूर्णपरम । मेघ
वर्षोंनेदीअधम । चिंताक्रांतशक्रझाला ६२ वज्रधरासिह्मणेब्रह्मसुत । अयोध्येचाराजादशरथ । तोप्रतापार्करणपंडित । जिंकीलदैत्यक्षणमात्रें ६३
मगमातलीआणीविजयरथा । मूळपाठविलेंदशरथा । मातलीसांगेसमूळवार्ता । अनावृष्टीकारणेंजे ६४ ऐकूनिदैत्यप्रतापअद्भुत । तात्काळरथींबैस
लादशरथ । तोंकैकेयीरायासप्रियअत्यंत । कायबोलततेधवां ६५ ह्मणेमीसमागमेंयेईन । आणिसंग्रामतुमचापाहीन । राजाह्मणेतूंसुकुमारपूर्ण ।
युद्धकंदनतेस्थानीं ६६ येरीह्मणेतुह्मीजवळीअसतां । मजभयनाहींसर्वथा । ऐसेतिचेबोलऐकतां । घेतलीरथावरीतेधवां ६७ निराळमार्गेंतयेवेळीं ।
रथनेतचपळमातली । देवदैत्यांच्यारणमंडळीं । रथअकस्मातउतरला ६८ वैकुंठींहूनिविनतासुत । क्षीराब्धितटींउतरेअकस्मात । तैसाराजादशरथ
सुरसमुदायांतउतरला ६९ अजपुत्रादेखोनिपाकशासन । देताझालाक्षेमालिंगन । दशरथेंधनुष्यचढवून । उभाठाकलायुद्धासी ७० बाणापाठींबा
णसोडित । जैसेशब्दामागेंशब्दयेत । कींमेघधारावर्षत । शरसोडितत्यारीतीं ७१ जैसामेघाबाहेरनिघोनी । निवटतीकल्पांतसौदामिनी । तैसा
बाणतूणीरांतुनी । निवडोनिकाढीदशरथ ७२ दैत्यांचींशिरेंअकस्मात । गगनींउडतीअसंख्यात । जैसेवृक्षावरूनिपक्षीउडत । प्रातःकाळींएकदां

१ बारा वर्षें. २ मेघ. ३ सूर्य. ४ उदक. ५ शुक्राचार्य. ६ देव. ७ युद्ध. ८ इंद्र. ९ नारद.

ची ७३ मारलेदैत्यभारतेव्हां । तोंआलावृषपर्वा । कपटकळायुद्धमावा । नानाप्रकारेंदावित ७४ परीदशरथवीरसमर्थ । कापट्यविद्यानचलेतेथ
जैसेंमूर्खाचेंवाग्जाळसमस्त। उच्छेदीपंडितएकब्दें ७५ जैसामंत्रवादीमहामती। त्यापुढेंभूतचेष्टानचालती। तैंशादशरथापुढेंयुद्धगती। कदानचालती
तयांच्या ७६ देखोनिदशरथाचाप्रतापतेव्हां। विरथझालावृषपर्वा। पाठींदेऊनितेधवां । निघताझालासवेगें ७७ घृतेंशिंपिलावैश्वानर। तैसाक्रोधाय
मानझालाशुक्र । रथींबैसोनियांशर । सोडिताझालाप्रतापें ७८ जातवेदास्त्रतेअवसरीं । सोडिताझालादेवांवरी । अयोध्याधीशेंझडकरी। जळास्त्रप्रे
रिलें ७९ शुक्रवातास्त्रप्रेरीअद्भुत। येरेंआडघातलेपर्वत। वातकोंडितांसमस्त । दैत्यगुरूनेंदेखिलें ८० मगसोडिलेंवज्रास्त्र । पर्वतफोडिलेसमग्र। दशर
थेंसोडिलेंमाहेश्वर । देखोनिवज्रास्त्रविरालें ८१ शुक्रपरमक्रोधायमान। काढिलाएकनिर्वाणबाण। रथाचेअंकछेदोन । टांकिताझालातेअवसरीं ८२
अंकछेदीतअकस्मात । खालींपडावाजोंदशरथ । कैकेयीदेखोनिधांवत । घालोनिहातअंकधरी ८३ पर्वताकाररथथोर । दंडावरीभारघेतलास
मग्र । वीरेंश्रीरंगेंनृपवर । समाचारनेणेतो ८४ दशरथेंसोडिलानिर्वाणबाण । तोडिलार्कवीचास्यंदन । अश्वासहितकुटकेकरून । रणमंडळींपा
डिला ८५ विरथजेव्हांझालाशुक्र । दशरथेंकाढिलासूर्यमुखशर । ह्मणेयाचेंछेदीनशिर । कापट्यमुकुटासहितपैं ८६ मागुतीविचारीअजनंदन ।
शुक्रतोंहोयब्राह्मण । याचारक्षोनियांप्राण । मुकुटमात्रछेदावा ८७ निमेषनलागतांगेलाबाण । मुकुटपाडिलातळींछेदून । भयाभीतभृगुनंदन ।
पळताझालातेधवां ८८ देवकरितीजयजयकार । पळोंलागलेदैत्यभार । जैसामहावातसुटतांसमग्र । भूसउडेअंबरीं ८९ रायेंकोदंडासिघातलीगव
सणी । तूंणीरठेविलाआवरणघालोनी । जैसाकुंडामाजींदैदीप्यअग्नी । आच्छादितयाज्ञिक ९० दशरथपाहेसावधान । तोंकैकेयीनेंहातघालून ।
धरिलाअसेतेथेंस्यंदन । वर्तमानकळलेंतें ९१ आश्चर्यकरीनृपवर । आह्मांसिजयलाभसमग्र । आजिचापराक्रमथोर । कैकेयीनेंसंपादिला ९२
जैसेंघरपडतांअकस्मात। निजबळेंउचलीबळिवंत । तैसाकैकेयीनेंआजिरथ। सांवरिलारणांगणीं ९३ खालींउतरूनदशरथ। प्रियेलागींआलिंगनदे
त । ह्मणेदोनवरमागेंत्वरित । जेकांअपेक्षाअसेल ९४ कैयेयीआनंदलीथोर । ह्मणेमीजेव्हांमागेनवर । तेव्हांमजद्यावेसाचार । ह्मणोनिभाषघेतली
९५ महायुद्धींजयपूर्ण । कैकेयीसयावयाकायकारण । कायहोतेंतीसवरदान । तेंचिकारणऐकपां ९६ पितृगृहींकैकेयीअसतां । एकतापसीआलाअव
चिता । तयासिप्रार्थूनियांमाता । राहवितीझालीकैकेयी ९७ ऋषीबैसलाअनुष्ठानातें । मातानिरोपीकैकेयीतें । उपकरणसामग्रीलागेलयातें । ती

१ समुदाय. २ बडबड. ३ पंचाक्षरी. ४ अग्नि. ५ अग्न्यस्त्र. ६ दशरथें. ७ वीरश्रीचे रंगानें. ८ शुक्र. ९ रथ. १० भाता. ११ निश्चयानें. १२ बाप. १३ ऋषि, साधु.

सिद्धकरूनदेइजे १८ धूपदीपपुष्पेंआरती । सिद्धकरूनदेऋषीप्रती । येरूप्राणायामकरूनिनिश्चिती । ध्यानींझालानिमग्न १९ तंवकैकेयीयेऊ
निमस । लाविलीऋषीच्यामुखास। ध्यानझालियातोमहापुरुष ।मुखस्वकरेंपुसीतसे १०० तोंहस्तासलागलेंकाळें। कर्तृत्वकुमारिचेंकळलें।ऋषी
नेंशापिलेंतेवेळे ।वदनकाळेंतुझेंहोकां १ तुजवरीअपयशयेईलप्रचंड । जगांतहोईलकाळेंतोंड । पुत्रद्वेषकरिसीलउदंड ।नसतेंबंडवाढविसी २ मातेनें
समाचारऐकून ।वेगेंधरीऋषीचेचरण ।स्वामीकैकेयीबाळअज्ञान ।नेणोनिकर्महेंकेलें ३ कांहींद्यावेंजीवरदान ।मगऋषिकृपाळूहोऊन । ह्मणेसंग्रा
मींपतीलागून । जयदेईलमहारणीं ४ पूजासामग्रीदीधलीसमस्त । तरीहाहस्तहोईसयशवंत ।त्यावरदेंयासमर्थीअद्भुत ।जयप्राप्तकैकेयीतें ५
असोइंद्रआणिबृहस्पती । दशरथाचेंयशवानिती । वस्त्रेंभूषणेंअमरपती।देताझालारायातें ६ वस्त्राभरणेंअद्भुतें ।दिव्यमणीदीधलाकैकेयीतें । येरीनें
घातलावेणीतें । परमप्रकाशवंतजो ७ तोंदेवआचार्यबोलेवचन । रायासिकायआहेपुत्रसंतान । दशरथह्मणेपुत्रवदन । देखिलेंनाहींअद्यापी ८
सुरगुरूह्मणेरायावरिष्ठा ।त्रिभुवनपतीयेईलतुझ्यापोटा ।ज्याचेंध्यानलागलेंनीलकंठा।सनकादिकांभक्तांसी ९ जोमायाचक्रचाळक।अनंतब्रह्मांडां
चानायक।जोकमळोद्भवाचाजनक।तोपुत्रतुझादेखराया १० वेदशास्त्रांचेंजिव्हार ।जोआदिमायेचानिजवर।तोपुराणपुरुषअगोचर।तुझापुत्रहो
ईलतो ११ विभांडकाचापुत्रशृंगऋषी । हरिणीगर्भसंभूततेजोराशी। त्यासिआणावेंनानाआयासीं । पुत्रेष्टीकरावया १२ त्यासिनाहींमनुष्यदर्श
न । देखिलेंनाहींस्त्रियांचेंवदन । त्यासशब्दविषयेंमोहून । करूनिगायनआणावा १३ शक्रह्मणेदेवललना । पाठवाव्यातयावना । रंभाउर्वशी
शुभानना । ज्यांचेगायनामदनभुले १४ दशरथेंइंद्रगुरूचीआज्ञा । घेऊनिआलाअयोध्याभुवना । आनंदझालासकळजना । पर्जन्यवृष्टीजाहली
१५ असंभाव्यपिकलीमेदिनी । दुष्काळगेलामुळींहूनी । जैसीविष्णुसहस्त्रनामेंकरूनी। महापापेंसंहारती १६ इकडेवीणाटाळमृदंग ।झल्लरी।किंकि
णीउपांग । देवांगनाघेऊनिउपभोग । वनागेल्यासत्वर १७ विभांडकऋषितपोधन । नित्यप्रातःकाळींउठोन। करावयाअनुष्ठान । जान्हवी
तीराप्रतिजाय १८ मागेंआश्रमींएकलापुत्र । उंचबांधोनिगोपुर । त्यावरीशृंगीतोपरमचतुर । वेदाध्ययनकरीतसे १९ गजव्याघ्रसावजेंबहुत ।
देखतांहोयभयाभीत । ह्मणोनिउंचस्थळबांधोनिसत्य । त्यावरीसुतबैसविला २० विभांडकअनुष्ठानकरून । दोनप्रहरांयेतपरतोन । परमानंदें
पुत्रदेखोन।वेदाध्ययनसांगेत्यातें २१ चारीवेदमुखोद्गत । सकळशास्त्रेंपारंगत। यागविधिकर्मेंसमस्त । करतळामलकयेततया १२२ असोविभां

१ आपुलया हातानें. २ मुख. ३ युद्ध. ४ साहित्य. ५ वर्णिती ६ इंद्र. ७ देवांचा गुरु बृहस्पति. ८ पुत्राचें मुख. ९ ब्रह्मदेव १० पिता. ११ उत्पादक. १२ देवांच्या स्त्रिया, अप्सरा.

डकगेलास्नाना ।तोसमयपाहूनिदेवांगना । वेगींपातल्यातयावना। सर्वसंपत्तीघेऊनियां २३ वरीबैसलाऋषिनंदन । तंवत्यार्णीआरंभिलेंगायन ऐकतांभुललापंचबार्ण । स्वरूपलावण्यतयांचें १२४ जैशाकेवळसौदामिनी । मंडितदिसतीवस्त्राभरणी । ज्यांचींस्वरूपेंपाहोनी । सुधा पांनीभुललेपैं १२५ टाळमृदंगसुस्वर । गायनऐकोनिऋषिपुत्र । वरूनिपाहेसादर । स्वरूपसुंदरन्याहाळित २६ तंवनेत्रकटाक्षहावभाव दावितीनानालाघव । शृंगीनेंदेखतांचिअपूर्व । भयवाटेमानसीं १२७ गायनऐकतांसुस्वर । संतोषवाटेअपार । ह्मणेमजधरावयासाचारें । पातलेकोणनकळेहें २८ भयेंकरूनितेवेळां । शृंगीवायुवेगेंपळाला । सर्वेचिविलोकीपरतोनिडोळां । सुंदरस्वरूपतयांचें १२१ विभांडकअनु ष्ठानकरून । आश्रमायेतपरतोन । देवांगनागेल्यातेथून । शापभयेंऋषीच्या १३० ह्मणतीविभांडकासिकळेल । तरीआह्मांतत्काळशा पील । यालागींदोनप्रहरहोतांतात्काळ । जातीवेगेंकरूनियां ३१ असोपिताआलाआश्रमासी । शृंगीसांगेतयापासीं । ह्मणेयेथेंआलेहोतेताप सी । उपमाज्यांसीअसेना ३२ मीतयांसिदेखोनी । पळालोंदेहलोभकरूनी । आतांनयेतीदुसरेनी । खंतीमनींवाटतसे ३३ विभांडकह्मणे पुत्रासी । जरीआश्रमायेतीसंतऋषी । तरीआपणआतिथ्यकरावेंत्यांसी । पूजाविधिकरूनियां ३४ असोप्रातःकाळींविभांडकमुनी । गेलाअनुष्ठा नालागोनी । शृंगीचिंताकरीमनीं । ह्मणेकधींनयनींदेखेनत्यांतें ३५ विसरलापठणलेखन । ज्ञानध्यानआणिमनन । लागलेंमनींस्त्रियांचेंध्यान ।अ नर्थपूर्णस्त्रीसंगें ३६ ज्याणेंस्त्रीनदेखिलीस्वप्नीं । त्याणेंतीविलोकितांनयनीं । गेलासर्वविसरोनी । अनर्थकामिनीतपासी ३७ ज्यांसअखंडस्त्रीचिं तन । तेकैसेतरतीलजन । मूर्तिमंतभवाब्धीकामीन । भुलवीसज्जनजाणते ३८ स्त्रीकेवळअविद्यासाचार । महाअनृतअविचार। सकळअविद्येचाथार भयनधरीपापाचें ३९ स्त्रीअनर्थाचेंगृहकेवळ । कींकलहाचेंमहामूळ । कींविषवल्लीचकेवळ । स्त्रीरूपेंविस्तारली ४० स्त्रीकामाचीविशाळदरी ।कीं तेक्रोधव्याघ्राचीजाळीखरी । कींतेकेवळसमुद्रलहरी । कींतेभाजनअसत्याचें ४१ कींतेंदुःखवृक्षाचेंश्रेष्ठफळ । कींतोमोहाचापर्वतसबळ । कींतेंमत्स रवनचिकेवळ । किंवाभ्रांतीअवतरली ४२ कींदंभचिमूर्तिमंतविरूढला । कींअहंकारस्त्रीगडबांधिला । कींमूर्खत्वसकळत्यास्थळा । मिरासकेलीवाटत से ४३ कींस्त्रीमूर्तिमंतव्याधी । कींषडूर्मीचीभरलीनदी । कींसकळविकारांचीमादी । यात्रेसिआलीत्याठायां ४४ कवणेंनिर्मिलीहेकुऱ्हाडी । सब ळपुंण्यवृक्षतोडी । कींअविश्वासाचीबेडी । जीच्यापायींठोकिली ४५ कींस्वर्गमोक्षअर्गळाथोरहोत । दर्शनेंपुरुषाचेंचित्तचोरित । स्पर्शेंबळवीर्यहरत

१ पुत्र· २ काम· ३ विजा· ४ देव· ५ निश्चयानें· ६ लाटा· ७ पात्र· ८ उत्पन्न· झाला· ९ शोक· मोह· जरा· मृत्यु· क्षुधा· पिपासा· १० राक्षसीण· ११ स्त्री·

असुरीप्रत्यक्षतेकामिनी ४६ कौटाल्यादंभसंयुक्त ।क्षमाशौचविवर्जित ।महामंत्राचेंसामर्थ्य।क्षणेंहिरूनिनेतसे ४७ गौडीमाधवीपेषणी।तीनसु
राप्रकटजनीं। चवथेंमद्यतेकामिनी। दुर्गंधीनाह्यणीपापाची ४८ कायविद्याकायतप । कायसेंध्यानकायजप । कासयाज्ञानखटाटोप । हरिलेंसर्व
स्त्रियेनें ४९ जिव्हादग्धपरान्नेंपाहीं । हस्तदग्धप्रतिग्रहीं । मनदग्धस्त्रियेचेठायीं । करूनिकायजपतप ५० व्यर्थकरितीपुरश्चरण । स्त्रियेनेंह
रूनिनेलेंमन । करूंबैसतांजोंध्यान । ध्यानींचिंतनजियेचें ५१ कायअध्ययनहरिकीर्त्तन । व्यर्थगेलेंपुराणश्रवण । कायकरूनिधर्मदान । स्त्रि
यांनींमनहरियेलें ५२ स्त्रीस्वरूपाचीधरूनिदिवी । महानरकाचीवाटदावी । सज्ञानाहोभुलवी । वर्नींहिंडवीविषयांच्या ५३ कींकाळेंदूतीपाठ
विलीदेखा । चाळऊननेतमहानरका । दुरावलेमोक्षसुखा । अधःपातींपाडिलें ५४ आतांअसोहाअनुवाद । जरीकृपाकरीलब्रह्मानंद । तरीच
तुटेलभवबंध । हृदयींबोधठसावे ५५ जरीकृपाकरीलजगज्जीवन । तरीहरिरूपदिसेजनवन । कैंचापुरुषनपुंसककामिन । व्यापिलेंपूर्णश्रीरामें।
५६ नरनारींमिथ्याभास । अवघावोतलापुराणपुरुष । ऐसीकृपाकरीलसर्वेश । ब्रह्मानंदस्वामीपैं ५७ असोआतांशृंगऋषी । ह्मणेकधींयेतील
तेतापसी । तोंअकस्मातत्यासमयासी । रंभाउर्वशीपातल्या ५८ उत्तमस्वरूपेंमंजुळगायन । सुंदरमुखआकर्णनयन । शृंगीलागींखुणावून ।
कामभावदावित ५९ नानापक्कान्नेंअमृतफळें । शृंगीसदेतीबहुरसाळें । मगतोउतरूनखालें । जवळीयेऊनिबैसला ६० तयांसिपुसेआवडीकरू
न । सांगातुमचीनामखुण । हींगलंडेंकायह्मणोन । वक्षस्थळींतुमच्यापैं ६१ येरीगदगदांहांसती । तुझियामाथांशृंगनिश्चिती । ह्मणोनिशृंगऋ
षीह्मणती । तुजलागींऋषिपुत्रा ६२ आमुचेंनांवगलंडऋषी । बहुसुखअसेआह्मांपासीं । येरूह्मणेतेंदाखवाआह्मासी । चवीकैसीपाहूंपां ६३
त्याह्मणतीजीतलतां । काभांसनतुजशिकवूंआतां । तोंमदनेंमोहिलेंऋषिसुता । आसक्तसुरतालागींहोय ६४ मगतोह्मणेमीतुह्मांधीन । जिकडे
न्यालतिकडेयेईन । मगत्याणींविमानींबैसवून । आणियेलाअयोध्येसी ६५ दशरथेंकरूनिनमस्कार । केलाबहुतआदर । ह्मणेमहाराजतूंबहु
थोर । दर्शनआह्मांदीधलें ६६ मगपाळककन्यांआपली । शृंगऋषीसदीधली । लग्नसोहळातेवेळीं । चारदिवसजाहला ६७ मगऋषिमिळवि
लेबहुत । जेशापानुग्रहसमर्थ । वसिष्ठमुख्यआचार्यंजेथ । नपडेपदार्थन्यूनकांहीं ६८ इकडेज्ञानीपाहेविभांडकमुनी । तोंस्त्रियानींनेलाचाळउ
नी। परमक्रोधाविष्टहोउनी । अयोध्येसीपातला ६९ तोंऋषीनेंदेखिलापुत्र । जैसानक्षत्रींवेष्टिलारोहिणीवर । कींकिरणींवेष्टिलादिवाकर । ते

१ गुळाची. मधाची. पिठाची. असी तीन प्रकारची सुरा (मद्य.) २ नरकीं. ३ संसार. ४ स्त्री.५ शृंगाराचे हाव भाव. ६ दनाचें. ७ मैथुन. ८ सत्कार, मान. ९ बाळगलेली मुलगी. १० गुरु, उपाध्याय

सासुतदेखिला १७० स्नुषादेखोनिनयनीं । विभांडकनिवालामनीं । दशरथलागलाऋषिचरणीं । आनंदेंकरूनतेधवां १७१ विभांडकआ
नंदेबहुत । नृपासिआशीर्वाददेत । तुजहोतीलचवघेसुत । जेकांसमर्थत्रिभुवनीं ७२ असोयज्ञमंडपीशृंगीआपण । सकळऋषिमंडळघेऊन ।
स्वाहाकारासिअवदान । मंत्रयुक्तटांकिती ७३ पूर्णाहुतीचियेकाळीं । प्रत्यक्षप्रकटलाज्वालामाळी । जैसाउगवेउदयाचळीं । रवींतैसाअकस्मा
त ७४ चत्वांरिशृंगद्विमूर्ध्नं ।कृशाननिघालात्रिचरण । देखतांयज्ञनारायण । ऋषिजनसुखावले ७५ हातींपायसताटभरून । शृंगीपासींदेतकृशान
ह्मणेअविलंबेंपिंडकरून ।तिघीराणीसदेईजे ७६ बहुतत्वराकराहोयेक्षणीं । विलंबहोतांकार्यहानी । पोटायेईलकैवल्यदानी । क्षीरसागरविहारी
जो १७७ ऐसेंबोलोनितयेकाळीं । गुप्तझालाज्वाळामाळी । शृंगीनेंवसिष्ठाजवळी । पायसपात्रदीधलें १७८ वसिष्ठेंकरूनिविभाग । राणीयां
सदेतसवेग । कौसल्येसिश्रेष्ठभाग । देतांक्रोधआलाकनिष्ठेतें १७९ ह्मणेमीरायासिप्रियकर । म्यांरथचक्रींघालोनिकर । रणींविजयीकेलानृप
वर । इंद्रादिदेवांदेखतां ८० वयेंकरूनवृद्धफार । तोज्येष्ठनव्हेसाचार । जयामाजीगुणथोर । तोचिश्रेष्ठजाणिजे १८१ केतकीचेंलघुपत्र । त्या
समानितीसर्वत्र । इतरपत्रेंदिसतीथोर । परीचतुरनमानिती १८२ अमोलिकलहानरत्न । कायकरावेंथोरपाषाण । मृगेंद्राचीआकृतीलहान ।
थोरवारणकासया १८३ जवादीबिडाळाचेंवृषणसुवास । परीआवडेश्रीमंतास । रासभाचेंथोरबहुवस । नशिवेकोणीतयातें ८४ मजआधींनदे
तांमान । कायकरावाभागमागून । ह्मणोनिकैकेयीरुसोन । अधोवदनबैसली ८५ मगबोलेवसिष्ठमुनी । विघ्नहोयीलयेचक्षणीं । तोंकरींचापिंड
झडपोनी । घारीनेंनेलाअकस्मात १८६ हाहाःकारझालातेअवसरीं । पिंडनेतपैंघारी । कैकेयीपडेधरणीवरी । आक्रंदततेधवां १८७
माझेंपूर्वकर्मगहन । मजकैंचेंपुत्रसंतान । अभाग्यासिनिधान । जिरेलकैसेंसांगपां १८८ परमचिंताक्रांतदशरथ । कौसल्येकडेविलोकि
त । कैकेयीचिंसमाधानकरीत । पट्टमहिषीतेधवां ८९ अर्धविभागस्वभागांतुनी । देतकौसल्यासुमित्रदोनी । एकाग्रकरितांतेक्षणीं ।
पूर्णपिंडकैकेयीतें १९० जैशाभागीरथीआणिमंदाकिनी । तैशासुमित्राकैकयीदोनी । मत्सरअणुमात्रनाहींमनीं । संतोषरूपसर्वदां ।
१९१ अत्यंतजेकुटिलदेख । तयांसिस्वप्नींहीनिहोयसुख । कदांनमानितीलोक । अपयशेंमाथांसर्वदां १९२ खालताउतरूनदशरथ । स्त्रि
येलागींआलिंगित । ह्मणेदोनवरमागनिश्चित । जेअपेक्षिततुजलागीं १९३ असोवसिष्ठेंदीधलेंतीर्थ । त्यासवेंपिंडप्राशनकरीत । कैकेयी

१ ऋषींचासमुदाय. २ आहुति. ३ चार शिंगें. ४ दोन मस्तक. ५ समर्या. ६ दरिद्री. ७ द्रव्यठेवा. ८ पट्टस्त्री कौसल्या. ९ एके ठिकाणीं.१० आकाशगंगा. ११ द्वेषभाव. १२ अल्पसुद्धां. १३ दुष्कीर्तिं

च्यागळांअडकत । कासावीसझालीते १४ मगवसिष्ठेंसिंपितांतीर्थ । अंतरींपिंडप्रवेशत । आनंदलादशरथ । दानेंदेतअपार १५ वस्त्राभरणेंउ
दंडदक्षिणा । देवोनिगौरविलेंब्राह्मणा । सकळऋषिपावलेस्वस्थाना । शृंगीआदिकरूनियां १६ तिघीराण्याझाल्यागर्भस्थ । आनंदलाराजादशरथ
ह्मणेमाझेंभाग्यउदित । दिसतसेयेथोनियां १७ घारीनेंजोंपिंडझडपिला । त्याचावृत्तांतकायझाला । श्रोतयानेंआक्षेपकेला । कथासमूळसांगाते
१८ तरीकेसरीनामेंवानर । त्याचीस्त्रीअंजनीसुंदर । ऋष्यमूकपर्वतींघोर । तपकरीतबैसली १९ सातसहस्त्रवर्षेंपर्यंत । मौनधरोनिशुचिष्मंत । आरा
धिलाउमाकांत । प्रसन्नहोयतपांतीं २०० ह्मणेअंजनीमागइच्छित । येरीह्मणेअक्षयसुत । परमप्रतापीयशवंत । महाभक्तवज्रदेही १ मगबोले
उमावर । अकरावाजोमहारुद्र । तुझेउदरींतोअवतार । धरीलअक्षयजाणपां २ ऐकेंशुभवचनअंजनी । तूंअंजुळीपात्रपसरूनी ४ बैसेंसावधमाझे
ध्यानीं । अंतरदृष्टीकरूनियां ३ सुटेलअद्भुतप्रभंजन । साक्षात्लोकप्राणेशआपण । प्रसाददेईलआणून । तोतूंभक्षींअविलंबें । स्वस्थळागेलाशूल
पाणी । व्रतस्थबैसलीअंजनी । नयनझांकोनिनिजमनीं । ब्रह्मानंदेंउचंबळे ५ तंवकैकेयीहातींचापिंडझडपोनी । घारीनेतअसतांगगनीं । तोंचंडस
मीरेंतत्क्षणीं । पिंडमुखींचाआसूडला ६ तोपिंडअंजनीच्याकरांत । आणोनिघातलाअकस्मात । तीतत्काळभक्षित । शिवस्मरणकरूनियां ७ घारी
तेदेवांगनापहिली । पूर्वीनृत्यकरितांचाचरीगेली । मगविधीनेंशापिली । घारीहोईह्मणोनी ८मगतेसुवर्चसनामेंदेवांगना । लागेकमळोद्भवाचेचरणा ।
विधिह्मणेदशरथराणा । अयोध्येचानृपवर ९ मखसमर्यींपिंडझडपितां । उद्धरसीतूंतत्वतां । अंजनीकरींपिंडपडतां । निजस्थानातूंयेसी १० असो
घारीब्रह्मवरदानेंकरूनी । उद्धरोनिपावलीस्वस्थानीं । इकडेनवमासभरतांअंजनी । प्रसूतझालीतेधवां २११ ऋषिपत्न्यापाहातीतेवेळां । बळि
यातोपुत्रजन्मला । कींवांसरमणीप्रकटला । वानरवेषेंदेदीप्य १२ विद्युत्प्रायकुंडलेंझळकती । गंडस्थळींपडलीदीप्ती । दृढकौपीननिश्चिती । क
टिप्रदेशींमौंजीझळके १३ तळपतसेयज्ञोपवीतें । ऐसेंवानररूपअद्भुत । मुखींपुच्छाग्रींआरक्त । वर्णदिसतप्रवाळसम १४ क्षुधाक्रांतपरमबाळ ।
चहूंकडेपाहेचंचळ । तोंअंजनीउतावेळ । फळेंगेलीआणावया १५ रुदनकरितक्षुधितबाळ । तोंआरक्तदिसेसूर्यमंडळ । ह्मणेहेंदिसेउत्तमफळ । उ
डेचपळमारुती १६ पिंजरल्यारोमावळी । सिंहनादेंगर्जेनिराळीं । दिग्गजांचींबैसलींटाळीं । आंदोळलीवसुंधरा १७ स्फुरणदाटलेंथोर । गा
जवीपुच्छाचाफडत्कार । मागेंआंगवातेंतरुवर । उन्मळोनिजातीआकाशीं १८ चपळपदद्वयतसेचहस्त । प्रतापेंझेंपावेगगनांत । उड्डाणावरीउड्डाण

१ ऋषिभूत. २ महादेव. ३ वायु. ४ डोळे. ५ आकाशीं ६ हातांत. ७ ब्रह्मदेव. ८ यज्ञ. ९ स्वस्थान. १० सूर्य. ११ विजेसारखीं. १२ जानवें. १३ पोवळें. १४ केशपंक्ति. १५ पृथ्वी. १६ वृक्ष, झाडें.

घेतजातआदित्यलक्षोनी १९ कींउर्वीवरूनिसुपर्ण । जायवैकुंठपीठलक्षोन । तैसाचिअंजनीहृदयरत्न । भानुमंडळाआटोपी २२० मनोवेगासिमागें
टाकुनी । हनुमंतवेगेंजातगगनीं । तोंलोकप्राणेशधांवोनी । धरीनह्मणेस्वपुत्रा २१ परमतीव्रसूर्यमंडळ । तेजेंआहाळेलमाझेंबाळ । ह्मणोनिधरूं
पाहेअनिळ । परीतोचपळनाटोपे २२ मगहिमाचळाचेशीतलांबुकणं । मागूनिशिंपीप्रभंजन । हनुमंतमुखपसरून । सूर्याजवळीपातला २३ तोंते
दिवसींसूर्यग्रहण । राहूआलामुखपसरून । मारुतीसक्रोधआलादारुण । सिंहिकासुतदेखतां २४ ह्मणेमीअत्यंतक्षुधित । फळभक्षावयाआलों
येथ । हाकोणआलाअकस्मात । ग्रासाआडमाझिया २५ सबळपुच्छघायेंकरून । फोडिलेंराहूचेंवदन । भिरकाविलापायींधरून । मूर्च्छायेऊनपडिला
तो २६ जैसेंशुंडादंडेंकरूनिदेख । गजविदारीबिर्डाळक । कींभुजंगांचेकवेंतमूषक । अकस्मातसांपडला २७ राहूचेकैवारेंकेत । कपीवरीआलाधां
वत । जैसाकेसरीपुढेंजंबुकयेत । आपुलेंमरणविसरूनी २८ केतूदेखतांहनुमंत । तयासिवोपीमुष्टिघात । आंगचुकवोनित्वरित । केतूतेथूनिपळाला
२९ राहूआणिकेत । इंद्रापासींआलेधांवत । अशुद्धेंनाहलेपर्वत । सिंदूरेंकरूनजैसेकां ३० इंद्रासिवदतीदोघेजण । हेसुरेशसहस्त्रनयन । आह्मां
वरीकोपधरून । हेंकांविघ्नमांडिलें ३१ पुच्छनामाराहुकरून । आह्मांवरीदीधलापाठवून । आश्चर्यकरीशचीरमण । ह्मणेहेंकर्तृत्वकोणाचें ३२
कोणीकेलीविपरीतकरणी । त्यांससंहारावयावज्रपाणी । त्रिदशसमुदायघेउनी । वायुवेगेंपातला ३३ राहूपुढेंधांवत । मागेंदेवांसहअमरनाथ । तों
इकडेअंजनीसुत । सूर्याग्रासूंधांवतसे ३४ चळचळांकांपेमित्रं । ह्मणेहाकैंचाआलाअमित्र । दिनमानसोडोनिदिनकर । पळोंनलाहेसर्वथा ३५
प्रतापरुद्रमारुती । सूर्यमंडळधरिलेंहातीं । हेंफळनव्हेनिश्चिती । ह्मणोनिपुढतीटाकिलें ३६ जैसाकेवळवडवानळ । तैसेंदेदीप्यमानसूर्यमंडळ ।
फळनव्हेह्मणोनिअंजनीबाळ । टाकिताझालापुढती ३७ माघारापाहेपरतोन । तोंराहूआलाशक्रासघेऊन । पुढतीक्रोधआलादारुण । ह्मणेआ
तांनसोडींयासी ३८ साह्यकरूनअमरपती । मजवरीआलापुढती । जैसेशलभमिळोनियेती । कल्पांतविजूधरावया ३९ ऐसेंबोलतवायुनंदन ।
राहूवरीलोटिलायेऊन । इंद्रादेखतांताडण । राहूसिकेलेंबहुसाल ४० जैसापर्वतअकस्मात । तैसाराहूसिदेमुष्टिघात । ग्रहपूजायथासांगतेथ ।
बायुसुतेंमांडिली ४१ राहूआक्रोशेंफोडीहाका । ह्मणेकायपाहासीअमरनायका । मगशक्रेंऐरावतीदेखा । अकस्मातप्रेरिला ४२ जिकडेधांवेऐ
रावत । तिकडेभारेंउर्वीलवत । कींदुसरामेरूमूर्तिमंत । शक्राचेंवहनपैंझाला ४३ तोसबळलोटलाऐरावती । चपळधांवलावीरमारुती । जैसाव

१ गरुड. २ मारुति. ३ सूर्यमंडळ. ४ आकाशीं. ५ वायु. ६ उदकाचे तुषार. ७ राहु. ८ माजर. ९ सप. १० उंदीर. ११ देवांचा. १२ इंद्र. १३ सूर्य. १४ टोळ, १५ मारुति. १६ पृथ्वी.

ज्रघातपर्वतीं । तैसाकुंभस्थळींताडिला ४४ धाकेंऐरावततोपळे । मगपाकशासनदेखेतेवेळे । हस्तीआकळितांनाकळे । रानघेतलेंबळेंची ४५ जैसीदु
र्बळाचीस्त्रीनष्टबहुत । तीनमानीत्याचावचनार्थ । तैसाइंद्रासिऐरावत । नाटोपेचिसर्वथा ४६ असोविचारकरूनिमहंत । कामक्रोधजैसेआवरित । तै
सासहस्राक्षेंऐरावत । पुढतीसमोरआणिला ४७ मागुतोधांवेपवनसुत । धरीऐरावतीचेचारीदंत । उलथोनिखालींपाडित । शक्रासहिततेधवां ४८ ह
स्तचपेटेहाणोनितेवेळीं । शक्राचाकिरीटपाडिलाभूतळीं । सकळदेवसेनातेकाळीं । झालीपाहीभयाभीत ४९ इंद्राचीझोटीमोकळी ।
मागुतीऐरावतआकळी । हनुमंतावरीबळेंचिघाली । गंजनघालीपदपुढें २५० गजपळेरानोनान । परमघाबरलासहस्त्रनयन । तोंय
महस्तींदंडघेऊन । हनुमंतावरीउठावला २५१ यमेंदंडप्रेरिलातेवेळे । तोमारुतीवरीकोसळे । मुष्टिघातहृदयींदीधले । यमपाडि
लाधरणीवरी २५२ वक्षस्थळींवळंघोनिहनुमंत । पुढतीमुष्टिघातप्रेरित । हातींचादंडहिरूनघेत । तेणेंचिताडिततयासी ५३ यमें
धरिलेमारुतीचेचरण । ह्मणेमीतुजलाअनन्यशरण । हस्तद्वयजोडून । करीस्तुतीमारुतीची २५४ कुबेरधांवोनितेसमयीं । लागेमारुतीचे
पायीं । तोंऐरावतारूढशंक्रपाहीं । लागवेगेंपातला २५५ ऐसेंदेखोनितेअवसरीं । मारुतीधांवेशक्रावरी । ऐरावतीचेंपुच्छधरी । पृ
थ्वीवरीआपटावया ५६ पुच्छधरूनिभोंवंडीगज । तोंकांपतीसर्वदिग्गज । अवनीवरीदेवराज । वज्रासहपडियेला ५७ बळेंगजआपटीधरणीं ।
देवांसहितपळेवज्रपाणी । कडेकपारींजाउनी । महायोद्धेपळाले ५८ ह्मणतीपृथ्वीगेलीरसातळा । एकचिहाहाःकारजाहला । मगअमरेंद्रतेवे
ळां । अवसानधरीपुढती ५९ वज्रबळेंभवंडित । मुखावरीताडीहनुमंत । तेणेंमूर्च्छादाटलीबहुत । पडेवायुसुतपृथ्वीवरी २६० कनकोंद्रीवरून
कोसळला । पर्वतदरीमाजीपडला । लोकेंप्राणेशधांविन्नला । धरिलासुतपोटासी ६१ कासावीसवायुनंदन ! निकेंळपडिलाअचेतन । वायुकरी
तसेरफुंदन । पुढेंघेऊनहनुमंता २६२ ह्मणेहादुर्जनअमरेंद्र । तान्हयावरीघातलेंवज्र । परमनिर्दयपुरंदर । करीनसंहारतयाचा ६३ माझेतान्ह
याचाजातांप्राण । आटीनसकळत्रिभुवन । जैसेंप्रऱ्हादाकारणेंसंपूर्ण । नृसिंहजैसादैत्यआटी २६४ वायुआधीनसकळांचेप्राण । आकर्षितन
लागतांक्षण । श्वासोच्छ्वासकोंडून । त्रिभुवनकेलेंकासाविस ६५ मगइंद्रविरंचीसकळनृपवर । रमावरआणिउमावर । सकळप्रजाऋषीश्वर । श
रणआलेवायूतें ६६ पोटासिधरूनहनुमंत । वायूदीर्घस्वरेंरडत । तोंब्रह्मादिदेवसमस्त । प्राणनाथेंदेखिले ६७ हनुमंतासिकडेघेउनी । उभारा

---

१ मुगुट. २ जमिनीवर. ३ हत्ति. ४ कालदंड. ५ पृथ्वी. ६ इंद्र. ७ मोठ्या जोरानें ८ समर्थी. ९ मारुति. १० मेरुपर्वत. ११ वायु. १२ पुत्र. १३ म्लान. १४ निचेष्टित. १५ विष्णु. १६ शिव.

हेतक्षणीं । तिन्हिदेवंदेखोनिनयनीं । नमस्कारीतेधवां ६८ मगबोलेकमळासन । पुत्राचाकैवारघेऊन । अत्रयीप्रजानिर्दाळून । टांकिसीकायप्राणेशा ६९ येरूह्मणेनउठतांमाझासुत । इंद्रादिदेवअवघेक्षणांत । निर्दाळीनह्मणतांवैकुंठनाथ । वरदेतसंतोषोनी २७० पूर्णपिंडाचाहनुमंत । यासिस्वप्नींहीनाहींमृत्य । ब्रह्मकल्पपर्यंत । चिरंजीवपुत्रतुझा ७१ मगबोलेकर्पूरगौर । माझातृतीयनेत्रींचावैश्वानर । सर्वजाळीलसाचार । परीयासिबाधीना ७२ माझींत्रिशूलादिआयुधेंतत्वतां । तींनबाधितीलयासितत्वतां । मगविरंचीझालाबोलता । निजवरदानऐकातें ७३ माझाब्रह्मशापआणिपाश । कदांनबाधितीलयास । माझींशस्त्रेंबहुवस । तींहीयातेंनबाधिती ७४ मगइंद्रसत्वरदेतवर । माझेंयासिनबाधेवज्र । हावज्रदेहींसाचार । अर्क्षयअभंगसर्वदां ७५ हनुवटीसझगटलेवज्र । यासहनुमंतनामसाचार । कुबेरह्मणेबहुतअसुर । क्षयपावतीहस्तेंयाच्या ७६ यमदेतसेवरदान । यासकालत्रयींनबाधीदंडपूर्ण । याचेंकरितीजेनामस्मरण । त्यांसिबंधननकरींमी ७७ मगबोलेरसाधिपती । अक्षयअसोयासशक्ती । कधींश्रमनसेमारुती । युद्धकरितांबहुसाल २७८ दिव्यकमळांचीसुमनमाळा । नसुकेलोटतांबहुकाळा । तीविश्वामित्रेंतत्काळगळां । घातलीतेव्हां मारुतीचे २७९ समस्तींदेऊनिवरदाना । देवगेलेआपुलेस्वस्थाना । वायूनेंहनुमंततेक्षणा । अंजनीजवळआणिला २८० मारुतीसहृदयींधरूनी स्फुंदस्फुंदोनिरडेजननी । मुखामाजीस्तनघालोनी । वदनकुरवाळीवेळोवेळां २८१ रामविजयग्रंथसुरस । त्यामाजीहनुमंतजन्मविषेश । श्रवणकरितीजेसावकाश । त्यांसग्रहपीडानबाधी ८२ हनुमंतजन्मकथन । निजभावेंकरितांश्रवण । दुष्टग्रहविघ्नेंदारुण । नबाधितीकदांही ८३ पुढेंरसाळकथासुरस । राजाडोहळेपुसेलराणियांस । अजन्मायेईलजन्मास । तेचकथाअवधारा ८४ क्षेत्रपिकतांबहुवस । तोंतोंकणसेंदिसतीविशेष । तैसेप्रसंगाहूनप्रसंगसुरस । रसभरितअसतीपैं ८५ जयांसिनाहींपुत्रसंतान । त्याणींकरावेंविजयआवर्तन । संततीसंपत्तीपरिपूर्ण । सदांनांदतीत्यांचेगृहीं ८६ येथूनरामचरित्रकथागहन । श्रोतींपरिसावीसावधान । तरीब्रह्मानंदठसावून । कैवल्यपदपाविजे ८७ ब्रह्मानंदाश्रीरघुवीरा । विषकंठहृदयापरात्परा । वेदवंद्याश्रीधरवरा । दीनोद्धाराजगद्गुरू ८८ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मिकीनाटकाधार । सदांपरिसोतपंडितचतुर । तृतीयोध्यायगोडहा ॥ २८९ ॥ ॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ अध्याय ३ ॥ ॥ ओव्या २८९ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्रीकाशीविश्वेश्वरार्पणमस्तु ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

१ ब्रह्मा· विष्णु· महेश· २ ब्रह्मदेव· ३ वायु· ४ शंकर· ५ अग्नि· ६ आपलें· ७ निश्चित· ८ नाशरहित· ९ राक्षस· १० वरुण· ११ बळ· १२ जन्मरहितविष्णु· १३श्रवणकरा· १४ शत· १५ पाठ


अध्याय ४ था
दासी
कैकयी
दशरथ

श्रीगणेशायनमः ॥ श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । चतुरश्रोतेकरितीप्रश्न । तृतीयोध्यायींहनुमंतजन्मकथन । सांगीतलेंतुवांसंपूर्ण । कथाअद्भुतन
वलची १ आणिकेपुराणींसाचार । हनुमंतजन्मकथासविस्तर । वेगळाअसेबिचार । पृथक्पृथक्कथियेला २ तरीपुराणांतरींविपरीत । कथाप
डावयाकायनिमित्त । याचेंप्रत्युत्तरयथार्थ। सांगेसमस्तांकळावया ३ ऐसेंश्रोतयांचेंवाग्जाळ । परिसोनिकवीकुशळ । शब्दबोलेरसाळ। पंरिसा
सकळश्रोतेहो ४ अनादिसिद्धअवतारमाळा । जगदीशेंगुंफिल्याअबलीळा । जैसातरंगपरिजळा । व्यापोनिअसणेंपैं ५ जैसीराहाटमाळिका ।
तैसेंअवतारधरणेंदेखा । कींअखंडमित्रामृगांका । प्रदक्षिणाकरणेंमेरूची ६ कींजपमाळेचेमणी । तेचियेतीपरतोनी । तैसेअवतारब्रह्मांडभरणीं ।
फिरतमाळेसारिखे ७ तरीकल्पपरत्वेंअवतार । जेजेवेळेजेंजेंचरित्र । तैसेंचबोलिलासत्यवंतोकुमेर । कथासाचारंतितुक्याही ८ एकअवतारींवर्त्त
लेंएक । तेंदुसरेअवतारींविशेषकौतुक । तरीतितुकेंहीसत्यएक । विपरीतार्थनमानिजे ९ रणांमाजीएकांगवीर । तैसाजाणिजेकवीश्वर । बहु
तश्रोतयांचाभार । परमचतुरसागरजे १० सभानायकप्रवीणअत्यंत । करींसंदेहधनुष्यघेत । प्रश्नाक्षरशरसोडित । वक्तासमोरलक्षोनी ११
मगधैर्यठाणकवीनेंमांडून । चढविलेंस्फूर्तीचेंशरासन । शास्त्रसंमतघेऊनबाण । सोडीअभंगअनिवार १२ सत्ववोढीकाढूनसत्वर । क्षमावेशेंसोडी
शर । परमकौशल्येंसाचार । प्रश्नबाणसोडिती १३ श्रोत्यावक्त्याचेंसंधान । तटस्थपाहतीविचक्षण । धन्यधन्यह्मणोन । तर्जनीजाणडोलविती
१४ आवेशाचढलेदोघेजण । सप्रेमेंकरितीनामस्मरण । तोसघनघोषऐकून । अवदसाश्वापदेंदूरपळती १५ वक्त्याचेवाग्बाणअत्यंत । अर्थगौ
रवमुखलखलखित । पद्यरचनापक्षमंडित । सुरंगमिरवतसाहित्य १६ ऐसेशरसुटतांअपार । भेदलेंश्रोत्याचेंअंतर । डोलविलेंतेणेंशिर । सुखोर्मी
चेनिजभरें १७ वैरभावनसतांकिंचित । हेंआनंदाचेंयुद्धहोत । क्षीराब्धीच्यालहरीमिळत । जैशाएकएकासी १८ निष्कपटश्रोतापुसत । निरभि
मानवक्ताबोलत । शब्दकौशल्ययुद्धसत्य । जाणतीपंडितविवेकी १९ देवभक्तांचाअनुवाद । तेथेंकायआहेवैरसंबंध । कींगुरुशिष्यांचासंवाद । आ
नंदयुद्धशब्दाचें २० असोआतांबहुतयुक्ती । चातुर्यमंथनपद्धती । वर्मजाणिजेपंडितीं । साहित्यरीतीकळाज्या २१ कवीचीघडमोडीबहुत । युक्ति
सागरींचींरत्नेंकाढित । एकेगव्हांचेप्रकारबहुत । निपजवितसुगरिणी २२ एकेमृत्तिकेचेघटअपार । एकातंतूचेपटविचित्र । एकहेमबहुतअलंकार ।
हाटकघडणारकरीजैसा २३ एकेकाष्ठींशिल्पिकार । युक्तीदाखवीअपार । जोजैसाकवीचतुर । शब्दसाहित्यत्यावरी २४ असोहेंसाहित्यबो

---

१ दुसऱ्या. २ कारण. ३ शब्दजाळ. ४ श्रवण करा. ५ सर्व. ६ माळिका. ७ लाटा, लहरी. ८ सूर्य. ९ चंद्र. १० पराशराची स्त्री. ११ व्यास. १२ सत्य, खऱ्या. १३ युद्ध. १४ हृदय.

लणं । सांगीतलेंश्रोत्यांकारणें। पुढेंरघुनाथकथापरिसणें । श्रीधरचतुरांविनवीतसे २५ मागीलकथानुसंधान। तृतीयोध्यायींहनुमंतजनन।
सांगीतलेंश्रोत्यांकारण । मूळग्रंथआधारेंसी २६ सिंहावलोकनेंतत्वता। श्रोतींपरिसिजेमागीलकथा। तिघीराण्याझाल्यागर्भस्था। कौसल्यासु
मित्राकैकेयी २७ जैसाशुद्धबीजेचामृगांक। कींपळेंपळेंचढेअर्क । प्रकाशपडेअधिकाधिक । उदयाद्रीहूनिपश्चिमे २८ कींकरितांसंतसमागम।
दिवसेंदिवसवाढेप्रेम। कींऔदार्येंकरूनिपरम। कीर्तिवाढेसत्वर २९ तैसेराणियांचेगर्भवाढती। तोंवसिष्ठबोलेदशरथाप्रती। रायाधर्मशास्त्रींऐसी
रीती। डोहळेस्त्रियांसीपुसावे ३० ऐसेंबोलतांब्रह्मऋषी। हर्षवाटलारायासीं। नमोनिवसिष्ठाचेचरणासी। राजेंद्रतेव्हांचालिला ३१ शचीचि
यामंदिरांत। जैसावृत्रशत्रुप्रवेशत। तैसाचिअजपाळसुत। कैकेयीसदनींप्रवेशला ३२ पिंडप्राशनाचेकाळीं। कैकेयीहोतीरुसली। ह्मणोनिराजेंद्र
येकाळीं। तिचेसदनींप्रवेशला ३३ दूतीजाणवितीस्वामिणीतें । डोहळेपुसावयातुह्मांतें। नृपवरस्वयेंयेतसेयेथें। सुमुहूर्तपाहूनियां ३४ सुंदर
पणाचाअभिमान। त्याहीवरीकैकेयीगर्भिण। जैसाअल्पविद्यावंतासगर्वपूर्ण। तैसेंयेथेंजाहलें ३५ जैसीगारुडीविद्याकिंचित। परीब्रीदेंबांधिती
बहुत। कींनिर्नासिकवाहात। रूपाभिमानविशेषें ३६ बिंदुमात्रविषवृश्चिका। परीपुच्छाग्रवरुतेंदेखा। कींकिंचितज्ञानझालियामूर्खा। मगतो
नगणीकोणातें ३७ खडणधेनूसिदुग्धकिंचित । परीलत्ताप्रहारकरीबहुत। अल्पोदकउचंबळत। आंगभिजेवाहकाचें ३८ तैसेंकैकेयीसझालेंत
येवेळीं। प्रीतीनेंदशरथआलाजवळी । आपणशेजेवरीबैसली । नाहींउठिलीनृपादेखतां ३९ कांहींचमर्यादातेथ। नधरीदेखिल्यानृपनाथ।
मगउभाराहूनिदशरथ । डोहळेपुसततियेसी ४० ह्मणेंकैकेयीबोलेवचन । तुजजेंआवडेमनांतून । तेंमीसमस्तपुरवीन। सत्यजाणप्रियकरे
४१ मगकायबोलिलीतयेवेळे। तुह्मींकायपुरवालमाझेडोहाळे। माझेमनींचेसोहळे। पूर्णकर्तादिसेना ४२ मगबोलेअजनंदन। तुजकारणेंवेंचीन
प्राण। परीडोहळेतुझेपुरवीन। सत्यजाणसुकुमारे ४३ मगतीह्मणेजीनृपवरा । डोहळेमाझेहेचिअवधारा। कौसल्यासुमित्रेच्यापुत्रां। दिगंतरा
दवडावें ४४ पाठवावेंदूरकानना। त्यांचासमाचारपुनःकळेना। आमचेंवर्तमानत्यांचियाकर्णा । सहसाहीनजावें ४५ राज्यद्यावेंमाझियापुत्रां।
हेचिडोहळेहोतीराजेंद्रा। तुह्मींमानालअधर्मखरा । तोदोषमजवरीघालिजे ४६ मजनिंदितीलजेंजोंलोक। तोंतोंवाटेलपरमसुख। समस्तजना
व्हावेंदुःख। हेंचिमजआवडे ४७ ऐसेंकैकेयीवचनतेअवसरीं । ऐकतांनृपखोंचलाअंतरीं। कींकाळजींघातलीसुरी। कींआंगावरींचेपळापडे ४८

१ घरांत. २ इंद्र. ३ नकटा ४ विंचूस ५ सर्व ६ दशरथ ७ श्रवण करा ८ अरण्यास ९ समाचार १० समर्थी ११ वीज

वचननव्हतेंकेवळ । दुःखवल्लीचेंश्रेष्ठफळ । कींसंचरलेंहाळाहळ । हृदयींवाटेदशरथा ४९ किंवापर्वतकोसळला । कींकाळसर्पजिव्हा ग्राझोंबला । कींतप्तशास्त्रघायपडिला । आंगावरीअकस्मात ५० कैकेयीवचनकलेशोद्भवजाण । प्राशिलेंआयुष्यसमुद्रजीवन । रावघाबरलाजैसाचतुराननं । वेद हरणकेलेजेव्हां ५१ परमखेदपावलानृपवर । तीसनेदीप्रत्युत्तर । मगसुमित्रेचेंमंदिरँ । प्रवेशतापैंझाला ५२ संसारतापेंजेसंतप्त । तेसंतसमागमें निवत । तैसाचराजादशरथ । सुमित्रासदनींसुखावला ५३ तिचेंनांवसुमित्रासती । परिनामाऐशीआहेकृती । वरकडनांवेंजेऐकती । तींतरजाणा व्यर्थची ५४ नांवठेविलेंउदारकर्ण । अडकावेंचितांजायप्राण । बृहस्पतिनामजयालागून । धडवचनबोलतांनये ५५ कमलनयननामाविशेष । परीदोहींडोळयांवाढलेवडस । क्षीरसिंधुनामपुत्रास । परीताकतयासींमिळेना ५६ नामठेविलेंपंचाननं । परीजंबुकदेखतांपळेउठोन । जन्म गेलामागतांकोरान्न । सार्वभौमनामतयातें ५७ नामठेविलेंजयामदन । तोकुरूपकुलक्षण । तैसीसुमित्रानव्हेपूर्ण । करणीनामासारखी ५८ नृपआलाऐकतांकर्णीं । समोरआलीहंसगॉमिनी । दशरथाचियेचरणीं । मस्तकठेवीसद्भावें ५९ स्त्रियांसींदेवतोआपुलानाथ । पुत्रासदेवमाता पितासत्य । शिष्यासींगुरुदैवत । दैवतअतिथिगृहस्थासी ६० ह्मणोनिसुमित्रेनेंअजनंदन । पूजिलाषोडशोपचारेंकरून । उभीठाकलीकरजो डून । अधोवदनसलज्ज ६१ कैकेयीडोहाळयाचेंदुःखप्रबळ । स्तवनेंविसरलायेथेंसकळ । जैसाबोधठसावितांनिर्मळ । तंमजाळवितळेपैं ६२ रा जाह्मणेसुमित्रेसी । कायडोहाळेहोतातिमानसीं । तेमजसांगनिश्चयेंसी । कुरंगनेत्रेसुकुमारे ६३ मर्गकिंचितहास्यवदन । बोलेसलज्जअधोवदन जेंऐकतांसुखसंपन्न । अजनंदनपैंहोय ६४ ह्मणेहेचआवडीबहुवस । कौसल्यागर्भींजगन्निवास । अवतरेलआदिपुरुष । जगद्वंद्यजगदात्मा ६५ त्याचीअहोरात्रसेवाबरवी । वाटेममपुत्रेंचिकरावी । जाणीवशाहाणीवआघवी । ओंवाळावीतयावरुनी ६६ सेवेपरतेंथोरसाधन । मम पुत्रासिनमानेआनें । आपुलेआंगाचेंहातरुण । ज्येष्ठसेवेलागींकरूं ६७ त्रिभुवनराज्यतृणासमान । त्याहूनिअधिकज्येष्ठभजन । चारीमुक्तींवाट तीगौण । ज्येष्ठसेवेकारणें ६८ सुधारसत्यजोनिनिर्मळ । कोणासआवडेहाळाहळ । उत्तमसांडोनितंदुळ । सिकताकांहोशिजवावी ६९ त्यजो निसुंदररायकेळें । कोणभक्षीलअर्कीफळें । कल्पद्रुमींजोविहंगमखेळे । तोनातळेबाभुळेसीं ७० मानससरोवरींचाराजहंसपाहीं । तोकदांनराहे उलूकगृहीं । बुडीदिधलीक्षीराब्धिडोहीं । दग्धवननावडेत्या ७१ नंदनवनींचाभ्रमरकदाकाळीं । अर्कपुष्पींरुंजीनघाली । जेणेंइंद्रभुवनींनिद्रा

१ अगस्तिऋषि. २ उदक. ३ ब्रह्मदेव. ४ घरीं. ५ सिंह, व्याघ्र. ६ कोल्हा ७ हंसगति. ८ अतिथि. ९ दशरथ. १० अज्ञान. ११ दुर्लरें. १२ सलोकता, समीपता सरूपता, व सायुज्यता. १३ विष.

केली । खदिरांगारींननिजेतो ७२ रंभेतुल्यजायांचांगली । सांडोनिप्रेतकोणकवळी । तैसीमनींआवडीधरिली । कदाविषयींनरमेतो ७३ ह्मणो
निराजचक्रचूडामणी । माझीआवडीज्येष्ठभजनीं । ऐसेसुमित्रेचेशब्दऐकोनी । आलिंगनदीधलेंदशरथें ७४ वाटेअमृतप्राशनकेलें । कींत्रिभुवन
राज्यहातासिआलें । तैसेंनृपाचेंमनसंतोषलें । आलिंगनेंसुमित्रेचे ७५ ह्मणेऐकसुकुमारेराजसे । चंपककळिकेडोळसे । तुवांसांगीतलेडोहळेसुरसे । पू
र्णहोतीलनिर्धारें ७६ नानाभूषणेंअळंकार । ओंवाळीतिजवरूननृपवर । दानेंदेववीलींअपार । सुमित्रेहातींयाचकां ७७ याउपरीज्येष्ठराणी । कौस
ल्यानामेंज्ञानखाणी । जीपुराणपुरुषाचीजननी । त्रिभुवनींविख्यात ७८ जेपरब्रह्मरसाचीमूस । कींनिजप्रकाशरत्नमांदुस । क्षीराब्धिहृदयवि
लास । जिणेंअंतरींसांठविला ७९ जोइंदिरावरत्रिभुवनेश्वर । जेआज्ञाधारविधिशचीवर । हृदयींध्यायअपर्णावर । कौसल्याउदारनिवासीजो
८० असोकौसल्येचेमंदिरीं । प्रवेशताझालाश्रावणारी । सेवकराहाविलेबाहेरी । द्वारमर्यादाधरूनियां ८१ कौसल्याज्ञानकळापरम । तीसअं
तर्बाह्यव्यपिलाराम । आचरणअवघेंपरब्रह्म । नदिसेविषमकदांही ८२ सांडोनिजागृतीसुषुप्तीस्वप्न । नयनींलाविलेंज्ञानांजन । चराचरअवघेंनि
रंजन । रूपदिसेकौसल्या ८३ दशरथप्रवेशोनिअंतरीं । पाहेस्थूळवोसरीवरी । मगसूक्ष्मदेहमाजघरीं । नदिसेकदांकौसल्या ८४ कारणकोठडींत
पाहेसादर । तंवतेथेंअवघाअंधकार । मगमहाकारणउपरीथोर । त्यावरीनृपचढियेला ८५ तेथेंनदिसेकौसल्यासती । मगचकितपाहेनृपती । जे
उदरींसांठवलाजगत्पती । तिचीस्थितीकळेना ८६ मगपरात्परघरांत । प्रवेशेतेव्हांआजपाळसुत । तोंबैसलीसमाधिस्थ । निर्विकल्पवृक्षातळीं
८७ अंतरदृष्टीमुरडली । वरदळस्वनामविसरली । ब्रह्मानंदरूपझाली । नचालेबोलींद्वैताची ८८ जैसासतेजपरमपवित्र । तेथेंडागनलागेअणु
मात्र । स्वरूपींरमतांयोगेश्वर । ज्ञानराहेऐलीकडे ८९ कल्पांतवीजमशकगिळी । पिपीलिकामेरूकक्षेसिघाली । धेनूवत्समृगेंद्राआकळी । ए
कवेळेघडेलहें ९० परिचतुराविश्वरूपावरी । नचालेनहालेंनिर्धारीं । श्रोत्रियांचेयज्ञशाळेभीतरी । कोणमाहारप्रवेशेल ९१ वडवानळापुढेंकर्पूर
जाण । कींजळेंनिधीमाजीलवण । तैसीबुद्धीआणिमन । स्वमुखावरींविराली ९२ असोस्वानंदसागरांत । कौसल्यापूर्णसमाधिस्थ । जवळीउभाठाक
लादशरथ । पाहेतटस्थउगाची ९३ कौसल्यास्वरूपींलीन । हेदशरथासिनेणवेखूण । ह्मणेहेरुसलीसंपूर्ण । तरीचवचननबोले ९४ ह्मणोनिराजचक्र
चूडामणी । कौसल्येजवळीबैसोनी । स्नेहेंतीसहृदयींधरूनी । समाधानकरीतसे ९५ तरीतेनउघडीनयनं । नाहींशरीराचेंतियेसिभानं । मीस्त्रीपुरुषस्म

१ स्त्री. २ पेटी. ३ हृदयांत. ४ लक्ष्मीचा पति विष्णु. ५ अंतःपुरांत. ६ समुद्र. ७ मीठ. ८ ब्रह्मानंद. ९ नेत्र, डोळे. १० स्मरण.

रण । गेलीविसरूनकौसल्या ९६ अळंकारकैंचेएकसुवर्ण । तरंगलटकेअवघेंजीवन । तैसेंविश्वनाहींरघुनंदन । आनंदघनविस्तारला ९७
ऐसीकौसल्येचीस्थितीझाली । राजाह्मणेभूतेंझडपिली । कींमहद्भूतेंघेतली । वोळखीमोडलीइयेची ९८ राजाह्मणेदेवऋषिसिद्ध । इहींदीधला
आशीर्वाद । कींपोटायेईलब्रह्मानंद । आदिपुरुषश्रीराम ९९ ऐकतांरामनामस्मरण । कौसल्येनेंउघडिलेनयन । तोंजगदाभाससंपूर्ण । रघुनंद
नरूपदिसे १०० राजाह्मणेनितंबिनी । कुरंगनेत्रेगजगामिनी । कायजेआवडअसेलमनीं । तेडोहळेपुरवीनसर्व १ भ्रमेंटांकींबोलेवचन । तों
कौसल्याबोलेगर्जोन । मीजगदात्मारघुनंदन । कैंचेंअज्ञानमजपासीं २ स्थूळलिंगआणिकारण । याहूनिमाझेंरूपभिन्न । महाकारणहेंनिरसून
आत्मारामवेगळामी ३ द्वैताद्वैतमहाद्वैत । याहूनिवेगळामीअतीत । सच्चिदानंदशब्दजेथ । खुंटोनियांराहिला ४ जीवशिवदोनपक्षी । ध्याता
ध्यानलयलक्षी । यावेगळामीसर्वसाक्षी । अचिंत्यअलक्ष्यश्रीराम ५ राजाह्मणेकौसल्येऐकें । कोणआहेंमीमजवोळखें । डोहळेपुसावयामहासु
खें । तुजजवळींबैसलों ६ येरीह्मणेज्ञाताज्ञेयज्ञान । हेंसर्वगेलेंआटोन । नाहींस्त्रीपुरुषनपुंसकपूर्ण । मीतूंपणतेथेंकैंचें ७ नृपह्मणेहेमहद्भूतेंघेत
ली । वोळखीसर्वसोडिली । मगपुसेगोष्टमागली । धाकुटपणीचीतियेतें ८ राजाह्मणेशशांकवदने । गुणसरितेपद्मनयने । वऱ्हाडबुडवोनरावणें
नेलेंहोतेंआठवतेंकीं ९ शत्रूचेंनामऐकतांकर्णीं । हाकफोडिलीभुजाठोकोनी । ह्मणेधनुष्यबाणदेआणूनी । टांकीनछेदूनिदाहीशिरें ११० ता
टिकामारूनियांआधीं । ऋषियागपाववीनसिद्धी । महाराक्षसवधोनियुद्धीं । गांधितनयतोषवीन ११ शिवेंचापपरमप्रचंड । मोडूनिकरीनदुखं
ड । माझीज्ञानशक्तीजेअखंड । पणेंजिंकोनिआणितों १२ जेणेंनिक्षत्रीकेलीअवनीपूर्ण । त्याचागर्वहरीननलागतांक्षण । मीएकपत्नीरघुनंदन ।
पितृवचनपाळक १३ मीसेवीनघोरविपिन । परिवारेसीत्रिशिराखरदूषण । क्षणमात्रेंटांकीनवधोन । अग्नितृणजाळीजैसें १४ रीसवानरांहा
तीं । लंकाघालीनपालथी । माझावज्रदेहीमारुती । परमपुरुषार्थीमहावीर ११५ क्षणेंजाळूनिलंकानगर । शत्रूचींशिरेंछेदूनिसाचार । पाषाणीं
पालाणोनिसमुद्र । लंकापूरघेईनमी १६ कौसल्याहाकफोडीदारुण । लंकेपुढेंमाजवीनरण । महाढिसाळकुंभकर्ण । टांकीनछेदूनिक्षणार्धें १७
सहपरिवारेंछेदूनिदशशिरं । बंदीचेसोडवीनसुरवर । माझाबिभीषणप्रियकर । छत्रधरीनतयावरी १८ स्वपदींस्थापूनिनिजभक्त । मीअयोध्ये
सियेईनरघुनाथ । आधिव्याधिजरामृत्य । त्याविरहितकरीनप्रजा १९ स्त्रीपुरुषनपुंसकभेद । यावेगळामीब्रह्मानंद । मायाचक्रचाळकशुद्ध । नि

१ मृगनेत्री. २ अज्ञान. ३ जाणणारा. ४ जाणण्यास योग्य. ५ चंद्रमुखी. ६ गुणाची नदी. ७ कमलनेत्री. ८ यज्ञ. ९ विश्वामित्रऋषि. १० त्र्यंबकधनुष्य. ११ लक्ष्मी. १२ पृथ्वी.

ष्कलंकअभेदपं २० मीप्रळयकाळासिशासनकर्ता । आदिमायेचानिभजर्ता । कर्ताहर्तापाळिता । मजपरतानसेची २१ मीअजअजितसर्वेश्वर । मीचनटलोंचराचर । धरूनिनानाअवतार । मजमाजीसामावे २२ ऐसेंऐकतांदशरथ । ह्मणेंभूतेंघेतलीयथार्थ । फांटाफुटलाबहुत । बडबडीत भलतेंची १२३ पंचाक्षरीआणापाचारून । महाराजसद्गुरूज्ञानघन । तोसरसिजोद्भवनंदन । बोलावूनआणावेगें १२४ जेणेंदर्भावरीधरिली अवनी । कमंडलूठेविलासूर्यासनीं । इंद्रसभेसिनेलावासरमणी । अद्भुतकरणीजयाची २५ वसिष्ठआलाधांवून । राजादृढधरीचरण । कौसल्ये सारिखेंनिधान । भूतेंसंपूर्णग्रासिलें १२६ म्यांयागाकेलासायासीं । कींपुत्रहोईलकौसल्येसी । तोंमध्येंचहेविवसी । उठलीऋषीकायकरूं १२७ मगह्मणेब्रह्मसुत । इच्यापोटायेईलरघुनाथ । तीसगोष्टीहेंविपरीत । काळत्रयींघडेना १२८ अंधकूपींपडेलतरणी । कोरान्नमागेलचिंतामणी । सुधारसगेलाकडवटोनी । काळत्रयींघडेना २९ क्षुधेनेंपीडिलाक्षीरसागर । सुरंतरूसियेईलदरिद्र । तीव्रतपेलरोहिणीवर । काळत्रयींघडेना । १३० असोवसिष्ठकौसल्येजवळी । येऊनिविलोकीतेवेळीं । तंवतीश्रीरामरूपझाली । अंतर्बाह्यसमूळ १३१ नदिसेस्त्रियेचीआकृती । धनुष्यबाणघेऊनिहातीं । आकर्णनयनविराजती । देखेमूर्तिजगद्वंद्य ३२ पाहतांरूपआनंदघन । सद्गदजाहलाब्रह्मनंदन । अष्टभावेंदाटलापूर्ण । गेलाविसरूनदेहभाव १३३ वसिष्ठकौसल्यातेअवसरीं । मुरालींब्रह्मानंदसागरीं । दशरथपरमअंतरीं । घाबराझालानेणोनियां १३४ वसिष्ठा सारिखामहामुनी । भूतेंझडपिलायेक्षणीं । याभूताचीकरताझाडणी । कोणीत्रिभुवनींदिसेना ३५ मीहतभाग्यसंपूर्ण । मजकैंचेंपुत्रसंतान । कौल्याहीगेलीझडपोन । ब्रह्मानंदेंमूर्छित ३६ निरापराधवधिलाश्रावण । तोदुःखदेतोदारुण । ऐसातोमहाराजअजनंदन । ज्याकळेपूर्णअंतरीं ३७ तोंस्वानंदलहरीजिरवून । वसिष्ठेंउघडिलेनयन । राजाधांवोनिधरीचरण । आनंदनमायअंतरीं ३८ रायासिकैसीपरीझाली । पूर्वीबुडतांनौकाआली । अंधकूपींपडतांतत्काळीं । हस्तसूर्येंदीधला ३९ सर्पडंखितांगरुडधांवे । गर्जीकोंडितांकेसरीपावे । क्षुधितापुढेंहेलावे । क्षीरसागरयेउनी १४० कींवणव्यांतजळतांघन । घींहुडहुडीभरतांधांवेकृशान । कींदरिद्रेंपीडितांलक्ष्मीआपण । घरींयेऊनिबैसली १४१ ऐसाआनंदला राजानिश्चित । ह्मणेसद्गुरुस्वामीतूंसमर्थ । मजनवलहेंवाटत । तुजहींभूतेंझडपिती १४२ आह्मींअत्यंतभाग्यहीन । कैंचेंदेखोंपुत्रसंतान । मग हांसलाब्रह्मनंदन । कायगर्जोनबोलत ४३ जोनीलग्रीवहृदयरत्न । जेंकमलोद्भवाचेंदेवतार्चन । सनकादिककरूनियत्न । हृदयसांबळींतवाहती

१ मजमध्यें. २ ब्रह्मदेवाचा पुत्र वसिष्ठ. ३ सूर्यमंडळीं. ४ पद्म. ५ सूर्य. ६ समुद्र. ७ कल्पवृक्षास. ८ चंद्र. ९ वसिष्ठ ऋषि. १० स्तंभ. स्वेद. रोमांच लय. वैस्वर्य. वेपथु (कंप) अश्रु. वैवर्ण्य.

४४ जोवैकुंठपुरविलासी । आलाकौसल्येच्यागर्भासी । मारूनसकळदुष्टांसी । देवसोडवीलबंदीचे ४५ जेंजेंकौसल्याबोलिलीसत्य । तेंतेंपु
ढेंहोईलयथार्थ । तुजहोतीलचारसुत । सत्यवचनराजेंद्रा ४६ शंखचक्रशेषनारायण । चतुर्थरूपेंप्रकटेलजगज्जीवन । पुंण्यप्रतापहोयजाण ।
ज्याचीकथाऐकतां ४७ ऐसींवसिष्ठाचींवचनें । स्वानंदनेंभींचींउडुगणें । कींसत्यवैरागिरीचींरत्नें । निवडोनिदिधलींदशरथा ४८ माध्यान्हा
येयीलचंडकिरण । पुष्यनक्षत्रसाधून । अवतरेलरघुनंदन । पूर्णब्रह्मजगद्गुरू ४९ तेणेंकर्णद्वारांतत्वरित । सांठविलीहृदयसंदुकेंत । धांवोनिश्रीगु
रूचेपायधरित । ह्मणेकृतार्थझालोंमी १५० असोभरलियानवमास । प्रसूतिसमयकौसल्येस । कवणऋतुकवणदिवस । सावकाशऐकातें ५१ वसंत
ऋतुचैत्रमास । शुद्धपक्षनवमीदिवस । सूर्यवंशींजगन्निवास । सूर्यवारींजन्मला ५२ माध्यान्हाआलाचंडकिरण । पुष्यनक्षत्रसाधून । अवतर
लारघुनंदन । पूर्णब्रह्मजगद्गुरू १५३ श्रीरामकेवळपरब्रह्म । त्यासझालाह्मणतांजन्म । संतहांसतीलपरम । तत्वज्ञानवेत्तेजे १५४ ज्याचीली
लाऐकतांअपार । खंडेजन्ममृत्युदुर्धर । त्यारामासिजन्मसंसार । कालत्रयींघडेना ५५ दावीलौकीककरणी । कींकौसल्याझालीगर्भिणी ।
तोब्रह्मानंदमोक्षदानी । जन्मकर्मत्याकैंचें ५६ क्षीरसागरींहूननारायण । येऊनिअयोध्येसिझालासगुण । परीशेषलक्ष्मीसहितजगज्जीवन । तै
साचतेथेंसंचला ५७ जोअनंतकल्याणदायक । अजँअजितनिष्कलंक । भक्तारावयासिदेख । जगन्नायकअवतरला ५८ असोअयोध्या
पुरींतेवेळीं । दुंदुभीचीघाईलागली । विमानाचीदाटीझाली । पुष्पेंवर्षतीअपार ५९ देवकरितीजयजयकार । करीलराक्षससंहार । अवतरलाहा
रघुवीर । बंधमुक्तकरीलआह्मां १६० असोतेकौसल्यासती । बैसलीअसतांएकांतीं । तोंआठवर्षांचीमूर्ती । सन्मुखदेखेअकस्मात १६१
निमासुरवदनसुंदर । तेजेंभरलेंनिजमंदिर । ज्यातेजांतर्शशिमित्र । लपोनिजातीविलोकितां ६२ पदकमलमकरंदसेवना । भ्रमरीझालीक्षीरा
ब्धिकन्यां । कदानविसंबेचरणा । कृपणधनालागींजैसा १६३ संध्यारागअरुणबालार्क । दिव्यरत्नांचेरंगकाढिलेदेख । तळवेतैसेसुरेख । श्री
रामाचेवाटती ६४ चंद्रक्षयरोगेंकष्टीहोउनी । निजांगाचींदशशैकलेंकरूनी । सुरवाडलाश्रीरामचरणीं । स्वानंदधनीघेतसे ६५ रामपदीरंगली
दिवसनिशी । बंधुपाहुणाआलाशशी । तोराहिलाअक्षयव्हावयासी । नजायचिमाघारा ६६ ध्वजवज्रांकुशपद्म । उर्ध्वरेखादिचिन्हेंउत्तम । त्याचा
अर्थऐकतांपरम । सुखहोयभक्तांसी ६७ सात्विकप्रेमळांदेखा । ऊर्ध्वसंकेतऊर्ध्वरेखा । सत्यशीलभाविकां । ऊर्ध्वपंथदावित ६८विद्यामदेंम

१ ब्रह्मानंदरूप अकाश. २ नक्षत्रें. ३ सूर्य. ४ हृदयरूपी पेटींत. ५ असंख्यात. ६ लोकांचा आचार. ७ जन्मरहित. ८ चंद्र. ९ सूर्य. १० क्षीरसागराची कंन्या लक्ष्मी. ११ खंडे.

त्तगेज । भाग्यमदें[१]डुल्लतसहज । त्यासिआकर्षावयासतेज । पायींअंकुशझळकत ६९ पायींझळकेदिव्यपद्म । जेजगमाउलीउत्तम । तेंपद्मेचेंराहा तेंपद्म । तयेपदींसुरवाडली ७० अहंकारजडँ[४]पर्वत । शरणागतांबाधकयथार्थ । तोफोडावयाझळकत । वज्रपायींरामाचे ७१ भवसागरतारा वयागहनें[५] । जाहाजअद्भुतरामचरण । त्यावरीध्वजविराजमान । रात्रदिवसतळपतसे ७२ कामक्रोधदुर्धरअसुँर[६] । त्यांचेंछेदावयाशिरँ[७] । दैदी प्यमानदिव्यचक्र । श्रीरामतळवाझळकतसे ७३ मळरहितपदसुंदर । घोटींत्रिगुणपत्राकार । इंद्रनीळउपमासाचार । नपुरतीह्मणोनियां ७४ पदतळेंआरक्तसाजिरीं । तेथेंवसेसरसिजोद्भवकुमरीं[८] । विश्रांतीघ्यावयाअहोरात्रीं । वामंचरणींरंगलीहो ७५ कितीपापेंहरावींदिवसरजेंनीं[१०] । ह्मणो निश्रमलीजन्हुनंदिनी[११] । शुभ्रवांकीरूपहोउनी । रामचरणींविराजे ७६ मांडच्यासुकुमारसांवळिया । तेथेंसुरवाडलीमित्रतनया । कींयमानुजाअ पवादचुकवावया । महदाश्रयधरियेला ७७ ऐसीरामपदींत्रिवेणीसाचार । प्रयागतीर्थराजेश्वर । प्रेममाघमासींभाग्यवंतनर । प्रातःस्नानांधांवती ७८ भक्तमुमुक्षुसाधकसंत । हेचिराजहंसविराजित । वांकीवरीरत्नेंतळपत । तेचितपस्वीतपताती ७९ चरणरजझळकेस्पष्ट । तोचजाणिजेअक्षयव ट । जेथेंसनकादिकवरिष्ठ । क्षेत्रसंन्यासीजाहले १८० प्रयागींमोक्षदेहत्यागितां । येथेंमोक्षश्रवणकरितां । देहींअसतांविदेहता । येतहाताभ क्तांच्या ८१ प्रयागींकष्टबहुत । येतांजातांभोगितीअमित । हाप्रयागध्यानींअकस्मात । प्रकटेसत्वरभक्तांच्या ८२ तोडरवांकीनेपुरें । असु रांवरगर्जतीगजरें । वाटेभागाळोनिएकसरें । पोटऱ्याजानूवोतिल्या ८३ कींसरळकर्दळीचेस्तंभ । कींगरुडपाचूचेउगवलेकोंभ । इंद्रनीळगाळू निसुप्रभ । जानुजंघवोतिले ८४ मिळाल्यासहस्त्रचपळा । तैसाकांसेझळकेपिवळा । वरीतळपेकटिमेखळा । पाहतांडोळांआल्हाद ८५ कटि मेखळेवरीमहामणी । कींपंक्तींबैसलेमहाअग्नी । दाहकलसांडोनिजघनीं । श्रीरामाचेलागले ८६ वेदांताच्याश्रुतीगर्जोन । अर्थबोलतीजेविशोधून । तैशाक्षुद्रघंटारुणझुण । शब्दकरितीरसाळ ८७ देखोनिकटीसुकुमार । लाजोनिगेलामृगेंद्र । वाटेत्यादुःखेंशरीर । वाहनकेलेंदुर्गेचें ८८ गं भीरावृत्तीनांभिस्थान । जेथेंजन्मलाचतुरानन । सत्वरजतमगाळून । त्रिवळीवरीविराजे ८९ कौस्तुभतेजअपार । पाहतांभुलतीशशिमित्र । गु णींवोविलींनक्षत्रेंसमग्र । मुक्ताहारडोलती १९० कींत्यामुक्तीच्यामाळाबहुत । रघुपतीच्यागळांडोलत । कींमुक्तरूपेंसमस्त । अनंतब्रह्मांडेंगुंफि लीं ९१ मुक्ताफळांच्यामाळागहन । परीत्याचापालटलावर्ण । दिसतीइंद्रनीळासमान । श्यामलांगींरघुपतीच्या ९२ नीळगगनावरीसुंदर ।

१ उन्मत्त हत्ति॰ २ ऐश्वर्याचा गर्व॰ ३ कमल॰ ४ अहंकाररूप॰ ५ अपार॰ ६ दैत्य॰ ७ मस्तक॰ ८ सरस्वती॰ ९ डावा॰ १० दिवसरात्र॰ ११ गंगा॰

मंदाकिनीवोघदिसेशुभ्र । तैसीमाळामनोहर । श्यामतनूवरीशोभ १३ कोमळांगींअतिनिर्मळ । वरीडोलेवैजयंतीमाळ । पुष्करींशक्रचापसुढाळ सुरंगजैसेंविराजे १४ कींमेघींस्थिरावेजैसीप्रभा । तैसींवैजयंतीचीशोभा । सहस्त्रमुखाचियाजिभा । गुणवर्णितांशीणल्या १५ अनंतभक्तहृदयींध रिले । तरीचवक्षस्थळरुंदावलें । ब्रह्मानंदमुरोनिवोतिलें । हृदयस्थानसत्यपैं १६ श्रीवत्सझळकेसव्यांगीं । श्रीनिकेतनवामभागीं । उटीशोभेश्या मलांगीं । कोणदृष्टांततेऐका १७ मित्रकन्येवरीजान्हवीजळ । कींराकाइंदुप्रभेंनिराळ । दैदीप्यमणीइंद्रनीळ । आवरणत्यावरीकांशिमिराचें १८ सू र्यप्रभेचींचक्रेंतळपती । तैशामुद्रिकाझळकती । औपासकयंत्रेंरेखिती । तेचिगतींतेथेंदिसे १९ प्रळयींअग्नीनेंउघडिलेनयन । तेविकीर्तिमुखींदंडपू र्ण । निष्कळंकरोहिणीरमण । पदकहृदयींडोलतसे २०० कंबुकंठअतिशोभिवंत । नासिकसरळसुकुमारबहुत । मंदस्मितवदनविराजित । कोटिम न्मथशोभामुखीं १ विद्रुमवर्णअधरसुतेज । मर्गजवल्लीनेंझळकतीद्विज । त्यातेजेंशशिनक्षत्रेंतेजःपुंज । झांकोळतीपहातां २ त्रैलोकींचागोठोनिआ नंद । वोतिलेंश्रीराममुखारविंद । आकर्णनयनभ्रुकुटीविशद । धनुष्याकृतीशोभती ३ स्वानंदसरोवरींचींकमलदळें । तैसेआकर्णनयनाविराजले । ज्याकृपादृष्टीनेंनिवाले । प्रेमळजनसर्वही ४ कुंडलेंतळपतीमकराकार । जडिलेमित्रआणिरोहिणीवर । कींअंगिरापुत्रभृगुपुत्र । विचारपुसतीरा मातें ५ कींवेदसागरींचीरत्नज्योती । पूर्वउत्तरमीमांसानिश्चिती । कुंडलरूपेंजाणविती । अर्थविशदस्वामीतें ६ श्रीरामतनुसुकुमार । तेणेंशोभ तीअलंकार । पीतवर्णतिलकसुंदर । अनुपम्यरेखिला ७ स्वर्णनदीचापूर । नीळगिरीवरीनिरंतर । तैसातिलकसुंदर । विशाळभाळींझळकतसे ८ जैसाकल्पांतींचादिनकर । तैसामुकुटदिसेजाज्वल्यथोर । तेजतळपतसेअपार । दिग्गजचक्रींनसमाये ९ दावाग्नीचेकल्लोळभडकत । तैसेंउ त्तरीयवस्त्रझळकत । दशांप्रतिमुक्तेंरुळत । कृत्तिकापुंजासारिखीं २१० परमतेजाळक्षीरोदक । कींशुभ्रयशाचढलेंबिक । शुभ्रश्वेतमृडानीनायक कर्पूरेंकरूनिउटिला ११ दिव्यरंजततगटउघडलें । कींपारिजातेंकैलासडवरलें । कींजान्हवीतोयेंओपविलें । दिनकरनाथेंस्वहस्तें १२ सच्चिदा नंदतनुसगुण । अंतसिकुसुमाभासपूर्ण । त्याचिरंगेंकरून । नीलोत्पलेंराबविलीं १३ नभासिचढलातोचरंग । त्याचियाप्रभेनेंमेघांसिरंग । इं द्रनीळहीसुरंग । त्याचप्रकाशेंजाहले १४ तेथींचेंसौंदर्यअद्भुत । गरुडपाचूचेंतेजदिसत । मर्गजासिबीकचढत । तनुसांवळीदेखोनियां १५ जो वैकुंठींचावेल्हाळसुंदर । भक्तमंदिरांगणमंदार । कुरवंडीकरीवेगींसाचार । कोटिमकरध्वजवरूनियां १६ ब्रह्मांडोदाराबाहेरी । आंगींचासुवास

१ सूर्याची कन्या यमुना. २ पौर्णिमेचा चंद्र. ३ सोनें ४ पोवळीं. ५ सूर्य, व चंद्र. ६ बृहस्पति. ७ शुक्र. ८ पार्वतीचा पति शंकर. ९ रुपें. १० गंगेच्या उदकानें. ११ अळशीचें फूल.

धांवणेंकरी । लीलामृतसागरकैटभारी । भक्तजनमनोवेधकजो १७ पूर्णब्रह्मानंदरघुवीर । लीलाविग्रहीश्रीधर । हृदयींरेखितीनिरंतर । निज भक्तिप्रेमबळें १८ असोकौसल्याबोलेतेअवसरीं । भक्तवत्सलामधुकैटभारी । तूंआतांबाळवेषधरीं । माझेउदरींअवतरें १९ लोकह्मणतीकौसल्यानंदन । ऐसाहोयींतूंमनमोहन । अमलदलराजीवनयन । हास्यवदनविलोकी २२० सजलजलदवर्णकोमळ । कौसल्येपुढेंझालाबाळ । तंवतेपरमसुवेळ । पुष्यार्कयोगतेसमयीं २१ जोक्षीरसागरवासीतमालनीळ । तोकौसल्येपुढेंझालाबाळ । चरणांगुष्ठधरूनिकोमळ । मुखकमळींघालीतसे २२ भक्तचरणींलागलेबहुत । गोडगोडह्मणोनिवाखाणीत । यालागींगोडीरघुनाथ । स्वयेंपाहातचाखोनी २३ स्वचरणींचीगोडीकांचोंखित । भक्तांसिलोभलागावयाबहुत । ह्मणोनियांकौसल्यासुत । कौतुकार्थदाखवीतसे २४ पुत्रझालाकौसल्येस । लागलावाद्यांचाघोष । सुरांसहितसुरेश । जयजयकारनभींकरिती २५ सुमनसंभारतेअवसरीं । देववर्षतीअयोध्येवरी । दुंदुभीचानादअंबरीं । नसमायेचितेधवां २६ हळदीकुंकुमेंताटेंभरुनी । बिदोबिदीं धांवतीसुवासिनी । पावल्याकौसल्येच्यासदनीं । वेगेंकरूनितेधवां २७ मंगळतुरांचाएकचिनाद । घरोघरींहोतसेब्रह्मानंद । तेसमयींचाआनंद । भोगेंद्रवर्णूंशकेना २८ आनंदलाब्रह्मनंदन । चहूंकडूनधांवलेब्राह्मण । जैसाक्षीरसागरदेखोन । क्षुधार्थीवेगेंधांवती २९ कींमहापर्वकाळप्रगटला । प्रयागासिधांवेभक्तमेळा । कींगांवांसमीपपरीसनिघाला । दुर्बळधांवतीघ्यावया २३० कींतृषाक्रांतगोभारसकळी । धांवती जैसेंगंगाजळीं । कींवृक्षदाटलेदेखोनिफळीं । विहंगमतेथेंझेंपावती २३१ तैसीब्राह्मणाचीतेकाळीं । दाटीझालीराजाजवळी । पुत्रमुखपाहावयातेकाळीं । दशरथरावचालिला ३२ दशरथह्मणेयाचकांसी । जेजेइच्छाअसेलमानसीं । तेंतेंमागामजपासीं । येचसमयींदेईन ३३ भांडारेंफोडिलींबहुत । याचकांसिबोलेदशरथ । मोटाबांघोनअमितें । आवडेतितकेंन्यांआतां ३४ समागमेंघेऊनब्राह्मण । महाराजतोअजपाळनंदन । प्रवेशलाआनंदेंकरून । सदनाप्रतिआपुल्या ३५ दशरथेंकरूनियांस्नान । केलेंआदिपुंण्याहवाचन । पाहावयासिपुत्रवदन । राजाजवळीपातला ३६ श्रीरामवदनतेअवसरीं । न्याहाळितांतोषलाअंतरीं । मधुबिंदुघालोनिमुखाभीतरीं । मधुकैटभारीतोषविला ३७ श्रीरामाचेंजातक । करीतेव्हांनृपनायक । गोभूरत्नेंअसंख्य । मगदेतयाचकांसी ३८ रत्नजडितसिंहासन । त्यावरीमायबैसेश्रीरामघेऊन । मृगांकवर्णचामरेंजाण । दोघीढाळितीदोहींकडे ३९ पीकपात्रधरूनिहातीं । समीपबैसेएकदूती । कनकांबरांचींघेऊनिबुंथी । बैसलीसतीकौसल्या २४०

---

१ पक्षी. २ असंख्यात, अपार. ३ दशरथ. ४ पुत्रमुख. ५ चंद्रासारखीं शुभ्र वर्ण. ६ पिकदाणी. ७ भरजरीचें वस्त्र.

भोंवतेवेष्टिलेविद्वज्जन । जाणतीजेभविष्यज्ञान । सातशतेंस्त्रियाधांवोन । येत्याझाल्यादशरथाच्या ४१ जैशाकेवळविद्युल्लता । तैशाअळंकारव
स्त्रांसहिता । पाळाकौसल्याभोंवत्या । शोभल्याकैशातेवेळीं ४२ महामायाआणिभगवती । तिजभोंवत्यामिळाल्याअनंतशक्ती । कींसूर्यचक्रासि
वेष्टिती । किरणेंजैसींतयापरी ४३ वसिष्ठगुरूहोऊनिपुढें । विलोकीश्रीरामाचेंरूपडें । जेंजन्मकर्तृत्वनिवाडें । रायापुढेंसांगत ४४ ह्मणेहाक्षीरसा
गरविहारी । जन्मलाकौसल्येचेउदरीं । निजजनतारावयासिनिर्धारीं । अवतरालाआदिपुरुष ४५ द्वादशवर्षेंयासभरतां । एकद्विजयेईलअवचि
तां । प्रार्थूनियांदशरथा । यासिघेऊनिजाईल ४६ आरंभींसोडूनएकबाण । वधीलराक्षसीदारुण । गोब्राह्मणमखपाळण । करीलजाणपुत्रतुझा
४७ कृशानप्रवेशेशुष्कविपिनीं । तैसाजाळिलराक्षसमखरक्षणीं । पुढेंचरणस्पर्शेंकरूनी । एकललनाउद्धरील ४८ परमप्रचंडकोदंड । तेंबाहुदं
डबळेंकरीलदुखंड । एकपत्नीव्रतअखंड । वीरहोईलत्रिभुवनीं ४९ महायोद्धाएकब्राह्मणँ । त्यासर्जिकीलनलागतांक्षण । बंधूसहितपरतोन ।
अयोध्येसीयेईल ५० राज्यींबैसतांहावरिष्ठ । महाएकहोईलअरिष्ट । नगरलोकपावतीलकष्ट । खेदमहानकरितील ५१ हानरवीरपंचाननँ ।
प्रेमेंपाळीलपितृवचनँ । मगस्त्रींसमवेतकानन । चतुर्दशवर्षेंसेवील ५२ हानसतांआश्रमांत । एकराक्षसयेईलअकस्मात । याचेस्त्रियेसनेईलसत्य
षण्मासपर्यंतनिर्धारें ५३ मगहास्त्रीशोधीलअरण्यांत । वानरमिळतीलअकस्मात । एकवानरउन्मत्त । त्यासमारीलनकळतां ५४ ब्रह्मांडनाच
वीलनखार्थी । ऐसाएकवानरकेसरी । जाळोनियांलंकापुरी । महाप्रळयकरील ५५ शुद्धीआणितांराघवेंद्र । पाषाणींपाळाणीलसमुद्र । शरण
येईलएकरजनीचर । चिरंजीवकरीलत्यासी ५६ मारूनिराक्षसांसकळां । सोडवीलसुरांच्याबंदिशाळा । मागुतीयेईलस्वस्थळा । अयोध्यापु
रागजरेंसी ५७ अकरासहस्त्रसंवत्सर । राज्यकरीलराजेंद्र । पुढेंपुत्रांसीयुद्धथोर । करीलकौतुकेंकरूनियां ५८ शेवटींअयोध्याविमानींघालो
नी । नेऊनठेवीलवैकुंठभुवनीं । ऐसेंजातकऐकोनिकर्णीं । रावदशरथतोषला ५९ स्तनपानकरितांरघुनंदन । पाहेवसिष्ठाकडेपरतोन । कींवा
ल्मिकभाष्यसंपूर्ण । कथिलेंयेणेंअवलीलें ६० तोंसुमित्रेसिझालापुत्र । ह्मणोनिधांवतआलेविप्र । क्षीराब्धीहूनिश्रीधर । कौसल्येमंदिरींपावला
६१ तंवतोभोगींद्रपाठघेत । पाठिराखापावलात्वरित । सुमित्रेचेशेजेनिघत । बाल्यदशाधरूनियां ६२ सुमित्रास्वप्नदेखत । कींमजझालासुलक्ष
णसुत । सावधहोऊनियांपाहात । पुढेंखेळतबाळकतो ६३ ऐसाझालासुमित्रानंदन । विप्रांसहतेथेंदशरथयेऊन । तत्काळकेलेंपुंण्याहवाचन ।

---

१ अग्नि. २ स्त्री ( अहिल्या. ) ३ धनुष्य. ४ परशुराम. ५ सिंह, व्याघ्र. ६ पित्राज्ञा. ७ स्त्रियेसह. ८ अरण्य. ९ वाली या नामें. १० राक्षस ( बिभीषण ) ११ देवांच्या. १२ शेष.

जातकर्मसर्वही ६४ कैकेयीसझालेदोनकुमर । तेविष्णूचेशंखचक्रअवतार । परिकैसेजन्मलेतोविचार । कैकेयीसनेणवे ६५ सुषुप्तीमाजीकैकेयी निमग्न । जैसापंकगर्तेंतपाषाण । पुत्रहोऊनिदोघेजण । दोहींबाजूसखेळती ६६ दासीयेऊनिकैकेयीप्रती । थापटोनिजागीकरिती । दोघेपुत्र झालेनिश्चिती । सावधहोऊनिपाहेंपां ६७ कैकेयीपाहेपुत्रमुख । तोंमित्रआणिमृगांक । तेविदोघेखेळतीबाळक । देखतांसुखवाटलें ६८ रावतेथें हीयेऊन । अवलोकिलेदोघेनंदन । सुखीकेलेयाचकजन । वस्त्राभरणेंकरूनियां ६९ बारादिवसपर्यंत । रावमहोत्साहकरित । मंगळतुंरगर्जंत । रात्रदिवसराजगृहीं २७० तेरावेदिवसींवसिष्ठऋषी । नामकरणठेवीचवघांसी । कौसल्येचारामतेजोराशी । वैकुंठवासीजगदात्मा ७१ सुमित्रे चाजोनंदन । त्याचेंनामठेविलेंलक्ष्मण । जोकाद्रवेयकुळभूषण । विष्णुशयनज्यावरीकरी ७२ कैकेयीचेजेकांसुत । भरतशत्रुघ्ननिश्चित । चौघेदा शरथीविख्यात । ऐकाचरित्रतयांचें ७३ ज्यांचीजन्मकर्मलीलाऐकतां । पळसुटेसर्वदुरितां । जैसामहाप्रभंजनसुटतां । जळदजाळवितळेपैं ७४ श्रीरामकथामानससरोवर । तुह्मींसंतश्रोतेपरमचतुर । साहित्यमुक्तेंसुढाळथोर । सेवानिरंतरआवडीं ७५ श्रीरामकथासुधारस । तुह्मीपंडित श्रोतेत्रिदश । प्राशनकरासावकाश । अतिसुरसग्रंथहा ७६ पुराणपुरुषपरात्पर । तोब्रह्मानंदश्रीधरवर । अयोध्येंतअवतरलासाचार । त्याचें चरित्रपरिसापुढें ७७ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथप्रचंड । संमतवाल्मीकीनाटकाधार । सदापरिसोतपंडितचतुर । चतुर्थोध्यायगोडहा २७८ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ अध्याय ॥ ४ ॥ ओंव्या ॥ २७८ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

---

१ गाढझोंपेंत. २ चिखलांत. ३ सूर्य. ४ चंद्र. ५ वाद्यें. ६ पुत्र. ७ सर्पकुलामध्यें श्रेष्ठ. ८ दशरथाचे पुत्र. ९ पातकांस. १० तुफानवारा.



अध्याय ५ वा.
विश्वा.
दशरथ राजा.
रामचंद्र
लक्ष्मण

श्रीगणेशायनमः । । श्रीरामकथातेजःपुंज । हेंचिविशाळदिव्यजहाज । यासिनवखणसहज । नवविधाभक्तीचे १ एकाएकाखणाआंत । बैस लेअनुतापीमहाभक्त । प्रेमाचेंसीडवरीफडकत । पालवितमोक्षातें २ येथेंकर्णधारनिश्चित । स्वयेंजाणिजेश्रीरघुनाथ । तोचिपैलपारानेत । निज दासांबैसउनी ३ त्याश्रीरामाचेंनामगोड । कथाज्याचीगगनाहूनिवाड । जेलीलाऐकतांपुरेकोड । नलगेचाडआणिकाची ४ जोंजोंश्रोतेकथेसी सादर । तोंतोंरसवाढेअपार । जैसापुष्करींदेखतांरोहिणीवर । चंद्रकांतापाझरसुटे ५ बृहस्पतीसारिखावक्ता । मतिमंदमिळालाजरीश्रोता । तरीव्यर्थगेलीतेकथा । जेनाहींसादरताश्रोतया ६ जैसेंकामेंनामाजीरुदन । कोणीचनपुसेतयालागुन । तैसेंमतिमंदापुढेंश्रवण । करणेंत्याचप्रका रें ७ जैसेंअन्नकेलेंस्वादिष्ठ । परीजेवणारबैसलेरोगिष्ठ । तरीतेसुग्रणीचेकष्ट । शून्यस्थानींपडिलेकीं ८ षड्रसअन्नेंपरिकर । परितेंजेऊंनजाणे कायखर । पंकगर्तेंतसुंदर । हिरानेऊनिरोविला ९ कवित्वसागरींरत्नेंदष्टांत । त्याचेपरीक्षकज्ञातेपंडित । मतिमंदकुटिलनिश्चित । त्यासपरीक्षा नकळेहे १० सुधारसउकरडांवोतिला । गर्भांधासीआरसादाखविला । कींदिव्यमंचकघातला । चिताभूमीसनेउनी ११ कागासमर्पिलीं अमृतफळें । उष्ट्रापुढेंसोलीवकेळें । कींजेमृत्युप्रायनिजेले । त्यांसिपूजिलेंव्यर्थजेवी १२ कींअनर्घ्यरत्नमाळा । घातलीदिवाभीतांचेगळां । कींक स्तूरीटिळकरेखिला । सुकरींचेललाटीं १३ तैसीमतिमंदापुढेंकथा । वाग्देवीसंतापेबोलतां । जैसीपद्मिणीराजदुहिता । षंढाप्रतिदीधली १४ भ ग्नपात्रामाजीनीर । कदाकाळींनराहेस्थिर । तरीतुह्मीभक्तवरिष्ठचतुर । कथासादरपरिसाहो १५ आर्धीचमुक्ताफळवरीसुवास । आधींचहिरात्या वरीपरिस । तैसाचतुरावरीप्रेमरस । श्रीरामासीआवडेतो १६ असोचतुर्थाध्यायाचेअंतीं । कथासुरसपरिसिलीश्रोतीं । सांगीतलीश्रीरामाचीजन्म स्थिती । बंधूंसहितसर्वही १७ जोसरसिजोद्भवाचापिता । त्यासिदशरथबापकौसल्यामाता । भक्तारावयातत्वता । अयोध्येमाजीप्रगटला १८ दशरथाचेंभाग्यथोर । रत्नजडितपालँखसुंदर । चारीलांबविलेपरिकर । चवघेकुमरनिजतीतेथें १९ तेरावेदिवसींपाळणां । पहुडविलारामराणा जोअगम्यवेदपुराणा । त्यासिजोजोह्मणोनिहालविती २० जोआदिमायेचानिजवर । जोपुराणपुरुषपरात्पर । जोमायाचक्रचाळकचतुर । जोजो ह्मणोनिहालविती २१ जोअगम्यदशशतवदना । प्रेमपाळणातोरामराणा । जवळीज्याउभ्यालल्लना । सुवासिनीकोणत्याऐका २२ पाळण्यास भोंवत्याकामिनी । शांतीक्षमादयाउन्मनी । उपरतीसद्विद्याकामिनी । जोजोशब्देंहालविती २३ जेंसनकादिकांचेंध्यान । जेंमृडानीपतीचेंचिंतन

१ नावाडी. २ अपार ३ आकाशांत. ४ चंद्र ५ अरण्य ६ गाढव. ७ विसलंत. ८ उंट. ९ अमोलिक. १० घुवड. ११ डुकर. १२ सरस्वती. १३ उदक. १४ मोतीं. १५ ब्रह्मदेवाचा. १६ पाळणा

जेंचतुरास्याचेंदेवतार्चन । जोजोह्मणोनिहालविती २४ निर्वाणदीक्षास्वरूपस्थिती । मुमुक्षुनिष्कामनाप्रतीती । सुलीनतासमाधिसद्गती । लीला
गातीस्वानंदें २५ परापश्यंतीमध्यमावैखरी । गजरेंगातीचारीनारी । चारीमुक्तीनिर्धारी । चारीकोनींतटस्थ २६ घरांतमुख्ययासुंदरी । इतरा
बैसविल्याबाहेरी । जाग्रतीस्वप्नसुषुप्तीनारी । त्यांसीरावणारीदिसेना २७ असंभावनाविपरीतभावना । विक्षेपतागतायाताजाणा । तुर्यांदावी
शाहाणपणा । बहुतजाणतीअसेंमी २८ बारासोळाचवदानारी । गलबलाकरितीबाहेरी । चौचष्टीदावितीकळाकुसरी । अंतरींप्रवेशनव्हेची २९
असोसकळनितंबिनी । वोंटींकौसल्येचीभरुनी । वस्त्रेंअलंकारसमर्पुनी । आपुलेसदनांत्यागेल्या ३० अयोध्येसजन्मलारघुपती । विघ्नेंराक्षसां
जाणविती । प्रळयविजाकडकडूनपडती । लंकेवरीअकस्मात ३१ कांपोंलागलेंलंकानगर । भूकंपहोयवारंवार । उगेंचमोडलेंराजछत्र । सभाप्रेत
वतदिसतसे ३२ महाद्वारेंउलथोनिपडत । रावणजोंभद्रींचढत । दाहीमस्तकांचेकोसळत । मुगुटखालींउगेची ३३ शक्रारीआरसापाहेनिर्मळ ।
तोंआंतनदिसेशिरकमळ । राजमंदिरावरीअमंगळ । दिवाभीतेंबोभाती ३४ स्वप्नदेखेमंदोदरी । मर्कटेंतोडिलीगळसरी । विगतधवाज्यानारी ।
त्यावोटीभरितीधुळीनें ३५ ललाटशून्यलोचना । देखतीजाहलीमयकन्या । चिंतापडलीदशकंठप्राणा । ह्मणेईश्वरक्षोभला ३६ ईश्वरझालि
यापाठमोरा । नसतींविघ्नेंयेतीघरा । महारत्नेंहोतीगारा । नपुसेकोणीतयातें ३७ आपुलेंद्रव्यलोकांवरी । बुडोनिजायनलाभेकरीं । ज्याचेंघ्यावें
तेद्वारीं । बैसतीआणघालोनी ३८ वैरियेंाकरींसांपडेवेंर्म । आळसबहुतयेऊनबुडेधर्म । विशेषवाढेक्रोधकाम । तरीदेवक्षोभलाजाणिजे ३९ आ
पुलेजेकांशत्रुपूर्ण । त्यांसआपणपीडिलेंदारुण । अडल्याधरणेंत्यांचेचरण । तरीदेवक्षोभजाणिजे ४० लाभाकारणेंनिघेउदिमास । तोंहानीचहो
यदिवसेंदिवस । पूज्यस्थानींअपमानविशेष । तरींदेवक्षोभजाणिजे ४१ सुहृदअत्यंतद्वेषकरिती । नसतेचिव्यवहारगळांपडती । सदांतळमळवा
टेचित्तीं । तरींदेवक्षोभजाणिजे ४२ आपलीस्त्रीराज्यधन । शत्रूभोगूंपाहेआपण । देहींपीडितव्याधिपूर्ण । तरींदेवक्षोभजाणिजे ४३ विद्याज
वळीबहुतअसे । बोलूंजातांमतिभ्रंशे । कोणीतयासिनपुसे । तरीदेवक्षोभजाणिजे ४४ ठेविलाठेवानसांपडे । नसतीचव्याधिआंगाजडे । सदां
भयवाटेचहूंकडे । तरीदेवक्षोभजाणिजे ४५ वृद्धपणीयेईदरिद्र । स्त्रीमृत्युपावेगेलेनेत्र । हेळसूनिउपेक्षितपुत्र । तरीदेवक्षोभजाणिजे ४६ असोलं
केमाजीरावण । सांगेप्रधानासिबोलावून । अहोरात्रसावधान । लंकानगररक्षावें ४७ अयोध्येसिरामजन्मतांतात्काळ । वृक्षविराजतीसदाफळ ।

१ सरूपता सलोकता समीपता सायुज्यता २ राम. ३ चवथी अवस्था. ४ घरीं. ५ सिंहासनीं. ६ इंद्रजित. ७ घुवडें. ८ विधवा. ९ मंदोदरी. १० रावणास. ११ शत्रूच्याहातांत. १२ छिद्र, पैशून्य.

गाईदुभतीतत्काळ । क्षीरतुंबळनसांवरे ४८ आधिव्याधीरहितलोक । नाहींचिंतादरिद्रदुःख । शुष्कधरणीसअपारपीक । येऊंलागलेंतेधवा
४९ । अवतरतांजगज्जीवन । जरारहितझालेजन । अविद्यापापमुळींहून । देशधडीजाहलें ५० दरिद्रीझालेभाग्यवंतं । मूर्खतेबोलकेपंडित । कुरू
पतेस्वरूपवंत । देदीप्यमानतेजस्वी ५१ अवतरतांचश्रीराम । निःशेषगेलेक्रोधकाम । अयोध्यावासियांसुकाळपरम । स्वानंदाचाजाहला ५२
गृहींप्रकाशतांभास्करं । मगकैंचाअंधकार । जागृतअसतांघरधर्नीसाचार । चोराप्रवेशनव्हेची ५३ कींबोलतांज्ञानवेदांत । सकळमतेंहोतीकुं
ठित । कींसद्विवेकहोतांप्राप्त । संसारदुःखवितळेपैं ५४ कींप्रवेशतांवैराग्यशांती । दृढकामक्रोधपळती । तैसाअवतरतांरघुपती । दोषदुष्काळनि
माले ५५ असोदशरथाचेसुत । एकामागेंएकरांगत । हळुहळूचवघेचालत । संतोषतीमातापिता ५६ पाचुबंदआंगणांत । परस्परेंहातधरूनचा
लत । एकासिएकपाहूनहांसत । बाळभावेंकरूनियां ५७ कौसल्याउभीराहूनियां । चौघांबोलावीजेवावया । तंवतेजातीपळोनियां । धांवूनिमाया
धरीमागें ५८ चौघांचेंमुखधुवोनियां । बैसवीभोजनासमाया । निवतदशरथाचीकायां । पुत्रालागींपाहातां ५९ ह्मणेकोणपुंण्याचेपर्वत । पूर्वीं
आचरलोंबहुत । तरीचचवघेआदित्य । अवतरलेमाझेपोटीं ६० चिमणीमूर्तीचिमणेंठाण । चिमणींधनुष्येंचिमणेबाण । चिमणीनेर्पुरेंरुणझुण । पा
यींगर्जतीचौघांचे ६१ झालेअष्टवर्षांचेसुंदर । चौघांसमानवस्त्रेंअळंकार । चिमणीधनुष्येंपरिकर । चिमणेशरंसोडिती ६२ चिमणापीतांबरक
टींमेखळा । चिमणीपदकेंमुक्तांमाळा । चिमण्यासेवकांचामेळा । रामाभोंवताशोभला ६३ उन्हांतखेळतांरघुपती । सेवकमित्रेंपत्रेंधरिती । एकचा
मरेंढाळिती । राजनीतीकरूनियां ६४ श्रीरामसोडीबाण । पाठींसोडीतलक्ष्मण । त्यामागेंभरतशत्रुघ्न । भेदितीसंधानतैसेंची ६५ दुरूनपाहेदशर
थवीर । चवघेएकदांचटांकितीशर । असुरेंप्रतिमाकरूनथोर । शिरेंत्यांचींउडविती ६६ वेदांतींच्यादिव्यश्रुती । सर्वांवरीगर्जती । तैसेबाणसोडी
रघुपती । अचुकआणिचपळत्वें ६७ असोचौघांचेंमौंजीबंधन । श्रीगुरुवसिष्ठातेंपुसोन । मेळवूनिअपारब्राह्मण । अजनंदंनकरिताझाला ६८
श्रीरामाचाव्रतबंधहोत । अष्टमहासिद्धीतेथेंरावत । चारदिवसपर्यंत । न्यूनपदार्थनदिसेकांहीं ६९ यज्ञभोक्तारघुनाथ । त्यासब्राह्मणघालितीय
ज्ञोपवीत । गायत्रीमंत्रजपजपत । वेदवंद्यमहाराजतो ७० ऐसेंझालियावरीव्रतबंधन । वसिष्ठापासूनअनुदिन । चहूंवेदांचेंअध्ययन । करविलेंसंपूर्ण
चवघांसी ७१ जयासिवर्णितांवेदवेडे । तोश्रीरामगुरूपासींवेदपढे । अध्ययनसांगतांसांकडें । गुरुसिनपडेसर्वथा ७२ यापरीद्वादशवर्षेंत

१ वृद्धपणा. २ अज्ञान. ३ ऐश्वर्यवंत. ४ उत्तमानंद. ५ सूर्य. ६ निश्चयानें. ७ देह ८ तारडया. ९ बाण १० मोत्यें. ११ छत्रें. १२ राक्षस. १३ वेदवाक्यें. १४ दशरथ. १५ दररोज. १६ संकट

लता । संपूर्णजाहलीरघुनाथा । मगपुसोनिवसिष्ठदशरथा । श्रीरामतीर्थानिघाला ७३ तीर्थाटणाचवघेजण । निघालेसर्वेंअपारसैन्य । समाग मेंदिधलासुमंतप्रधान । असंख्यधनवांटावया ७४ ब्रह्मचर्येंतीर्थाटण । करावेंहेंशास्त्रांचेंप्रमाण । हेंजाणोनिरघुनंदन । तीर्थाटणासीनिघाला ७५ सवत्सगाईचेभार । नानावस्त्रेंअळंकार । तीर्थीवांटीश्रीरघुवीर । याचकांसीसन्मानें ७६ ज्यातीर्थाचामहिमाजैसापूर्ण । श्रीरामकरीतैसेंविधा न । ज्याचेनिसकळतीर्थेंपावनें । तोरघुनंदनतीर्थेंहिंडे ७७ लोकसंग्रहाकारण । तीर्थेंहिंडेराममनमोहन । तितुकींतीर्थेंकराश्रवण । संतश्रोतेसर्वही ७८ काशीविश्वेश्वरनिर्मळ । त्र्यंबकउज्जनीमहांकाळ । ओंकारअमलेश्वरजाश्वनीळ । बदरिकेदारघृष्णेश्वर ७९ नागनाथवैजनाथथोर । मल्लिका र्जुनभीमाशंकर । सोमनाथरामेश्वर । ज्योतिर्लिंगेंद्वादशहीं ८० अयोध्यामथुराहरिहर । काशीअवंतिकानगर । द्वारावतीगोमतीतीर । सप्तपुऱ्या अनुक्रमें ८१ तीर्थराजमुख्यात्रिवेणी । पंचप्रयागपुंण्यखाणी । ब्रह्मप्रयागकर्णप्रयागमहारणी । गुप्तप्रयागसमर्थ ८२ देवप्रयागशिवप्रयाग पापहरण । नैमिषारण्यधर्मारण्यपंचकारण्य । ब्रह्मारण्यवेदारण्य । बदरिकाश्रमपावनतो ८३ यमुनासरस्वतीभागीरथी । गौतमीकृष्णाभोगा वती । तापीनर्मदागोदावरी । प्रवरापुण्यवतीमंदाकिनी ८४ आनंदवर्धनीपयोष्णी । पिनाकीतुंगाकल्मषनाशिनी । कृतमालाकावेरीप्रकाशवाहि नी । सुवर्णमुखीसुमाळा ८५ कपिलाताम्रपर्णीसिरावती । तुंगभद्रासोमवती । सावित्रीरेवाकुंकुमवती । वेण्यावेदवतीमलप्रभा ८६ घटप्रभा नदीनलिनी । गंडकीशरयूवैतरणी । सोमनदीशिवनदतापहरणी । सोमभद्रनदेश्वर ८७ करुणाअरुणाप्राचीपुरंधरी । वेत्रवतीसप्तउरगाकर्णकु मरी । स्वामीकार्तिकीपंचघृताप्टथ्वीवरी । विख्यातप्रवाहयांचे ८८ वंजराकालिकाश्रमहारिणी । महिंद्राकाळिमंत्रवेडूरणी । इरावतीनदीशंखोद्धारि णी । जयंतीआणिअहिर्णवी ८९ नाटकीआणिअलकनंदा । फल्गूसर्वांतकत्रिपदा । शांतिबाणनदीसुखदा । अनुक्रमेंनद्यासर्व ९० शेषाद्री आणिब्रह्माद्री । मूळपीठसिंहाद्री । विंध्याद्रीआहिमाद्री । मानससरोवरींस्नानदान ९१ अरुणाचळनंदनवनें । कमळालेंयींचिदंबरीपूर्ण । अ गस्त्याश्रमपावन । श्रीरंगपट्टणशोभिवंत ९२ जनार्दनकन्याकुमारी । शिवकांचीविष्णुकांचीसुंदरी । मत्स्यतीर्थकच्छेतीर्थप्टथ्वीवरी । शंखोद्धारवेदो द्धार ९३ हिरण्यनदीसंध्यावट । ब्रह्मवर्त्तधर्मस्तंभसुभट । ब्रह्मयोनीपृथक्वरिष्ठ । करुक्षेत्रबिंदुतीर्थपैं ९४ धर्मालयकलापग्राम । अमरावती अंबिकाधाम । गंगासागरसिंधुसंगम । प्रेमपूरमार्तंड ९५ बाळाबगळाकाळकेश्वरी । विश्वरूपिणीरक्तांबरी । भ्रमरांबिकाज्वालामुखीसुंदरी ।

१ कळप. २ विधि. ३ पवित्र. ४ मनाला मोहित करणारा. ५ शंकर ६ उज्जनी ७ पातकांचा नाश करणारी ८ हिमाचल ९ इंद्राचा बाग १० लक्ष्मीचें स्थान ११ कच्छावतार संबंधीं १२ धर्माचेंस्थान

पीतांबरीमहाशक्ती १६ जोगळादेवीभैरवी । करवीरवासिनीशांभवी । सप्तशृंगरुद्रादेवी । हिंगुळजाआणिकमळजा १७ चांगदेवमोरेश्वर । गुप्तकेदारवटेश्वर । अक्षयवटकक्षतीर्थपवित्र । त्रिकुटाचळसौंदर्य १८ हरिहरेश्वरनृसिंहपुर । मूळमाधवीज्ञानेश्वर । चक्रपाणीकदंबभुलेश्वर । जुनाटनागेश्वरगौतमेश्वरतो १९ सप्तयोजनेंकोटेश्वर । सिद्धवटरामेश्वर । धूतपापसिद्धेश्वर । पूर्वसागरतीर्थराज १०० वैराटपुष्करमहाबलेश्वर धूळखेटशंकरनारायणेश्वर । मलयेश्वरपांचाळेश्वर । सत्यनाथपर्णालय १ शिवकांचीविष्णुकांची । मोक्षमठआश्रमकाळहरती । वेदपुरगया अरुणावती । उडुपीशेषशायीसर्वेश्वर २ त्रिपतिअहोबळस्वामीकार्त । सुब्रह्मण्यकिष्किंधामातंगपर्वत । हंपीविरूपाक्षमूर्तिमंत । पंपासरोवरनिर्मळ ३ त्रिकूटसूक्ष्मकूटलोणार । अंबूअयोध्यामहंकार । काळचंद्रिकाअर्धोदयपवित्र । गोकर्णकृष्णसागरपैं ४ हरिहरतीर्थजंबुकेश्वर । अनंतशायीविमळेश्वर । मथुराविकर्णप्रभाकर । विश्रांतीवनतपोधन ५ कुंभकोणमंजरथ । मातुलिंगत्रिविक्रमतीर्थ । मुद्गलमांधातावोढ्यानागनाथ पंढरीक्षेत्रचंद्रभागा ६ त्रिकोणआणिकर्णमूळ । नानागौररंगेजुंगाळ । आशापुरीनेपाळत्रिमल्ल । मंथनकाळेश्वरशतपर्ण ७ मीनाक्षीकामाक्षी मातुलिंगथोर । सिताअसिताचिदंबरेश्वर । ब्रह्मकटाहरिद्वार । आदित्यवैश्वानरमहातीर्थ ८ ब्रह्मानंदेंह्मणेश्रीधर । इतुकींतिर्थेंकरूनिरघुवीर । अयोध्येसिदीनोद्धार । परतोनिआलागजरेंसी ९ वसिष्ठासिसाष्टांगनमन । दशरथासीअनन्यशरण । तिघीमातांसीरघुनंदन । करीनमनअभेदलें ११० तीर्थेंकरूनिआलियाश्रीराम । सदांविरक्तआणिनिष्काम । नावडेलौकिकसंभ्रम । वैराग्यपरमबाणलें ११ षड्रसान्नउत्तमासन । हास्यविनोदशृंगारगायन । नावडेमृगयागमनागमन । एकांतपूर्णनावडे १२ नावडेस्त्रीसीसंभाषण । नेणेकामिनीचेंविलोकन । नासाग्रींदृष्टीदेऊन । आनंदघनडोलतसे १३ याचिप्रकारेंतिघेबंधू । महावीरनिष्कामसाधू । श्रीरामसेवाकरितांआनंदू । तिघांसहीसर्वथा १४ तंवतोप्रतिसृष्टीकरणार । सिद्धाश्रमीगाधीकुमर । महातपस्वीविश्वामित्र । अयोध्येसीपातला १५ आलाऐकोनिगाधिसुत । सामोराधांवेदशरथ । साष्टांगकरूनिप्रणिपात । क्षेमालिंगनदीधलें १६ दृष्टींदेखोनिब्राह्मण । जोतयानकरीअभ्युत्थान । त्याचेंआयुष्यहोयखंडण । आलेंमरणजवळीत्याचें १७ । जोब्राह्मणासिनेदीअभ्युत्थान । तोदुसरेजन्मींहोयश्वान । विघ्नेंशोधीतजातत्याचेंसदन । कोठेंनांदतोह्मणोनियां १८ तैसानव्हेराजादशरथ । महाराजकेवळब्राह्मणभक्त । कौशिकाचाधरूनिहात । सिंहासनींबैसविला १९ वस्त्रालंकारादिउपचार । देऊनिपूजिलाविश्वामित्र । मानसींभावी अजपाळपुत्र । धन्यदिवसआजिचा १२० ऋषीसह्मणेदशरथ । आजिमजहर्षवाटेबहुत । तुमचेपुरवीनमनोरथ । कांहींइच्छितमागावें २१

ह्मणोनिकेलानमस्कार । मगआशीर्वाददेतविश्वामित्र । सूर्यवंशभूषणतूंउदार । अनंतकल्याणतुजलाहो २२ तुष्टिपुष्टीतुजलागींबहुत । धर्मऐ
श्वर्यवृद्धीअद्भुत । आयुष्यस्वार्थसुखसमस्त । तुजप्रतिहोदशरथा २३ विवेकज्ञानसमृद्धीबहुत । विप्रविष्णुभक्तिघडोसतत । प्रतापप्रतिज्ञायश
वंत । भद्रअत्यंततुजलागींहो २४ तवशत्रुक्षयहोकांबहुत । अक्षयकल्याणअसोतुजप्राप्त । भूतमात्रींदयासतत । रविकुलवंशध्वजारे २५
चिंतितपूर्णहोमनोरथ । सर्वअरिष्टहोकांशांत । सर्वाभीष्टहोतुजप्राप्त । कुळवृद्धीहोबहुतूतें २६ निर्दोषयशवाढोबहुत । तवकीर्तिवर्णोतसाधुसंत ।
याचकांचेमनोरथ । पुरोतसर्वतुझेनी २७ अनाचारींनसोआदर । परद्वेषनसोसाचार । माझेआशीर्वादसमग्र । सुफळहोकांतुजराया २८ सु
बुद्धीअसोतवहृदयीं । ब्राह्मणाचाआशीर्वादघेयीं । चिंतितकार्यमाझेंसर्वही । होतुझेनीसमस्त २९ मीमागतनाहींसंपत्तिधन । मागतनींहाराज्यसिं
हासन । माझामखमोडितीराक्षसयेऊन । देयींनंदनरक्षावया १३० कुंडवेदिकामोडून । यज्ञपात्रेंटांकितीफोडून । गिळियेलेबहुतब्राह्मण । देर
घुनंदनरक्षावया ३१ सिद्धीनपवेचियज्ञ । मारीचताटिकासुबाहूयेऊन । जातीहोमद्रव्येंभक्षून । देयींरघुनंदनरक्षावया ३२ मनुष्यांच्याअस्थिमां
सआणून । अकस्मातटांकितीवरून । मंडपासिलाविती अग्न । देरघुनंदनरक्षावया ३३ ऐकोनिऋषीचात्वचनार्थ । भयाभीतझालादशरथ । वाटे
आंगावरीकोसळलापर्वत । कींविद्युत्पातजाहला ३४ वाटेहृदयींखोंचलेंतप्तशस्त्र । कींअकस्मातगेलेनेत्र । कींउभेठाकलेतस्कर । धनहरावयाका
रणें ३५ पाहेराजाअधोवदन । कांहींनबोलेप्रतिवचन । विवेकचातुर्यगेलेंलपोन । भयेंकरूनतेधवां ३६ बोलेहळूचभिऊन । महाराक्ष
समोडितीयज्ञ । केवळबाळकरघुनंदन । कैसादेऊंयुद्धासी ३७ लीलाकार्मुकघेऊनिहातीं । मजपुढेंखेळेरघुपती । नाहींदेखिलीयुद्धरीती । अ
द्यापवरीश्रीरामें ३८ धनुर्विद्येचाअभ्यास । अद्यापिनाहींश्रीरामास । कोमळतनूडोळस । कैसायुद्धासदेऊंतूतें ३९ राज्यसंपत्तीगृहगोधन ।
सर्वहीदेयीनतुजलागून । परीमीनेदींरघुनंदन । राजीवनयनसुकुमार १४० राक्षसमारावयासमस्त । मीसेनेसहितयेयीनतेथ । तुझियाकर्यावेंचीन
जीवित । परीमीरघुनाथदेयीना ४१ कृपणासिनदेववेधन । मीनासनसोडवेजीवन । तैसामजनदेववेरघुनंदन । युद्धकंदनकरावया ४२ श्रीराम
माझेंवान्हेंअत्यंत । कधींनेणेउष्णवात । ऐसेंबोलतांअश्रुपात । नेत्रींलोटलेरायाचे ४३ ऐसेंबोलतांअजनंदन । ऋषिझालाकोपायमान । ह्मणेतूं
कांबोलिलासिवचन । इच्छितपूर्णदेयीनऐसें ४४ मीनमागतांनिश्चित । तूंबोललासिमागइच्छित । अरेतूंसूर्यवंशीनृपनाथ । डागलाविलाकुळा
सी ४५ हेचिवंशींहरिश्चंद्रजाण । लटिकेंसाचकरूनिस्वप्न । राज्यमजदीधलेंदान । घेतलेंविकूनडोंबाघरीं ४६ तेचिवंशींतूंजन्मोन । कैसेंअस

त्यकेलेंवचन । सूर्यवंशासीदूषण । तुझेनिपूर्णलागलें ४७ येचिवंशींशिबीआपण । कपोतपक्षीसमसमान । आपुलेंमांसतुकिलेंपूर्ण । मिथ्यावच
ननकरीच ४८ येचिवंशींरुक्मांगद । एकादशीव्रतसाधीतशुद्ध । केलापुत्राचाशिरच्छेद । मिथ्याशब्दनकरीच ४९ पैलशेजारीश्रियाळ । त्यासि
दानमागेजाश्वनीळ । केलापुत्रवधतत्काळ । सत्वासिचळहोऊंनेदी १५० तूंश्रीरामाचामहिमानेणसी । हाअवतरलावैकुंठवासी । वृत्तांतपुसेंवसि
ष्ठासी । साचकींमिथ्याअसेतो ५१ जोकाळासीशासनकर्ता । जोआदिमायेचानिजभर्ता । जोकमलोद्भवाचापिता । त्यासिबाळह्मणसीतूं ५२
जोनीळग्रीवाचेंध्यान । जेंसनकादिकांचेंगुह्यज्ञान । ज्यासिशरणसहस्त्रनयन । त्यासिबाळकह्मणसीतूं ५३ वेदांतशास्त्रसर्वनिरसून । स्थापितीपर
ब्रह्मनिधान । तोहाश्रीरामपरिपूर्ण । त्यासीबाळह्मणसीतूं ५४ मीमांसकाचाकर्ममार्ग । ज्याकारणेंआचरतीसांग । तोहाभक्तहृदयारविंदभृंग ।
त्यासीबाळह्मणसीतूं ५५ नैयायिकह्मणतीजीवअनित्य । ईश्वरकर्ताएकसत्य । तोहाजगद्वंद्यरघुनाथ । त्यासीबाळह्मणसीतूं ५६ व्याकरणकारसा
धितीशब्दार्थ । याच्यानामाचाकरितीअर्थ । तोहाअवतरलावैकुंठनाथ । त्यासीबाळह्मणसीतूं ५७ प्रकृतिपुरुषविभाग । सांख्यशास्त्रींज्ञानयोग ।
तोरामअक्षयअभंग । त्यासीबाळह्मणसीतूं ५८ पातंजलयोगशास्त्रसाधन । अष्टांगयोगआचरोन । ज्याचेंपदपावावेंनिर्वाण । त्यासीबाळह्म
णसीतूं ५९ आतांकल्याणअसोश्रीरामा । मीजातोंआपल्याआश्रमा । उल्लंघोनिद्वारसीमा । बाहेरगेलागाधिसुत १६० घाबराझालानृपवर ।
ग्रहांतजाऊनसत्वर । वसिष्ठासिसांगेसमाचार । नमस्कारकरूनियां ६१ ह्मणेकोपलागाधिसुत । नेयीनह्मणतोरघुनाथ । महाराजतूंगुरुसमर्थ ।
सांगायथार्थकायकरूं ६२ तुझेअनुग्रहाचेंफळ । तोहारामतमाळनीळ । हाविश्वामित्रनव्हेकाळ । नेऊंआलाराघवातें ६३ जेंमागेलतेंयासदेयीं ।
समाधानकरींयेसमयीं । रामासिजीवदानलवलाहीं । देयीआतांमहाराजा ६४ मगवसिष्ठबोलेगोष्टी । हाविश्वामित्रमहाहटी । येणेंकेलीप्रातिसृ
ष्टी । परमेष्ठीसजिंकावया ६५ येणेंलोहचूर्णभक्षून । साठसहस्त्रवर्षेंपुरश्चरण । केलेंगायत्रीचेंआराधन । त्रिभुवनभीतजयातें ६६ सदांजवळीधनु
ष्यबाण । महायोद्धागाधिनंदन । तत्काळशापदेऊन । भस्मकरीलकुळातें ६७ तुजसांगतोंयथार्थवचन । त्यासिदेयींरामलक्ष्मण । भरतआणिशत्रु
घ्न । तुजपासींअसोंदे ६८ ऐसेंबोलतांगुरुनाथ । दीर्घस्वरेंरडेदशरथ । मगहृदयींधरीब्रह्मसुत । दशरथासीउठोनी ६९ रायाचेमस्तकीं
हस्तठेवून । श्रीरामाकडेपाहेविलोकून । तोंशंखचक्रगदासंपूर्ण । आदिनारायणदेखिला ७० सांगेकर्णींमूळकाव्यार्थ । अवतरलावैकुंठनाथ ।
देखोनिद्वोषलातोदशरथ । जोयथार्थजाणतां ७१ सौमित्रतोभोगींद्रनाथ । देखोनिसंतोषेदशरथ । गुरूह्मणेयांसमानवसत्य । सर्वथानह्मणेराजेंद्रा

७२ यालागींरामलक्ष्मण । देयींत्यासपाचारून । शिरींवंदोनिगुरुचरण । गेलाधांवूनतयापासीं ७३ करूनिसाष्टांगनमन । ह्मणेन्याजीरामल
क्ष्मण । आनंदलागाधिनंदन । कायवचनबोलत ७४ ह्मणेमीमागतहोतोंरघुनंदन । सवेंदिधलातुवांलक्ष्मण । माझेंभाग्यपरिपूर्ण । लाभद्विगु
णजाहला ७५ माझेपुंण्याचेगिरिवर । मेरूहूनबाढलेअपार । तेआजिफळाआलेसाचार । रघुवीरप्राप्तजाहला ७६ विश्वामित्रआलापरतो
नी । बैसलाआपलेस्वस्थानीं । बाहेरआलावसिष्ठमुनी । सभास्थानींबैसला ७७ सभेसिबैसलाथोरमहंत । आनंदमयझालादशरथ । विश्वामि
त्रह्मणेरघुनाथ । मजआतांदाविजेहो ७८ धन्यझालेआजिनयन । पाहीनतोरघुनंदन । जयावरूनिमीनकेतन । कोटचावधीओंवाळिजे ७९
नृपसांगोनिपाठवीरामासी । विश्वामित्रआलान्याबयासी । आपणयावेंसभेसी । सुखसर्वांसिद्यावया १८० ऐसेंऐकतांभुवनसुंदर । सभेसिचालिला
रघुवीर । विद्युत्प्रायप्रावर्णचीर । रुळतीपदरमुक्तलग ८१ निशासंपतांतत्काळ । उदयाचळावरीरविमंडळ । तैसारामतमाळनीळ । सभेमाजी
पातला ८२ कौसल्याहृदयारविंदभ्रमर । दृष्टींदेखोनिविश्वामित्र । करूनियांजयजयकार । भेटावयापुढारला ८३ विश्वामित्राचेचरण । प्रे
मेंवंदीरघुनंदन । तोंऋषीनेंहस्तधरून । आलिंगनासीमिसळला ८४ नीळजीमूतवर्णरघुवीर । प्रेमेंधरीविश्वामित्र । ह्मणेजन्माचेंसार्थकसमग्र
आजिझालेंपैंमाझें ८५ विश्वामित्रासिआलिंगुनी । वसिष्ठासनमीचापपाणी । मगश्रीरामबैसलानिजस्थानीं । वेदपुराणींवंद्यजो ८६ मगश्री
रामासिह्मणेविश्वामित्र । माझाक्रतुविध्वंसितीअसुर । तुजवीणकोणरक्षणार । दुजानाहींत्रिभुवनीं ८७ ऐकोनिविश्वामित्राचेंवचन । कमळविका
सेमित्रदेखोन । तैसारघुवीरसुहास्यवदन । बोलताझालातेवेळीं ८८ तेकौतुककथारसबहुत । ऐकोतआतांसाधुसंत । जेकथाऐकतांसमस्त । म
हापातकेंनासती ८९ जैसेंकांवेदांतज्ञानशास्त्र । सर्वांसीमान्यकरीपवित्र । तैसाअध्यायहासाचार । रसअपारबोलिला १९० केवळजेंवेदांत
ज्ञान । श्रीरामासीउपदेशीब्रह्मनंदन । तेंऐकतांनिवतीलपूर्ण । श्रवणजाणब्रह्मरसें ९१ षष्ठमाध्यायींपरमसुंदर । वसिष्ठज्ञानाचासागर । कीं
चातकदेखोनिसादर । वर्षेउदारमेघजैसा ९२ त्यावसिष्ठगोत्रींउद्भवलापूर्ण । ब्रह्मानंदस्वामीज्ञानसंपन्न । कींवसिष्ठचिआपण । आपलेकुळींअवतर
ला ९३ ऐसामहाराजब्रह्मानंद । तयाचेंजेंचरणारविंद । तेथेंश्रीधरहोवोनिमिलिंद । दिव्यआमोदसेवितसे ९४ स्वस्तिश्रीरामविजय
ग्रंथसुंदर । संमतवाल्मिकीनाटकाधार । सदांपरिसोतभक्तचतुर । पंचमोध्यायगोडहा १९५ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्रीसीताराम
चंद्रार्पणमस्तु ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ श्रीभूमिजारमणार्पणमस्तु ॥ ७ ॥ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७

श्रीगणेशायनमः । श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । जयजयजगद्वंद्यावेदसारा । अनंगदहनहृदयविहारा । कमलोद्भवजनकापरात्परा । अगोच
रानिरुपाधिका १ तुझ्याइच्छेंप्रचंड । मायेनेंरचिलेंब्रह्मांड । चौऱ्यायशींलक्षयोनीउदंड । जीवआंतभरियेले २ तेजीवविसरूनतूतें । भुललेदे
खोनिविषयांतें । ह्मणोनिमुकलेनिंजपदातें । अहंमतेंभुलोनियां ३ शब्दविषयघेतांकान । कुरंगवेंचीआपुलाप्राण । स्पर्शविषयसेवीवारण । अं
कुशेंआकर्षोनिहिंडविती ४ रूपविषयदेखतांपतंग । करीआपलादेहत्याग । रसविषयासवेग । मीनँमुकेप्राणासी ५ गंधविषयेंमिलिंदभुलो
न । कमळकोशींवेंचीप्राण । तेपांचहीविषयसंपूर्ण । भोगितीजाणमानवहे ६ तुजविसरूनिश्रीरामा । जीवभुललेदेहादिधनकामा । त्यांसिता
रावयापरब्रह्मा । दशरथात्मजझालासी ७ पंचमाध्यायाचेअंतींकथा । दशरथेंरामदीधलागाधिसुता । यावरीवर्तलेंतत्वता । ऐकाआतांसावध ८
गुरूसिशरणनिघालागुरुनाथ । हेकथाकथिलीवाल्मिकेंअद्भुत । ब्रह्मवासिष्ठथोरग्रंथ । छत्तीससहस्रअसेपैं ९ समुद्राऐसाथोरग्रंथ । त्यांतीलसा
रसांगेनमथितार्थ । जैसेंभागीरथींतीलतृषार्त । पाणीसेवीअंजुळीनें १० सागरामाजीबुडीदेउन । काढितीसतेजमुक्तेंवेंचून । कींसाधकासीसांप
डेअपारधन । परियथाशक्तीमोटबांधी ११ देखिलाअन्नाचापर्वत । परीआपणापुरतेंघेयीक्षुधित । तैसाब्रह्मवासिष्ठथोरग्रंथ । त्यांतीलगुह्यार्थऐका
हो १२ वाल्मिकउच्छिष्टउत्तरें । तींचपरिसातुह्मीसादरें । श्रोतेह्मणतीउच्छिष्टखरें । तरितेंचकांहोसांगतां १३ परावेंउच्छिष्टअंगिकार । क
दानकरितीश्रोतेचतुर । संदेहधनुष्यघेऊनिथोर । प्रश्नाक्षरशरसोडिती १४ तोंवक्त्यानेंस्फूर्तिधनुष्यघेऊन । शास्त्रसंमतटांकोनिबाण । प्रश्नाक्ष
रशरनिर्वाण । संदेहधनुष्यछेदिलें १५ वक्ताह्मणेऐकासावधान । कोणतेंउच्छिष्टघेतीसज्जन । तरितेंमधुमक्षिकाउच्छिष्टपूर्ण । मधुआवडेदेवातें ।
१६ वत्सआदींकरीदुग्धपान । तेंघ्यावेंनकरितांअनुमान । भ्रमरआधींजायपुष्पसेऊन । परितेंशास्त्रअंगिकारिती १७ मेघाचेमुखींचेंजीवन ।
उच्छिष्टनव्हेजाण । यागींचापुरोडाशपूर्ण । उच्छिष्टकोणह्मणेलत्यासी १८ गौतमेंगोदाआणिलीप्रार्थून । तेणेंआधींकेलेंस्नानपान । व्यासाचेंतें
उच्छिष्टपुराण । उच्छिष्टपूर्णनव्हेतें १९ विष्णुनैवेद्यपावन । त्यासउच्छिष्टह्मणेलकोण । वाल्मीककाव्यह्मणोन । उच्छिष्टनव्हेसर्वथा २० व्याघ्र
चर्मग्रहण । तैसेंचसूकरकेशजाण । हस्तिदंतगवाशृंगआपण । इतुकींब्राह्मणपवित्रह्मणती २१ असोआतांपूर्वानुसंधान । यागरक्षणार्थजातांरघुनं
दन । कौशिकाप्रतिराजीवनयन । बोलताझालातेधवां २२ श्रीरामह्मणेमहाऋषी । मजतुह्मीनेतांयुद्धासी । क्षणभंगुरदेहासी । आत्मप्राप्तीमज

१ मदनाचा नाश करणारा शंकर त्याचे हृदयांत क्रीडा करणारा. २ ब्रह्मदेवाचा बाप. ३ अगम्य, अप्राप्त. ४ तुझ्या. ५ हरिण. ६ हत्ति. ७ मत्स्य. ८ भ्रमर. ९ विश्वामित्रास.

नाहीं २३ आत्मप्राप्तीवीणसाधन। जैसेअलंकारगळसरीविण। कींदीपाविणशून्यसदन । जीवनेंवीणसरिताजैसी २४ कींप्राणावीणकलेवर। कींआवडीवीणआदर। कींइंद्रियांवीणआचार । अनाचारतोचिपैं २५ कींभ्रतारावीणकामिनी। कींअत्रिसुतावीणरजनी। तैसेआत्मप्राप्तीवीणप्राणी । व्यर्थनाडलेसंसारीं २६ आत्मप्राप्तीसीकारण । धरावेश्रीगुरूचेचरण ।गुरुकृपेवीणज्ञान । कल्पांतींहीसाधेना २७ पदार्थनदिसेनेत्रेंवीण। मोडनवाढेजीवनावीण। परिसावीणसुवर्ण। लोहाचेंनोहेसर्वथा २८ जोगुरुसेवेसीसादर। आत्मज्ञानेंजोडोनिकर। उभेत्यापुढेंनिरंतर। अहोरात्रतिष्ठतसे २९ गुरुसेवाजयासीनावडे । त्याचेज्ञानासिपडलेकिडे। जन्ममरणाचेंसांकडें। नसरेकल्पांतीं ३० जयासिनावडेगुरुसेवन। तोझालाचतुःषष्टिकलाप्रवीण। साहीशास्त्रेंमूखोद्गतपूर्ण। परितेंभाषणमद्यपीयाचें ३१ तेणेंकेलेंजरीकीर्त्तन। दावीवरपांगडोलोन। परीगुरुदास्यनावडेपूर्ण। त्यासबंधनचुकेना ३२ जळोत्याचाप्रताप। कायचाटावेंकोरडेंतप। जैसेंविगतधवेचेंस्वरूप। यौवनकायजाळावें ३३ गर्भांधाचेविशाळनेत्र। अदातयाचेंउंचमंदिर। कींधनलुब्धाचातत्वविचार। कींरम्यगृहअंत्यजाचें ३४ भ्रष्टासिकायकुळगोत्र। श्वाननेणेपवित्रापवित्र। जैसेंमद्यपीयाचेंपात्र। श्रोतींनशिवेसर्वथा ३५ तैसेगुरुकृपेवीणजेनर। तेदेहासिआलेजैसेखर। सदांविषयव्यापारींसादर। आपपरनावडेजयां ३६ उत्तममनुष्यदेहपावून। तेथेंसाधावेंआत्मज्ञान । ज्ञानहीनतेमूढपूर्ण। गूढनरकभोगिती ३७ रघुपतीचेबोलऐकूनी। सभासदसुखावलेमनीं। विश्वामित्रतेव्हांआनंदोनी। ब्रह्मनंदनाप्रतिबोले ३८ जगद्वंद्यरविकुलभूषण। त्यासउपदेशीदिव्यज्ञान। जोअनंतब्रह्मांडांसींसांठवण। लीलावेषधारकजो ३९ जोकमळोद्भवाचातात ।तोउठोनिरघुनाथ। वसिष्ठासिसाष्टांगनमित । शरणागतझालाअसे ४० ह्मणेतनुमनधनेसींअनन्य। श्रीवसिष्ठातुजशरण। ऐसेंऐकतांब्रह्मनंदन। हृदयींधरीराघवातें ४१ ह्मणेजगद्वंद्याश्रीरामा। अवतारपुरुषापूर्णकामा। तूंसच्चिदानंदपरमात्मा। तुजमीकायउपदेशूं ४२ आदिनारायणनिष्कलंक। भोगींद्रझालातुझातल्पक । वेदशास्त्रांसींपडलेठक। तुझेंस्वरूपवर्णितां ४३ तुझेंनामजपतांसादर। शीतळझालापार्वतीवर । गुरुमहिमावर्णावयासाचार । शरणमजतूंआलासी ४४ देवभक्तांचीपूजाकरीयथार्थ। याचकांसींराजादानमागत । सागरजैसास्तवकरित। सरोवराचेंप्रीतीनें ४५ वाचेस्पतीमुक्यासीपुसेविचार । दीपप्रकाशइच्छीदिनकर । चकोरासीह्मणेअत्रिपुत्र। मजतृप्तकरातुह्मीं ४६ कल्पतरूमागेदुर्बळासिदान । जलदचातकासीमागेजीवन । चक्रवाकाचेंदर्शन। तरणीइच्छीनवलहें

१ विघ्नेवें. २ तारुण्य. ३ वाडा. ४ कुत्रा. ५ वेदवेत्ता, आचार संपन्नब्राह्मण. ६ गर्दभ. ७ वसिष्ठमत. ८ ब्रह्मदेवाचा. ९ शेष. १० शय्या. ११ शंकर. १२ बृहस्पति. १३ चंद्र.

४७ प्रीतींनेंमाताबाळकासीह्मणत । मीतुझेंस्तनपानकरीनसत्य । कींतृषाक्रांतासीमागत । उदकजैसेंजान्हवी ४८ वनस्पतीसह्मणेवसंत । मजतुह्मींनिववासमस्त । तैसातूंजगद्गुरूरघुनाथ । गुरूसीशरणआलासी ४९ संतोषोनिब्रह्मनंदन । श्रीरामासंसन्मुखबैसवून । गुरुसांप्रदाय शास्त्रप्रमाण । महावाक्यदीक्षाविधी ५० जोमायानियंताजगद्भूषण । तोवसिष्ठापुढेंवोढवीकर्ण । चहूंवेदांचेंजीवन । तेंमहावाक्यऋषिसांगे ५१ वसिष्ठह्मणेसप्रेम । सर्वद्रष्टातूंआत्माराम । सर्वव्यापकतूंपूर्णब्रह्म । अतींद्रियवेगळा ५२ जगडंबरभाससकळ । हातुझेमायेचाखेळ । मिथ्याभूतमृगजळ । साचनव्हेसर्वथा ५३ तूंअलिप्तसर्वांसीतत्वता । कींकाष्ठामाजीअग्निपाहातां । जैसासर्वांघटींबिंबलासविता । अलिप्ततैसासंसारीं ५४ कींवाद्यांमाजीध्वनीउमटती । कींकंठींरागउठती । परितेथेंअसोनिनसती । तैसासर्वांभूतींराघवतूं ५५ कींदर्पणींस्वरूप । दिसेपरीमिथ्यारूप । तैसाश्रीरामतूंविश्वरूप । व्यापूनियांअलिप्त ५६ बीजामाजीतरुवरें । कींतंतूमाजीवस्त्र । कींउदकींतरंगअपार । विश्वसमग्रतुजवरी ५७ अनंतब्रह्मांडांच्याकोडी । जीवासिभुरळेंघालोनिपाडी । अहंममतेंभूलोनिवेडी । विषयावर्तीपडलीसदां ५८ मायेचाअवघाविचार । कींमृगजळाचादाटलापूर । कींगंधर्वनगरसविस्तर । रचिलेंदिसेपरिमिथ्या ५९ वोडंबरीचेंलेणेंसंपूर्ण । कींस्वप्नींचेंराज्यसिंहासन । कींचित्रींचाहुताशन । ज्वाळाअद्भुतदिसतपैं ६० कींदर्पणामाजीलदिव्यहार । कींमृगजळामाजीवंध्यापुत्र । शुक्तिकरजंताचेंकरूनिपात्र । रात्रींसमीरनधरीतसे ६१ नयनांतीलपुतळी । गर्भांधेंपदरींधरिली । कींकल्पांतविजुगिळी । मशककेवीघडेहें ६२ पांगळाधांवेअंतराळीं । तेणेंआकाशाचीसालकाढिली । प्रभंजनाचींचिंधीफाडिली । साचबोलीकायहोय ६३ कींकुहूचेकाळोखेंभरिलें । तेंदिवादोंप्रहरावाळूंघातलें । कींउंरगाचेपायबांधिले । सिकतातंतूकरूनियां ६४ काढोनिदिव्याचारंग । वस्त्रेंरंगविलींसुरंग । कींवडवानळामाजीकाग । लोळतीकायघडेहें ६५ हेंजैसेंसर्वअसत्य । तैसीमायामिथ्याभूत । साचकींलटकीयथार्थ । ब्रह्मादिकांनकळेची ६६ मायेचेंपरमबिंदाण । थोरथोरांसींनकळेपूर्ण । तरीमायेचीकथासांगेन । ऐकसादर श्रीरामा ६७ जेणेंन्यायशास्त्रनिर्मिलेंपूर्ण । तोगौतमऋषीपरमप्रवीण । त्याचाशिष्यअतिसुजाण । गाधीनामतयाचें ६८ त्यासिचहूंवेदांचेंअध्ययन । षड्शास्त्रींपरमनिपुण । तेणेंकेलेंदिव्यअनुष्ठान । झालाप्रसन्नश्रीविष्णू ६९ मगबोलेइंदिरानाथ । प्रसन्नझालोंमागइच्छित । यावरीतोब्राह्मणबोलत । कायतेंऐकश्रीरामा ७० गाधीह्मणेहृषीकेशी । मजदावींतुझीमायाकैसी । तिणेंठकविलेंसर्वांसी । मजवेगेंसीपाहूंदे ७१ ऐकोनि

---

१ ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वण. २ आरशांत. ३ वृक्ष. ४ लहरी. ५ भोंवरा. ६ अग्नि. ७ शिंपल्यासंबंधिरुप्याचें. ८ मासें. ९ आकाशीं. १० वायूची ११ अमावास्येच्या. १२ सर्पाचे.

हांसलानारायण । मायापाशपरमदारुण । तोडीह्मणोनियेतीशरण । तूंतीसपाहीनकांह्मणसी ७२ दिसेतेंतेंअवघेंअसत्य । हेंचिमायेचेंस्वरूपयथार्थ । जैसादोरचिसर्पभासत । कींशुक्तिकेवरीरजतजैसें ७३ कींखुंटतोचिचोर । भ्रांतासिभासेसाचार । जेंस्वप्नींचेंसैन्यअपार । जागृतीसमिथ्यातें । ७४ गाधीह्मणेवैकुंठराया । तूंमिथ्यारूपसांगसीमाया । तरीमार्कंडेयऋषिवर्या । ब्रह्मादिकांभुलविलें ७५ तरीतेमजक्षणभरी । सर्वोत्तमादावींनेत्रीं । हांसतसेवैकुंठविहारी । बोलऐकोनितयाचे ७६ हरिह्मणेमायादेखून । समूळजासीतूंभुलोन । तुझेकासावीसहोतीलप्राण । मगकोणसोडवील ७७ तुझीभ्रंशेलमती । पडसीलमहाआवर्तीं । मगगाधीह्मणेजगत्पती । वरनिश्चितदेईमातें ७८ मीकासावीसजेव्हांहोयीन । तेव्हां आठवणमजदेऊन । तुझेंकरितांचिनामस्मरण । पुढतीभेटेंऐसाची ७९ अवश्यह्मणेजगन्निवास । जाताझालास्वस्थानास । कांहींएकझालेदिवस ऐकसर्वेशाराघवा ८० जान्हवीतीरींअरण्यांत । गाधीराहिलास्त्रियेसहित । एकदांमाध्यान्हांयेतांआदित्य । ऋषीजातस्नानातें ८१ प्रवेशतांगंगाजीवनीं । मनांतह्मणेमायाअझूनी । मजकांनदावीचक्रपाणी । कैसीकरणीतयाची ८२ अघमर्षणकरितांब्राह्मण । तोंमायेनेंमांडिलेंविंदान । गाधीसवाटेआलेंमरण । ठंथथादारुणजाहली ८३ तोंपातलेयमदूत । तिहींप्राणकाढिलेत्वरित । यमापासींमारीतमारित । गाधीनेलातेधवां ८४ तेथेंयमजाचणीदारुण । कुंभीपाकींघालितीनेऊन । असिपत्रवनींहिंडवून । तप्तस्तंभींबांधिती ८५ इतुकेंदुःखविप्रभोगित । तरीआपणउभाजान्हवींत । मगतोजन्मलाचांडाळयोनींत । कंटजनामतयाचें ८६ पंचवीसवर्षेंपर्यंत । स्त्रीपुरुषझालेबहुत । वाटपाडोनिअसंख्यात । द्रव्यतेथेंजोडिलें ८७ नानापरीच्याहिंसाकरी । गोब्राह्मणजिवेंमारी । तोंतेथेंआलीमहामारी । मेलींसर्वकुटुंबाचीं ८८ बापमायस्त्रीसुतें । एकदांचिपावलींमृत्य । कंटजविचारीमनात । होऊंविरक्तयेथोनियां ८९ रढेकंटजनाममाहार । ह्मणेनमिळेआतांसंसार । मगअतिथिहोऊनिदुराचार । देशोदेशींहिंडतसे ९० आलाकेरळदेशाप्रती । तोंतेथीलमृत्युपावलानृपती । त्यासिनाहींपुत्रसंतती । मगप्रधानकरितीविचार ९१ शृंगारूनएकहस्तीण । तिच्याशुंडादंडींमाळदेऊन । अकस्माततिणेंजाऊन । घातलीमाळकंटजगळां ९२ सहावर्षेंराज्यकरूनिदेख । भ्रष्टविलेसकळलोक । घरींजेऊंघातलेसकळिक । सोयरेकेलेबहुतची ९३ एकेदिवसींतोनिर्लज्ज । एकलाजातबाहेरकंटज । प्रधानादिसेवकसहज । पाठींधांवतीरायाचे ९४ अवधियांसदटाविलेंरागें । ह्मणेयेऊंनकामजसंगें । प्रधानगुप्तजातमागें । कोठेंजातोह्मणोनियां ९५ तोंतेगांवींचेअनामिक ।

१ शिंपीवर. २ रुपें. ३ खरें. ४ जागृतपणा. ५ भ्रमरूपी भोंवरा. ६ गाधिराजा. ७ भागीरथीच्या. ८ सूर्य. ९ उदकीं. १० दुःख, पीडा. ११ पुत्र. १२ राजा.

परमउन्मत्तमद्यप्राशक । तेवाटेसिभेटलेसकळिक । कंटजासीतेधवां १६ त्याणींकंटजवोळखिलासत्वरा । ह्मणेआमच्यागांवींचासोयरा । ये
णेंलोकभ्रष्टविलेएकसरा । नाहींकळलेंकोणासिहें १७ त्यासकळांसिदावितोंदेखा । ह्मणेहेगोष्टीबोलूंनका । नाहींतरीसकळिकां । शिक्षाकरीन
साक्षेपें १८ तेंप्रधानवर्गींऐकिलें । ह्मणतीसमस्तराज्यबुडविलें । कंटजामारूनबाहेरघातलें । विचारींबैसलेसमस्त १९ शेवटींकाढिलाशास्त्रा
र्थ । घ्यावेंदेहांतप्रायश्चित्त । मगअग्निप्रवेशसमस्त । लोककरितीनगरींचे १०० प्रधानादिअष्टाधिकारी । स्त्रीपुरुषतेअवसरीं । भस्मझालेअग्नीभी
तरी । बाळेंनगरींउरलींपैं १ ऐसेंकंटजेंदेखिलें । ह्मणेथोरपापमजघडलें । तेव्हांतयानेंसरणरचिलें । वरताआपणनिजेला २ तोंअग्निशिखातेवे
ळीं । वामांगींयेऊनझगटली । कंटजेंहांकफोडिली । उडीघातलीखालती ३ तोंइकडेगाधीब्राह्मण । बाहेरनिघेहांकफोडून । फोडआलेतरतरू
न । वामांगासीदेखिले ४ ह्मणेमीगाधीब्राह्मण । जान्हवींतकरितांस्नान । करीतअसतांअघमर्षण । दुःखदारुणभोगिलेंकीं ५ सूर्यसुतेंमज
गांजिलें । चांडाळयोनींतजन्मविलें । साहावर्षैंराज्यकेलें । लोकभ्रष्टविलेसर्वही ६ मृत्युपावलेअसंख्यजन । जरीअसत्यमानावेंस्वप्न । तरीहे
फोडतरतरून । करीरुदनविप्रतो ७ विसरलासर्वअनुष्ठान । नाठवेसंध्यावेदाध्ययन । आश्रमासिआलापरतोन । चिंतार्णवींपडियेला ८
स्त्रीविनवीभ्रतारालागून । तुमचेवामांगींकांझोंबलाअग्न ! तंवतोविलापेब्राह्मण । ह्मणेमाझेनहेंनसोसवे ९ तोंगाधीचागुरुबंधुतेथ । अकस्मातआ
लातीर्थैंकरित । गाधींतयासीक्षेमदेत । ह्मणेकृशकांझालासी १० तेणेंसांगीतलेंसर्ववर्तमान । एकमजपापघडलेंदारुण । केरळदेशींसंपूर्ण । बाळें
तेथेंनांदती ११ एकाचेघरींम्यांघेतलेंअन्न । मगत्यासिपुसिलेंवर्तमान । तेह्मणतीकंटजमाहारयेऊन । ग्रामआमचाभ्रष्टविला १२ समस्तांचे
घेऊनप्राण । मगतोगेलायेथोन । ऐसेंपापीनगरतेंसंपूर्ण । तेथेंभोजनघडलेंमज १३ तोदोषजावयापूर्ण । द्वादशवर्षेंकरितोंतीर्थाटण । ऐसेंगु
रुबंधूससांगोन । गेलापुढेंवाराणसीये १४ प्रचीतपाहावयासमस्त । गाधीआपणआलातेथ । तोंअवघ्याखुणायथास्थित । प्रत्ययाआल्यासर्वही
१५ आपणजेथेंजन्मलाहोतामाहार । तेथेंघेतलासमाचार । अनामिकसांगतीसमग्र । कंटजयेथेंजन्मलाहोता १६ तेणेंसाहावर्षैंराज्यकरून ।
केरळनगरभ्रष्टवून । मगकाळेंतोंडकरून । गेलानेणोंकोणींकडे १७ गाधीआश्रमासिआलापरतोन । घेतलेंक्षितींवरघालून । आतांकैचेंब्राह्मण
पण । गेलोंबुडोनरौरवीं १८ शोकेंकपाळआपटीक्षितीं । ह्मणेमीगौतमशिष्यविख्यातजगतीं । मजकैसीघडलीगती । कोणाप्रतिसांगूंहे १९

१ पाटिल. देशमुख. महाजन. कुलकरणी. धर्माधिकारी. उपाध्याय. जोशी. फौजदार. २ यमानें. ३ आलिंगन. ४ बारा वर्षें. ५ तीर्थयात्रा. ६ अनुभव. ७ भूमीवर. ८ नरकीं. ९ प्रसिद्ध.

असत्यजरीह्मणावेंवहिलें । तरीसर्वप्रत्ययाआलें । जेंजन्मकर्मसुकृतवहिलें । पाहोनिआलोंस्वनयनीं १२० सत्यकींअसत्यपूर्ण । मजकोणसांगेल
उकलोन । कोणासमीजाऊंशरण । कैंचेंब्राह्मणपणमजआतां २१ धांवधांवइंदिरावरा । वैकुंठवासियाकमळाकरा । पतितपावनासर्वेश्वरा । राजी
वनेत्राजगद्गुरू २२ तत्काळप्रकटलाजगज्जीवन । ह्मणेगाधीसावधान । माझीमायापरमगहन । ब्रह्मादिकांअतर्क्य २३ तूंह्मणविसीसर्वजाण
ता । सत्यकींअसत्यमायासांगआतां । बहुतऋषितर्ककरितां । निर्वाहसर्वथानव्हेची २४ जेकथितीसर्वदांज्ञान । सांगतीमायालटिकीह्मणून ।
तेहीमायेंतगेलेमिळून । झालेदीनसर्वही २५ तुजमायादाविलीकिंचित । पुढेंकायपाहासीअद्भुत । गाधीधांवोनचरणधरीत । ह्मणेमजसोडवींयेथू
नी २६ मगभगवंतेंहृदयींधरिला । वरदहस्तमस्तकींठेविला । निजात्मबोधप्रकटकेला । सावधझालाब्राह्मणतो २७ जैसास्वप्नदेखतांजा
गाहोय । कींयामिनीअंतींउगवेसूर्य । तैसेंप्रकटलेंजेंमहाभय । विरूनगेलेंसर्वही २८ असोगाधीचाउद्धारझाला । आपुलेस्वरूपींमेळविला । हाइ
तिहाससांगीतला । हेंचस्वरूपसांगीतलें २९ मगबोलेरघुनंदन । मायाव्हावयाकायकारण । स्वरूपनिर्विकारनिर्गुण । तेथेंस्फुरणकांझालें ३०
पिंडब्रह्मांडनानायोनी । नानावर्णनानाखाणी । हीमुळींहूनमायेचीकरणी । मिथ्याभूतसर्वही ३१ कींनिर्गुणासिगुणलागले । अव्यक्ततेंव्यक्तीस
आलें । अनामिकासनामठेविलें । आंगींलाविलेंसगुणत्व ३२ ऐकोनिश्रीरामाचेप्रश्न । आनंदलाब्रह्मनंदन । ह्मणेबारेतूंचैतन्यघन । जाणोनिप्र
श्नकरितोसी ३३ श्रीरामातुझेंदिव्यज्ञान । तुजलाचिसांगतोंपरतोन । जैसेंसुरतरूचेंफळघेऊन । त्यासचिनैवेद्यदाविजे ३४ कींकनकाद्रीचेंसुव
र्णघेऊन । त्यावरीचअळंकारघातलेघडून । कींक्षीरसिंधूचेंदुग्धघेऊन । पुनःत्यासीचसमर्पिलें ३५ कींसागरींचेंउदकनेती । पुनरपित्यासचिमेघस
मर्पिती । तैसेंश्रीरामातुजप्रती । तुझेंज्ञानसांगतों ३६ तरीतुवांकेलाजोप्रश्न । स्वरूपींकांझालेंस्फुरण । तरियेविषयींदृष्टांतसांगेन । ऐकरामा
निर्धारें ३७ जैसाकोणीएकपुरुषनिद्रिस्थ । पडिलाअसेचिंतारहित । स्वेच्छाहोऊनजागृत । कार्यकांहींआठवी ३८ कींसमुद्रींउठिल्यालहरी
तैसीध्वनीउठेचिदंबरीं । मीब्रह्मह्मणोनिनिर्धारीं । हांकथोरजाहली ३९ एकअसतांब्रह्मानंद । निःशब्दींउठिलाशब्द । तेध्वनीराममायाप्रसि
द्ध । वेदांतशास्त्रगर्जतसे १४० जीचेंनाममूळप्रकृती । जेआदिपुरुषाचीचिच्छक्ती । तिणेंशेजवरीनिजवूनिपती । सृष्टिकार्यआरंभी ४१ एवढेंब्र
ह्मांडकेलेंनिर्माण । परीपतीसकळोंनेदीवर्तमान । तेपरमकौटाळीन । नसतींदैवतेंउभींकेलीं ४२ विधिविष्णुउमाकांत । हींतीनीबाळेंजीचेआज्ञेंत

१ ब्रह्मदेवाचा पुत्र वसिष्ठऋषि. २ चैतन्यस्वरूपी. ३ कल्पवृक्षाचें. ४ मेरुपर्वताचें. ५ समुद्राचें. ६ चित्स्वरूपीं. ७ आदिमाया. ८ ईश्वराची, पुरुषाची. ९ ब्रह्मदेव. १० पार्वतीपति शंकर.

नेत्रउघडोनिनिश्चित । पाहूंनेदीस्वरूपाकडे ४३ ब्रह्मसुखाचेसमुद्रांत । बुडालेहेजीवसमस्त । परितीगोडीकिंचित । चाखोंनेदीकोणातें ४४
चैतन्यइणेंचिझांकिलें । इणेंअरूपतेंरूपाआणिलें। अनंतब्रह्मांडींचेपुतळे । एक्याचसूत्रेंनाचवीहे ४५ इणेंचिनिर्गुणासीगुणलाविले । निराकारआ
कारासीआणिलें । अनामासीनामठेविलें । जीवित्वासीलाविलेंपैं ४६ हेपरमपतिव्रतासाचार । पतीसनकळतांझालीगरोदर । ब्रह्मांडरचिलेंस
मग्र । नानाविकारेंकरूनियां ४७ नानायोनीयातीभाव । इणेंफासांपाडिलेअवघेजीव । गाधीसकैसेंकेलेंलाघव । मिथ्याकर्तृत्वनसतेंची ४८
कोणीमुरडेस्वरूपाकडे । त्यासनसतेंचिघालीसांकडें । अथवास्वर्गसुखरोकडें । पुढेंदाऊनभुलवीतसे ४९ निंजात्मगोडीनिःसीम। तीजीवासके
लीकडूपरम । विषयविषरूपमोहभ्रम । तेथेंगोडीआणिली १५० असोऐसीतेआदिशक्ती। तिणेंइच्छाधरिलीचित्तीं। तिसीचगुणक्षोभिणीह्मणती ।
त्रिगुणनिश्चितीकेलेहिणें ५१ सत्वरजतमजाण । तेचिविधिविष्णुईशान । त्रिशक्तिरूपेंधरून । अवतारणपैंकेलें ५२ क्रियाशक्तीचाअधरज
जाण । प्रसवलातोपंचकेंतीन । एकज्ञानेंद्रियपंचकपूर्ण । कर्मेंद्रियपंचकदुसरेंपै ५३ तिसरेंजाणवायुपंचक । तमद्रव्यशक्तीआधारदेख । पिषयपं
चकँनेमिलेंसुरेख । पंचतन्मात्रह्मणतीज्यातें ५४ ऐसींपंचवीसतत्वेंविशेष । मगकेलापरस्परानुप्रवेश । कर्दमकरूनिविशेष । ब्रह्मांडहेंरचियेलें ५५
ब्रह्मांडहीपेंठपूर्ण । नानारीतींकमळासन । चारखाणीकरूनिनिर्माण । चौऱ्यायशींलक्षजीवकेले ५६ ऐसीब्रह्मापेंठभरित । विष्णुतयाचात्र
तिपाळकरित । दशावतारधिरटीघेत । संकटींभक्तांतारितसे १५७ सृष्टींतदोषहोतांअपार । परमक्रोधीतोपार्वतीवर । तत्काळकरीसंहार ।
टांकीसर्वांमारूनी १५८ विराटजेंरचिलेंढिसाळ । हेंशिवाचेंदेहस्थूळ । तरीपायांचेतळवेआद्यपाताळ । प्रपदंरसातळजाणिजे १५९
याचासांगतोंनिर्णय । ज्ञानजेणेंप्राप्तहोय । सकळसंतांचेसमुदाय । ऐकोनिबहुतआनंदती १६० गुल्फद्वयतेंमहातळ । पोटरियाजानुयुगुल ।
तळातळआणिपाणियुंगुल । विराटाचेजाणपां १६१ जठरामाजीपोकळ । तेंअवघेंनभमंडळ। जठराग्नीतोवडवानळ । महाकल्लोळधडकतसे
१६२ कटिप्रदेशतेंमहीतळजाण । नैर्ऋत्यलोकतेंगुह्यस्थान । दक्षप्रजापतीशिश्न । विराटाचेंजाणपां ६३ सप्तसमुद्रउदरकेवळ । ज्योतिर्लिं
गतेंवक्षस्थळ। महर्लोकतेंकंठनाळ । वदनंकमळजनलोक ६४ वरुणलोकतेजिव्हाजाण । यमलोकतोदंतदाढातीक्ष्ण । अश्विनौदेवतेंघ्रांण ।
भ्रुकुटीस्थानभूलोक ६५ तपोलोकतेंकपाळ । मस्तकब्रह्मभुवननिर्मळ । वासरमणीनेत्रतेजाळ। प्रकाशलोकब्रह्मांडभरी ६६ पातींउघडतां

१ जाति. २ स्वस्वरूपसाक्षात्कार. ३ प्राण, अपान, व्यान. उदान समान, ४ शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध. ५ महेश्वर. ६ पायांचें अग्र. ७ दोन हात. ८ पृथ्वीतळ. ९ मुखकमल. १० नासिकेंद्रिय.

त्यानांवदिवस । झांकितांरात्रह्मणतीत्यास । उभयहस्तरूपेंअमरेश । कर्तव्यकरीसर्वही ६७ चंद्रमातयाचेंमन । वनस्पतीरोमावळीपूर्ण । त्वचातेंप्र
भंजन । द्रुमपूर्णमांसतें ६८ नाडीचक्रगंगानिश्चिती । पृष्ठीजिकडेअधोगती । कनकाचळतोसुमती । शिरोभागजाणिजे ६९ अस्थित्याजाणपा
षाण । फेणलाळवोळखेंखुण । दहीबरतेंमूत्रपूर्ण । जलतेंचिरेतजाणिजे ७० पाषाणभागमांड्यासत्य । पर्जन्यतेंशिवाचेंरेत । दुर्भिक्षतीक्षुधाअत्यंत ।
जलशोषणअद्भुततृषा ७१ आळसर्शीतळकाळ । पर्जन्यकाळनिद्रासकळ । उष्णकाळमैथुनकेवळ । वृष्टीव्हावयातावीतसे ७२ जुंझाटवा
यूतेंधांवण । वाटतीतयाचेचरण । दशदिशापसरल्यासंपूर्ण । तेंपसारणतयाचें ७३ स्तब्धवायुतेंआकुंचन । उकाडातोनिरोधन । जलवृष्टीइ
च्छाकामपूर्ण । सृष्टिसंहारक्रोधतो ७४ शोकतोमहाअनर्थ । मोहसृष्टिपालनयथार्थ । भयतेंमृत्युवोळखेंसत्य । विराटपुरुषाचेंराघवा ७५
पीतवसनतेंअंतःकरण । रमाबंधूतयाचेंमन । विरिंचीबुद्धीसंपूर्ण । चित्तनारायणजाणिजे ७६ देवदैत्यतेमुख्यप्राण । धनंजयपाताळींआपण ।
दिशातयाचेकर्ण । पवनसंपूर्णत्वचाज्याची ७७ अग्नीतयाचेंवदनं । चरणपाताळींवामन । ऐसाविराटपुरुषसंपूर्ण । सप्तार्णवमयअसे ७८ भूगो
ळदशगुणप्रबळ । वायुवोळखेंपृथ्वीमंडळ । याचेदशगुणसमुद्रजाळ । असंभाव्यपसरलें ७९ उदकाचेदशगुण । धडाडीतसेअग्न । त्यादशगुणप्र
भंजन । आवर्षणपैंजाणिजे १८० समीरदशगुणसाचार । वाढआहेअंबरं । नभादशगुणअहंकार । वेष्टिलाअसेसघनपैं ८१ अहंकारदशगु
णनिश्चित । व्यापलेंअसेमहत्तत्व । यादशगुणअद्भुत । मायावरणशेवटीं ८२ त्यापलीकडेजेंउरेजाण । तेंकेवळस्वरूपनिर्वाण । तेंइतुकेंतितुकेंथो
रलहान । व्यक्तिवर्णनाहींतिथें ८३ ऐसामहाखटाटोप । आतांऐकायाचाशेवट । पंचप्रळयस्पष्ट । वेदशास्त्रींनिवडिले ८४ पिंडींनित्यप्रळय
संपूर्ण । निद्राह्मणतीत्यालागून । तत्वासमवेतस्थूळलिंगजाण । बुडोनिजायनिद्रार्णवीं ८५ हानित्यप्रळयजाण । आतांमहाप्रळयतोमरण । जा
यस्थूळदेहसंहारून । सर्वजनदेखती ८६ आतांब्रह्मांडींचाप्रळयनिश्चित । चारीयुगेंसहस्रवेळांजात । तोंवरीब्रह्माहोयनिद्रिस्थ । मगराहातोसृ
ष्टिक्रम ८७ अवघीसृष्टीजायसंहारूनी । सर्वजळमयहोयतेक्षणीं । बत्तीसलक्षगांवचढेपाणी । जायबुडोनब्रह्मांड ८८ सप्तचिरंजीवबुडोनिजात ।
सत्यलोकींपाणीआदळत । तेव्हांवटपत्रशायीभगवंत । ब्रह्मानिद्रिस्थनाभिस्थानीं ८९ मगकमळोद्भवहोयजागृत । जळजायआटोनिसमस्त ।
यथापूर्वककल्पित । वेदनिश्चितबोलतसे ९० पूर्वील्यासारिखेंहोयसकळ । मागुताअवतारधरीघननीळ । अवतारचरित्रसकळ । पूर्वी



---

१ लक्ष्मीचा बंधु चंद्र. २ धनंजयनामें अग्नि. ३ मुख. ४ वायु. ५ आकाश. ६ कृत. त्रेत. द्वापार. कलि. ७ ब्रह्मदेव. ८ मेघासारखा नीलवर्ण भगवान्.

ल्याऐसेंदावित ११ हानित्यप्रळयसंपूर्ण । ऐकमहाप्रळयदारुण । आधींशतसहस्त्रवर्षेंघन । नवर्षेंचिकदापी १२ तेणेंजीवसृष्टीसंहार । सवें
चउगवतीद्वादशमित्रें । वडवानळतोमहातीव्र । भूमंडळजाळीलपैं १३ तापेलतप्तभूमंडळ । भोगींद्रमुखांतूनिनिघेज्वाळ । तेणेंसप्तपाताळेंसकळ ।
भस्महोतीएकदांची १४ मगशतसहस्त्रवर्षेंपर्यंत । हस्तीशुंडाधारींमेघवर्षत । जैसीजळींगारविरत । जगंतीसमस्तवितळेतेवी १५ मगअद्भु
ततोअनिळ । क्षणेंगिळीलनिराळ । त्यागगनासिसमूळ । तमोगुणग्रासील १६ तमासिग्रासीलरजोगुण । रजसत्वींहोयलीन । सत्वासमहातत्व
गिळोन । समँरसेलमायेंत १७ मायाहोयस्वरूपींलीन । स्वरूपस्वरूपींसमाधान । जेंब्रह्मानंदपरिपूर्ण । बोलतांमौनवेदशास्त्रां १८ निर्गुण
निर्विकारनिरुपम । पूर्णशांतीयोगक्षेम । असतांपूर्णझालेंनिःसीम । केलाक्रमविस्मयें १९ तेंतूंस्वरूपनिर्वाण । राघवानटलासिपरिपूर्ण । सच्चि
दानंदसत्यज्ञान । हेंहीबोलणेंनसाहे २०० आटोनिसर्वअलंकार । एकरसझालानिर्विकार । आटलेंपिंडब्रह्मांडसमग्र । तोचितूंसाचारश्रीरामा
१ कैंचाविष्णुकैंचाकैलास । लोपलाअवघामायाविलास । शेषशायीजगन्निवास । हाहीभासमावळला २ वटपत्रशायीसर्वेश्वर । हेनित्यकल्पिती
गोष्टसाचार । ब्रह्माविष्णुमहेश्वर । स्वस्वरूपींमिळाले ३ उरलेंनिर्विकारस्वरूप । तेंतूंराघवानिर्विकल्प । अच्छेद्यअभेदअरूप । आत्मारामपरिपू
र्ण ४ स्वरूपनिर्धारहोतांपूर्ण । श्रीरामेंझांकिलेनयन । ब्रह्मानंदसागरींलीन । रघुनंदनजाहला ५ वसिष्ठआनंदेंडोलत । खुंटलाबोलरा
हिलीमात । गुरुशिष्यदेवभक्त । एकरूपजाहले ६ विराल्यारघुनाथाच्याशक्ती । स्वस्वरूपींपावलाविश्रांती । शक्तिपातबोधनिश्चिती । श्रीरघु
नाथबिंबला ७ अठरादिवसपर्यंत । श्रीरामजाहलासमाधिस्थ । विसरलाअवतारकारणहेत । रामसमरसलाआत्मरूपीं ८ शरीरजाहलेंअ
चेतन । हृदयींआकर्षिलेप्राण । गजबजिलेंदशरथाचेंमन । ह्मणेअनर्थपूर्णजाहला ९ गजबजिलाविश्वामित्र । ह्मणेकायसंपलाअवतार । बंदीप
डिलेसुरवर । सोडवीलकोणतयांतें २१० आतांकैंचेंयागरक्षण । तात्काळदशरथदेयीलप्राण । आजिजाहलेअष्टादशदिन । रघुनंदनसावधनव्हे
११ ऐकतांनिर्वाणज्ञानथोर । रामजाहलानिर्विकार । मगवसिष्ठासिविश्वामित्र । घालीनमस्कारतेधवां १२ ऐकमहाराजब्रह्मसुता । सावध
करींरघुनाथा । पुढेंअवतारकार्यतत्वता । बहुतअसेजाणसीतूं १३ मगवसिष्ठह्मणेश्रीरामा । सावधहोयींमेघःश्यामा । सच्चिदानंदापूर्णब्रह्मा । याग
रक्षणाआतांजायिजे १४ जाणोनियांस्वरूपातें । क्षात्रधर्मरीतींवर्तें । पाळोनियांसज्जनातें । दुष्टक्षयातेंपाववीं २१५ जैसींकेशनखेंआंगींवाढ

१ बारा सूर्य. २ शेषाच्या. ३ पृथ्वी. ४ मिळेल. ५ शेषावर निद्रा करणारा भगवान्. ६ छेद करण्याला अशक्य. ७ ब्रह्मसाक्षात्काराचा निश्चय. ८ देव. ९ यज्ञाचें संरक्षण. १० अठरा दिवस.

ती । आपलींआपणारुपती । तेकाढिलियानिश्चिती । तैसेदुष्टदुर्मतीवधावे २१६ समाधीआणिध्यान । दोनीअंतरींजिरवून । तुर्याउन्मनीवो
लांडून । आनंदघननवर्णवे २१७ तटस्थतादेखोनिवेगीं । रामाउघडसमाधीभोगीं । श्रीरामातूंराजयोगी । सर्वसंगींनिःसंग २१८ जोआ
पुलेठायींभ्रमवर्तत । तयाजगचिभ्रमभासत । ब्रह्मस्वरूपेंब्रह्मांडदिसत । भ्रमेंचमृत्युजळहोय २१९ ईश्वराचेंरूपनिर्वाण । भ्रमेंकरूनझालादिन
आपणआहेकोणाचाकोण । भ्रमेंपूर्णनोळखे २२० भ्रमेंकरूनिजन्ममरण । भ्रमेंकरूनअधःपतन । तोभ्रमगेलासंपूर्ण । आपणाविणेंदुजेंनसे ।
२१ आपणब्रह्मरूपहोतांपूर्ण । ब्रह्मरूपदिसेत्रिभुवन । मित्रशत्रुथोरलहान । ब्रह्मस्वरूपसर्वदिसे २२ घागरीमडकींरांझण । आंतबिंबला
चंडकिरण । परीसूर्यासिस्त्रीपुरुषनपुंसकपण । कल्पांतींहीघडेना २३ सोनेंसाँचलटकेअलंकार । तरंगमिथ्याएकसमुद्र । पटमिथ्यातंतूचनिर्धार ।
तैसेंचराचरब्रह्मरूप २४ नानाघटएकचिअंबर । नानामणीएकसूत्र । नानामातृकाएकओंकार । ब्रह्मसर्वत्रतैसेंची २५ ह्मणोनसोडींहृदयग्रं
थी । सर्वसंशयाचीहोयनिवृत्ती । कर्मींचहोयब्रह्मप्राप्ती । त्रिजगतीब्रह्मरूप २६ उभयपक्षांचेबळेंकरूनी । विहंगमसंचरेगगनीं । तैसेंकर्मब्रह्मऐ
क्यरूपकरूनी । स्वानंदेंसदनींसंचरावें २७ जेथेंनिमाल्यासकळव्याधी । श्रीरामासितेसमाधी । तटस्थताहेउपाधी । एकदेशीजाणपां २८
अंतरींजाणोनिनिर्वाणज्ञान । बाहेरदाविजेभिन्नाभिन्न । अंतरींबोधपरिपूर्ण । बाहेरजडपणदाविजे २९ अंतरींकरूनिपूर्णत्याग । बाहेरदाविजेलौकी
कमार्ग । अंतरींहोवूनिनिःसंग । विषयांचारागधरावा २३० बाहेरलटकेंचकृपणपण । परीअंतरींसमसमान । रामतोचसाधकपूर्ण । लोकसं
गतीवर्जित ३१ जैसाबीजाहूनिवटथोर । निघेअद्भुतप्रतापकर । तैसेंआत्मरूपींचराचर । झालेंजाणोनिवर्तावें ३२ तंतूआणिपटपूर्ण । दोघां
सिनव्हेवेगळेपण । घटमृत्तिकेसटांकोन । वेगळानव्हेसर्वथा ३३ तैसेंजगआणिजगदीश्वर । भिन्ननोहेसाचार । हेंज्ञानजाणोनिनिर्विकार । व
तैंसदाराघवा ३४ अविद्याविवसीद्वाड । निजात्माधनाचेआड । तिचेगुरुकृपेंछेदोनिबंड । अखंडवर्तेंराघवा ३५ प्रपंचसमुद्रनसतांदिसे । गुरुकृ
पेंनावेंतबैसे । निवृत्तितटींसमरसें । आत्मप्रकाशेंकरूनियां ३६ अभ्यासांवीणविद्यासकळा । तात्काळहोतीराघवाविकळा । तैसीनव्हेज्ञानकळा ।
तारीअवळांनिजरूपर्शें ३७ लोहासझगटतांपरिसपूर्ण । मगतेंजन्मवरीझालेंसुवर्ण । तैसेंहोतांआत्मज्ञान । जन्ममरणत्यासिकैंचें ३८ ह्मणून
जेसाधुसज्ञान । तिहींपाळावेंगुरुवचन । सकळकुमार्गटाकून । सन्मार्गेंचवर्तावें ३९ रामातोगुरुह्मणसीकोण । जोतत्ववेत्ताअनुभवीपूर्ण । शिष्य

१ अंतःकरणांत· २ चौथी अवस्था· ३ स्वर्ग· मृत्यु· पाताळ· ४ सूर्य· ५ खरें· ६ आकाश· ७ देवता· ८ त्रैलोक्य· ९ पक्षी· १० ब्रह्मानंदरूप गृह· ११ उपाधिरहित बोध·

व्हावाज्ञाननिपुण । ऐसीमतीतयाची ४० साधकेंहेंचिकरावेंत्वरित । बोधवज्रघेऊनिनिश्चित । जन्ममरणहेदुःखपर्वत । चूर्णकरूनिटांकावे ४१ मोक्षतरूचेंबीजहेंसत्य । अद्वैतज्ञानक्रियासहित । सदांचालिजेधर्मपंथ । सर्वकुमतेंटांकूनी ४२ ज्याचेंमनशुद्धतोचिशुचिष्मंत । सद्विवेकवसेतो चिपंडित । जोगुरूसींनव्हेरत । तरीविषयविषतोप्याला ४३ कासयासीग्रंथसहस्त्र । मुख्यधर्मपरोपकार । अधर्मनामसाचार । परपीडाकरणें हें ४४ याकारणेंवत्सारघुनाथा । तूंसमाधीग्रासोनियांआतां । धनुष्यबाणघेऊनितत्वता । मखरक्षणाजायिजे ४५ ऐकतांसद्गुरूचेंवचन । श्रीरा मकरीहास्यवदन । उघडीनेत्रराजीवनयन । जेकांआकर्णविकाशले ४६ करूनिसद्गुरूसिनमस्कार । करीप्रदक्षिणात्रिवार । सद्गदझालेंहृदयमंदि रें । अष्टभावेंकरूनियां ४७ मगह्मणेतोब्रह्मपुत्र । बरवेंदावीआतांलीलाचरित्र । तोंगुरुआज्ञाराजीवनेत्र । मस्तकींवंदूनिनिघाला ४८ दि व्यरथींबैसलारघुनाथ । सवेंकौशिकआणिसुमित्रासुत । लक्षोनिसिद्धाश्रमाचापंथ . सुमूहूर्तेंसीचालिला ४९ दशरथआणिब्रह्मसुत । भागीरथी पर्यंतबोळवित । जातांशकुनउत्तमहोत । श्रीरामासीतेधवां २५० त्याशकुनाचाकरूनिअर्थ । रायासिसांगेविरिंचीसुतँ । विजयश्रियेसीरघुनाथ अयोध्येसीयेईल ५१ सुखेंबोळवूनितेव्हांरघुनाथ । माघारेआलेवसिष्ठदशरथ । पुढेंकथागोडबहुत । अमृताहूनिविशेषें ५२ रामविजयवै रागरसुरेख । षष्ठोध्यायहिराअमोलिक। हृदयपदकींजडोनिदेख। संतश्रोतेअनुभविती ५३ ब्रह्मानंदाश्रीरामचंद्रा । श्रीधरवरदागुणसमुद्रा । हा षष्ठोध्यायरघुवीरा । सदांहृदयींवसोमाझे ५४ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मिकीनाटकाधार । सदांपरिसोतपंडितचतुर । षष्ठो ध्यायगोडहा २५५ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ शुभंभवतु ॥ ॥ अध्याय ६ ॥ ॥ ओव्या ३५५ ॥ ॥

---

१ कमल. २ हृदयरूप गृह. ३ स्तंभ, स्वेद, रोमांच, लय, वैस्वर्य, वेपथु, ( कंप, ) अश्रु, वैवर्ण्य. ४ ब्रह्मदेवाचा पुत्र वसिष्ठऋषि.

श्रीगणेशायनमः । श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । चंडकिरणकुलमंडणा । कमलदळाक्षाराजीवनयना । जलजोद्भवजनकाजगज्जीवना । पतितपावना
श्रीरामा १ विद्वज्जनमानसमराळा । कामांतकध्येयभक्तवत्सला । अनंतवेषात्रिभुवनपाळा । दीनदयाळारघुवीरा २ जयजयअविद्याविपि
नदहना । निजभक्तमानसहृदयरत्ना । जगदोद्धारामुनिजनरंजना । दुर्जनभंजनाराघवेशा ३ मागेंषष्ठमोध्यायींकथन । वसिष्ठेंरामासउपदेशू
न । मगविश्वामित्रगेलाघेऊन । यागरक्षणाचेनिकाजें ४ भागीरथीतीरींकरूनिस्नान । कौशिकरामलक्ष्मण । साग्रोनियांनेमअनुष्ठान । सत्क
र्माचरणवेदोक्त ५ धनुर्वेदनानामंत्र । कोणेसमर्यीकैसेंप्रेरावेंशस्त्र । रामासिअवघेंमंत्रशास्त्र । विश्वामित्रउपदेशी ६ युद्धींनानायुक्तीकळा ।
विश्वामित्रसांगेसकळा । राघवेंआकळिल्यात्यावेळा । जैसाआंवळाकरतळींचा ७ मूर्तिमंतशस्त्रदेवता । श्रीरामचरणींठेवितीमाथा । मगहृदयींप्र
वेशतीतत्वता । जळींजळज्यापरी ८ पाहावयाश्रीरामाचेंधैर्यमानस । विश्वामित्रह्मणेत्यासमयास । येणेंमार्गेंजेगेलेसिद्धाश्रमास । ताटिकेनेंतयांभक्षिले
९ । येणेंमार्गेंरघुपती । भयवाटेजावयाचित्तीं । हामार्गचुकवूनत्वरितगती । जावेंपैंसिद्धाश्रमातें १० ऐकतांकौशिकाचेंवचन । रामबोलेसुहास्य
वदन । जेणेंविश्वामित्राचेकर्ण । तृप्तहोऊनिसुखावती ११ स्वामीतुमचेदयेंकरूनी । महाकाळउभाचफोडीनरणीं । तेथेंताटिकेसकोणगणी । येच
क्षणींमारीनमी १२ कौशिकाचेमनींसंदेहहोता । कींहेबाळकेवीझुंजतीलआतां । यासंशयाचीसमूळकथा । रामवचनेंविसरला १३ मगरथा
वरीबैसोन । ताटिकेचेंपाहातकांनन । त्याचमार्गेंतिघेजण । जातेझालेतेधवां १४ वातवेगेंजातस्यंदन । अपारभूमीटांकिलीक्रमोन । जैसेंऐकतांह
रिकीर्तन । पापेंखंडोनिभस्महोती १५ पुढेंदेखिलेंघोरअरण्य । वृक्षलागलेमहादारुण । चालावयासिस्यंदन । पुढेंमार्गफुटेना १६ रामासि
ह्मणेगाधिनंदन । राघवाहेंताटिकारण्य । आतांयेईलतीधांवोन । वासकाढीतमनुष्याचा १७ तोंहांकफोडिलीअकस्मात । जेऐकतांदचकेकृतांत
विश्वामित्रझालाभयाभीत । रक्षींरक्षींराघवाह्मणे १८ उन्मत्तदशसहस्त्रगजांचेंबळ । ऐसीताटिकापरमसबळ । पर्वतसांठवीविशाळ । ऐसेंउदराति
येचें १९ तेकुंभकर्णाचीभगिनी । बहुतविशाळराक्षसिणी । शताचेशतगोद्विजधरूनी । दाढेखालींरगडीतसे २० ताटिकामार्गींजातांसहज
मुखींघालोनिरगडीगज । वनोपवनींशोधूनिद्विज । नित्यभक्षीसाक्षेपें २१ प्रेतरक्तेंवस्त्रेंभरलीं । तींआपणाभोंवतींवेष्टिलीं । मनुष्यशिरेंकानींबांधि
लीं । बहुतदाटवळीनें २२ नराशिरांच्याआपादमाळा । शोणितेंचर्चितपैंगळा । कपाळींसेंदूरचर्चिला । बाबरझोंटीमोकळयाअसती २३ द्वाद

१ सूर्य. २ कमलपत्राक्षी. ३ कमलनेत्र. ४ ब्रह्मदेवाचा पिता. ५ राजहंस. ६ शंकर. ७ यज्ञ. ८ विश्वामित्राचें. ९ अरण्य. १० रथ.

शगांवपसरिलेंवदन । पांचगांवएकेकस्तन । अगणितराक्षसीसंगेंघेऊन। रामावरीलोटल्या २४ सखियांसताटिकाह्मणेवचनीं । यापंथेंयेत मनुष्यधाणी । नरमांसाचीआजिवांटणी। तुह्मांसकरीननिर्धरें २५ विश्वामित्रह्मणेचापपाणी । हेवृक्षविशाळगगनीं। आंतगर्जनाकरितातिराक्ष सिणी । ताटिकेसहितपाहेपां २६ रामकाढीकोदंडगव्सणी । जैसायाज्ञिकेंफुंकिजेअग्नी । कींअकस्मातउगवेवासरमणी। यामिनीअंतींपूर्वेसी २७ मौर्वीवोढितांआकर्ण ।कडकडाटघोषउठेदारुण । झालासर्वेंचियोजिताबाण। प्रळयचपळेसारिखा २८ बाणाचेंअर्धचंद्रकारवदन। करीधां वत्यावायूचेंखंडण। रामेंवोढोनिआकर्ण । सोडिलाबाणतेसमयीं २९ वृक्षांसहितराक्षसिणी। मुरुयताटिकाहृदयापासोनी। छेदोनिपाडिलीतेक्ष णीं। घोषगगनींनसमाये ३० प्राणजातांराक्षसिणी । ताटिकागर्जिन्नलीतेक्षणीं । तोघोषऐकतांकानीं । सर्वदेवगजबजिले ३१ ह्मणतीविज यीश्रीरघुविर । देववर्षतीसुमनसंभार ।ब्रह्मांनंदेंविश्वामित्र। रामालागींआलिंगी ३२ ह्मणेरविकुलभूषणारघुवीरा। राजीवनेत्रासुकुमारा। तुझी धनुर्विद्याश्रीरामचंद्रा । आजिम्यांदृष्टींदेखिली ३३ जैसेंएकेचिनामेंकरून । कोट्यावधीपापेंजातीजळोन। तैसेंताटिकेसहराक्षसींवधून । एके चिबाणेंटांकिल्या ३४ ताटिकेच्यारक्तेंकरूनी । असंभाव्यरंगलीमेदिनी। देवदुंदुभीवाजतीगगनीं । आलाचापपाणीसिद्धाश्रमा ३५ जैसे वर्षाबकाळींगंगेचेपूर । तैसेचहूंकडोनधांवतीऋषीश्वर । समस्तांसिवंदोनिरघुवीर । भेटताझालातेकाळीं ३६ यज्ञमंडपशास्त्रप्रमाण ।कुंडवेदि काभूमीसाधून । चारीद्वारेंअष्टकोन । करितीसाधनविप्रतेव्हां ३७ सकळसामग्रीसिद्धकरून। आरंभिलामहायज्ञ ।श्रीरामासिह्मणेगाधिनं दन। मखरक्षणकरीआतां ३८ ताटिकावधिलीहासमाचार ।ऐकोनिधांवतीलरजनीचर। मारीचसुबाहूभयंकर। प्रलयथोरकरितील ३९ याला गींनरवीरपंचानना ।सांभाळींचहूंकडेरघुनंदना। परमकपटीराक्षसगणा । वधोनियांटांकावें ४० श्रीरामह्मणेहोऋषी । तुह्मींचिंतानकरावीमा नसीं। शिक्षालावीनकृतांतासी ।विघ्नकरूंआलिया ४१ ऐकोनिश्रीरामाचेंवचन । उल्हासलेंऋषीचेंमन। मगदीक्षाग्रहणगाधिनंदन । आरं भकरीयज्ञासी ४२ चंद्रवेष्टिततारागण । मित्रवेष्टितजैसेंकिरण। तैसाऋषिवेष्टितगाधिनंदन । कुंडासहविराजे ५३ ओंकारासहितस्वाहाका र। अवदानटांकीतसत्वर । उठिलामंत्रांचागजर। वषट्कारघोषपैं ४४ तोंअस्तागेलावासरमणी। दोनप्रहरजाहलीरजनी । पिशिताशनआ लेधांवोनी। ताटिकेच्याकैवारा ४५ वीसकोटीरजनीचर । त्यांतमुरुयबाणासुर । सिद्धाश्रमासमीपसत्वर । हांकफोटीतपातले ४६ हां

१ धनुष्याची दोरी. २ पृथ्वी ३ आकाशांत. ४ गाधिराजाचा पुत्र विश्वामित्र. ५ यज्ञ. ६ राक्षस. ७ सिंह, व्याघ्र. ८ यमधर्मास. ९ सूर्य. १० रात्र.

कऐकोनिदारुण । भयाभीतजाहलेब्राह्मण । गळालेंहातींचेंअवदान । वदनींबोबडीवळतसे ४७ ह्मणतीरक्षींरक्षींगारघुनंदना । नरवीरश्रेष्ठा गोविप्रपालना । श्रीरामह्मणेहोब्राह्मणा । चिंताकांहींनकरावी ४८ एकह्मणेब्राह्मण । रक्षणाररामलक्ष्मण । पर्वताकारराक्षसपूर्ण । वीसकोटी पातले ४९ एकद्वारेंहेरक्षिती । दुजेद्वारेंराक्षससंचरती । कैसीआतांहोयीलगती । पळावयाठावनाहीं ५० विश्वामित्रह्मणेस्वस्थकरामन । मा नवनव्हेरघुनंदन । पुराणपुरुषनारायण । राक्षसवधावयाअवतरला ५१ तोंपर्वतआणिपाषाण । यज्ञमंडपावरीपडतीयेऊन । हांकफोडितीदा रुण । मगरघुनंदनकायकरी ५२ कोदंडवोढोनिआकर्ण । सोडीबाणापाठींबाण । राक्षसांचींशिरेंकरचरणें । तटतटांतुटताती ५३ राक्षस परमअतुर्बळी । ज्याहींसुरांचेमुकुटपाडिलेतळीं । हांकादेतीअंतराळीं । यज्ञमंडपवेष्टिला ५४ एकउडतीअंबरीं । प्रेतेंटांकितीयज्ञावरी । मगर घूत्तमअयोध्याविहारी । सर्वद्वारेंव्यापक ५५ जिकडेतिकडेरघुनंदन । चारीद्वारेंअष्टकोण । अष्टदिशाव्यापून । सोडीबाणश्रीराम ५६ मंड पाचियाकळसावरी । उभारामकोदंडधारी । बाणाचापर्जन्यतयाअवसरीं । चहूंकडोनिपाडित ५७ रामरूपअसंख्यात । यागमंडपापुढेंवेष्टित । बाणाचापूरवर्षत । संहारहोतअसुरांचा ५८ मंडपावरीआणिखालतें । सर्वव्यापिलेंरघुनाथें । तीळठेवावयापुरतें । रामाविणस्थळरितेंनसे ५९ तूणीरांतूनिकितीओढीशरें । शेषासित्याचानकळेपार । कींलिखकापासावअक्षर । कितीनिघतीकळेना ६० कींमुखांतूनिशब्दनिघती । त्यांचीन कळेगणती । कींमेघधारावर्षती । नाहींगणतीतयांची ६१ कींमहाकवीचीपद्यरचना । कितीझालीहेंकळेना । कींकुबेरभांडारींचीगणना । कदान कळेकोणातें ६२ मेरुपाठारींरत्नखाणीनिश्चिती । त्यांतूनरत्नेंकितीनिघती । कींपृथ्वीवरीतृणांकुरफुटती । नाहींगणतीतयांची ६३ कींशास्त्र संमतेंअनेकअर्थ । बुद्धिबळेंकरितीपंडित । तैसारामबाणासिनाहींअंत । तूणीरानिश्चितरितानोहे ६४ मेघसमुद्रजळनेतां । परितोरितानोहे सर्वथा । कींविष्णुमहिमावर्णितां । नसरेसर्वथाकल्पांतीं ६५ तैसाउणानोहेतूणीर । कोट्यानकोटीनिघतीशर । होतराक्षसांचासंहार । समरधी रश्रीराम ६६ वीसकोटीराक्षसदेख । एकलारामअयोध्यानायक । परितेमृगेंद्रावरीजंबुक । अपारजैसेपातले ६७ कींदंदशूकमिळोनिअ पार । धरूंआलेखगेश्वर । प्रलयाग्नीवरीपतंगभार । विझवावयाझेंपावती ६८ कींबहुतमिळोनिखद्योत । धरूंह्मणतीआदित्य । कींशलभमिळो नसमस्त । महामेरूउचलूंह्मणती ६९ एकलाचिपरशधर । परीअवनीकेलीनिर्वीर । एकलाचिनृसिंहसाचार । परीदैत्यभारसर्वआटी ७०

१ आहुति. २ हात पाय. ३ देव. ४ आकाशांत. ५ यज्ञ. ६ भात्यांतून. ७ बाण. ८ संख्या, अजमास. ९ कवितेची रचना. १० जामदारखाना. ११ भाता. १२ सिंहावर. १३ कोल्हे. १४ सर्प.

असोराक्षसांच्यालाखोल्या । श्रीरामेंभूलिंगासीसमर्पिल्या । मारीचसुबाहूतेवेळां । गदाघेऊनिधांविन्नले ७१ रामेंकाढिलेनिर्वाणबाण । ज्या
शरमुखींसूर्यबैसवून । सुबाहूचाकंठलक्षून । केलेंसंधानराघवें ७२ जैसेविहंगमवेगेंकरून । वृक्षींधांवतीफळेंदेखोन । तैसावेगेंगेलाबाण । शि
रउडविलेंसुबाहूचें ७३ त्याबाणाचापिसाराकिंचित । मारीचासलागलाअकस्मात । त्याशरवातेंअद्भुत । मारीचउडोनिपैंगेला ७४ कींखगेश्व
राचेफडत्कारीं । अचळउडोनिजातीदिगंतरीं । तैसामारीचसमुद्राभीतरीं । जाऊनियांपडियेला ७५ परमहोऊनिभ्रमित । लंकेसिगेलाधांवत ।
वाटेपाठींलागलारघुनाथ । परतोनिपाहतसेघडोघडी ७६ लंकेमाजीप्रवेशोन । राक्षसेंद्रातेंसांगेवर्तमान । ह्मणेमानवनह्वेरघुनंदन । आदिपुरुष
अवतरला ७७ अवघाऐकोनिवृत्तांत । रावणदचकलामनांत । जैसासुपर्णाचाऐकोनिपुरुषार्थ । सर्पबहुतसंतापती ७८ कींऐकोनिसंतांचेंस्त
वन । मनांतकष्टीहोयदुर्जन । कींपतिव्रतेचाधर्मदेखोन । व्यभिचारणीविटतीपैं ७९ असोसकळआटोनिरजनीचर । सिद्धाश्रमींरणरंगधीर ।
रणमंडळींरघुवीर । कैसाएकलाशोभला ८० जैसामहाकल्पाचेसंहारें । मगएकलेंपरब्रह्मउरे । कींसमस्तलोपोनिनक्षत्रें । एकलादिंनकरउ
रेजैसा ८१ कींशुक्तिकेवेगळेंमुक्ताफळ । दिसेजैसेंपरमतेजाळ । कींप्रपंचत्यागोनिनिर्मळ । योगेश्वरविलासेजेवी ८२ जैसीरात्रनिरसतांपक्षी
जातउडोन । तैसेयज्ञमंडपांतूनिब्राह्मण । भेटतीरामासयेऊन । ब्रह्मानंदेंकरूनियां ८३ जठरींअन्नपाकहोयवेगें । परिगर्भासढकानलागे । कींज्ञा
नवेष्टितांतापत्रयभंगे । परिअंतरनभंगेसर्वथा ८४ तैसेयज्ञमंडपासाहितविप्र । रघूत्तमेंरक्षिलेसाचार । पूर्णझालामँखसमग्र । श्रीरघुवीरप्रसादें
८५ विश्वामित्रासिनावरेप्रेमा । ह्मणेवत्सामाझियाश्रीरामा । सहस्त्रवदँनातुझामहिमा । नवर्णवेचिसर्वदा ८३ कौशिंकासिह्मणतीॠषिजन ।
श्रीराममूर्तीधाकुटीसगुण । पर्वताकारराक्षससंहारून । कैंसेक्षणमात्रेंटांकिले ८७ विश्वामित्रहास्यवदन । ॠषींसदेतसेप्रतिवचन । ह्मणेआदि
त्यमंडळदिसेलहान । पडेपृथ्वीवरप्रकाश ८८ धाकुटाअसेंकलशोद्भव । परिउदरींसाठविलाजलार्णव । कींवामनरूपधरीकेशव । परिदोनपाउलेंब्र
ह्मांडकेलें ८९ दिसेइंद्राचेंवज्रलहान । परिकेलेपर्वताचेपक्षचूर्ण । पंडितबुद्धीदिसेसान । परिआब्रह्मभुवनव्यापिलें ९० तैसाश्रीरामधाकुटादि
सेतुह्मां । परिब्रह्मादिकांनकळेमहिमा । पुराणपुरुषपरमात्मा । भक्तरक्षणाअवतरला ९१ असोभूतांवळापातल्यातेथें । त्यांहींभक्षिलींराक्षसप्रेतें ।
यज्ञमंडपाभोंवतें । शुद्धकेलेंभूमंडळें ९२ तोंआलेंमिथिलेश्वराचेंपत्र । तेंस्वयेंवाचीविश्वामित्र । सवेंघेऊनिसर्वविप्र । स्वयंवरालागींयेयिजे ९३

---

१ सूर्य. २ शिंपी. ३ मोतीं. ४ यज्ञ. ५ शेषास. ६ विश्वामित्रास. ७ अगस्तिॠषि. ८ समुद्र. ९ अल्प. १० पिशाचांचा समुदाय. ११ स्थान.

वेळूवरीघालितांकुठार । चिरतजायजैसादूर । तैसीश्रीरामाचीबुद्धीतीव्र । तर्कअपारनगणवे ४७ वसिष्ठधनुष्यबाणघेऊन । जेजेसोडूनदावीबा
ण । त्याहूनिविशेषरघुनंदन । दावीकरूनगुरूसी ४८ शस्त्रास्त्रींविद्याप्रवीण । झालेरामलक्ष्मण । तोंपरीक्षापाहावयाअंजनंदन । रंगमं
डपींबैसला ४९ त्यारंगमंडपाचीरचना । नवर्णवेचिसहस्त्रवदना । तेंतेजविलोकितांसहस्त्रकिरणा । परमाश्चर्यवाटतसे ५० शशांकप्रभासमपू
र्ण । कोरिलेकाश्मिरीपाषाण । त्यांचींपोंवळींप्रभाघन । सभोंवतीरचियेलीं ५१ त्यामाजीसप्तरंगीपाषाण । चक्रजाळचाचौकडीपूर्ण । माजी
घातल्यादुरून । पाहातांआश्चर्यवाटतसे ५२ साधिलेंपाचुबंधआंगण । गरुडपाचूचींजोतींपूर्ण । नीळयाचेगजजोडोन । तेचितोळंबेदाविले ।
५३ त्यावरीहिऱ्याचेस्तंभ । वरीवैडूर्यउथाळींस्वयंभ । पेरोजाचेतुळवटसुलभ । लंबायमानपसरले ५४ गरुडपाचूचेदांडेविराजती । आर
क्तमाणीककिलच्याझळकती । चर्याशेषफणाकृती । जैसेगभस्तीवळीनें ५५ एकावरीएकनवखण । तेथेंरात्रींदीपाचेंकायकारण । गरुडपाचूचे
रावेपूर्ण । शब्दकरितीनवलहें ५६ निळयाचेमयूरधांवती । रत्नाचींगोळांगुंळेंनाचती । छप्पन्नदेशींच्यानृपाकृती । चित्रेंभिंतीवरीपैंतेथें ५७
खांबसूत्रंपुतळिया । नाचतीगिरक्याघेऊनियां । नृसिंहमूर्तीस्तिंभांतूनियां । हुंकारतीक्षणक्षणा ५८ ऐसियारंगमंडपांत । बैसताझालाद्विपंचरथ।
वसिष्ठादिऋषिसमस्त । अष्टाधिकारीआणिप्रजा ५९ जालंधरवाटेतलतां । पाहातीकौसल्यादिमाता। श्रीरामेंविद्यासाधिल्यासमस्ता । पाहाव
याआस्थासकळांसी ६० जैसानक्षत्रांतअत्रिसुत । तैसासभेंतराजादशरथ । इंद्राजवळबृहस्पतीबुद्धिमंत । तैसावसिष्ठबैसळा ६१ असोरंगमं
डपापुढेंदोघेजण । श्रीरामआणिलक्ष्मण । पाचबंदआंगणींयेऊन । उभेठाकलेतेधवां ६२ जैसेशशीआणिचंडकिरण । कींअन्नपूर्णावरकींरमारमण।
कींमेरुमंदाररूपधरून । उभेठाकलेरणांगणीं ६३ साक्षातशेषनारायण । अवतारपुरुषदोघेजण । अनंतजन्मींचेंतपाचरण । दशरथाचेंफळाआलें
६४ कींकोटिकंदर्पलावण्यखाणी । तेजासीउणावासरमणी । कींअनंतविजापिळूनी । श्रीरामरूपवोतिलें ६५ तोंलावण्यामृतसागर । आजा
नुबाहूश्रीरघुवीर । गुरुआणिपित्यासिनमस्कार । करूनिशस्त्रेंवंदिलीं ६६ नानावाहनींआरूढोनिरघुपती । दावीयुद्धाचीअगाधगती । रथफे
रीनानारीतीं । विस्मितपाहतीसर्वजन ६७ कुंजरावरीबैसोनिफेरी । सर्वेचितुरंगारूढहोयझडकरी । चपळतादावीनानापरी । अलातचक्रासा
रिखी ६८ चरणयुद्धशस्त्रयुद्ध । अनेकशस्त्रेंनानाविध । मल्लमेषकुंजरयुद्ध । व्याघ्रसिंहयुद्धनानागती ६९ वृकवृषभनक्रयुद्ध । जलमंडळ

१ दशरथ. २ युद्धाची कवाईत शिकण्याचें स्थळ. ३ शेषास. ४ सूर्य. ५ चंद्र. ६ वैदूर्यरत्नें. ७ चवऱ्या. ८ बाहुलीं. ९ दशरथ.

युद्धविशद । अंतरिक्षभूमीतदाप्रसिद्ध । समदळकळायुद्धदाविलें ७० शक्तीपाशुपततोमर । शूलपरिघलहुडीचक्र । कंदुकभिंडिमाळावज्र । दावी रघुवीरगतीतयांची ७१ पाषाणअसिलतामुद्गल । शतघ्नीफरशकुंतसरळ । यमदंष्ट्राशब्दयुद्धसबळ । मंत्रशास्त्रयुद्धगती ७२ एकसोडितांचिबा ण । कोटयावधीव्हावेतयापासून । सकळचमूचेंछेदन । एकाचिबाणेंकरावें ७३ अग्न्यस्त्रपजन्यास्त्र । वातपर्वतआणिवज्र । मायाब्रह्ममाहेश्वर । भूतहनुमंतभैरवास्त्र ७४ सिंहपर्वतगरुडास्त्र । कामवैराग्यतारकासुर । पावकनामगंधर्वास्त्र । दावीरघुवीरसकळही ७५ ब्रह्मागिरीविश्वजित । याअस्त्रांच्यागतीदावीरघुनाथ । तेचिपरीसुमित्रासुत । मानदशरथडोलवी ७६ वसिष्ठउठोनितेअवसरीं । श्रीरामसौमित्रांहृदयींधरी । दश रथाचाआनंदअंबरीं । नमायेतेव्हांसर्वथा ७७ सभाविसर्जूनिदशरथ । वसिष्ठसौमित्ररघुनाथ । प्रवेशतेझालेसदनांत । आनंदयुक्तसर्वही ७८ एकेदिवसींअजपाळनंदन । दर्पणींविलोकीनिजवदन । तोंदाढींतशुभ्रकेंशदेखोन । कायबोलताजाहला ७९ ह्मणेशीघ्रबोलवाब्रह्मनंदन । अष्टाधिकारीप्रजाजन । सकळव्यवहारींबैसासघन । विवेकसंपन्नथोरथोर ८० सकळांबैसवोनिएकांतीं । निजगुह्यपुसेकौसल्यापती । ह्म णेराज्यद्यावेंरामाप्रती । ऐसेंचित्तींवाटतसे ८१ राज्यासियोग्यरघुनायक । जोगुणेंसमुद्रप्रतापार्क । जोधीरवीरउदारदेख । लावण्यसागर श्रीराम ८२ अनंतजन्मतपाचेंफळ । तोहाश्रीरामतमाळनीळ । राज्यद्यावेंहेंतात्काळ । सुमुहूर्तपाहोनियां ८३ ऐकोनिदशरथाचेंवचन । संतो षलाब्रह्मनंदन । मानवलेप्रजाजन । ह्मणतीधन्यदशरथा ८४ वसिष्ठादिऋषिसमस्त । पाहूनियांसुमुहूर्त । चैत्रमासअतिविख्यात । गुरुपुष्य योगसाधी ८५ श्रीरामासिद्यावयाराज्यपट । सुमुहूर्तनेमिलाअतिवरिष्ठ । सर्वसामग्रीवसिष्ठ । सिद्धकरितापैंझाला ८६ श्वेतवर्णचौदंतगज । क्षी रवर्णआणिलाहयराज । छत्रचामरतेजःपुंज । मृगांकवर्णासारिखीं ८७ सप्तमृत्तिकापंचपल्लवपरिकर । सप्तसमुद्रींचेंआणिलेंनीरें । दिव्यर त्नेंअळंकार । नूतनछत्रनिर्मिलें ८८ दिव्यमंडपनिर्मून । तेथेंमांडिलेंसिंहासन । जपासिघातलेदिव्यब्राह्मण । वेदोनारायणसाक्षात ८९ छ प्पन्नदेशींचेराजेश्वर । शाहाण्णवकुळींचेराजकुमर । तेथेंयेतेझालेसमग्र । अपारकरभारघेउनी ९० आनंदमयअयोध्यानगर । सदनेंशृंगारिलीं सुंदर । अयोध्यावासीनारीनर । समग्रअळंकारमंडित ९१ राजमंदिरेंशृंगारिलींविशेष । वरीझळकतीरत्नजडितकळस । उणेंआणितीउडुगँ णास । रजनीमाजींसतेज ९२ एकांतींबोलावूनिरघुनाथ । गुह्यगोष्टीसांगेदशरथ । ह्मणेमजग्रहपीडाआलीयथार्थ । काळविपरीतपुढेंदिसे ।

१ शौर्यौदार्यादिगुण. २ मतापरूप सूर्य. ३ वसिष्ठऋषि. ४ चंद्र. ५ उदक. ६ विद्वान्. ७ नक्षत्रांस. ८ रात्रीस. ९ यथाशास्त्र.

९३ अष्टमस्थानींशनैश्चरनिश्चिती । द्वादशस्थानींबृहस्पती । मजमृत्युचिन्हेंजाणविती । बैसेंरघुपतींसिंहासनीं ९४ रामामजवाटेखंती । म
जटांकूनियांरघुपती । दूरजासीलनिश्चिती । ऐसेंचित्तींवाटतसे ९५ तरीलावण्यामृतसागरा । तमाळनीळाचारुगात्रा । रामाघनःश्यामसुंदरा ।
राज्यभाराचाल्वीं ९६ श्रीरामेंवंदिलेपितृचरण । ह्मणेमजआज्ञाचिप्रमाण । श्रीरामासिकरविलेंउपोषण । श्रीवसिष्ठेंतेदिवसीं ९७ र
घुनाथाहातींदानें । अपारकरविलींब्रह्मनंदनें । रामजानकीदोघेंजणें । कुशासनींपहुडलीं ९८ जोपुराणपुरुषपरब्रह्म । तयाहातींकरवीहोम ।
आहुतीघालितांपुरुषोत्तम । दृष्टांतउत्तमऐकाते ९९ चकोराचेमुखींअमृतधार । वर्षेजैसारोहिणीवर । कींधेनूपान्हासोडीसत्वर । वत्सासीतृप्त
करावया १०० कींबाळकाचियामुखांत । मातास्तनघालूनिकरीतृप्त । कींमेघबिंदूटांकीअकस्मात । चातकमुखींकृपेनें १ ऐसेंअवदानरा
मटांकित । धूम्रेंनेत्रझालेआरक्त । यज्ञनारायणझालातृप्त । राघवहस्तेंकरूनियां २ जैसीगौतमीआणिभागीरथी । तैसीकौसल्याआणिसुमि
त्रासती । विप्रांसिदानेंअर्पिती । आनंदचित्तींनसमाये ३ दशरथासींविनवीलक्ष्मण । श्रीरामसेवामीकरीन । ऐकोनिसंतोषेअंजनंदन । कुरवा
ळीवदनसौमित्राचें ४ अयोध्यानगरवेष्टूनिजाणा । उतरल्याराजयांच्यासेना । कोणकरीतयांचीगणना । पाहातांनयनाधँणीनपुरे ५ श्रीराम
बैसतोराज्यपटीं । तोसोहळापाहावयादृष्टीं । सकळसुरवँरांच्याकोटी । विमानारूढपाहतीतेधवां ६ तंतवितंतघनसुस्वर । चतुँर्विधवाद्यांचा
गजर । नादेंकोंदलेंअंबँर । चिंतातुरसुरवरजाहले ७ निर्जरदिनवितीकमँलोद्भवा । दशरथराज्यसमर्पीराघवा । आमुचेबंदसुटकेचावरा । वि
चारकांहींदिसेना १०८ इंद्रपदातुल्यराज्यअपूर्व । तेंसोडोनिसीतार्धव । कासयायेईलदशग्रीव । वधावयाकारणें १०९ तोमंगळभँगिनी
चावर । भक्तांलागींजाहलासाकार । तरितपोवनायेईलरघुवीर । ऐसाविचारयोजावा ११० मगविरंचीसांगेविकल्पासी । तुवांजावेंअयोध्येसी । प्र
वेशोनिकैकेयीचेमानसीं । विघ्नराज्यासीकरावें १११ विकल्पह्मणेतेवेळां । अयोध्येमाजीपरमसोहळा । दुःखद्यावयासकळां । माझेनतेथेंनजा
ववे ११२ माझाप्रवेशहोतांतेथ । बहुतांसीहोईलप्राणांत । मांडेलएकचिअनर्थ । ह्मणूनमीतेथेंनजाय ११३ शीतळहोईलवडवानळ । मधुरता
धरीलहाळाहळ । परीमजविकल्पाचेंबळ । क्षीणनव्हेकल्पांतीं ११४ देवह्मणतीतुजविण । हेंकार्यसाधीलकवण । आह्मांसोडवींबंदींतून । घेईंपुं
ण्यएवढें ११५ ऐसेंऐकतांचिवचन । विकल्पनिघालातेथून । जवळकेलेंअयोध्यापट्टण । परिआंतप्रवेशनकरवे ११६ अयोध्यावासीपुंण्यशी

---

१ चंद्र. २ दशरथ. ३ तृप्ति. ४ देवांच्या. ५ चार प्रकारचीं वाद्यें. ६ आकाश. ७ ब्रह्मदेवास. ८ सीतेचा पति रामचंद्र. ९ मंगळाची बहीण सीता.

ळ । सत्यवादीसात्विकप्रेमळ । जयांकडेपाहूंनशकेकाळ । तेथेंविकल्पप्रवेशेना ११७ ज्यांसिवेदाज्ञावाटेप्रमाण । नेणतीपरांचेदोषगुण । सदां सारासारविचारश्रवण । तेथेंविकल्पप्रवेशेना १८ जेनिःसीमगुरुभक्त । जेमातापित्यांसीभजत । जेअनंन्यब्राह्मणासीवंदित । तेथेंविकल्पप्रवेशे ना १९ दयाउपजेदेखतांदीन । अंधपंगुवृद्धक्षीण । त्यांसीदेईजोवस्त्रअन्न । तेथेंविकल्पप्रवेशेना २० सदांआवडेहरिभजन । श्रवणमननहरिकी र्तन । परंद्रव्यतृणासमान । तेथेंविकल्पप्रवेशेना १२१ सर्वांभूतींएकरघुनाथ । ऐसीजयासीपूर्णप्रचीत । प्रपंचींवर्ततांविरक्त । तेथेंविकल्पप्रवेशे ना २२ जेपूर्णब्रह्मानंदेंधाले । जेआपणाआपणांविसरले । तेथेंविकल्पाचेंबळनचाले । कल्पांतींहीसर्वथा २३ परललनामातृवत । जेथेंवादंप्र तिवादींमुकेहोत । जेविश्वरूपपाहातीसंत । तेथेंविकल्पप्रवेशेना २४ असोपुंण्यवंतअयोध्येचेजर्न । त्यांसीदेखतांविकल्पजायपळून । प्रवेशावया अयोध्यापट्टण । धीरनोहेसर्वथा १२५ तोंकैकेयीचीदासीमंथरां । तीपूर्वींचद्वेषीरघुवीरा । परमपापीणतेसीतावरा । सर्वदांहीनिंदित १२६ प्रातःकाळींअयोध्याधीशेंउदार । सेजेसीअसतांश्रीरामचंद्र । झाडितांबळेंचिकेर । रामावरीघालित १२७ तोआंगावरीयेतांकेर । दैवेंहतहो ईलरघुवीर । ह्मणोनिदासीतेअपवित्र । रामावरीरंजउडवी १२८ प्रतिदीनींऐसेंचिकरित । देखतांक्रोधावलाजनकजामात । ह्मणेतूंहोसील यथार्थ । कुरूपवक्रसर्वांगी १२९ मगलागेश्रीरामाचेपायीं । ह्मणेमजलागींउःशापदेईं । मगतोजगदानंदतेसमयीं । कायबोलतापैंझाला १३० ह्मणेपुढीलअवतारींपूर्ण । कंसवधावयायेईन । तेव्हांतुजउद्धरीन । दिव्यकरीनरूपतुझें १३१ असोअयोध्येबाहेर । पुष्पवाटिकापरमसुंदर । सदांफळेंतरुवर । विकल्पसत्वरतेथेंआला १३२ जोभजनवनछेदककुठार । स्नेहदाहककर्पूरवैश्वानर । कींप्रीतिमेघविदारकसमीर । परमतीव्र रूपज्याचें १३३ हाभजनमार्गींचामारकमांग । परद्वेषीविष्ठाभक्षककाग । द्वेषवारुळांतीलभुजंग । धुसधुसीतविकल्पहा १३४ तोमत्सरवनीं चावृक्षथोर । कीनिर्दयसमुद्रींचानक्र । कींपरनिंदाजल्पकखर । विकल्पसाचारजाणिजे १३५ विकल्पनव्हेतोश्वान । धांवेभक्तांवरीवसवसून । आनंदरसपात्रउलंडून । क्षणमात्रेंटांकित ३६ असोहिंवरवृक्षींतोविकल्प । बैसलासंतोषेंसुखरूप । तंवतेथेंमंथरापापरूप । पुष्पेंन्यावयापातली १३७ हिंवरछायेसितेअवसरीं । मंथराबैसलीक्षणभरी । विकल्पप्रवेशलातिच्याअंतरीं । अत्यंतकुपात्रदेखोनियां १३८ जोकांनिर्दयअविचारी हीन । नावडेहरिकथापुराणश्रवण । सदांजल्पतपरदोषगुण । विकल्पयेऊनितेथेंराहे १३९ साधुसंतब्राह्मण । त्यांसद्वेषीरात्रदिन । भूतदयाना



१ दुसऱ्यांचे· २ एकनिष्ठ· ३ पांगळा· ४ परकीय· ५ दुसऱ्याच्या स्त्रिया· ६ कलह· ७ साधु· ८ लोक· ९ मंथरा नामें दासी· १० अयोध्येचा अधिपति· ११ मारब्धहीन· १२ केर·

वडेमनांतून । विकल्पयेऊनितेथेंराहे १४० वेदविरुद्धजेवर्त्तत । नसतेंचिवाढवितीकुमत । कोठेंविश्वासनधरीचित्त । विकल्पनित्यतेथेंराहे ४१
असामंथरेचेमनीं । विकल्पसंचरलातेक्षणीं । तोंपक्ककालिंगणदेखियेलेंनयनीं । प्रीतीकरूनिभक्षित ४२ पुष्पेंवेंचितांकुश्चळ । मनींउठतीद्वेष
कल्लोळ । गृहासपरतलीतत्काळ । कलहप्रबळल्लावावया ४३ तोंकैकयीचेगृहींसोहळाहोत । मंडपउभविलानभचुंबित । जनअवघेआनंदभरित ।
चिंतारहितसर्वही ४४ ऐसेंमंथरेनेंदेखतां । परमद्वेषवाटेचित्ता । जैसावसंतकाळींकोकिळागर्जतां । वायसांदुःखउपजेपैं ४५ चूतयेतांपाडा
स । मुखरोगप्राप्तहोतीकागांस । दृष्टींदेखतांराजहंस । दुःखविशेषवाटेतया ४६ कींदेखोनसंतांच्यामूर्तीं । निंदकसंतापतीचित्तीं । कींदेखोनियां
व्युत्पत्ती । अनक्षराचित्तींखेदवाटे ४७ कींदेखोनमृगेंद्राचाप्रताप । सृंगालासिचढेसंताप । कींदेखोनिश्रीमंताचेंस्वरूप । जेवीदुर्जनचरफडती
४८ कींदेखोनिधार्मिकाचीलीला । अपवित्रासीद्वेषआगळा । कींपतिव्रतादेखोनिडोळां । व्यभिचारणीवीटती ४९ शशीदेखोनिवीटतीकाग
थोर । दिवांभीतानावडेदिनकर । कींहिंसकासतत्वविचार । मनींहूनिनावडे १५० तैंसोहळादेखोनिमानसीं । परमसंतापलीमंथरादासी ।
रामनिधानासीविघ्नसी । आडआलीसाक्षेपें ५१ तेकलहपीठींचीदेवता । दुःखकल्लोळप्रवाहसरिता । गृहासीअग्निलागेअवचिता । तैसीआंतप्रवे
शली ५२ शरीरधर्रणीवरीटांकीतत्काळ । धवधबांपिटीतवक्षस्थळ । कैकेयीसह्मणेतूंकेवळ । अभागीणसर्वस्वें ५३ अगेतूंबुद्धिहीनसवांत ।
तुझेंतुजलानकळेहित । मातुळकुळापाठविलेतुझेसुत । राज्यींरघुनाथस्थापिती १५४ तुजअवदसाआलीयथार्थ । सौभाग्यझालेंवाताहत । देशं
धडीकेलाभरत । तुजअनर्थसमजेना १५५ राज्यींबैसतांरघुनंदन । तुझेपुत्रटांकीलवधोन । कैकेयीतुजलाशिकवीलकवण । मजवांचूनिबुद्धी
आतां ५६ जरीहेगोष्टीमाझीनऐकसी । तरीराज्यनमिळेभरतासी । श्रीरामचालवीलस्वराज्यासी । हेंतोंबरवेंदिसेना ५७ मगतिजप्रतकै
केयीबोलत । मजभरततैसाचरघुनाथ । तूंहाखेदनकरींयथार्थ । कदांअनर्थकरूंनको ५८ ऐसेंबोलतांसत्वर । कंठींचेंपदकआणिहार । तिच्या
गळयांतघालीपरिकर । दासीआपुलीह्मणोनो १५९ पदकआणिमुक्तमाळा । मंथरेनेंतोडूनिटांकिल्यातेवेळां । तोंडघेतलेंअतिविकळा । राज्य
बुडालेंह्मणोनी १६० स्नेहेंधांवोनीकैकेयी । तीसधरितीजाहलीह्रदयीं । विकल्पप्रवेशलातेसमयीं । चित्तगृहींकैकेयीच्या ३१ कैकेयीह्मणेतेस
मर्यी । बरींयुक्तिआठवलीलवलाहीं । तूंप्राणसखीहोसीपाहीं । करूंकायसांगआतां ६२ भरतशत्रुघ्ननाहींजवळी । रामासीराज्यदेतीप्रातःका

---

१ आंब्याचा वृक्ष. २ मूर्खास. ३ सिंह. ४ कोल्हा. ५ चंद्र. ६ घुबडास. ७ सूर्य. ८ भूमी. ९ पुत्र भरत व शत्रुघ्न. १० देशपार.

ळीं । अयोध्यावासीलोकसकळी । रामाकडेमुरडले ६३ वसिष्ठआणिदशरथ । यांसिप्राणाहूनिआवडेरघुनाथ । तेतोंमाझावचनार्थ । नमानि
तीकदांही ६४ मंथराह्मणेऐकसोचार । पूर्वीचेमागेंदोनीवर । तुवांरथसांवरिलाघालोनिकर । शक्राचेयुद्धसमयीं ६५ ऐसेंगांठीसअसतांशस्त्र ।
तुजभयनाहींअणुमात्र । राज्यींस्थापूनतुझापुत्र । रामचंद्रावनाधाडीं ६६ मनुंसंख्यासंवत्सर । वनापाठवींरघुवीर । चतुर्दशवर्षांततुझापुत्र ।
चतुर्दशभुवनेंजिंकीढ ६७ वनानिघतांरामचंद्र । सवेंजाईलसौमित्र । काननींराक्षसदुर्धर । रामलक्ष्मणाभक्षितील ६८ राक्षसेंभक्षिल्यारघु
नंदन । मगभरतासीसहजकल्याण । यालागींदोनवरघेमागून । रायापासींआतांची ६९ वनासीनिघतांरघुनाथ । प्राणत्यागीलराजादशरथ
तेहीगोष्टतुजहितं । राज्यींभरतस्थापावया ७० रामाचेआवडतेभक्त । तेबाहेरघालूंदेखतांचिसमस्त । आतांयेईलदशरथ । करीलअनर्थयेथेंची
७१ ऐसींतेदासीचींवचनें । हृदयींधरिलींकैकेयीनें । जैसेंर्वमनहोतांश्वांनें । त्वरेंकरूनीचाटिती ७२ कींसिंदीवृक्षापासून । किंचितनिघेमंद्यजीव
न । मद्यपींजैसाओढवीवदन । तैसेंवचनमानलें ७३ मर्कटासीमद्यरसपाजिला । त्यांतवृश्चिकेंदंशकेला । त्यामाजीभूतसंचारझाला । कै
केयीसतेवींजाहालें ७४ ऐसानानाप्रकारेंबोधकरून । कैकेयीचेंमनघेतलेंहिरून । जैसाग्रहासीलागेअन्न । तैसेंझालेंकैकेयीसी ७५ अ
ळंकारकाढिलेझडकरी । तोडूनिटांकिलीगळसरी । केशमुक्तउर्वीवरी । निद्राकरीसक्रोधें ७६ तंवतेभोगसमयाचीवेळ । कैकेयीगृहाआलाभूपा
ळ । राजाकुब्जेसीपुसेउतावीळ । राणीआमुचीकोठेंपां ७७ तंवतेबोलेपापखाणी । पैलतेपडलीसेतुमचीराणी । कायआहेतियेचेमनीं । तेंनक
ळेमजलागीं ७८ मगकैकेयीजवळयेऊन । करेंकुरवाळीतिचेंवदन । दिधलेंदशरथासीलोटून । झिडकाऊनएकीकडे ७९ ह्मणेपरताहोई
नृपानष्टा । असत्यवादियाक्रियाभ्रष्टा । तुझेअंतरींचाभावखोटा । सर्वहीम्यांवोळखिला ८० राज्यींस्थापूनिरघुनाथ । वनवासासीपाठवावे
शत्रुघ्नभरत । ऐशागोष्टीतुझियामनांत । कपटविद्याकरूनी ८१ जैसारामआणिसौमित्र । तैसेचिशत्रुघ्नभरततुझेपुत्र । सर्वांवरीकृपाठेवावीपवित्र ।
हींगोष्टमनींनआणिसी ८२ ऐसेशब्दऐकतांतीव्र । धगधगिलेंरायाचेंअंतर । चरणतिचेधरीसत्वर । येरीलोटीपरतेंची ८३ राजाह्मणेसंभ्र
महोत । राज्यींस्थापितोंरघुनाथ । तूंविघ्नकरिसीयेथ । शरणांगतमीतुझा ८४ वस्त्रेंभूषणेंअळंकार । अपेक्षितदेईनसमग्र । तुझियावचनेंमीनि
र्धार । प्राणवेंचीनआपुला ८५ मीअसतांगळसरी । तोडूनिटाकिलीभूमीवरी । मगतोधांवोनिचरणधरी । लोटीकरींकैकेयी ८६ स्त्रीलोभा

१ निश्चयें, सत्य. २ इंद्र. ३ अल्पसुद्धां. ४ चवदा वर्षें. ५ लक्ष्मण. ६ रानांत. ७ कल्याणकारक. ८ वांती. ९ कुत्रे. १० सुरा, दारु.

चीआवडी । प्राणीनाडलेलक्षकोडी । जन्ममरणाचियावोढी । माजीपडिलेबहुतपैं ८७ स्त्रीलोभपरमदारुण । पूर्वीनागविलेबहुतजन । मूर्तिमंत
भवव्याधीकामिन । भुलविलेसज्ञानजाणते ८८ संसारअनर्थाचेंमूळ । तोस्त्रीसंबंधजाणकेवळ । स्त्रीलोभेंपापेंसकळ । आंगींयेऊनझगटती ८९
असोतोराजादशरथ । स्त्रीलोभेंझालाभ्रांत । कैकेयीसह्मणेमागइच्छित । तेंमीयथार्थपुरवीन ९१ कैकेयीससंकेतदावीमंथरा । सांडूंनकोपूर्वील
निर्धारा । मागोनघेईंदोनीवरा । वनारघुवीरापाठवीं ९१ कैकेयीह्मणेनृपनायका । माझ्यास्वर्गींच्यादोनभाका । नदेसीतरीउणेंदेखा । येईल
वंशातुमच्यापैं ९२ राजाह्मणेमागसत्वर । अपेक्षितदोनीवर । तीह्मणेवनापाठवींरघुवीर । राज्यभरतासीसमर्पीं ९३ जवळअसतांरघुनायक ।
त्याकडेह्मोतीलप्रजासकळिक । यालागींदूरवनासीदेख । आतांचिरामासपाठवावें ९४ मनुंसंख्यासंवत्सर । राज्यकरीलमाझापुत्र । मग
तुह्मीआणावारघुवीर । अथवातिकडेचिठेविजे ९५ ऐसेंऐकतांचिवचन । गजबजिलेंरायाचेंमन । वाटेविद्युल्लतायेऊन । आंगावरीपडियेली ९६
कींशरीरअग्नींतपडलें । कींकाळिजींकर्वतघातलें । कींविशाळपर्वतकोसळले । आंगावरीअकस्मात ९७ कैकेयीवचनप्रळयाग्न । जाळीतचालि
लाआंयुष्यकानन । मगतिचेधांवोनिधरिलेचरण । पदरपसरूनमागतसे ९८ जेजेमागसीपदार्थ । तेतेपुरवीनसमस्त । परिसुकुमारमाझारघुना
थ । वनाप्रतिधाडूंनको १९९ लावण्यामृतसागर । उदारधीरगुणगंभीर । कोमळगात्ररघुवीर । वनाप्रतिधाडूंनको २०० कायरघुनाथानें
अन्यायकेला । डोळसतमाळनीळसांवळा । एवढात्यावरीकोपधरिला । बनाप्रतिपाठवूंनको १ मीपृथ्वीपतीदशरथ । परितुझाअसेंशरणांग
त । सुकुमारमाझारघुनाथ । वनाप्रतिपाठवूंनको २ पट्टराणियासमस्त । तुझेसेवेसीलावीनयथार्थ । परीसुकुमारमाझारघुनाथ । पाठवूंनकोवना
प्रती ३ भरतापरीरघुनंदन । तुजप्रियहोतामनांतून । आतांकांकठिणकेलेंमन । मजलागूनसांगतें २०४ कैकेयीपुढेंपसरीपदर । वनापाठवूं
नकोशतंपत्रनेत्र । येरीह्मणेतूंअधमसाचार । माझेंवचननदेसी ५ आपुलेंकार्यसाधावेंह्मणोन । हातजोडोनिबोलसीलीन । हीकापटयविद्या
संपूर्ण । मजकळोंआलीतुझी ६ तुझेपूर्वजसंपूर्ण । भाकेकारणेंवेंचितीप्राण । त्याचियेवंशींजन्मोन । डागलाविलाकुळासी ७ कैकेयीचेशब्द
परमकठिण । रायाचेंहृदयझालेंचूर्ण । भूमीवरीमूर्च्छायेऊन । निचेष्टितपडियेला ८ रात्रीसइतकावर्तलावृत्तांत । तोंप्रातःकाळींआलाप्रधानसु
मंत । रायासिकरूनप्रणिपात । वचनबोलताजाहलासे ९ सर्वसामग्रीजाहलीपूर्ण । वाटपाहातब्रह्मनंदन । अरुणोदयजाहलाचंडकिरण । उ

१ चौदा वर्षें. २ मोठे. ३ आयुष्यरूप अरण्य. ४ सौंदर्याचा समुद्र. ५ दाता. ६ दास. ७ कमलपत्रासारिखे आहेत नेत्र ज्याचे तो रामचंद्र. ८ निश्चयानें. ९ नमस्कार. १० वसिष्ठ ऋषि.

दयकरूंपाहातो २१० तरीतुह्मीयेऊनतेथ । राज्यींस्थापावारघुनाथ । वचननबोलेचदशरथ । चकितसुमंतविलोकी २११ मनींविचारीअजपाळ सुत । हीमातऐकतांरघुनाथ । वनाजाईलयथार्थ । थोरअनर्थवोढवला १२ कैकेयीह्मणेसुमंता । येथवरीआणींरघुनाथा । मीत्यासांगेनअवघी वार्त्ता । जाहलीकथापूर्वीची २१३ रायासीनिद्रालागलीजाण । यालागींनबोलेवचन । तोंइकडेब्रह्मपुत्रेंसंपूर्ण । सामग्रीसिद्धकेलीअसे २१४ सुमंतह्मणेकैकेयीलागून । रायेंभूमीवरकांकेलेंशयन । तोंदशरथस्फुंदस्फुंदोन । रुदनकरूंलागला १५ ह्मणेसुमंताऐकवचन । माझेंजवळीआलेंमरण । येथवरीआणीरघुनंदन । कोणासीवर्तमाननसांगावें १६ सुमंतआज्ञावंदून । निघालातेव्हांम्लानवदन । जैसासूर्यग्रहणींकळाहीन । तैसायेतरामसदंना १७ विचारकरीतसुमंत । रामधामाकडेजात । जैसासंसारतापेंसंतप्त । वेगेंयेतसंतसदना २१८ केवळआत्मप्राप्तीचेंस्थान । तैसेंदिसेरामसदन । चारीमहाद्वारेंवोलांडून । सुमंतगेलातेधवां २१९ दृष्टींपाहावयारघुवीर । क्रमोनगेलास्थूळदेहद्वार । दुसरेंसूक्ष्मसुंदर । तत्वांसहितवोलांडिलें २२० पुढेंक्रमोनियांकारण । वेगेंनिघालाप्रधान । तोंमहाकारणदेदीप्यमान । द्वारचवथेंदेखिलें २२१ चतुर्थद्वारींचीरचना । पाहातांब्रह्मानंदझालामना । तुर्याचौबारावोलांडूनिजाणा । पुढेंसत्वरचालिला २२ तोंमणिमयमंडपप्रभाघन । त्यासनवपायदेदीप्यमान । श्रवणकीर्तनस्मरण । पादसेवनतेंचवथें २३ अर्चनवंदनदास्यसख्य । चढतसेप्रधानदेख । तोंस्वानंदचौकीवरीसीतानायक । प्रधानोत्तमेंविलोकिला २४ मगनवविधाभक्तीआत्मनिवेदन । केलेंसुमंतेंसाष्टांगनमन । तंवतोकमलदलाक्षसुहास्यवदन । कायतेव्हांबोलत । २५ सुमंतातूंमुख्यप्रधान । आह्मांसज्येष्ठबंधूसमान । तुझेंनिर्मळसुगुणपाहून । ब्रह्मानंदमजवाटे २६ मगजोडोनियांदोनीकरँ । उभाराघवासमोर । सांगेदशरथाचानिरोपसत्वर । कैकेयीसदनाबोलाविलें २७ आतांकैकेयीसँदनाश्रीराम । कैसाजाईलपूर्णब्रह्म । तेकथाकौतुकसप्रेम । संतसज्जनऐकोतपां २२८ श्रीरामविजयग्रंथसुंदर । भक्तिज्ञानवैराग्यभांडार । दृष्टांतरत्नेंअपार । माजीसतेजझगमगित २२९ जैसेंअमृतप्राशनकरितां । संतोषबाटेजयाच्याचित्ता । त्याहूनविशेषगोडहेरामकथा । संतसज्जनींसेवावी २३० ब्रह्मानंदाश्रीधरवरा । श्रीमद्भीमातटविहारा । पुराणपुरुषानिर्विकारा । जगद्वंद्याअभंगा ३१ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मीकीनाटकाधार । सदांपरिसोतपंडितचतुर । नवमोध्यायगोडहा २३२ ॥ ॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ओव्या ॥ २३२ ॥ ॥ अध्याय ॥ ९ ॥

१ दशरथ. २ निद्रा. ३ रामाचें गृह ४ साधूच्या घरीं ५ कमल पत्रासारिखे आहेत ज्याचे नेत्र तो रामचंद्र. ६ हात. ७ गृह. ८ जगतांमध्यें पूज्य.

श्रीगणेशायनमः। ।श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः। संतसज्जनांचिमांदीमिळाली। देखोनिवाग्देवीधांविन्नली। शब्दरत्नांचींभरणींभरलीं। वेगें आणिलींभक्तीपेंठे १ पाहूनिग्राहिकांचीआवडी। परीक्षकतैसेंचिरत्नकाढी। कींसुगरणीजैसीवाढी। अपेक्षापाहूनिक्षुधितांची २ गात्रेंपाहूनभूषणें। लेववितीपैंशाहणे। कींदिनमानपाहूनउष्णकिरणें। उदयजैसापाविजे ३ कींपाहूनियांसमयघटिका। उदयहोयजेवीशशांका। कींवर्षाव काळींचेदेखा। मेघजैसेवर्षती ४ कींऋतुकाळींयेतीफळें। कींउत्तमकाळपाहूनिभले। सत्कर्मेंकरितीसकळें। निष्कामबुद्धीकरूनियां ५ कींवेदांचें अंतरपाहूनिदेख। चालतातीशास्त्रांचेतर्क। कींलवणपाहूनिउदक। धांवेजैसेंत्वरेनें ६ तैसेंश्रोत्यांचेंजाणोनिअंतर। रामकथाआरंभिलीसाचार। बोलिलावाल्मीकऋषीश्वर। तेंचिचरित्रपरिसापां ७ शब्दभवांब्धीभरलाअपार। कवितालक्षतारूंथोर। स्फूर्तीवायूच्याबळेंसत्वर। जाहाजचालेल रेनें ८ सद्गुरुकृपाचिबंदर। तेथेंशब्दरत्नेंभरलींअपारें। संतपेंठेसींआणिलींसाचार। ग्राहीकथोरह्मणोनियां ९ तरींसादरतादेऊनिधन। घ्या जीशब्दरत्नेंपरीक्षाकरून। असोपूर्वाध्यायींसुमंतप्रधान। श्रीरामगृहासिपातला १० शोकाकुळितहोउनी। दशरथपडिलाकैकेयीसदनीं। कीं अग्निसंगेंकरूनी। मुक्तंजैसेंआहाळलें ११ ग्रहणकाळींसूर्यचंद्र। दिसतीकळाहीनसाचार। कींपंकेंगर्तंतसुकुमार। हंसजैसारूतला १२ तैसा जाणद्विपंचरथं। पडिलाअसेशोकग्रस्त। सुमंतपाठविलात्वरित। श्रीरामासींआणावया १३ असोसुमंतह्मणेजीश्रीरामा। रायेंबोलाविलेंकैके यीधामा। पुराणपुरुषसर्वात्मा। तत्काळउठोनिचालिला १४ रथींबैसलातेक्षणीं। नवमेघरंगचापपाणी। भक्तकैवारीकैवल्यदानी। वेदपुराणीं वंद्यजो १५ वस्त्रालंकारमंडितपूर्ण। पाहातीसर्वअयोध्याजन। ह्मणतीकोटयानकोटीमीनकेतन। श्रीरामावरूनिओवाळिजे १६ श्रीराममुकुटींचीदिव्यकळा। तेणेंरविमंडळउजळला। त्यातेजांतसूर्यबुचकळला। प्रकाशपडलापृथ्वीवरी १७ मकराकारशोभतीकुंडलें। कींप्रळयाग्नीनें नेत्रउघडिले। कींकल्पांतविजूचेउमाळे। शीतळझालेसर्वही १८ अनंतबालसूर्याच्याकळा। श्रीरामरूपींलोपल्यासकळा। कींब्रह्मानंदरसवोतिला। सगुणलीलाधरूनियां १९ सुवर्णोदकनदीनिर्मळ। मेरुपाठारींवाहेसदांकाळ। तैसाकेंशरदिव्यतिलकभाळ। श्रीरामाच्याशोभतसे २० आंगींदिव्यचंदनचर्चित। अयोध्येमाजीसुवासबहकत। तेणेंघ्राणदेवतानाचत। निजानंदेंकरूनियां २१ गुणींवोंविलींभगणेंसकळें। तैसेचमुक्ताहारशोभतीचांगले। अनंतब्रह्मांडेंएकेचवेळे। एकसरेंडोलती २२ अपारराहिलेभक्तप्रेमळ। ह्मणोनिरुंदावलेंवक्षस्थळ। दिव्यतेजपदकनिर्मळ। प्रभेनें

१ मंडळी. २ दिवसमान. ३ सूर्य. ४ चंद्र. ५ मन ६ शब्दरूपसमुद्र. ७ असंख्य. ८ आदरसत्कार. ९ गृहीं. १० मोतीं ११ चिखल. १२ दशरथ. १३ मोक्ष देणारा.

निराळकोंदलें २३ आजानुबाहुहारघुनंदन । करींविराजतचापबाण । कटींमेखळापीतवसन । चपळेहूनझळकतसे २४ असोऐसारघुनाथ । रथारूढविरिंचितात । छप्पन्नदेशींचेराजेसमस्त । देखोनियांआनंदले २५ पुढेंचालतचतुरंगदळ । धडकतवाद्यांचाकल्लोळ । श्रीरामपाहावया सकळ । उतावेळजनजाहले २६ पाहतांश्रीरामाचेंमुखकमळ । राजेआनंदलेसकळ । ह्मणतीजन्मजाहलेंसफळ । तमालनीळदेखिला २७ धन्य धन्यतोदशरथ । जयाच्याउदरींअवतरलारघुनाथ । यासीराज्यपदयथार्थ । देतीलआतांसंभ्रमें २८ तोसोहळापाहूनिनयना । जाऊंआपुल्या स्वस्थाना । असोऐसामिरवतरामराणा । कैकेयीसदनासमीपआला २९ जवळीआलाऐकोनिरघुनाथ । स्फुंदस्फुंदोनिरडेदशरथ । लोकांवा हेरटांकूनजात । श्रीरामदशरथाजवळीपैं ३० लक्ष्मणआणिसुमंत । यांसहितप्रवेशेरघुनाथ । तोंमूर्च्छितपडिलादशरथ । नयनींवाहतअश्रुधारा । ३१ रामेंदशरथासीकेलेंनमन । वंदिलेंकैकेयीचेचरण । येरीह्मणेविजयीपूर्ण । सर्वदांहीहोसीतूं ३२ श्रीरामपुसेकैकेयीसी । कायव्यथारायाचे मानसीं । कांशयनकेलेंभूमीसी । मजप्रतिसांगिजे ३३ कैकेयीसांगेसमाचार । रायेंमजदिधलेदोनवर । तेमीमागतांसाचार । दुःखथोरवाटलें ३४ मगबोलेरघुनंदन । तेमीभाकंपुरवीन । येरीह्मणेतूंवनासिकरींगमन । चतुर्दशवर्षेंपर्यंत ३५ सांगातेंनेईंसुमित्रासुत । राज्यकरिलमाझा भरत । तूंवनींहोसीलयशवंत । सीताकांतअवश्यह्मणे ३६ मातेचीआज्ञासर्वथा । नमोडावीप्रमाणशास्त्रार्था । संन्यासजरीघेतलातरीमाता । वंदावीहेंसाचार ३७ प्राणाहूनपलीकडे । माझाभरतमजआवडे । त्यासराज्यदेतांमजसांकडें । सर्वथाहीवाटेना ३८ भूधरअवतरलालक्ष्मण । परमक्रोधावलाजाण । भ्रुकुटियेआंठीघालोन । नेत्रयुगुळवटारिलें ३९ जैसाविवेकबळेंकरून । क्रोधआवरितीसाधकजन । तैसाचिउगारा हिलालक्ष्मण । भीडधरूनरायाची ४० असोकैकेयीसनमूनरामराणा । आलाकौसल्येच्यासदनां । परमानंदपावलामना । तपोवनाजावया ४१ दैत्यवधावयाजातांस्वानंद । गजवदनआणिवीरस्कंद । नमिलेंअन्नपूर्णेचेंचरणारविंद । ब्रह्मानंदेंकरूनियां ४२ कींजातांअमृतहरण । सुपर्णें वंदिलेजननीचरण । त्याचपरीरघुनंदन । कौसल्येसिनमीतसे ४३ सांगीतलेंसकळवर्त्तमान । धगधगिलेंकौसल्येचेंमन । भूमीसपडलीमूर्च्छायेऊन । वाटेप्राणचालिला ४४ किंवाहृदयींशस्त्रखोंचलें । कींलोभियाचेंधनहारवलें । तैसेंकौसल्येसिवाटलें । आज्ञामागतांश्रीरामें ४५ मग ह्मणेघनःश्यामगात्रा । रामामाझ्याराजीवनेत्रा । मजसांडोनिपवित्रा । कैसावनाजासील ४६ माझेपुष्पवाटिकेआंत । राहेचतुर्दशवर्षेंपर्यंत ।

१ आधि, मानसीव्यथा. २ निश्चय. ३ वचन. ४ चौदा. ५ लक्ष्मण. ६ संकट. ७ शेष. ८ दोन नेत्र. ९ घरीं. १० गणपति. ११ कार्तिकस्वामी. १२ गरुड. १३ विनता.

कोणासीतूंनभेटेंयथार्थ । राहेंगुप्तराघवा ४७ श्रीरामह्मणेमाते । तैसेंनव्हेजाणेंवनातें । सत्यकरावयापितृवचनातें । दंडकारण्याजाईनमी । ४८ पश्चिमेसउगवेलचंडेकिरण । परिनमोडींपितृवचन । होईनभाकेसीउत्तीर्ण । नसेअनुमानसर्वथा ४९ जन्मोनियांजनकपोटीं । साचन करवेत्याचीगोष्टी । तरीअपकीर्त्तीनेंसृष्टी । भरोनियांउचंबळे ५० साचनकरवेपितृवचन । व्यर्थकायजन्मासयेऊन । विगतधवेचेंसुंदरपण । किंवाज्ञानदांभिकाचें ५१ कींवोडंबरीचेंशूरत्वजाण । कींअजाकंठींचेजैसेस्तन । कींनटामाजीलकामिन । कींकंटकवनसघनपैं ५२ कींजन्मां धाचेविशाळनेत्र । कींमद्यपियाचेंअपवित्रपात्र । कींअदात्याचेंउंचमंदिर । व्यर्थकायजाळावें ५३ यालागींपुत्रतोचिधन्य । जोसाचकरीपितृवच न । तरीमजवनाजावयालागुन । आज्ञादेईंअंबेतूं ५४ ह्मणोनिश्रीरामेंधरिलेचरण । उभाराहिलाकरजोडून । धवधवांवक्षस्थळबडवून । कौ सल्येनेंघेतलें ५५ नगरींतेव्हांफुटलीमात । कींवनाजातोश्रीरघुनाथ । वर्त्तलाएकचिआकांत । पडिलेमूर्च्छितलोकतेव्हां ५६ कौसल्याह्मणेर घुनंदना । सुकुमाराजगन्मोहना । माझीमोडोनियांआज्ञा । कैसावनाजातोसी ५७ श्रीरामासिह्मणेलक्ष्मण । मजआज्ञादेईंअणुप्रमाण । कैके यीचेंशिरच्छेदून । संतोषवीनसकळांसी ५८ रघुपतीतूंवनाजातांयथार्थ । प्राणत्यजीलदशरथ । राज्यबुडेलसमस्त । अयोध्यावोसहोईल ५९ परमप्रेमळबंधूभरत । राज्यनकरीयथार्थ । इचावधकरितांसत्य । तोहीसुखपावेल ६० सकळअनर्थाचेंकारण । कैकेयीअसत्याचेंभाजन । इ जलाटांकितांवधून । सकळजनआनंदती ६१ जैसीसमूळटांकितांदुर्वासना । साधकपावतीआत्मैसदना । कींरजेंनीसरतांसकळजना । सूर्योद यींआनंद ६२ मगबोलेश्रीराम । प्राणांतझालियाविपरीतकर्म । सहसानकरावेंहेंवर्म । हृदयींधरीलक्ष्मणा ६३ कौसल्यासुमित्राजैशामाता । तैसीचकैकेयीजाणतत्वतां । तियेचावधकरितां । मगयशकैंचेंआह्मांतें ६४ लक्ष्मणह्मणेश्रीरामातें । तरीमजन्यावेंसांगातें । नाहींतरीप्राणत्यागी नयेथें । मगतूंवनासुखेंजाय ६५ तोंसुमित्राह्मणेरघुनंदना । माझालक्ष्मणनेईंवना । सेवीलतुझियानिजचरणा । प्रेमभावेंकरूनियां ६६ रामा तुजवेगळाएकक्षण । सर्वथानोहेलक्ष्मण । वनींफळजीवनआणून । शय्येसीतृणनिजावया ६७ तुझीसेवाकरीललक्ष्मणस्वकरें । तेणेंआनंदमजथो र । ऐसेंबोलतांसुमित्रेचेनेत्र । प्रेमोदकेंभरूनआले ६८ मगउन्मिळेचेंसमाधान । करूनियांलक्ष्मण । सिद्धझालाप्रयाण । वनाप्रतिकरावया ६९ कौसल्याह्मणेरघुनंदना । बारेमजटांकूनिजासीवना । कांटेपाषाणतुझियाचरणा । चालतांरजखुपतील ७० जडितांबरेंसर्वसांडोनी । कैसाराहा

१ सूर्य. २ पित्राज्ञा. ३ खरी. ४ विधवा. ५ बकरीचे. ६ स्त्री. ७ मोठे. ८ अयोध्या. ९ कोसलराजाची कन्या ह्मणून कौसल्या हें नाम. १० पात्र. ११ सायुज्यमुक्तीस. १२ रात्र.

शीलवल्कलेंवेष्टुनी । भ्रमरपर्यंकत्यजोनी । भूमींशयनकेंविकरिसी ७१ त्यजूनिरत्नजडितकोटिरें । कैसाराखसीजटाभार । रामातुझीतनुसुकुमार । वातउष्णेंश्रमेलकीं ७२ सुगंधपरिमळत्यजूनिपरम । कैसेंअंगींचर्चिसीभस्म । वनींराक्षसदुर्धरपरम । छळावयातुजयेतील ७३ वनींसां पढसीतूंजगजेठी । मगतुझीकोणराखीलपाठी । शोकेंकौसल्याहृदयपिटी । ह्मणेकायकरूंआतां ७४ मगऔषधीमोहरेअनेकआणुनी । रामाचेदंडींबांधीजननी । रामासिपाणीलागेलवनीं । औषधीमणीकरींबांधी ७५ वनींदृष्टावेलरघुनाथ । ह्मणोनिमोहरेकरींबांधित । कांहींएकपीडानहोय यथार्थ । ऐशावस्तूदेतमाता ७६ तेआदिपुरुषाचीजननी । वनासिनिघतांचापपाणी । पंचभूतांसिकरजोडोनी । प्रार्थनाकरीभावार्थें ७७ धरणीसकौसल्याविनविता । मातेतुझाश्रीरामजामात । यासींरक्षींयथार्थ । निजस्नेहेंकरूनियां ७८ ज्यापंथेंजाईलकमळपत्राक्ष । त्याचपंथेंअसोतसुफळवृक्ष । नानासंकटींविरूपाक्ष । रक्षोयासीसर्वदां ७९ रातोत्पलकमलेंपूर्ण । त्याहूनिसुकुमाररामचरण । त्याचियाचरणींखडेपाषाण । रुतोंनेदीअवनीये ८० उदकासिकौसल्याह्मणत । रघुवीरहोईलतृषाक्रांत । नदीसरोवरेंसमस्त । पूर्णोदकेंठेवींकां ८१ ह्मणेविश्वप्रकाशकाचंडकिरणा । तूंरक्षींआपुलेकुलभूषणा । तुझींकिरणेंमनमोहना । स्पर्शोंनेदीसर्वथा ८२ लोकप्राणेशप्रभंजना । लघुमाझियारघुनंदना । तुझियागुणेंधुळीनयना । माजीनजावीसर्वथा ८३ उष्णेंशिणतांरघुनाथ । तूंमंदमंदयेईंमारुत । जेणेंसुखावेअवनिजाकांत । करींऐसेंप्राणेशा ८४ अंबरातूंनिर्विकारपाहीं । शब्दविषयतुझेठायीं । मंजूळशब्दतुझेहृदयीं । अंडजंकरोतसर्वदां ८५ ब्रह्माशिवइंदिरावर । अष्टदिक्पाळएकादशरुद्र । नवग्रहअष्टवसूद्वादशमित्र । माझारघुवीररक्षावा ८६ यक्षगणगंधर्वकिन्नर । सिद्धचारणऋषीश्वर । मरुद्गणपितृगणसाचार । माझारघुवीररक्षावा । ८७ देवउपदेवकर्मजदेव । पाताळभोगीसर्वमानव । जळचरजलार्णव । माझारघुवीररक्षावा ८८ चराचरप्राणीजेवहिले । चहूंखाणीमाजीजन्मले । वेदशास्त्रेंपुराणेंसकळें । ब्रह्मसांवळेंरक्षाहें ८९ करजोडोनिकौसल्यासती । चराचरनीवांसीप्रार्थिती । परिहाआदिपुरुषरघुपती । नेणवेचितयेतें ९० जोदानवकुळवैश्वानरं । साधुहृत्पद्मभ्रमर । अज्ञानतमछेदकदिवाकर । नेणेंसाचारकौसल्या ९१ जोअरिचक्रवारणपंचानन । कींदुःखपर्वतभंजनसहस्त्रनयन । कींविघ्नफणिपाळविदारून । त्याबरीसुपर्णरघुवीर ९२ तोसज्जनचकोरामृतकर । भक्तचातकसजळजलधर । कींसाधुनयनाब्जमित्र । तोहासाचारअवतरला ९३ असोयाउपरीकौसल्याह्मणत । चतुर्दशवर्षेंपर्यंत । व्यर्थदेहहाप्रेतवत । कैसापाळूंमीआतां ९४ केसेंपूर्व

१ मुकुट २ अवनिजा ह्मणजे सीता तिचा पति रामचंद्र. ३ पक्षी. ४ अग्नि. ५ सूर्य. ६ शत्रुसमूहरूप हत्ती त्यास मारणारा सिंह. ७ मेघ.

कर्मगहन । फळाआलेंमुळीहून । अमळदळराजीवनयन । वनासजातोयेवेळे ९५ तूंवनाजातोसिरघुनंदना । स्तनींदाटलाप्रेमपान्हा । मा
झ्याविसावियामनमोहना । गुणनिधानाजाऊंनको ९६ श्रीरामाभुवनसुंदरा । डोळसासुकुमाराराजीवनेत्रा । मुनिजनरंजनागुणसमुद्रा ।
जाऊंनकोवनातें ९७ हृदयींनसतांरघुनंदन । संपत्तीत्याविपत्तीजाण । कळात्याविकळासंपूर्ण । विद्याहोतअविद्या ९८ श्रीरामाविणकारि
तीकर्म । तोचतयांसपडलाभ्रम । सच्चिदानंदमेघःश्याम । मजटाकूनिजातोकीं ९९ तंवदेववाणीगर्जिन्नलीपाहीं । सर्वांठायींरामविजयी । क
ल्पांतींतयासींभयनाहीं । हाशेषशायीअवतरला १०० जैसाजीवजातांवैद्ययेऊन । म्हणेमीतुजवांचवीन । तैसेंमायेसवाटलेंपूर्ण । आकाशवा
णीऐकतां १ आदिपुरुषनिर्विकार । कौसल्येसघालीनमस्कार । प्रदक्षिणाकरूनिवारंवार । मुखविलोकीजननीचें २ जोमायांतीतअंगोचर । ते
णेंआसुवेंभरलेनेत्र । बिमळांबुधारापवित्र । मुखावरूनउतरल्या ३ मायेनेंधांऊनतयेवेळीं । रामाचेगळांमिठीघातली । तोशोकऐकतांउंर्वीमंड
ळीं । कवींसिबोलोंनवर्णवे ४ म्हणेकमलपत्राक्षारघुनंदना । तुवांकैकेयीचीपाळिलीआज्ञा । मानदीधलापितृवचना । माझीअवज्ञाकांकरिसी ५
मगतोजगद्वंद्यरघुनायक । मातेसिम्हणेनकरींशोक । मीसत्वरपरतोनिदेख । जननीयेतोंतुजपासीं ६ असोसीतेचियामंदिरांत । प्रवेशलाजन
कजांमात । सीताझालीआनंदभरित । मुदओवाळीवरूनियां ७ मनींजगन्माताविचारित । कांएकलेचिआलेश्रीरघुनाथ । संगेंराजचिन्हेंनाहीं
त । चिंताक्रांतजानकी ८ वृत्तांतसांगेरघुनंदन । आम्हींवनाप्रतिकरितोंगमन । तुवांकौसल्येचीसेवाकरून । सुखेंराहेंयेथेंची ९ सुमित्राआ
णिकैकेयी । समानभजेसर्वांठायीं । जनकगृहानजायकदांही । कुरंगनेत्रेजानकीये ११० वनासियेसीतरीबहुत । दंडकारण्यकठिणपंथ । वात
उष्णशीतयथार्थ । नसोसवेतुझेनी ११ तंवतेसुंदरशृंगारमराळी । गुणसरिताजनकबाळी । सुकुमारराजसचंपककळी । कायबोलेतेधवां १२ अ
हाजगद्वंद्याश्रीरामा । निजभक्तकामकल्पद्रुमा । गजास्यजनकाविश्रामा । टाकूनिमजलानवजावें १३ जगज्जनकारघुवीरा । जनकजामाताजग
दोद्धारा । जगरक्षकाजलजनेत्रा । जलजगात्रारघुराजा १४ जलचरेंजलसांडून । वेगळींहोतांत्यजितीलप्राण । द्विजकुळांसिआकाशावांचून । नव्हे
भ्रमणकोठेंही १५ दीपसांडूनिनिश्चिती । प्रभानराहेकल्पांतीं । कनकासिटाकूनिकांती । कदांपरतीनव्हेची १६ शिवावेगळीनोहेअंबिका ।
किरणेंनसोडितीकदांअर्का । साधुहृदयसांडोनिसद्विवेका । कोठेंजाणेंघडेना १७ रत्नावेगळीकळा । गोडीनसोडीगुळा । कस्तूरीनसोडीपरिमळा ।

---

१ नारायण. २ कौसल्येस. ३ मायारहित. ४ अविषय. ५ उदकाच्या धारा. ६ पृथ्वी. ७ जनकाचा जांवई. ८ सीता. ९ हरिणाक्षी. १० हंसीण, ११ नदी.

तेवीमीवेगळीनव्हेची १८ ह्मणोनिरघुपतीकोमलांगा । दयाळाममहृदयाब्जभृंगा । ताटिकांतकानवमेघरंगा । मजटांकूनिनवजावें १९ सिंहस
खाअसतांपाहीं । मगकांतारींहिंडतांभयनाहीं । सीतेचेशब्दऐकोनिहृदयीं । जगदात्मासंतोषला १२० जानकीवचनसुधाकर । तेणेंतोषलेराम
कर्णचकोर । कींवचनमेघगर्जतांगंभीर । मनमयूरनृत्यकरी २१ रघुपतीह्मणेइंदुवदने । श्रीवसिष्ठाचेचरणधरणें । मजवनाप्रतिपाठवणें । हेंचिवि
नवीतयाप्रती २२ तुजनेतांवनाप्रती । नानाशब्देंलोकनिंदिती । यालागींपुसोनिवसिष्ठाप्रती । समागमेंनिघावें २३ मगवसिष्ठाचियेचरणीं ।
नमनकरीजगत्रयजननी । ह्मणेमीराघवाचीसांगातिणी । वनवासीहोईन २४ मगवसिष्ठह्मणेरघुनाथा । संगेंनेईजनकदुहिता । सवेंअसोंद्यावें
सुमित्रासुता । रक्षणार्थतुह्मांतें २५ असोसौमित्रासह्मणेराघवेश । वसिष्ठगृहींआहेममधनुष्य । अक्षयभातेनिःशेष । वरदशस्त्रेंआणावीं २६
आपुलेंसंग्रहधनरघुवीर । याचकांवांटीउदार । गुरुगृहासद्रव्यअपार । वस्त्रेंभूषणेंधाडिलीं २७ आणिनानावस्तुसंपत्ती । पाठविल्यागुरुगृहाप्र
ती । सद्गुरूसिजेनभजती । अभागीनिश्चितीतेचिपैं २८ तनमनधनेंसींशरण । श्रीगुरूसिजोनभजेआपण । तोझालाजरीशास्त्रप्रवीण । नकरि
तांगुरुभजनतरेना २९ व्यर्थगेलेंतयाचेंतप । जळोजळोतयाचाजप । व्यर्थकायकोरडाप्रताप । गुरुवचननावडेजया १३० सद्गुरूचेघरींआपदा।
आपणभोगीसर्वसंपदा । त्याअपवित्राचेंमुखकदां । दृष्टीनपाहावेंकल्पांतीं ३१ तरीतैसानव्हेरघुवीर । गुरुगृहाप्रतिअपार । द्रव्यवस्त्रेंअलंकार।
पाठविलींतेधवां ३२ गुरुपुत्रपरमसूज्ञ । आदरेंआणिलाबोलाऊन । आपुलींवस्त्रेंभूषणेंकाढून । तयासंपूर्णलेवविलीं ३३ सीतेनेंवस्त्रेंभूषणेंअपा
र । सुयज्ञेसिदिधलींसत्वर । रथदेऊनियांगुरुपुत्र । निजगृहासपाठविला ३४ सकळऋषींच्यागृहाप्रती । द्रव्यपाठवीरघुपती । चौदावर्षेंनिश्चि
ती । पुरेनउरेअपार ३५ विश्वामित्रअसितकण्व । दुर्वासाभृगुवामदेव । अंगिरादिद्विजसर्व । द्रव्यराघवपाठवीत्यांतें ३६ कौसल्यासुमित्रामा
ताजाणा । द्रव्यपाठवीतयांच्यासदना । रामेंआपुलेसेवकजना । द्रव्यअपारदीधलें ३७ दरिद्रीदीनकुटुंबवत्सल । अशक्तपंगुकेवळ । तयांसिद्र
व्यतमाळनीळ । आणूनिदेताजाहला ३८ इष्टअत्यंतगौरवून । सर्वांसह्मणेरघुनंदन । स्नेहनसांडावामजवरून । सुखेंकरूननांदाहो ३९ म
गकैकेयीच्यागृहास । येताझालाजगन्निवास । तेवेळेअयोध्येच्यालोकांस । कल्पांतचिवाटला १४० अयोध्येच्यानरनारी । अश्रुवाहतीतयांचेने
त्रीं । गौब्राह्मणांचाकैवारी । वनाजातोह्मणोनी ४१ इकडेकैकेयीच्यासदनांत । रामेंनमिलादशरथ । प्रदक्षिणाकरूनिविलोकित । वदनारविंदपित

---

१ हृदयकमलांतील भ्रमर. २ चंद्र ३ कर्णरूप चकोरपक्षी. ४ मनरूप. मोर. ५ चंद्रमुखी. ६ जनकाची कन्या. ७ गुरुपुत्राची स्त्री. ८ आपल्या. ९ ब्राह्मण. १० घरीं. ११ असंख्य.

याचें १४२ दशरथह्मणेरघुनंदना । राजीवनयनाजातोसिवना । मीनठेवींआपुल्याप्राणा । कुळभूषणारघुवीरा १४३ राजाह्मणेश्रीरामातें । दळभारनेईंसांगातें । वनामाजीसुखेंवर्तें । चौदावर्षेंपर्यंत १४४ तोंरामचंद्रबोलेवचन । मीतपालागींसेवितोंकानन । तेथेंदळभाराचेंकारण । सर्वथाह्मीनसेची ४५ वल्कलेंवेष्टूनिवनांत । तपकरीनयथार्थ । ऐसीकैकेयीनेंऐकोनिमात । वल्कलेंपुढेंठेविलीं ४६ तींवेष्टोनिश्रीराम । श्यामलां गींलाविलेंभस्म । केशभारसुवासपरम । आकर्षोनीबांधिले ४७ सौमित्रेंवल्कलेंवेष्टून । वंदिलेदशरथाचेचरण । तोंकैकेयीह्मणेसीतेंझडकरून । वस्त्रेंभूषणेंफेडींकां ४८ ऐसेंऐकतांजनकबाळी । तेंडिदंबरभूषणेंत्यागिलीं । तींसर्वकैकेयीनेंआवरिलीं । वल्कलेंदिधलींनेसावया ४९ तंववल्कलें कडकडीतकठिण । नेसतांनयेसीतेलागून । मगआपुलेंकरेंरघुनंदन । नेसवीतजानकीतें १५० जानकीसुकुमारअत्यंत । वल्कलेंनेसतांआंगास रुपत । तेंदेखोनिब्रह्मसुत । निर्भर्त्सितकैकेयीतें ५१ परमनिर्दयतूंपापिणी । घेसीसीतेचींवस्त्रेंहिरूनी । तूंजाहलीसराज्यबुडवणी । रामासि वनींधाडिसी ५२ दशरथह्मणेतेअवसरीं । गृहांतूनिनिघजाबाहेरी । तीनकाठ्यामांडोनिबाजारीं । द्वाडेबैसेंआतांची ५३ माझींबाळेंसुकुमार । निर्दयेघालिसीबाहेर । मीभाकेंबांधिलोंसाचार । नाहींतरीशिरच्छेदितों ५४ आडांतपडलामृगेंद्र । कींसांपळयांतगोंविलाव्याघ्र । कींवणव्यांत सांपडलाफणिवर । तैसासांचारगुंतलोंमी ५५ कींगळींसांपडलामीनँ । कींपारधीयेंकोंडिलेंहरण । कींतस्करेंवाटेसिसज्जन । गोवोनिहरिलेंसर्व स्वें ५६ ऐसेंबोलतांनृपवर । ह्रदयींदाटलागहिवर । पोटासिधरूनसीतासुंदर । ह्मणेमायेशीणलीस ५७ सुकुमारतूंचंपककळी । वातउष्णेंशि णशीलवेल्हाळी । गुर्णसरितेजनकबाळी । सांगसीशीणकोणातें ५८ सुमंतासांगेराजेंद्र । आणादिव्यअलंकार । सीतेसिदेऊनिसत्वर । जगं न्मातागौरवीं ५९ त्यावरीतेमंगळेंभगिनी । मस्तकठेवीश्वशुरचरणीं । वसिष्ठनमिलास्नेहेंकरूनी । ह्मणेकृपाबहुतअसोंद्या १६० जैसाद्वितीयेचा चंद्र । दिवसेंदिवसह्योयथोर । तैसास्वामीस्नेहादर । अपारबर्धमानहोऊंदे १६१ वसिष्ठदेतआशीर्वचन । जोंवरीमृगांकचंडेंकिरण । तोंवरीचिरं जीवदोघेंजण । अक्षयीराज्यकरावें १६२ असोबसिष्ठआणिदशरथ । रामलक्ष्मणनिघतांत्वरित । सव्यघालूनिहातजोडित । कौंननामाजीजा वया ६३ मुनिह्मणेतूंपूर्णसती । त्रिभुवनींवाढेलतुझीकीर्ती । विजयीहोईलरघुपती । वनांतरींजाऊनियां ६४ सप्तशतराजयुवती । तयांसाष्टांग नमींरघुपती । मातेंवाढवावीप्रीती । श्रीकौसल्येसमानसर्वदां ६५ तोंएकचिहाकझालीतेवेळे । सर्वमातापिटितीवक्षस्थळें । एकमृत्तिकाघेऊनि

१ भरजरीचीं वस्त्रें. २ हातानीं. ३ वसिष्ठ ऋषि. ४ सिंह. ५ सर्प. ६ निश्चयानें. ७ मासा. ८ गुण हीच कोणी एक नदी. ९ आदिशक्ति. १० सीता. ११ चंद्र. १२ सूर्य. १३ अरण्यामध्यें.

बळें । मुखामाजीघालिती ६६ एकभूमीसिआपटतीशिरें । एककेशतोडितीनिजकरें । एकहाकफोडितीएकसरें । रामाराहारेह्मणोनियां ६७ द
शरथह्मणेचापपाणी । ग्रामांतूननजावेंचरणी । जान्हवीपर्यंतषड्गुणीं । माझारथनेईंकां ६८ अवश्यह्मणेरघुनाथ । तत्काळआणविलारथ । क
रजोडूनिसुमंत । पुढेंउभाठाकला ६९ दशरथाचेचरणींभाळ । ठेऊनियांतमालनीळ । निघालातेव्हांतत्काळ । झालाकोल्हाळएकची ७० सी
तारथाधरीघालून । निघतीवेगेंरामलक्ष्मण । तेव्हांवक्षस्थळबडवून । दशरथरायेंघेतलें ७१ उठोनिरावदशरथ । द्वाराबाहेरीधांवत । लोकांसिह्म
णेरघुनाथ । राहावाआतांलवकरी ७२ कोठेंगेलेंमाझेंपाडस । कोणीकडेगेलामाझाराजहंस । भेटावयाआणाडोळस । मीवनासजाऊंनेदीं ७३
मीआपुलीघालीनआण । रथापुढेंआडवायेऊन । राघवापुढेंपदरपसरून । वनासिगमनकरूंनेदीं ७४ गोपुरावरीचढेदशरथ । चांचरीजायखालेंप
डत । मागुतीबिदोबिदींधांवत । दीनवदनेंकरूनियां ७५ लोकांसिपुसेदशरथ । रामकोठेंदावात्वरित । वाटेसिअडखळूनपडत । मस्तकपिटी
अवनीये ७६ लोकांसिह्मणेम्लानवदन । अयोध्येसीलावारेअग्न । माझाजाईलआतांप्राण । दावावदनरामाचें ७७ प्राणाविणेंजैसेंप्रेत । तै
सेंअयोध्यापुरदिसत । तरीअग्नीलावूनित्वरित । मजसहितभस्मकरा ७८ दाहीदिशादिसतीउदास । अयोध्यानगरझालेंवोस । राघवगेलावन
वासास । मुखलोकांसकायदाऊं ७९ झालेंमाझेंकाळेंवदन । आतांमाझाजडदेहत्यागीन । वायुवेगेंजाईन । काननींरामशोधावया १८० लोकां
सिह्मणेतेवेळां । मजराघवदाखवासांवळा । स्त्रियाह्मणतीवनागेला । आज्ञाघेऊनितुमचीपैं ८१ एकवदेबेशींतआहेरथ । ऐकतांधांवेदशरथ । तों
दूरगेलाजनकजामात । ध्वजहीपरतूनदिसेना ८२ तोंआरडतकौसल्याधांवे । वरतीकरूनियांबाहे । ह्मणेकोमलांगाउभाराहे । वदनतुझेंपाहूंदे
८३ कैकेयीभाष्यअमावास्याथोर । माजीनदिसेरामचंद्र । त्यावियोगेंआह्मींचकोर । चिंताग्नींतपडिलोंकीं ८४ कींकैकेयीवरकेतूजाण । रा
मझांकिलाचंडकिरण । चतुर्दशवर्षीमुक्तस्नान । तोंवरीउपोषणपडियेलें ८५ राममाझामेघपूर्ण । कैकेयीवरदुष्टप्रभंजन । दूरनेलाझडपोन ।
जीवनावीणसुकलोंआह्मीं ८६ मजअंधाचीकाठींहिरून । कोणेंवनींटाकिलीनेऊन । मजदरिद्रियाचीगांठपूर्ण । कोणेंनिर्दयेंसोडिली ८७
माझेंदवडिलेंनिधान । चिंतामणीदिधलाभिरकावून । माझापरिसनेऊन । कोण्यानिर्दयेंभिरकाविला १८८ मजपान्हांदाटलास्तनीं । माझेंतान्हें
दावाहोनयनीं । माझासुकुमारघोरवनीं । भोजनमागेलकोणातें १८९ गेलावल्कलेंवेष्टून । कैंचेंतयामंगलस्नान । रातोत्पलाहूनकोमलचरण
कंटकपाषाणखुपतील १९० आंधळेंजातांवनांतरीं । सांगातीटांकूनिगेलादुरी । तेंतळमळूनशोककरी । माझीपरीतेविझाली १९१ कींतान्हें

टाकूमपरदेशीं । माताजायसहगमनासी । तेंतळमळीजेविपरदेशीं । झालेंतैसेंरामाविण १९२ वनींनिघतांरविकुळमंडण । दुःखेंउलथतीकठी
णपापाण । गजतुरंगपशुपक्षीसंपूर्ण । तृणजीवननघेती १९३ वनाजातांजनकजामात । वनींपक्षीरुदनकरीत । अयोध्येच्याप्रजासमस्त ।
पाठींधांवतीरामाचे १९४ श्रीरामाचेआवडतेब्राह्मण । भक्तमित्रसेवकजन । चर्मकअनामिकआदिकरून । कुटुंबेंघेऊनचालिले १९५ ओसप
डलेंअयोध्यापूर । आबालवृद्धधांवतीसमग्र । ह्मणतीसेऊंकांतार । श्रीरामचंद्रासांगातें १९६ कैकेयीचांडाळीणखरी । सीतेचींवस्त्रेंभूषणेहरी ।
तिजखालींदुराचारी । कोणयेथेंनांदेल १९७ दशरथआतांदेईलप्राण । ओसपडेलअयोध्यापट्टण । कैकेयीचेंशिरवपनकरून । छत्रधरोत
कोणीही १९८ एकह्मणतीहादशरथ । दग्धझालायाचापुरुषार्थ । कैकेयीसवधूनरघुनाथ । कांहोराज्यींस्थापीना १९९ स्त्रीलोभेंझालादीन ।
वनासिपाठविलाश्रीरामनिधान । एकह्मणतीवनासिगमन । करावेंहानिर्धार २०० दूरटांकिलेंअयोध्यापूर । धांवतीनगरजनांचेसंभार । मागां
पाहेरघुवीर । तोंलोकसत्वरधांवती १ तात्काळउभाकेलारथ । सकळजनासिहातजोडित । ह्मणेशिरींआहेराजादशरथ । निजगृहींस्वस्थराहा
वें २ आह्मींसेवितोंघोरकानन । तुह्मांसितेथेंनघडेआगमन । आह्मींयेतोंसत्वरपरतोन । चतुर्दशवर्षेंहोतांची ३ ऐसेंश्रीरामेंविनविलें । लोक
भिडेनेंअवघेपरतले । रुदनकरीतअयोध्येसआले । शोकेंझालेनिस्तेज ४ तरीश्रीरामभक्तब्राह्मण । अग्निहोत्रीपंडितसज्ञान । त्यांवरीप्रळयचि
वर्तलापूर्ण । प्रियप्राणराघवाचेजे ५ तेसवर्थानसोडीतीरामातें । ह्मणतीआह्मीयेऊंकाननातें । बहुतप्रार्थिलेंरघुनाथें । परीकदानराहती ६
रथाखालींउतरून । धरीब्राह्मणांचेचरण । तेह्मणतीगेलियाप्राण । तुजनसोडूंराघवा ७ रघुनाथासिह्मणेसुमित्रासुत । ब्राह्मणश्रमपावलेसमस्त
आजयांसाठींराहावेंयेथ । अहिल्योद्धाराराघवा ८ असोवासरमणीगेलाअस्ता । अयोध्येंतकायझालीअवस्था । स्त्रियानींधरूनदशरथा । कैकेयी
सदनाप्रतिगेल्या ९ कौसल्यासुमित्राआदिकरून । बैसतीदशरथासवेष्टून । सदनेंसमस्तदीपेंविण । भणभणीतदिसतीपैं २१० बाहेरजातां
रघुनाथ । अवदसाप्रवेशलीनगरांत । जैसाविवेकजातांयथार्थ । अज्ञानहृदयींप्रवेशे ११ राण्याआणिदशरथ । प्राणद्यावयाहोऊनिउदित । महा
विषआणिलेंत्वरित । जेंस्पर्शतांघातकरीप्राणाचा १२ तंवतोवसिष्ठश्रीगुरुनाथ । ह्मणेसहसानकीजेआत्मघात । मगवाल्मीकाचामूळकाव्यार्थ । सम
स्तांसीसांगीतला १३ सहपरिवारेंदशग्रीव । वधोनबंदीचेसोडवीलदेव । चतुर्दशवर्षानींराघव । गजरेंयेईलस्वधामा १४ जरीमीअसत्यबोलेन ।
तरीश्रीरघुनाथाचीआण । गुरुवचनमानूनिप्रमाण । विषपानवर्जियेलें १५ इकडेवनींराहिलाजगदोद्धार । तोपद्मोद्भवजनकउदार । स्मरारिमित्ररघु

 

वीर । सकळविप्रवेष्टित १६ रात्रझालीतीनप्रहर । रथवेष्टितनिजलेद्विजवर । जैसाउडुगणवेष्टितरोहिणीवर । कींकिरणचक्रींचंडांश १७ निद्रा
र्णवींनिमग्नब्राह्मण । ऐसेंजाणोनिसीतारमण । सौमित्रासीह्मणेरथवेगेंकरून । येथोनियांकाढींकां १८ कायातेंसिअसोन । केव्हांजायनकळेप्रा
ण । तैसारथारूढरघुनंदन । नलागतांक्षणपैंगेला १९ अयोध्येकडेदावोनमाग । मगरथमुरडिलासवेग । जैसाअमृतहरणींस्वर्ग । खगनायकआ
क्रमी २२० असोआकाशमार्गीरथ । शृंगवेरेपासींउतरत । मानससरोवरींअकस्मात । राजहंसबैसलेतैसे २१ तेथेंगुहकाचाआश्रमनिर्मळ ।
पुढेंवाहेजान्हवीजळ । देखोनियांप्रातःकाळ । घननीळस्नानकरी २२ पाहूनियांभागीरथी । ह्मणेसूर्यवंशींभगीरथनृपती । तेणेंप्रार्थूनिनानारितीं ।
जगदोद्धाराआणिली २३ कींशिवमुकुटींचीशुभ्रमाळा । प्रसाददिधलाशीघ्रकाळा । फोडूनब्रह्मकटाहसकळा । परब्रह्मजललोटलें २४ ब्रह्मापुरं
दरउमावर । ऋषिगणगंधर्वफणिवर । देखतांजान्हवीचेंनीर । स्तुतीअपारकरितीते २२५ दृष्टींपाहातांजान्हवीनीर । सहस्रजन्मींचेंपातकसम
ग्र । शुष्कदग्धवनवैश्वानर । अघसर्वजळेतेवी २६ ऐसीतेसगरकुळतारिणी । रामलक्ष्मणस्तवोनी । स्नानकरितीतेक्षणीं । सीतासुमंतसर्वही
२७ नित्यकर्मसारूनिसकळी । न्यग्रोधवृक्षाचियेतळीं । श्रीरामबैसेतेवेळीं । तृणशेजघालूनियां २८ वटदुग्धघालूनितेयेवळीं । रघुवीरमस्तकीं
जटावळी । भस्मचर्चितचंद्रमौळी । तैसातेकाळींरामदिसे २९ असोइकडेब्राह्मणसमस्त । जागेहोऊनिजंवपाहात । तोंरथासहितरघुनाथ । गे
लानिश्चितसमजलें २३० परमखेदकरितीब्राह्मण । निद्रानव्हेहाअनर्थपूर्ण । हातींचागेलारघुनंदन । आनंदघनजगद्गुरू ३१ अज्ञानपांघ
रूणपडलिया । मगआत्मारामनयेप्रत्यया । नदिसेजवळअसोनियां । दुर्घटमायापडलीहे ३२ एकह्मणतीरामकरुणाघन । दशरथरावसोडीलप्रा
ण । ह्मणोनिगेलापरतोन । सीताजीवनजगदात्मा ३३ तोंरथचक्रांचामार्ग । अयोध्येकडेदिसेसवेग । ब्राह्मणधांवतीकाढितीमाग । परमआनंदलेम
नीं ३४ हर्षयुक्तहोऊनब्राह्मण । प्रवेशलेअयोध्यापट्टण । तोंतेथेंनाहींरघुनंदन । भवबंधनछेदकजो ३५ सकळमंगळभोगवर्जुनी । ब्राह्मणबै
सलेनिरंजनीं । ह्मणतीश्रीरामदर्शनावांचोनीं । प्रवेशसदनींनकरूंची ३६ आतांजान्हवीजळलंघून । केसाजाईलरघुनंदन । तीकथाकातुकेंश्रव
ण । सज्जनकरोतआदरें ३७ अहोश्रीरामविजयग्रंथ । हेंकेवळस्वानंदामृत । संतहेनिर्जरसमस्त । ब्रह्मानंदेंसेविती ३८ रविकुळमंडणराघवें
द्रा । ब्रह्मानंदाज्ञानसमुद्रा । श्रीधरवरदाअतिउदारा । निर्विकाराअभंगा ३९ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मिकीनाटकाधार । सदां
परिसोतभक्तचतुर । दशमोध्यायगोडहा २४० ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ अध्याय ॥ १० ओव्या ॥ २४० ॥

श्रीगणेशायनमः । श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । अध्यायापरीसअध्यायपरिकर । जैसापळेपळेंचढेदिनकर । कींशुक्लपक्षींहूनिचंद्र । कळावि
शेषवाढती १ कींअभ्यासकरितांवाढेज्ञान । कींयोगसाधनेंसमाधान । कींवटबीजविस्तारेपूर्ण । दिवसेंदिवसअधिक २ कींबाळपणापासूनि
पंडित । अधिकाधिकव्युत्पत्तिवाढत । कींकृष्णावेणीसंकीर्णदिसत । पुढेंविशाळहोतीजैशा ३ कींअग्रांपासूनिमूळाकडे । इक्षुदंडाचीगोडीवाढे ।
कींगुरुभजनकरितांआतुडे । ज्ञानकळाविशेष ४ जोंजोंनेमशुचिष्मंत । तोंतोंतपश्चर्यावाढत । कींसाधुसमागमकरितांत्वरित । क्षमादयावाढ
ती ५ कींकरितांनिष्कामदान । कीर्तीनेंभरेत्रिभुवन । कींवीरश्रीचीधरितांआंगवण । प्रतापविशेषपैंवाढे ६ किंवाधरितांस्नेहादर । मैत्रीवाढेअ
पार । किंवाकरितांपरोपकार । यशविशेषवाढत ७ तैसीरामकथागोडबहुत । विशेषपुढेंरसचढत । जेविवर्षावकाळींपूरयेत । गंगेसजैसाउल्हा
सें ८ गंगेचापूरमागुतावोहटे । हादिवसेंदिवसअधिकदाटे । चतुरप्रेमळजरीश्रोताभेटे । तरीवक्तयासिआनंद ९ श्रोताभेटलियामतिमं
द । तरीमावळेवित्पत्तीचाआनंद । जैसेंसूर्यमावळतांअरविंद । संकोचोनिजायपैं १० असोदशमोध्यायींकथन । जान्हवीतीरींरघुनंदन । न्य
ग्रोधवृक्षातळींजाण । तृणशेजेपहुडला ११ त्यजोनियांमायाजाळ । निरंजनींयोगीजैसानिश्चळ । तैसारामतमाळनीळ । जान्हवीतीरींशोभ
ला १२ तोंतेथेंगुहकभक्तथोर । तयासिह्मणेराघवेंद्र । परतीरासीसत्वर । आह्मांआतांनेईंतूं १३ भवाब्धितारावयादुस्तर । नामनौकाजाणकींप
वित्र । तोरघुवीरराजीवनेत्र । प्रार्थनाकरीगुहकाची १४ भणंगापुढेंक्षीरसागर । ह्मणेमजभूकलागलीथोर । कींवाचस्पतीमूढासविचार । पुसत
सेसाक्षेपें १५ कींथिल्लरासीजन्हुकुमरी । ह्मणेमाझीतृषाहरी । किंवादरिद्रियाचेद्वारीं । कल्पवृक्षयाचक १६ तैसारामगुहकातें । ह्मणेपरपा
रानेईंमातें । तंवतोजाणोनियांराघवातें । पुसेकौतुकेंकरूनियां १७ ह्मणेतुमचेंनांवकराश्रवण । कोठेंजातांकायकारण । मगमेदिनीगर्भरत्नभूष
ण । कायबोलताजाहला १८ रविकुळमंडणदशरथ । तोपिताआमुचायथार्थ । यादेहासनामरघुनाथ । जनसमस्तबोलती १९ ऐसेंबो
लतांरघुनंदन । गुहकमाताकरीरुदन । ह्मणेयाचानौकेसीलागतांचरण । नारीसंपूर्णहोतील २० याचेंचरणरजझगटतां । शिळाउद्धरिलीमिथि
लेसिजातां । आह्मींपूर्वीचऐकिलीकथा । भक्तसंताचेनिमुखें २१ कठिणपाषाणलागतांचरणीं । इंदिरेतुल्यजाहलीकामिनी । नौकाकाष्ठाचीत
त्क्षणीं । चरणलागतांहोईल २२ वृद्धाह्मणेपुत्राअवधारीं । यासिनघालावेंनावेवरी । नौकेचीझालियानारी । कैसीजीविकातुझीहोय २३ एक

१ सूर्य. २ वगाचे वी. ३ ग्रंथार्थज्ञान. ४ शेंडा. ५ ऊंस ६ प्राप्त होय. ७ पवित्र. ८ कमळ. ९ भागीरथी. १० संसार हाच कोणी एक समुद्र. ११ बृहस्पति.

१ वनितापोषितां । तुजसंकटहोयतत्वतां । नावेवरीरघुनाथा । पुत्रासर्वथाबैसवूंनको २४ मगगुहकह्मणेसर्वोत्तमा । अगाधतुमचेचरणांचामहिमा ।
तरीतेचरणश्रीरामा । मीप्रक्षालीनस्वहस्तें २५ पाषाणाचीजाहालीनारी । हेतोंचरणरजाचीथोरी । तरीतेपदप्रक्षालीनंनिर्धारी । मगनावेवरी
बैसवीन २६ मगगुहकेंआश्रमासनेऊन । बैसविलाजगन्मोहन । जोमायातीतशुद्धचैतन्य । पद्माक्षीरमणजगद्गुरू २७ विधिहरसहस्त्रनय
न। ज्याचेवांछितीरजःकण। सनकादिकांदुर्लभपूर्ण। करितांसाधननातळेजो २८जेथूनिजन्मलीजन्हुकुमरी। तेचरणप्रक्षालीनस्वकरीं। फळेंमुळेंआ
णूनिझडकरी । जनकजामातपूजिला २१ तवेळींगुहकाचाहर्षपाहें । ब्रह्मांडामाजीनसमाये । दृढधरूनश्रीरामाचेपाय । प्रेमेंकरूनस्फुंद
त ३० ह्मणेस्वामीरविकुळतिलका । दयाब्धीमायाचक्रचाळका। अयोध्यापतीताटिकांतका। झडकरयेईंमागुती ३१ स्वामीतूंपरतोनआलि
यावीण । मीकदापिनभक्षींअन्न । नानाभोगमंगलस्नान । नकरींयेथूनिश्रीरामा ३२ जाणोनियांप्रेमळभक्त। श्रीरामत्यासिहृदयींधरित। म
गनौकाआणूनित्वरित। जनकजामातबैसविला ३३ सौमित्रआणिसीतासती । तिघेंनौकेवरीआरूढती । मगसुमंताप्रतिरघुपती । आज्ञादे
ताजाहला ३४ सुमंतातूंजायवेगें । सकळवृत्तांतरायासिसांगें । माझानमस्कारसाष्टांगें । वसिष्ठदशरथांसींकरीं का ३५ चतुर्दशवर्षेंहो
तांपूर्ण। मीसत्वरयेतोंपरतोन । सकळलोकांचेंसमाधान । करींसुमंताजाऊनियां ३६ तुवांजाऊनियांत्वरित । ग्रामासिआलियाबंधुभरत ।
क्रोधेंकरूनदशरथ। वधीलएकादातयासी ३७ याकारणेंतुवांसुमंता । वेगेंपरतोनिजाइजेआतां । सुमंतउतरूनरथाखालता । चरणींमाथाठे
वितसे ३८ नयनोदकेंकरून। प्रक्षाँळिलेश्रीरामचरण । सुमंतह्मणेमाझेन । अयोध्येसनजाववे ३९ मीसमागमेंयेईन । अथवायेथेंप्राणदेई
न। परिमीनजायपरतोन। दुःखद्यावयासमस्तां ४० देखतीजेव्हांरथरितां। दशरथआणिकौसल्यामाता। यांचीकरावयाहत्या। माझेनतेथेंन
जाववे ४१ वनींसांडूनतुजरघुनायका । प्रवेशतांअयोध्येंतदेखा । मजह्मणतीलकाळमुखा । कांतूंयेथेंआलासी ४२ मगरघुनाथेंधरिलाहृदयीं ।
ह्मणेबारेचिंतानकरींकांहीं। तूंअयोध्येसिशीघ्रंजाईं । आज्ञामाझीपाळींकां ४३ माथांठेविलावरदहस्त। तेणेंशोकसमस्तझालाशांत। जैसामेघवर्षतां
अद्भुत। वणवात्वरितविझोनिजाय ४४ मगआज्ञाघेऊंनिसुमंत । पैलतीरींउभाअवलोकित ।नावेंतबैसलारघुनाथ। गुहकपैलतीरानेतपैं ४५
जैसानिर्वृत्तीतटाकींयोगीपावत । तैसापैलतीराउभारघुनाथ । सुमंतासीहातेंपालवित । जायत्वरितमाघारा ४६ यावरीपुढेंपुष्करिणी। तेथेंक्रमि

१ श्रीराम. २ प्रधान. ३ चवदा. ४ धुतले. ५ रिकामा. ६ त्वरित. ७ कृपायुक्त हात. ८ मोक्ष. ९ पुष्करिणी तीर्थ आहे.

लीएकरजनी । मगप्रयागाप्रतिचापपाणी । येताझालातेवेळे ४७ दृष्टींदेखोनिरघुनंदन । प्रयागहीझालापावन । पुढेंभारद्वाजआश्रमारघुनंद
न । येताझालासाक्षेपें ४८ आलाऐकोनिरघुराज । सामोराधांवलाभारद्वाज । रामेंनमस्कारिलाद्विज । क्षेमालिंगनदिधलें ४९ भारद्वाजबोले
सप्रेम । आजिमाझासुफळजन्म । त्रिभुवनपतीश्रीराम । गृहाआलाह्मणोनियां ५० माझियापुण्याचेगिरिवर । भेदोनिगेलेचिदंबरें । तरीचसी
तावल्लभरघुवीर । मूळेंवीणपातला ५१ सकळमंगळरघुवीर । जोमंगळभगिनीचानिजवर । मंगळभातेचाउद्धार । करावयाजातदक्षिणे ५२
ओपंचद्वयरघुनंदन । करावयासुरांचेंबंधमोचन । कमळणीमित्रंकुळभूषण । येणेंपंथेंचालिला ५३ तोंऋषिधांवतीअपार । त्यांहींकैसावेष्टिलारघु
वीर । जैसादेवींवेष्टिलासहस्रनेत्र । कींकिरणांतमित्रविराजे ५४ कींचंदनेंवेष्टितमलयानिळ । कींविरक्तींवेष्टितजार्श्वनीळ । कींवराभोंवतेसकळ ।
वऱ्हाडीजैसेमिरवती ५५ कींसाधककजैसेंनिधानाजवळी । कींरत्नाभोंवतीपरीक्षकमंडळी । कींकनकाद्रीभोंवतीपाळी । कुळाचळाचीविराजे ५६
कींनक्षत्रींवेष्टिलाशेंशी । कींमानेंसवेष्टिलाराजहंसी । तैसाऋषीनींअयोध्यानिवासी । भारद्वाजाश्रमींवेष्टिला ५७ भारद्वाजेंपूजिलारघुनंदन । ते
थेंक्रमिलाएकदिन । ऋषिबोलतीसुवचन । अजनंदनपुत्राप्रती ५८ चतुर्दशवर्षेंपर्यंत । श्रीरामाराहायेथेंस्वस्थ । दंडकारण्याप्रतिव्यर्थ । का
सयासीजावेंहो ५९ राघवह्मणेयेथेंराहतां । अयोध्येच्याप्रजायेतीसमस्ता । ब्राह्मणआणिमातापिता । येतीभेटीसीनिश्चयें ६० आह्मीगुप्त
रूपेंयेथूनी । प्रवेशूंमहाकाननीं । पुढीलभविष्यार्थमनीं । मुनीहोतुह्मींजाणतसां ६१ असोऋषिआश्रमींक्रमोनिएकदिवस । ऋषीसपुसेअयोध्या
धीश । पुढेंचालिलाजगन्निवास । मार्गआह्मांसदाविजेजी ६२ भारद्वाजह्मणेचित्रकूटपर्वतीं । विद्वज्जनबहुतराहती । तुह्मीतेथेंकरावीवस्ती । कां
हींदिवसराघवा ६३ सिद्धवटपर्यंत । भारद्वाजेंबोळाविलारघुनाथ । आज्ञाघेऊनित्वरित । प्रयागासीपरतला ६४ सिद्धवटदेखोनिनमन । क
रीपद्माक्षीरमण । त्यासिद्धवटींसावित्रीपूर्ण । सीतादेखोननमस्कारी ६५ विजयीहोऊनिरघुनंदन । वनींहूनिआलियापरतोन । दोनलक्षगोदानें
येथेंदेईन । ब्राह्मणसंतर्पणयथाविधी ६६ पुढेंचित्रकूटपर्वतावरी । बळलाशरयूतीरविहारी । तेथेंवाल्मीकऋषितपकरी । बहुतऋषींसमवेत ६७
जेणेंनारदकृपेचेनिबळें । अवतारभविष्यकथियेलें । जैसेंकमळाअगोदरभारिलें । सरोवरींजळजेवी ६८ अवताराआधींजन्मपत्र । केलेंशतकोटी
विस्तार । तेणेंदृष्टींदेखतांरघुवीर । आश्रमाबाहेरधांवला ६९ वाल्मीकाचेनिजचरणीं । माथाठेवीमोक्षदानी । वाल्मीकेंवरउचलोनी । आलिं

१ भारद्वाजऋषि. २ पर्वत. ३ आकाश. ४ सीतेचा पति. ५ पृथ्वी. ६ दशरथाचा पुत्र. ७ सूर्य. ८ शंकर. ९ मेरुपर्वत. १० चंद्र. ११ मानस या नामें सरोवर. १२ अरण्यांत.

गनदीधलें ७० इतरांसमस्तांद्विजवरां । भेटलापरात्परसोयरा । सौमित्रेंचित्रकूटींतेअवसरां । पर्णकुटिकाबांधिली ७१ ऋषिमंडळींतरघुवीर । चित्रकूटींराहिलाजगदोद्धार । गुहकपाठवूनबाहेर । समाचारनेलाहो ७२ चित्रकूटींराहिलारघुनायक । सुमंतासिसांगेगुहक । राघववियोगें दोघांसीदुःख । अत्यंतझालेंतेधवां ७३ गुहकेंसुमंतघरासिनेला । ह्मणेमीआतांरामकैंदेखेनडोळां । असोरथासहितसुमंतपरतला । वेगींअयोध्ये सीयेतसे ७४ अयोध्यादिसेप्रेतवत । रिताघेऊनिप्रवेशलारथ । सुमंतमुखावरीपल्लवघेत । झांकोनिमुखचालिला ७५ सुमंतह्मणेआपलेम नीं । श्रीरामटांकोनिआलोंवनीं । ऐसियामजअभाग्यासीजननी । काय॰र्थप्रसवली ७६ कैकेयीसदनासमोर । सुमंतेंसोडोनिरहंवर । मंदि रांतप्रवेशेसत्वर । अतिमुखचंद्रउतरला ७७ रिताआणिलामाघारारथ । अयोध्येंतसमस्तांसीजाहलेंश्रुत । घरोघरींएकचिआकांत । सीता कांतवियोगें ७८ इकडेकंठींप्राणधरून । कैकेयीसदनींअजनंदन । सुमंतेंतयासिदेखोन । नमनकरूंलाजतसे ७९ राजाह्मणेसुमंतप्रधाना । कोठेंटांकिलेंराजीवनयना । मजवाटतेंमाझियाप्राणा । मूळआलासीसत्वर ८० जगद्वंद्यमाझीवस्तूजाण । टांकिलीकोणेवनींनेऊन । श्रीराममा झेंनिधान । कोणेंचोरेंचोरिलें ८१ राजहंसमाझारघुनंदन । पंकेंगतठेविलारोवून । माझेंसुधाळमुक्तपूर्ण । भिरकाऊनदिधलेंकोठें ८२ अ न्नपूर्णावरंहृदर्यीचेंरत्न । म्यांतुझेहातींदिधलेंपूर्ण । घोरवनींतेंटांकून । कैसाआलासिमाघारा ८३ मजअंधाचीकाठीबळें । हिरोनिकोणीनेली नकळे । अरण्यांमध्येंमाझींबाळें । उपवासोनिराहार ८४ सुंदरसुकुमारसुमनकळी । माझीमाउलीजनकबाळी । सुमंतारथाखालींकैसीउतर ली । कैसीचालिलीपंथींसांग ८५ तिहींभोजनेंकोठेंकेलींवनीं । शयनकेलेंकोणेमेदिनीं । सुमंतासांगमजलागुनी । देहटांकूनजाईनमी ८६ मगतोसुमंतम्लानवदन । सांगेसकळवर्तमान । तीनदिवसनिराहारपूर्ण । तिघेंजणेंपैंहोतीं ८७ तृणासनींराजीवनेत्र । पहुडलाघनःश्यामगा त्र । पांघरावयाअंबर । आंपदासमस्तदेखिलीम्यां ८८ शृंगवेरपर्यंत । म्यांबोळविलारघुनाथ । ज्याचेनिनामेंजगतरत । तोगुहकेंनेलापरपारा ८९ मायानदीउल्लंघून । संतस्वरूपींहोतीलीन । तैसापैलतीरारघुनंदन । दैदीप्यमानपाहिलाम्यां ९० याउपरीकरुणाकरें । अयोध्येसीजायत्व रें । ऐसेंतेथोनियांजगदोद्धारें । निजकरेंमजपाळविलें ९१ राघवेंसाष्टांगनमन । घातलेंमगतेथोन । पुढेंचरणचालीरघुनंदन । करीतगमनवनवा सा ९२ जैसाअस्तागेलादिनकर । तैसावनींप्रवेशलारघुवीर । याज्ञिककुंडामाजीवैश्वानर । आच्छादितजैसाकां ९३ ऐसींसुमंताचींवचनेंभूपाळ



१ चित्रकाची गार. २ पाणीदार मोती. ३ शंकर. ४ फुलाची कळी. ५ आकाश. ६ संकट. ७ आपले हातानें खुणाविलें. ८ सूर्य. ९ अग्नि.

कर्णींऐकतांचितात्काळ । धबधबांतेव्हांवक्षस्थळ । पिटोनघेततेसमयीं ९४ सुमंतावनींरघुनंदन । कैसापरतलासिसोडून । अरेतुझेंह्रदयनिर्दय
पूर्ण । कैसाप्राणगेलानाहीं ९५ सुमंतातुझाधीरथोर । वज्रापरीतुझेंशरीर । वनींसांडोनिरघुवीर । कैसायेथवरीआलासी ९६ गळामाजीगुंत
लामीन । तैसातळमळीअजनंदन । श्रीरामवियोगाचाअग्न । जाळीतपूर्णसर्वांगीं ९७ ह्मणेधांवधांवबारेरघुनंदना । सरोजनेत्रासुहास्यवदना ।
कोमलांगामाझियाप्राणा । गेलासिवनाटांकूनी ९८ हांकफोडिलीदशरथें । धांवमाउलियेरघुनाथे । मजसांडोनियांतान्हयातें । गेलीसवनादूर
देशा ९९ रामाचालिलामाझाप्राण । अंतकाळींदावींतुझेंवदन । ऐसेंबोलतांवटारिलेनयन । सोडिलाप्राणरामस्मरणें १०० रामरामकरितांदश
रथ । जाहलारामरूपयथार्थ । खुंटलाशोकसमस्तहेत । मातसर्वराहिली १ पाहाशरीराचेंकर्मगहन । चवघेपुत्रदशरथासअसोन । जवळींनस
तांसोडिलाप्राण । मगसुमंतप्रधानधांवला २ तेणेंउशासीमांडीदीधली । सुमित्राकौसल्याजवळीआली । तेव्हांएकचिहांकजाहाली । महाशब्दें
करूनियां ३ सप्तशतराण्यासकळ । दुःखेंपिटितीवक्षस्थळ । हडबडलेंअयोध्यापूरसकळ । शोकतुंबळलोकांतें ४ आक्रोशेंकौसल्यासुमित्रारड
त । रामवियोगेंदुःखबहुत । त्यांतमृत्युपावलादशरथ । नाहींअंतशोकातें ५ जैसेंपायांसडंखिंजेमहाव्याळें । तोंमस्तकींवृश्चिकेंताडिलें । कींवण
व्यांतप्राणीसांपडले । त्यावरीतोडिलेंतस्करानीं १०६ आधींचबहुतधाकेंकरून । त्यावरीपडतीपाषाण । आधींचनवज्वरेंगेलाव्यापोन । त्यांतवि
षपानपैंजाहालें ७ आधींचगृहासलागलाअग्न । त्यावरीसाह्यझालाप्रभंजन । कींपुरींजातांबुडोन । तोंगळांपाषाणबांधिला ८ व्याघ्रभयेंपळ
तांउठाउठी । तोंरिसेंकंठींघातलीमिठी । तैसीकौसल्येसजाहलीगोष्टी । ललाटपिटीअवनीये १०९ तोंतेथेंपावलाब्रह्मसुत । ह्मणेशोककांकीरतां
व्यर्थ । आतांवेगींआणोनिभरत । राज्यींतयास्थापावा ११० एकराजाउभाराहिल्याविण । करूंनयेराजाचेंदहन । आणिसमीपनसतांनंदन ।
कदाअग्नदेऊंनये ११ मगतैलद्रोणींतसाचार । घातलेंदशरथाचेंशरीर । वसिष्ठह्मणेसुमंतासत्वर । रथघेवोनिधांवेंकां १२ सूर्योदयहोतांयेथें ।
वेगींघेऊनियावेंभरतातें । त्याचेकर्णींवोखटतेथें । सर्वथाहीसांगूंनको १३ वनासगेलारघुनंदन । अथवादशरथेंसोडिलाप्राण । हेंगुह्यत्यासिन
सांगोन । वेगेंघेऊनियेईंजे १४ भरतकेवळश्रीरामभक्त । हीगोष्टऐकतांविपरीत । तत्काळदेहटांकीलतेथ । यालागींश्रुतनकरावें ११५ भक्तवि
रक्तचतुरवरिष्ठ । जोज्ञानगंगेचानिर्मळलोट । जोविवेकरत्नांचामुकुट । एकनिष्ठसुभटजो १६ वैराग्यवैरागरपूर्ण । जोआनंदभूमीचेंनिधान । जो

---

१ मासा. २ दशरथ. ३ कमलनेत्रा. ४ इच्छा. ५ सातशें स्त्रिया. ६ डसणें, चावणें. ७ सर्प. ८ वायु. ९ आस्वल. १० कपाळ. ११ पृथ्वीवर. १२ वसिष्ठऋषि.

विरक्तवल्लीचेंसुमन । जोसमुद्रसत्याचा १७ जोशांतिवृक्षाचेंपक्कफळ । जोदयेचासागरकेवळ । कींउपरतीचानिर्मळ । पूर्णकुंभउचंबळला १८
ऐसासर्वगुणींअलंकृत । वेगींघेऊनयेईंभरत । तैसाचिनिघालासुमंत । आचार्यचरणवंदुनी १९ वायुवेगेंचालिलासुमंत । स्वप्नदेखेमातुळींभरत ।
कृष्णवर्णवस्त्रवेष्टित । नारीएकदेखिली १२० तिणेंघेऊनियांकरीं । तैलजिरवीआपुलेशिरीं । भरतजागाहोऊनिझडकरी । रुदनकरीआक्रोशें २१
ह्मणेस्वप्नम्व्हेदिसतोअनर्थ । आह्मींचौघेबंधुआणिदशरथ । पांचांमाजीजीवघात । होईलएकाचानिर्धारें २२ आणिप्राणसखाअत्यंत । तोअंत
रेलदूरबहुत । धरणीवरीमस्तकभरत । आपटीशोकेंतेधवां १२३ आक्रंदोनिहांकदेत । केवींदृष्टींदेखेनरघुनाथ । राजाधिराजदशरथ । अंतरला
असेंवाटतें २४ तोंमातुळसंग्रामजित । भरतासिस्नेहेंहृदयींधरित । शत्रुघ्नासिसमजावित । शोकव्यर्थकांकरितां १२५ रजनीसरतांतत्काळ ।
सिद्धकरूनचतुरंगदळ । अयोध्येप्रतिउतावेळ । नेऊनघालवितोंतुह्मांतें १२६ ऐसेंबोलतांसरलीरजनी । भरतशत्रुघ्नउठोनी । नगराबाहेरयेउ
नी । मार्गलक्षितीअयोध्येचा १२७ ऊर्ध्ववदनेंकरूनचकोर । विलोकींजैसारोहिणीवर । कींचक्रवाकचिंतीदिवाकर । किंवामयूरमेघातें १२८
ऐसाअयोध्येचामार्गलक्षित । तोंएकाएकींदेखिलारथ । वरीप्रधानसुमंत । आरूढोनियेतसे १२९ मंदमंदयेतरहंवर । अश्वांचेनेत्रींवाहेनीर ।
ध्वजाचेंविद्युत्प्रायचीर । अतिमलीनदिसतसे १३० वरीसुमंतम्लानवदन । नेत्रींवाहातअश्रुजीवन । राघवलीलाआठवून । क्षणक्षणांस्फुंदत
से ३१ मागुतीवस्त्रेंनेत्रपुसित । तोंशत्रुघ्नआणिभरत । जवळीआलेधांवोनित्वरित । चिन्हेंविपरीतदेखोनियां ३२ सुमंतेंदेखतांचिभरत । वेगेंर
थाखालींउतरत । क्षेमालिंगनदोघांदेत । सांगेत्वरितबोलाविलें ३३ भरतसुमंताचेंवदन । क्षणक्षणांपाहेविलोकून । ह्मणेसख्यातुझेआरक्तनयन
शोकेंझालेदिसतीपैं ३४ कायअयोध्येचेंवर्तमान । सुखीआहेकींरघुनंदन । श्रीदशरथक्षेमकल्याण । सुखरूपआहेकीं १३५ सुमंतह्मणेसुखी
रघुनंदन । तुह्मांसिबोलाविलेंत्वरेंकरून । मगरथींबैसतभरतशत्रुघ्न । त्वरेनेंशीघ्रचालिले ३६ पुढेंधुरेबैसलासुमंत । घडिघडीनेत्रांसिवस्त्रलावित ।
तेणेंभरतहोयसद्गदित । तोंपुढेंदेखतअयोध्या ३७ प्राणरहितजैसेंशरीर । तैसेंदिसेअयोध्यानगर । कींजीवनेंवीणसरोवर । कींकांतारदग्धजैसें
३८ कींनारीजैसीभ्रताराविण । कींजननींविणतान्हेंदीन । कींनासिकावांचोनिवदन । अयोध्याभुवनतेंविदिसतसे १३९ राजमंदिराचेंढळलेक
ळस । मंगळवाद्यांचानाहींघोष । घरोघरींनारीपुरुष । शोकआक्रोशेंकरिताती १४० होतेंदशरथाचेंप्रेत । सुमंतेंतेथेंचिनेलारथ । छत्रभंगलेंदेख

१ चंद्र· २ सूर्य· ३ रथ· ४ घोडे· ५ पाणी· ६ विजेसारिखें वस्त्र· ७ रामाचे गुण· ८ अरण्य· ९ आई· १० बालक·

तांभरत । रथाखालींपडियेला १४१ दशरथाचेंप्रेतदेखोनी । भरततेव्हांलोळेधरणीं । अश्रुधारावाहतीनयनीं । शोकगगनींनसमाये ४२ शोकसमुद्रींनिमग्न । झालाकैकेयीनंदन । भोंवतेसद्गदप्रजाजन । दुःखेंकरूनबोलती ४३ मगसुमंतप्रधानेंसांवरूनी । भरतबैसविलाउठवोनी । भरतविचारकरीमनीं । रामनयनींपाहीनआतां ४४ संसारमायासांडोन । दशरथपावलास्वर्गभुवन । मीआतांराघवचरण । दृढधरीननिजभावें ४५ विलोकितांश्रीरामवदन । मीशोकावेगळाहोईन । प्रधानासिह्मणेमजनेऊन । श्रीरामचरणावरीघालावें ४६ वडीलबंधुरघुनाथ । दशरथासमयथार्थ । रामसदनाकडेभरत । मुरडोनियांचालिला ४७ परीवनासगेलारघुनंदन । हेंकोणासीनबोलवेवचन । एकह्मणतीदेईलप्राण । सीतारमणनदेखतां ४८ तोंआरडतकौसल्यामाय । भरतधांवोनिधरीदृढपाय । मायेश्रीरामकोठेंआहे । तोलवलाहेंदावींकां ४९ तोंकौसल्येसिआलीमूर्च्छना । बोलतांनबोलवेवचना । बारेरामगेलातपोवना । मगरायेंप्राणत्यजियेला १५० भरतेंऐसेंऐकिलें । लल्लाटभूमीवरीआपटिलें । तेंदुःखनवजायवर्णिलें । कल्पांतमांडलातेवेळीं ५१ आहारघुवीराराजीवनेत्रा । नवमेघरंगास्मरारिमित्रा । जगद्वंद्याकोमलगात्रा । कांउपेक्षिलेंआह्मांतें ५२ ऐसेंबोलोनियांभरत । मेदिनीवरीआंगघालित । माझीमाउलीरघुनाथ । गेलीनिश्चितटांकोनी ५३ मेदिनीगर्भरत्नभूषण । वनासिनिघतांरघुनंदन । दशरथेंतेव्हांसोडिलाप्राण । तैसेंमरणमजकांनये ५४ अद्यापिनयेमजलामृत्य । कांमृत्यूचनिमालायथार्थ । रामावियोगाचेंदुःखअत्यंत । मृत्यूसहीनसोसवे ५५ धन्यधन्यराजादशरथ । कोमलहृदयप्रेमळयथार्थ । देहठेऊनिविदेहजाभात । जवळकेलात्वरेनें ५६ तंवतोकमलोद्भवसुत । आचार्यपातला त्वरित । भरतजाऊनिचरणधरित । मजरघुनाथदाखवीं ५७ पाहावयाभरताचेंमन । वसिष्ठकायबोलेवचन । तुजराज्यदिधल्याविण । रायासअन्नदेऊंनये ५८ आणितुझियामातेच्यामनांत । तुजराज्यव्हावेंप्राप्त । वनासगेलाजनकजामात । तेंचनिमित्तजाणपां ५९ ऐसेंऐकतांतेअवसरीं । परमदुःखपावलाअंतरीं । भरतआक्रंदतदीर्घस्वरीं । राज्यकरींह्मणतांची १६० सुकुमारचंपककळिकेवरी । चपेटेंपडतांनउरेउरी । कींकर्पूरजननेंनीचेशिरीं । शुंडाप्रहारींताडीगज ६१ कींशस्त्रघायेंतोडिलींबाळें । कींवज्रघायेंचूर्णकपाळें । कींअग्नींतपडलींमुक्ताफळें । तैसेंवाटलेंभरतातें ६२ श्रीरामगेलावनांतरीं । जरीमीयेथेंराज्यकरीं । तरीजितुकेब्राह्मणपृथ्वीवरी । तेम्यांवधिलेस्वहस्तें ६३ जगद्वंद्यासवनींसांडोन । जरीमीअंगिकारींराजासन । विगतधवाजेजारिण । तिचेगर्भस्थमीपावें ६४ रजस्वलेच्याशोणितासमान । राज्या

१ राम. २ कपाळ. ३ शंकराचा मित्र. ४ पृथ्वीवर. ५ सीता. ६ नाहींसा झाला. ७ जनकाचा जांवई राम. ८ वसिष्ठ मुनि. ९ उपाध्याय. १० चांफेची कळी. ११ वीज. १२ केळी.

भिषेकाचेंउदकपूर्ण । मीआपुल्याउदरींशस्त्रघालीन । राज्यासनघ्याह्मणतां ६५ ज्यासीमृडानीवरध्यायमनीं । ज्याचीअयोध्याहेराजधानी । तेमीभोगितांचितेक्षणीं । महाचांडाळमीजाहलों ६६ रघुवीरसांडोनकाननीं । जरीमीभोगीनराजधानी । तरीजिव्हाजावोझडोनी । कीटकपडो ततत्काळ ६७ वनींसांडोनिजगन्मोहन । जरीमीघेईनराज्यासन । तरीगुरुवधमद्यपान । मात्रागमनघडेमज ६८ कलंकलागेलवासरेमणी । पाप प्रवेशेलगंगाजीवनीं । मृगजळींघटोद्भवमुनी । जरीबुडोनजाईल ६९ मित्रकिरणाचियावरी । चढतीमुंगियांच्याहारी । कींवडवानळाचेशिरीं । नृत्यकरीपतंग १७० कींऊर्णनाभीच्यातंतुसूत्रीं । जरीउचलेलधरित्री । कींतृणपाशेंमहाकेसरी । जरीगुंतोनपडेल १७१ कींमहीउचलेलमश का । जरीसुपर्णासिबांधेलअळिका । कींदृष्टींदेखतांदीपका । मृगांकखालींपडेल १७२ जरीहेंघडेब्रह्मनंदना । तरीमजहोईलराज्यवासना । ऐकोनिभरताचियावचना । वसिष्ठजाहलासद्गद १७३ अहोतेंभरताचेंवचन । वैराग्यवल्लीचेंसुमन । कींविवेकनभींचेंउडुगण । सप्रेमतेजेंझळक त १७४ कींहेंभक्तिपंथींचेंसरोवर । कींनिश्चयभावाचेंदिव्यनगर । कींतेंविश्रांतीचेंमंदिर । वचनरूपप्रत्यक्ष १७५ असोतोंकैकेयीनंदन । ह्म णेस्वामीशिवतोंतुझेचरण । श्रीरघुवीराचीमजआण । राज्याभिषेककरूंनेदीं ७६ कैकेयीचेंकाळेंवदन । मातानव्हेतेलांवपूर्ण । तीसआवडेरांडपं ण । पतीचाप्राणघेतला ७७ मगवसिष्ठेंजेंजेंचिंतिलें । तेंतेंभरतासिनिवेदिलें । मंथरादासीचेनिबोलें । कार्यनासलेंसर्वही १७८ कलहकल्लोळ सरिता । तेहींमंथरादासीतत्वता । कुबुद्धीशिकवूनितुझियेमाता । इणेंचिपाहापांबोधिली १७९ ऐसीऐकतांचिमात । वेगेंधांवेवीरभरत । मंथरे चीवेणीअकस्मात । धरूनिशस्त्रकाढिलें १८० मगधांवोनिब्रह्मसुत । भरताचाधरिलाहात । ह्मणेस्त्रीवधितांपापअद्भुत । कदाविपरीतकरूंनको । ८१ मगलत्ताप्रहारेंकरूनी । भरतेंताडिलेंतियेलागूनी । त्रिवक्रकुब्जातेथूनी । नामतियेसीजाहलें ८२ असोब्रह्मपुत्रतयेक्षणीं । रामपादुकासिं हासनीं । मणिमयजडितदिव्यरत्नी । सिंहासनींस्थापिल्या ८३ त्यावरीछत्रधरून । मगराजदेहउचलोन । अग्निमुखींसमर्पून । उत्तरकर्मभरतक री ८४ सप्तशतराजाच्यायुवती । अग्निप्रवेशतत्काळकरिती । जैसींसूर्यकिरणेंसामावती । सूर्यासरसींअस्तमानीं १८५ सुमित्राआणिकौसल्या । प्राणद्यावयासिद्धजाहल्या । मगत्यावसिष्ठेंवर्जिल्या । शास्त्रप्रमाणरीतीनें ८६ पुत्रवंत्यास्त्रियाविशेष । त्याहींनकराबाअग्निप्रवेश । तोंकौसल्याह्मणे आह्मांस । कशासव्यर्थठेवितां ८७ बनासगेलारघुनाथ । परत्रपावलादशरथ । आतांकायवांचूनिव्यर्थ । कायाअग्नींतनिक्षेपूं ८८ मगवसिष्ठसांगे

१ सूर्य. २ अगस्तिऋषि. ३ ओळी. ४ कोष्टी नामें किडा. ५ सिंह. ६ गरुड. ७ चंद्र. ८ वसिष्ठ. ९ नक्षत्रसमुदाय. १० डांखीण. ११ वसिष्ठ. १२ स्त्रिया.

वाहूनिआण । तुह्मांसश्रीरामभेटवीन । मगवनासिकरीलगमन । पुढतीआगमनकरीलपैं ८१ निवटोनिअसुरसमस्त । अयोध्येसीयेईलरघुनाथ । हावाल्मीकाचामूळकाव्यार्थ । मानायथार्थसर्वही १९० गुरुवचनमानूनिप्रमाण । चित्रकूटींभेटेलरघुनंदन । अग्निप्रवेशह्मणून । वर्जकेलातेकाळीं ९१ असोरात्रजाहलीदोनप्रहर । कैकेयीनेंयेऊनसत्वर । भरतासिएकांतविचार । सांगेकैसाऐकातें ९२ ह्मणेपुत्राऐकवहिलें । संकटेंम्यांराज्यसाधिलें । रामासिवनवासापाठविलें । नानायत्नेंकरूनियां ९३ वनागेलेरामलक्ष्मण । हेंतूंमानीपरमकल्याण । सत्वरघेईंछत्रसिंहासन । कांहींअनमानकरूंनको ९४ पितृवचनकरावयाप्रमाण । वनासगेलारघुनंदन । त्याशोकास्तवरांवपावलामरण । हेंहीजाणबरेंझालें ९५ सापत्नबंधुरामनिर्धारें । त्यासिवंचनकरितांबरें । देवदैत्यदायादवैरें । अद्यापीहीवर्तती ९६ गरुडसर्पसापत्न । वैरेंवर्ततीदोघेजण । जरीतूंहोसीमाझानंदन । तरीचवचनपाळींहें ९७ भरतेंऐकतांचितिचीवाणी । ह्मणेउठेंयेथोनिचांडाळिणी । तुझावधकेलाअसतायेक्षणीं । परिमाताह्मणोनिरक्षिली ९८ परमनिर्दयतूंपापिण । अमंगळतूंलांवपूर्ण । घेतलादशरथाचाप्राण । जानकींजीवनधाडिलावना ९९ तूंसर्पीणहोसीयथार्थं । डंखोनिमारिलाराजादशरथ । माझासखारघुनाथ । दूरवनासिधाडिला २०० पिताबंधुदोघेजण । गेलेज्यापंथेंकरून । त्यामागेंमीजाईन । ऊठयेथोनिपापरूपे १ असोकैकेयीगेलीउठोन । तोंडदयापावलाचंडकिरण । भरतेंवल्कलेंवेष्टून । भस्मलाविलेंसर्वांगीं २ सर्वअळंकारत्यागून । वटदुग्धींजटावळून । वनाप्रतिकैकेयीनंदन । चरणचालीचालिला ३ षोडशपद्मेंदळभार । नगरलोकनिघालेसत्वर । वोसपडलेंअयोध्यापूर । जीवमात्रचालिले ४ कौसल्यासुमित्रादोघीजणी । शिबिकेंतबैसल्यातेक्षणीं । वरीवस्त्राभरणघालूनी । वहनासहितझांकिल्या ५ वसिष्ठादिसकळब्राह्मण । सर्वेंनिघालेचारीवर्ण । अयोध्येंतकैकेयीवांचून । नाहींकोणीराहिलें ६ जनह्मणतीवोसनगर । कैकेयीचेंवपनकरूंसत्वर । तिजवरीधरावेंछत्र । परमअपवित्रपापिणी ७ तिचेपोटींभरतजन्मला । जैसाकांगविष्ठेंतअश्वत्थप्रगटला । कींकागिणीपोटींकोकिळा । निपजेअदचितांजैसीकां ८ असोभरतह्मणेसुमंतातें । रघुवीरगेलाकोण्यापंथें । तोचमार्गदावीआह्मांतें । तुझेअनुमतेंचालूंआह्मीं ९ मगभरतसमवेतदळभार । गुहकाश्रमापावलेसत्वर । वाजतवाद्यांचेगजर । नादेंअंबरकोंदलें १० गुहकविलोकीदुरून । ह्मणेमातेनेंधाडिलेदोघेजण । दळभारसिद्धकरून । रामलक्ष्मणवधावया ११ मगसहस्त्रांचेसहस्त्रकिरांत । गुहकेंमेळविलेसमस्त । धनुष्यवोढोनियांत्वरित । जान्हवीतीरबळकाविलें १२ भरता

---

१ दशरथराजा. २ सीतेचा पति राम. ३ सूर्य. ४ झाडांच्या सालींचीं वस्त्रें. ५ वडाच्या झाडाचा चीक. ६ सैन्य. ७ कावळा. ८ पिंपळ. ९ गगन, १० कोळी. ११ भागीरथी.

सिसांगतीसेवक । संग्रामासिसिद्धझालागुहक । जन्हुकुमरीचेंउदक । स्पर्शोंनदेतीकोणातें १३ मगशत्रुघ्नआणिदळपती । भरताप्रतिविचापुस
ती । ह्मणतीआज्ञाद्यावीनिश्चितीं । शिक्षालावूंतयांतें १४ मगभरतह्मणेगुहकरामभक्त । म्यांऐकिलाहोतावृत्तांत । तरीसमाचारनघेतांयथार्थ।
युद्धत्यासिनकरावें १५ मगभरतपुढेंहोऊन । गुहकाप्रतिबोलेवचन । त्वांयुद्धआरंभिलेंनिर्वाण । कायकारणसांगतें १६ गुहकह्मणेंघेऊनदळभा
र । वधावयाजातोसिरघुवीर । तरीमीश्रीरामउपासकनिर्धार । वेंचीनप्राणस्वामिकांर्जी १७ माझास्वामीरघुनंदन । निराहारीवनींनिर्वाण ।तु
ह्मींमारावयादोघेजण । दळभारेंसींचालिलां १८ परमनिंदकदुर्जनखळ । जेरघुनाथद्वेषीचांडाळ । त्यांचींशिरेंछेदोनितत्काळ । पाठवीनयमलो
का १९ मांतेच्यांबोलेंकरूनी । श्रीरामवधूंपाहसीवनीं । तरीतुह्मांसजान्हवीचेंपाणी । स्पर्शोंनेदींअणुमात्र २२० ऐकतांगुहकाचेंवचन । भरता
सिआलेंदीर्घरुदन।गुहकासह्मणेसोडोनिबाण । माझेंशिरछेदोनिटांकीं २१ मजपापियाचादेहत्वरित। गुहकाछेदींयथार्थ । कैकेयीनेंकेलाअनर्थ
सीताकांतधाडिलावना २२२ जन्मलोंकैकेयीचेउदरीं । जनह्मणतीहारामचंद्राचावैरी । तरीगुहकाआतांवेगकरीं । छेदींझडकरीदेहमाझा २२३
श्रीरामवियोगाचेंदुःख। मजनसोसेचिअणुमात्रदेख । निर्वाणबाणसोडोनिएक । मजरघुनायकपददावीं २४ भरताचेंअंतरखोळखून । गुहक
धांवोनिधरीचरण। दोघांसिपडिलेंआलिंगन। गेलेविसरूनदेहभाव २५ कंठदाटलादोघांचा। उभारणीझालीरोमांचा। दोघांचेनेत्रींअश्रुधारांचा।
पूरपडततेकाळीं २६ दोघेहीश्रीरामाचेभक्त। दोघेहीयोगीविरक्त। दोघेहीश्रीरामासआवडत। वल्कलेंवेष्टितदोघेही २७ दोघांहींकेलेंभस्मोत्धू
लन। दोघांहींकेलेंजटावळण। दोघेहीनघेतीअन्न। रामदर्शनावांचोनी २८ गुहकह्मणेभरतावसिष्ठा। श्रीरामगेलाचित्रकूटा। आतांचलाजीउठा
उठा। वेगींभेटारामातें २९ ऐकतांगुहकाचेंवचन। भरतधरूंधांवेचरण। गुहकघालीलोटांगण। प्रेमेंकरूनसद्गद ३० भरतेंस्नानसंध्यासारून।
गुहकासिह्मणेप्रीतीकरून। श्रीरामराहिलाएकदिन। तेंस्थळमजदाविजे ३१ गुहकह्मणेन्यग्रोधवृक्ष। त्याखालींराहिलाकमलपत्राक्ष। जयासीं
हृदयींध्यायविरूपाक्ष । सहस्राक्षेंशरणज्यातें ३२ येतृणशेजेवरीजाण । पद्मनयनेंकेलेंशयन । याचपंथेंयेऊन । केलेंस्नानजान्हवीचें २३३
सीतेच्यातगटवस्त्रांचेरज । तेणेंझगझगलीतृणशेज । देखतांभरतभक्तराज। साष्टांगनमनकरीतसे ३४ रघुनाथपदमुद्रातेथ । उमटल्यादेखोनि
भरत। तेधुळीकपाळालावित। सद्गदितहोवोनी ३५ असोनौकाआणोनिसहस्र। उतरलासकळदळभार । प्रयागासियेऊनिसत्वर । भारद्वा

१ युद्धास. २ सेनापति. ३ स्वामीच्या कार्यासाठीं. ४ आई ( कैकेयी. ) ५ मन ६ प्रेमानें आंगावर केंस उभे राहणें. ७ वडाचें झाड. ८ शंकर. ९ इंद्र. १० भागीरथीचें. ११ रामाचीं पाउलें.

जदर्शनघेतलें ३६ लक्षोनिचित्रकूटाचापंथ । चालतीगुहकआणिभरत । तोंफळेंवेंचावयासुमित्रासुत । पर्वतातळींउतरला ३७ तोंपर्णकुटीमा
जीरघुनंदन । करावयाबैसलाहवन । तेथेंउपसामग्रीआणोन । जनकात्मजादेतसे ३८ चकोरमुखींएकसरां । अत्रिसुतसोडीअमृतधारा । तैशाआ
हुतीघालीवैश्वानरा । तृप्तहोयरामहस्तें ३९ तेव्हांआश्रमाबाहेरजनकबाळी । जेसुकुमारचंपककळी । तोंसुदर्शनगंधर्वजातांनिराळीं । तेवेल्हा
ळींदेखिली २४० जानकीदेखोनिसुंदर । चित्तींझालाकामातुर । भयलज्जासमग्र । सोडोनियांदीधली ४१ मंगळरूपतेमंगळभगिनी । गंधर्वधां
वलातयेक्षणीं । अमंगळकागरूपधरूनी । सीतेलागींझडपीतसे ४२ जैसापतंगदीपदेखोन । उडीघालीविसरूनमरण । कींखदिरांगारासीवृश्चिकये
ऊन । पुच्छेंकरूनताडीजेवीं ४३ कींअंतरगृहींचेंदिव्यअन्न । स्पर्शोंधांवेजैसेंश्वान । यज्ञशाळेमाजीमळिण । अंत्यजजैसापातला ४४ असो
जानकीचेंस्तनयुग । धरूंपाहेपतितकाग । जगन्माताधांवलीसवेग । आंगघालीधरणीवरी ४५ ह्मणेधांवधांवरघुराया । कागेंविटंबिलीमाझीकां
या । आक्रंदेपरमजनकतनया । रघुवर्याजाणवलें ४६ आहुतीटांकीरघुनाथ । जवळीनाहींसुमित्रासुत । मगदर्भमंत्रोनित्वरित । रामचंद्रेंप्रेरिला
४७ कल्पांतविजूसमान । कागेंदर्भदखिलादुरून । पळोंलागलाघेतलेंरान । पाठीसीबाणलागलाअसे ४८ गंधर्वभ्रमेसकळसृष्टी । परीकोणीन
घालीतयापाठीं । हिंडतांझालाहिंपुटी । होयकष्टीदुरात्मा ४९ इंद्रादिकदेवगण । समस्तांसिगेलाशरण । तेह्मणतीनदाखवींवदन । दुष्टाहोईंमाघा
रा २५० मगभेटलानारदमुनी । कागलागलातयाचेचरणीं । ह्मणेपाहाहोयात्रिभुवनीं । ठावनेदीकोणीमज ५१ माझीपाठनसोडीबाण । म
गनारदबोलेवचन । मूढारामासिजायशरण । तोचिमरणचुकवील ५२ मगह्मणेजगद्वंद्यारामचंद्रा । मीतुजशरणकृपासागरा । दीनरक्षकाअतिउ
दारा । मजपामरानमारावें ५३ मजवरीटांकिलाबाण । हेंलोकांतनदिसेथोरपण । कमळावरीवज्रघेऊन । घातल्याकायपुरुषार्थ ५४ सूक्ष्म
अळिकाधरीसुपर्ण । वडवानळजाळीतृण । भोगेंद्रउचलीसुमन । हेंकायअपूर्वबोलावें ५५ पर्जन्येंउठलेंतृण । अगस्तीप्यालांकिंचितजीवर्न । मे
घेंनिजप्रतापेंकरून । घटींजीवनभरियेलें ५६ सूर्येंदीपतेजझांकिलें । गोवत्साविदारिलाशार्दूळें । रघुपतीत्वांमजतैसेंमारिलें । तरीथोरपणप्रकटेना
५७ मातेचियास्तनावरी । बाळकहस्तठेवूनिक्रीडाकरी । तरीकायमाताजीवेंमारी । बाळकातेंसांगपां ५८ महाराजरविकुळभूषण । ताटिकां
तकाअहिल्योद्धारणा । द्विपंचमुखदर्पहरणा । शरणागतानमारावें ५९ मगबोलेरघुपती । माझाबाणअसत्यकल्पांतीं । नव्हेचजाणनिश्चितीं ।

१ स्वैराचा निस्तारा. २ स्वयंपाकघर. ३ पापी दुष्ट. ४ शरीर. ५ लक्ष्मण. ६ दुःखी. ७ शेष. ८ उदक. ९ वासरूं. १० व्याघ्र. ११ दहामुखांचा रावण. १२ गर्व.

महामलिनाअपवित्रा २६० मगबाणासआज्ञापीरघुनंदन । याचारक्षोनियांप्राण । वेगेंछेदावासव्यनयन । शिक्षायासजाणपैं ६१ नलागतांपात यापातें । दर्भेंछेदिलेंनयनातें । कागंम्हणेरघूत्तमातें । देंईवरातेंमजकांहीं ६२ मगदोहींकडेएकबुबुळ । खेळेऐसेंकेलेंचंचळ । कांकदृष्टीअवघ्यांतचप ळ । जनसकळदेखती ६३ सीतेसिद्यावयाचुंबन । तूंधांवलासीदुरात्मापूर्ण । तरितूंकरिसीविष्ठाभक्षण । कनिष्ठजाणपक्ष्यांततूं ६४ तुजवरए कदेतोंजाण । प्रेतपिंडतूंभक्षिल्याविण । सर्वथानोहेउद्धारण । हेंवरदानतुजदीधलें ६५ मगसुदर्शनगंधर्वतेव्हां । साष्टांगनमूनिश्रीराघवा । आ पलेस्वस्थळाप्रतीतेधवां । जाताझालाआनंदें ६६ भरतप्राणसखाआतां । येऊनिभेटेलरघुनाथा । श्रोतींपरिसावीतेचिकथा । भवव्यथानासेजे णें ६७ रामविजयग्रंथप्रचंड । रसभरितअयोध्याकांड । तेंश्रवणकरितांवितंड । विघ्नेंउदंडविंतळती ६८ अयोध्याधीशारामचंद्रा । ब्रह्मानंदा ज्ञानसमुद्रा । श्रीधरवरदाप्रतापरुद्रा । मजनाममुद्राअखंडदेईं ६९ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मीकीनाटकाधार । सदांपरिसो तभक्तचतुर । एकादशोऽध्यायगोडहा २७० श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥ ॥ ओव्या ॥ २७० ॥ ॥ अध्याय ॥ ११ ॥ ७

१ डावा नेत्र. २ कावळा. ३ संसारसंबंधीं दुःख. ४ नाश पावतात.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । संतमंडळींबैसलीथोर । बृहस्पतीऐसेचतुर । आतांसाहित्यसुमनांचेहार । गुंफोनगळांघालूंत्यां
चे १ अनर्ध्यशब्दरत्नेंप्रकाशवंत । त्यांचेग्राहिकचतुरपंडित । विशेषेंरघुनाथभक्तविरक्त । तेप्रेमभरेंडुल्लती २ मतिमंदबैसतांश्रोताश्रवणीं ।
तरीग्रंथरसजायवितळोनी । जैसेंभस्मामाजीनेउनी । व्यर्थअवदानघालिजे ३ रत्नपरीक्षाकरितीचतुर । तेथेंगर्भांधविटेसाचार । गायनऐकतीस
ज्ञाननर । परीबधिरंतेथेंविटतीपैं ४ कमलसुवाससेवितीभ्रमर । परीतोस्वादनजाणेदर्दुर । हंसघेतोमुक्तांचाचारें । परीतोबकासीप्राप्तनाहीं ५
दुग्धदोहोनिनेतीइतर । गोचीडतेथेंअहोरात्र । वसेपरिप्राप्तीत्यासरुधिरें । नेणेक्षीरेंमतिमंदतो ६ कींवसंतकाळींकोकिळा । पंचमस्वरेंआळविती
रसाळा । काकेंजातितैशासकळा । परीतयांतोस्वरनव्हेची ७ बलाहकगर्जनाकरितोगगनीं । मयूरनाचतीपिच्छेंपसरुनी । परितेकळाव्रुषभांनीं ।
नेणिजेजैसीसर्वथा ८ चकोरचंद्रामृतसेविती । परितेकळाकुक्कुटनेणती । ह्मणोनिश्रोतामंदमती । सहसाहीनभेटावा ९ श्रोताभेटलियाचतुर ।
ग्रंथरसवाढेअपार । जेवीवीरसंघटतांथोर । रणचक्रींरंगभरे १० असोएकादशाध्यायाचेअंतीं । चित्रकूटींराहिलारघुपती । सुदर्शनगंधर्वनिश्चितीं
काकरूपेंउद्धरिला ११ उपरीसिंहावलोकनेंकरूनतत्वता । श्रोतींपरिसावीमागीलकथा । दळभारेंसींभरततत्वतां । चित्रकूटासमीपआला १२
तंवतोभूधरेंअवतार । चित्रकूटाखालींसौमित्र । फळेंवेंचितांतोदळभार । गजरेंयेतांदेखिला १३ वोळखिलाआपलाध्वजसंकेत । आलेकळलेंशत्रुघ्नें
भरत । ह्मणेकैकेयोनेंपाठविलेयथार्थ । वनींरघुनाथवधावया १४ हेयुद्धासीआलेयेथ । जरीरघुनाथासकरूंश्रुत । तरीहेहीगोष्टअनुचित । युद्धअ
द्भुतकरीनमी १५ माझाश्रीरामएकलावनीं । हेआलेदळभारसिद्धकरूनी । तरीजैसावणवालागेवनीं । तैसेंजाळीनसैन्यहें १६ रवीच्याकिर
णावरींदेखा । कैशाचढतीलपिपीलिका । कल्पांतविजूसमशकमुखा । माजीकेवीसांठवील १७ चढूनप्रळयाग्नीचेशिरीं । पन्नगकैसानृत्यकरी ।
ऊर्णनाभीचेतंतुवाभीतरी । वारणकैसाबांधेल १८ तृणपाशेंकरून । कैसाबांधवेलपंचानन । द्विजेंद्रासीअळिकाधरून । कैसीनेईलआकाशा १९
दीपाचेंतेजदेखान । कैसाआह्मळेलचंडकिरण । तैसामीवीरलक्ष्मण । मजजिंकूंनशकती २० भारदेखोनिसमीप । क्षणनलागतांचढविलेंचाप । बा
णसोडिलेअमुप । संख्येरहिततेकाळीं २१ वाटेगडगडितांमहाव्याघ्र । थोकतीजेवीअजांचेभार । तैसेंसोळापद्मेंदळभार । भयाभीतजाहलें २२
त्याबाणांचेंकरावयानिवारण । वीरसरसावलाशत्रुघ्न । दोघांचेंसमानसंधान । बाणेंबाणतोडित २३ एकचंद्रएकमित्र । कींरमावरआणिउमावर । किं

१ अमूल्य. २ आहुति, ३ बहिरे. ४ बेडूक. ५ भक्षण. ६ रक्त. ७ दूध. ८ गायन करिती. ९ कावळ्यांच्या जाति, १० मेघ. ११ लक्ष्मण. १२ शत्रूंचा नाश करणारा ह्मणून शत्रुघ्न

वातेमेरुमंदार । युद्धालागींमिसळले २४ एकसमुद्रएकनिराळ । एकदावाग्निएकवडवानळ । एकगदाएकचक्रनिर्मळ । विष्णुआयुधेंभीडती २५ एकवासुकीएकभार्गींद्र । एकवसिष्टएकविश्वामित्र । तैसेशत्रुघ्नआणिसौमित्र । बाणसोडितपरस्परें २६ एकावरीएकसोडितीबाण । तेवरचेवरउ ढवितीसंपूर्ण । बाणमंडपझालासघन । चंडकिरणतेणेंनदिसेची २७ रामनामबीजांकित । बाणसुटतीसतेजमंडित । रघुनाथनामगर्जत । सुसाटे निघतयेतांची २८ वाटेवोढवलाप्रळयकाळ । वनचरांसर्वांसुटलापळ । ऋषीश्वरपळतीसकळ । कडेवेंघतीपर्वताचे २९ सांडोनिगुंफातपाचर ण । पळतीआपुलाजीवघेऊन । एकधांवतांधांपादाटून । मूर्च्छायेऊनिपडियेले ३० एकह्मणतीराक्षसदळ । आलेंरामावरीतुंबळ । येणेंमखरक्षणीं राक्षससबळ । वीसकोटीनिवटिले ३१ तेंवैरस्मरोनिअंतरीं । सत्यहेआलेराघवावरी । आतांसौमित्राचीकैंचीउरी । अनर्थनिर्धारींवोढवला ३२ असोऋषीश्वरसमस्त । आलेजेथेंरघुनाथ । गोष्टीसांगतांबोबडीवळत । संकेतदावितीएककरें ३३ एकरुदनकरूनिफोडितीहांका । वेगेंपळवींज नककन्यका । आतांगूढविवरींलपवींकां । रघुनायकाऊठवेगीं ३४ नभरेजोंअर्धनिमिष । तोंचढविलेंश्रीरामेंधनुष्य । जैसाउगवलाचंडांश । गुं फेबाहेरतैसाआला ३५ ऋषींसह्मणेअयोध्यानाथ । तुह्मींमनींनव्हावेंदु:खित । काळहीविघ्नकरूंआलियायेथ । खंडविखंडकरीनबाणीं ३६ पड त्याआकाशादेईनधीर । रसातळाउर्वीजातांकरीनस्थीर । तुह्मींबैसाधरूनिधीर । तपश्चर्याकरीतबैं ३७ अथवाकरावेंअध्ययन । न्यायमीमांसा सांख्यज्ञान । पातंजलीअथवाव्याकरण । याचीचर्चाकरावी ३८ असोपाठीसिघालूनब्राह्मण । पुढेंचालिलारघुनंदन । तोंध्वजचिन्हेंबोळाखिलींपूर्ण शत्रुघ्नबाणटांकीतसे ३९ आपलेभेटीकारणेंउत्कंठित । सद्गदितझालाभरत । लक्ष्मणापासींसीतानाथ । क्षणनलागतांपातला ४० मगह्मणेसौ मित्रासी । बारेभरतआलाभेटीसी । तूंकिमर्थत्यासींयुद्धकरिसी । पाहामानसींविचारूनी ४१ ऐसेंबोलतांराजीवनेत्र । परिवीरश्रियेनेंवेष्टिलासौमि त्र । सोडितांनराहेशरं । मगरघुवीरकायकरी ४२ हातींचेंधनुष्यहिरूनी । श्रीरामेंघेतलेंतेक्षणीं । सौमित्रलागलाश्रीरामचरणीं । हास्यवदनक रूनियां ४३ श्रीरामेंवारितांफणिपाळ । अवघेंवितळलेंबाणजाळ । जैसेंनिजज्ञानठसतांकेवळ । मायापडळजेवींविरे ४४ भरतासहितअयोध्ये चेजन । सर्वींविलोकिलारघुमंदन । जैसानिशासंपताचंडकिरण । उदयाचळींविराजे ४५ तोंभरतासीनधरवेधीर । सप्रेमेंधांवघेतलीसत्वर । वाटे सीसाष्टांगनमस्कार । वारंवारघालीतसे ४६ कींबहुतदिवसमातागेली । तेबाळकेंसमीपदेखिली । कींगायवनींहूनिपरतली । वत्सेंआटोपिलींधां

१ खूण. २ सूर्य. ३ धर्मशास्त्र, व आत्मा व अनात्मा यांचा विचार. ४ बाण. ५ लक्ष्मण. ६ समुदाय. ७ पडदा. ८ रात्र. ९ पर्वत.

वोनियां ४७ कींक्षीराब्धीदेखोनित्वरित । धांवघेतक्षुधाक्रांत । कींमृगजळदेखोनिनिश्चित । मृगधांवतीउष्णकाळीं ४८ कींसफळदेखोनि दिव्यद्रुमें । झेंपावेजैसाविहंगमें । भरतेंधरूनितैसाराम । चरणसरोजींस्पर्शिला ४९ जैसेंलोभियाचेंजीवित्वधन । तैसेंभरतेंधरिलेदृढचरण । नय नोदकेंकरून । केलेंक्षाळणरामपायां ५० मगउचलोनिदोहींकरीं । बंधूसीआदरेंहृदयींधरी । जैसाजयंतपुत्रसहस्त्रनेत्रीं । प्रीतीकरूनिआ लिंगिला ५१ कींक्षीरसागरींलहरियाउठती । त्याएकांतएकमिसळती । कींवेदांतशास्त्रींश्रुती । ऐक्यायेतीपरस्परें ५२ तैसाआलिंगिलाभर त । तोंशत्रुघ्नलोटांगणघालित । परमप्रीतींरघुनाथ । आलिंगनदेततयातें ५३ सकळअयोध्येचेब्राह्मण । रामासीभेटतीप्रीतीकरून । सर्वदळ भारप्रजाजन । करितीनमनरामासी ५४ लक्ष्मणभरतशत्रुघ्न । परस्परेंदेतीक्षेमालिंगन । मगसुमंतप्रधानेंयेऊन । श्रीरामचरणवंदिले ५५ मगसुमंतह्मणेरघुराया । पैलवसिष्ठआणिदोघीमाया । तंवत्यादशरथकुळवर्या । धीरनधरवेतेकाळीं ५६ सामोराचालिलारघुनंदन । भोंवतेअ पारअयोध्याजन । जैसाकांवेदोनारायण । अनेकश्रुतींवेष्ठिला ५७ येऊनियांवसिष्ठाजवळीं । रामेंगुरुचरणवंदिलेभाळीं । जैसामदनदहनाचेच रणकमळीं । स्कंदठेवीमस्तक ५८ तोंकौसल्यासुमित्रामाता । त्यांचींवहनेंजवळींदेखतां । धांवोनियेतांरामसुमित्रासुता । उतरतीखालत्यादोघीज णी ५९ कौसल्येचेचरणींमस्तक । ठेऊनिबोलेरघुनायक । ह्मणेसुखींकींममजनक । श्रीदशरथदयाब्धी ६० तोंझालाएकचिकल्लोळ । रुदनकरितीलो कसकळ । सुमित्राकौसल्येसीदुःखबहुसाल । नाहींपारतयातें ६१ वसिष्ठह्मणेरघुनाथा । तुझावियोगनसाहेदशरथा । रामरामह्मणतांमोक्षपंथा । गे लातत्काळजाणपां ६२ वचनऐसेंऐकतांकानीं । करुणासागरमोक्षदानी । विमळांबुधारानयनीं । तेचक्षणींचालिल्या ६३ स्फुंदस्फुंदोनिविलाप थोर । पित्यालागींकरीरघुवीर । ह्मणेपूर्णसत्याचासागर । श्रीदशरथवीरजो ६४ ज्याचेयुद्धाचीठेव । पाहातीमानवइंद्रादिदेव । वृषपर्वाशुक्रादि सर्व । दैत्ययुद्धींजिंकिले ६५ श्रोतेह्मणतीनवलयेथ । पुराणपुरुषरघुनाथ । तोशोकार्णवींपडिलाहीमात । असंमतदिसतसे ६६ जोजगद्वंद्यआ त्माराम । जोविश्वबीजफळांकितद्रुम । तोशोकाकुळितपरब्रह्म । पितयालागींकांजाहला ६७ विषकंठआलाकींक्षीरसागरा । उष्णताव्यापिली रोहिणीवरा । पक्षिवर्यात्याखगेंद्रा । सर्पबाधाकेविंझाली ६८ चिंतामणीदरिद्रेंव्यापिला । कल्पवृक्षकेवीनिष्फळझाला । प्रळयाग्नीचेडोळां । अंधत्व केवींपातलें ६९ तंववक्तादेतप्रत्युत्तर । श्रोतींऐकिजेसादर । पूर्णब्रह्मानंदरघुवीर । मानवलोकींअवतरला ७० जगद्गुरुदेवाधिदेव । दावीमा

---

१ हरण. २ झाडें. ३ पक्षी. ४ चरणकमल. ५ इंद्र. ६ माता ( कौसल्या व सुमित्रा. ) ७ दशरथाचे कुळांत श्रेष्ठ रामचंद्र. ८ शंकराचे. ९ कार्तिकस्वामी. १० बाप ( दशरथ. )

येचेंलाघव । **अवतारकारणाचीठेव** । लौकिकभावदाविला ७१ नटजोजोधरीवेष । त्याचीसंपादनीकरीविशेष । यालागींजगदात्माआदिपुरुष । दाखवीआवेशमायेचा ७२ ऐसीउघडतांशब्दरत्नमांदूस । गुणग्राहकश्रोतेपावलेसंतोष । संदेहरहितानिःशेष । जेवितमनासेसूर्योदयीं ७३ कींवैराग्येंनिरसेकाम । ज्ञानेंवितळेजेविभ्रम । जैसानिधानांतूनिपरम । दारुणसर्पनिघाला ७४ करितांसंशयाचेंनिरसन । मागेंराहिलेंअनुसंधान । तरीयेगोष्टीसदूषण । सर्वथाहीनठेवावें ७५ ग्रासामाजीलागलाहरळ । तोकाढावयालागेलवेळ । कींअनध्यायामाजीरसाळ । वेदाध्ययनराहिलें ७६ चोरवाटचुकवावयापूर्ण । अधिकलागलाएकदिन । तरितेगोष्टीतेंदूषण । कदांसज्ञाननठेविती ७७ रात्रीमाजीसत्कर्मराहती । परिसूर्योदयींसवेंचिचालती । छायेसपांथिकबैसती । सवेंचजातीनिजमार्गें ७८ समुद्राचेंभरतेंवोहटे । सवेंचमागुतीविशेषदाटे । कींचपळतुरंगचपेटे । विसावाघेऊनिमागुती ७९ तेवीपरिसापुढीलकथार्थ । आठवोनिपितादशरथ । शोकाकुळितजनकजामात । एकक्षणजाहला ८० मगवसिष्ठह्मणेश्रीरामा । प्रयागाप्रतिजाऊनिगुणग्रामा । उत्तरक्रियाकरूननिजधामा । दशरथासीबोळविजे ८१ कित्येकप्राकृतकवीबोलत । कींपतंनींपडिलादशरथ । परिहेगोष्टीअसंमत । बोलतांअनर्थवाचेसी ८२ जयाचेंनामघेतांआवडीं । जीवउद्धरतीलक्षकोटी । तोआपुलापितापतनींपाडी । काळत्रयींनघडेहें ८३ असोगयेप्रतियेऊन । उत्तरक्रियासर्वसारून । पितानिजपदींस्थापून । आलेपरतोनिचित्रकूटा ८४ सकळऋषिआणिअयोध्याजन । बैसलेश्रीरामासीवेष्टून । मगभरतेंघालोनिलोटांगण । करजोडूनिउभाठाकला ८५ ह्मणेजयजयाजीपुरुषोत्तमा । मायाचक्रचाळकापूर्णब्रह्मा । विरिंचिजनकासुखविश्रामा । मंगळधामारघुराया ८६ हेरामकरुणासमुद्रा । हेरविकुळभूषणाराघवेंद्रा । सत्रानंदसदनारामचंद्रा । प्रतापरुद्राजगद्गुरू ८७ हेरामरावणदर्पहरणा । हेरामभवहृदयमोचना । हेरामअहिल्योद्धारणा । मखरंक्षणासीताधवा ८८ हेरामकौसल्यागर्भरत्ना । हेराममायाअपारश्रममोचना । सनकसनंदनमानसरंजना । निरंजनानिजरूपा ८९ दानवकाननवैश्वानरा । ममहृदयारविंदभ्रमरा । अज्ञानतिमिरछेदकदिवाकरा । समरधीरासर्वेशा ९० हेरामभक्तचातकजलधरा । प्रेमचकोरवेधकचंद्रा । संसारगजछेदकमृगेंद्रा । अनंगमोहनाअनंगा ९१ उपवासीमरतांचकोर । त्याचेधांवण्याधांवेचंद्र । कींअवर्षणपडतांजलधर । चातकालागींधांवेकां ९२ कींचिंताक्रांतासीचिंतामणी । सांपडेपूर्वभाग्येंकरूनी । कींदरिद्रियाचेअंगणीं । कल्पवृक्षउगवला ९३ कींपतिव्रतेसीप्राणनाथभेटला । कींक्षधितापुढेंक्षीराब्धिआ

१ खडा. २ वैकुंठास. ३ अधोगती पावणें. ४ ब्रह्मदेवाच्या बापा. ५ गर्व. ६ यज्ञ. ७ धव ह्मणजे पति ( राम. ) ८ अज्ञानरूप अंधकार. ९ मेघ. १० सिंह. ११ मदन.

ला । कींसाधकासीनिधीजोडला । आनंदझालातैसाआह्मां ९४ हंसेंदेखिलेंमानससरोवर । कींप्रेमळाभेटलाउमावर । कींसंकल्पींद्रव्यअपा
र । दुर्बळब्राह्मणासीदीधलें ९५ तैसाआनंदझालाजनांसी । आतांसत्वरचलावेंअयोध्येसी । सांभाळावेंबंधुवाआह्मांसी । श्रीदशरथाचेनिन्यायें
९६ आपुलेंराज्यसांभाळावें । गोब्राह्मणाप्रतिपाळावें । आमुचेमनोरथपूर्णकरावे । आतांपरतावेंसत्वर ९७ जननीआमचीपरमचतुर । मजदेत
होतीराज्यभार । जैसेंछेदोनियांशिर । गुडघ्यासपूजाबांधिली ९८ पूज्यमूर्तीवोसंडोन । जैसेगुरवाचेधरितीचरण । राजकुमरंसांडोन । कन्यादिध
लीअजांरक्षका ९९ पाडोनिदेवळाचेंशिखर । घातलेंभोंवतेंआवार । नागवूनियात्रासमग्र । अन्नसत्रघातलें १०० फणसटांकोनिरसाळ । प्री
तीनेंघेतलेंकनंकफळ । मुक्तसांडोनितेजाळ । गुंजजैसीघेतली १ गारघेऊनिटांकिलाहिरा । अंधकारघेऊनित्यजिलेंदिनकरा । पाचभिरकावूनिस
त्वरा । कांचबळेंरक्षिली २ परिसत्यागूनिघेतलाखडा । पंडितदवडूनिआणिलावेडा । चिंतामणीटाकूनिरोकडा । पलांडूघेतलाबळेंची ३ अमृ
तटाकूनिघेतलेंकांजी । कल्पवृक्षतोडोनिलाविलीभाजी । कामधेनूदवडोनिसहर्जी । अजांपूजीआदरें ४ निजसुखटाकूनिघेतलेंदुःख । कस्तूरीटा
कूनिघेतलीराख । सोनेंटाकूनिसुरेख । शेणजैसेंघेतलें ५ सांडोनियांरायकेळें । आदरेंभक्षिलींअर्कीफळें । ज्ञानसांडोनिघेतलें । अज्ञानजाणव
ळेंची ६ तैसेंकैकेयीनेंकेलेंसाचार । वनादवडोनिजगदोद्धार । मजद्यावयाराज्यभार । सिद्धझालीसाक्षेपें ७ सर्वअपराधकरूनिक्षमा । अयोध्ये
सीचलावेंश्रीरामा । याउपरीजगदात्मा । कायबोलिलातेंऐका ८ सूर्यमार्गचुकेकरितांभ्रमण । नेत्रींअंधत्वपावेअग्न । मशकाचीथडकलागून ।
जरीमेरूपडेल ९ पाषाणप्रहारलागून । वायूपडेलमोडोनिचरण । कींपिपीलिकाशोषीसिंधुजीवन । विजूसीधांवूनिमशकधरी ११० धडधडीत
अग्निज्वाळ । कर्पूरतुषारेंहोयशीतळ । हेंहीघडेलएकवेळ । परिवचनासचळनोहेमाझे ११ एकबाणएकवचन । एकपत्नीव्रतपूर्ण । चौदावर्षेंभर
त्याविण । कदापिआगमनघडेना १२ ऐसेंनिश्चयाचेंवचन । बोलताजाहलारघुनंदन । अग्नीनेंआहाळेजैसेंसुमन । तैसेंभरताजाहलें १३ मग
भरतेंचेतविलाजातवेद । प्राणद्यावयाजाहलासिद्ध । ह्मणेहादेहकरीनदग्ध । रामवियोगमजनसोसवे १४ तंवमहाराजवाल्मीकमुनी । भरतासएकां
तींनेउनी । मूळकाव्यार्थअवघाकार्नी । भविष्यार्थसांगीतला ११५ तोऐकतांकैकेयीसुत । उगाचराहिलानिवांत । मगयेऊनिजनकजामात । ह
दयींधरीभरतातें १६ आपुल्याहस्तेंकरून । पुसिलेभरताचेनयन । करेंकुरवाळिलेंवदन । समाधानकरीतसे १७ देवबंदीचेसोडवून । चौ

१ दशरथाप्रमाणें. २ राजपुत्र. ३ मेंढपाळ, धनगर. ४ धोत्र्याचें फळ. ५ कांदा. ६ शेळी. ७ रुइचें फळ. ८ मुंगी. ९ समुद्राचें पाणी.

दावर्षांतयेतापरतोन । मगवरदहस्तउचलून । भाषदिधलीभरतातें १८ चौदावर्षेंचौदादिन । पंधरावेदिवसींपूर्ण । मध्यान्हायेतांचंडकिरण । भेटेनयेऊनतुजलागीं १९ भरतह्मणेहानेमटळतां । मगदेहत्यागीनतत्वता । श्रीरामचरणींठेविलामाथा । प्रेमावस्थाअधिक १२० भरत मागुताउठोन । विलोकीश्रीरामाचेंवदन । अमलदळराजीवनयन । तैसाचिहृदयींरेखिला २१ भरतसद्गदबोलेवचन । मीअयोध्येसीनजायपर तोन । सकळमंगळभोगस्नान । त्यजूनिराहीननंदिग्रामीं २२ अवश्यह्मणेरघुनायक । मणिमयपादुकासुरेख । भरतासीदिधल्याशोकहरक । ये रेंमस्तकींवंदिल्या २३ शिवमस्तकींविराजेचंद्र । तैशाशिरींपादुकासुंदर । शोकहरपलासमग्र । शरीरशीतळजाहलें २४ जैसेंकंठींधरितांनामस्म रण । शीतळजाहलापार्वतीरमण । तैसाचप्रेमळभरतजाण । अंतरींपूर्णनिवाला २५ शत्रुघ्नासिह्मणेरघुनाथ । तूंआणिप्रधानसुमंत । राज्यभार चालवासमस्त । यथान्यायेंकरूनियां २६ सदास्तवावेसंतसज्जन । श्रीगुरुभजनींसावधान । दूरत्यागावेदुर्जन । त्याचेंअवलोकननकरावें २७ परदाराआणिपरधन । तेथेंकदांनठेविजेमन । वेदमर्यादानुलंघावीपूर्ण । प्राणांतहीझालिया २८ जरीक्लेशकाळपातलाबहुत । परिधैर्यन सांडावेंयथार्थ । गुरुभजनपुण्यपंथ । नसोडावासर्वथा २९ साधुसंतगोब्राह्मण । त्यांचेंसदांकरावेंपाळण । सकळदुष्टांसदवडोन । स्वधर्मपूर्ण रक्षावा १३० कथाकीर्तनपुराणश्रवण । काळक्रमावायेणेंकरून । आपुलावर्णाश्रमधर्मपूर्ण । सर्वथाहीनत्यजावा १३१ संतांचानकरावामा नभंग । हरिभजनींझिजवावेंअंग । सांडोनिसर्वकुमार्ग । सन्मार्गेंचिवर्तावें १३२ ऋषींचेआशीर्वादघ्यावे । वर्मकोणाचेंनबोलावें । विश्वअवघें जाणावें । आत्मरूपीनिर्धारें १३३ सत्संगधरावाआधीं । नायकावीदुर्जनाचीबुद्धी । कामक्रोधादिकवादी । दमवावेनिजपराक्रमें ३४ मीज्ञा तोंसज्ञान । हानकरावाअभिमान । विनोदेंहीपरांचेंछळण । नकरावेंसहसाही ३५ शमदमादिकसाधनें । दूरनकरावींसाधकानें । जनजातीआ डवाटेनें । त्यांसीसुमार्गदाविजे ३६ शोकमोहाचेचपेटेपूर्ण । अंगींआदळतीयेऊन । विवेकवोडणपुढेंकरून । ज्ञानशस्त्रयोजावें ३७ कामक्रो धमदमत्सर । हेगृहासीयेऊंनद्यावेतस्कर । आयुष्यक्षणिकजाणोनिसाचार । सारासारविचारावें ३८ क्षणेकजाणोनिसंसार । सोडावाविषया वरीआदर । सद्गुरुवचनींसादर । सदांचित्तठेविजे ३९ दैवेंआलेंभाग्यथोर । त्याचागर्वनधरावाअणुमात्र । एकदांचिगेलेंजरीसमग्र । कदांधी रनसांडावा ४० कमळपत्राक्षकृपानिधान । वर्षतस्वातीजलपूर्ण । तेंसुमंतआणिशत्रुघ्न । कर्णशुक्तिकेंतसाठविती ४१ शब्दामृतवर्षेंरामचंद्र ।

---

१ विपत्तिकाळ, संकटसमय. २ आपल्यासारखें. ३ दुसऱ्याचें. ४ ज्ञानेंद्रियांचा व कर्मेंद्रियांचा जय. ५ ढाल. ६ चोर. ७ श्रीराम. ८ स्वाती नक्षत्राचें पाणी. ९ कानरूप शिंपल्यांत.

निवालेभरतकर्णचकोर । कींरामवचनक्षीरसागर । उपमन्युभरतसाचारतेथें ४२ सूर्यउगवतांनिरसेतमजाळ । तैसेंश्रीरामवचनेंझालेंहृदयनिर्म
ळ । मगभरतपरतोनितत्काळ । नंदिग्रामींराहिला ४३ करूनिमातेचेंसमाधान । सकळब्राह्मणप्रजाजन । सुमंतआणिशत्रुघ्न । पाठवीपरतोन
अयोध्ये ४४ श्रीरामपादुकासिंहासनीं । शत्रुघ्नेंवरीछत्रधरूनी । मगराज्यचालवीअनुदिनीं । नामस्मरणींसावध ४५ क्षणक्षणांयेतनंदिग्रामा
सी । मागुताजायअयोध्येसी । सकळपृथ्वीच्याराजांसी । धाकभरतशत्रुघ्नांचा ४६ प्रतिसंवत्सरींकरभार । भूपाळदेतीसमग्र । असोनंदिग्रामींभ
रतवीर । निर्विकारबैसला ४७ नंदिग्रामाजवळअरण्यांत । पर्णकुटीकरूनराहेभरत । श्रीरामपादुकाविराजत । रात्रदिवसमस्तकीं ४८ जे
आवडतेश्रीरामभक्त । तेहीभरताऐसेविरक्त । कनककामिनीगृहसुत । त्यागकरूनीबैसले ४९ वटदुंग्धींजटावळूनी । सकळमंगळभोगत्यजोनी ।
वल्कलेंवेष्टूनितृणासनीं । बैसलेध्यानींश्रीरामाचे ५० नक्षत्रांतजैसाचंद्र । तैसामध्येंभरतसाचार । रात्रदिवसरामचरित्र । भरतसांगेसमस्तांतें
५१ किंवामानससरोवरीं । बैसतीराजहंसांच्याहांरी । भरतासभोंवतेतैशापरी । वेष्टूनियांबैसले ५२ श्रीधरह्मणेश्रोतयांसमस्तां । चित्तद्यावेंपु
ढिल्याश्लोकार्था । रघुनाथचित्रकूटींअसतां । कायकथावर्तली ५३ कवीचीशब्दरत्नमांदुस । उघडितांपंडितपावतीसंतोष । इतरकुबुद्धिमतिमंदा
स । रत्नपरीक्षानकळेहो ५४ असोचित्रकूटींअसतांरघुनंदन । मिळोनिबहिर्मुखब्राह्मण । ह्मणतीरामातूंजांईयेथुन । आह्मासींविघ्नेंतुझेनी
५५ तुझीस्त्रीपरमसुंदर । न्यावयाजपतीअनेकअसुरें । वाल्मीकभाष्यहीसाचार । ऐसेंचअसेजाणपां ५६ वर्नींहूनिवार्ताआलीसाचार । त्रि
शिरादूषणआणिखर । दळभारेंसींयेथेंयेणार । तुजकरितांरघुवीरा ५७ ह्मणोनिसांगतोंआह्मीतुजसी । येथोनिजाईंनिश्चयेसीं । नाहींतरीआह्मी
स्वाश्रमासीं । त्यजोनिजाऊंनिर्धारें ५८ श्रीरामह्मणेब्राह्मणालागुनी । तुह्मीनिश्चिंतअसावेंअंतःकरणीं । मीकाळहीफोडीनसमरंगणीं । राक्ष
सांतेंगणीकोण ५९ परमअविश्वासीब्राह्मण । ह्मणतीविघ्नेंयेतीयेथेंदारुण । हाआपलीस्त्रीरक्षीलजाण । कींआह्मांसीरक्षील १६० हात्यांसी
नपुरेसमरंगणीं । चारीबाणजातीसरूनी । याच्याबोलाचाविश्वासधरूनी । कदांयेथेंनराहावें ६१ मगसकळींकरूनिएकविचार । रात्रींचउठो
नियांसमग्र । कुटुंबेंघेउनीसत्वर । गेलेविप्रपळोनियां ६२ उपरीप्रातःकाळींउठोन । श्रीरामपाहेऋषिजन । तंवतेरात्रींचगेलेपळून । राजीवन
यनकायकरी ६३ एकवाल्मीकिउरलापूर्ण । तोमहाराजतपोधन । भूतभविष्यवर्तमान । त्रिकाळज्ञानजयासी ६४ वायुसंगेंउडेतृण । परि

---

१ सोनें, स्त्री, पुत्र, घर इत्यादि. २ वडाच्या झाडाचा चीक. ३ ओळी, पंक्ती. ४ पेटी. ५ दुसऱ्याचें सांगणें ऐकणारे. ६ राक्षस. ७ आपलें घर.

अचेळनसोडीकदास्थान । किंवारणमंडळसोडून । रणशूरकदांपळेना ६५ तैसावाल्मीकउरलाजाण । तेणेंआधींचकथिलेंरामायण । इतरबहि र्मुखब्राह्मण । श्रीरामनिधाननोळखती ६६ प्रत्ययानयेतांरघुवीर । आचारतितकाअनाचार । कर्मतोचभ्रमथोर । पिशाचनरतेचिपैं ६७ तेणेंकेलेंवेदपठण । करतळामळशास्त्रेंप्रमाण । परितेंमद्यपियाचेंभाषण । राघवाशरणनजातां ६८ जैसीमुग्धांबत्तीसलक्षणी । परमसौंदर्यलाव ण्यखाणी । परीमननाहींपतिभजनीं । तरीतेंसर्वहीवृथागेलें १६९ खरंपृष्ठीसचंदनदेख । परीतोनेणेसुवाससुख । षड्रसींफिरविजेदर्वीपाक । रसस्वादनेणेतो १७० कृपानकरितांसीतावर । कायसाव्यर्थतत्वविचार । त्याचेंज्ञाननव्हेसाचार । जैसेंकीरंअनुवादंती १७१ तेणेंकेलेंतीर्थाट ण । होयचौसष्टिकळाप्रवीण । तेणेंकेलेंजरीकीर्तन । तेंजाणगायनगोरीयाचें १७२ असोरघुपतीससांडोनिविप्र । पळोनगेलेसमग्र । जगद्वंद्य रघुवीर । त्याचेंस्वरूपनेणोनियां ७३ असोआतांबहुभाषण । श्रीरामचित्रकूटत्यागोन । वाल्मीकऋषींसनमून । दंडकारण्याचालिला १७४ श्रीरामविजयग्रंथप्रचंड । येथेंसंपलेंअयोध्याकांड । आतांअरण्यकांडइक्षुदंड । अतिअपूर्वसुरसपुढें ७५ रामविजयग्रंथक्षीरसागर । दृष्टांतर त्नेंनिघतीअपार । संतश्रोतेनिर्जर । अंगीकारोतसर्वदां ७६ ब्रह्मानंदारविकुळभूषणा । श्रीधरवरदासीताजीवना । पुढेंअरण्यकांडरचना । बो लवींआतांयेथोनी ७७ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मीकीनाटकाधार । सदांपरिसोतभक्तचतुर । द्वादशोऽध्यायगोडहा १७८ । श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु । । श्रीमज्जगदीश्वरार्पणमस्तु । । अध्याय । १२ । । ओव्या । १७८ । । ७ ।

१ स्थानापासून न हालणारा म्हणून अचल हें नांव (पर्वत). २ अनुभवास. ३ स्त्री. ४ गाढव. ५ पळी. ६ राघु. ७ बोलणें. ८ नट.

श्रीगणेशायनमः । श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । संस्कृतापासावकेवळ । झालीप्राकृतभाषारसाळ । स्वातीजलापासूनमुक्ताफळ । अतितेजाळनि
पजेपैं १ चंद्राचेआंगींनिपजेचांदिणें । कींदिनकरापासावजेविकिरणें । कींजंबुफळापासावसुवर्ण । दिव्यबावन्नकसीनिपजतसे २ कींदह्यापा
सावनंवनीत । अभ्यासापासावज्ञानअद्भुत । कींइक्षुदंडापासावनिपजत । रसभरितशर्करा ३ कींपुष्पापासावपरिमळ । कींरंभेपासावकर्पूरशीत
ळ । मृगापासावपरिमळ । मृगमदजेविनिपजे ४ कथालक्षणसरितानाथ । साहित्यतरंगअपरिमित । प्रेमळलहरियाअद्भुत । ऐक्यायेतपररूपरें
५ अमृताहूनगोडअन्न । परिरुचीनयेशाखेविण । दृष्टांताबीणग्रंथसंपूर्ण । रसींनचढेसर्वथा ६ अलंकारेंशोभेनितंबिनी । कींगगनमंडितउडु
गणीं । कींमानससरोवरराजहंसावांचोनी । शोभानदिसेसर्वथा ७ कींमननावीणश्रवण । कींसद्भावावीणकीर्तन । कींक्षेत्रजैसेंबीजेंवीण । दृष्टांता
वीणग्रंथतैसा ८ कींसभाजैसीपंडितावीण । कींसुस्वरावीणगायन । कींशुचीवीणतपाचरण । दृष्टांतावीणग्रंथतैसा ९ कींविरक्तीवीणज्ञान ।
कींप्रेमेंवीणव्यर्थभजन । कींदानेंवीणभाग्यपूर्ण । दृष्टांतावीणग्रंथतैसा १० अरण्यकांडअरण्यांत । दृष्टांतवृक्षविराजत । तेथेंआनंदफळेंपंडित ।
सदांसेवोतस्वानंदें ११ आतांअरण्यकांडवसंतवन । तेथेंवाग्देवीचिच्छक्तीपूर्ण । क्रीडाकरीतउल्हासेंकरून । संतसज्जनपरिसोतकां १२ अ
सोचित्रकूटाहूनिरघुनाथ । सीतासौमित्रासमवेत । निजभक्तांसीउद्धरित । जगन्नाथजातसे १३ दक्षिणपंथेंजनकजामात । सकळऋषींचेआश्रम
पाहात । त्रयोदशवर्षेंपर्यंत । रघुनाथक्रमीतऐसेंची १४ कोठेंवर्षकोठेंअयेंन । कोठेंमासकोठेंपक्षपूर्ण । कोठेंएकरात्रकोठेंएकदिन । कोठेंपंच
रात्रीक्रमियेल्या १५ मगअत्रीचियाआश्रमाप्रती । येताझालाजनकजापती । तोंदेखिलीदत्तात्रेयमूर्ती । अविनाशस्थितीजयाची १६ सह्या
द्रीवरीश्रीराम । अजअजितघनश्याम । श्रीदत्तात्रेयपूर्णब्रह्म । देतक्षेमतयातें १७ क्षीरसागरींच्यालहरिया । उचंबळतीएकवटलिया । कींजा
न्हवीआणिमित्रतनया । एकेठायींमिळताती १८ नानावर्णगाई । परिदुग्धासदुजावर्णनाहीं । तैसाजनकजांवई । अत्रितनयसमरसले १९
अवतारहीउदंडहोती । सवेंचमागुतीलयासजाती । तैसीनव्हेश्रीदत्तात्रेयमूर्ती । नाशकल्पांतींनव्हेची २० पूर्णब्रह्ममुसावलें । तेंहेंदत्तात्रेयरूपावो
तिलें । ज्याचेंविलोकनेंमात्रतरले । जीवअपारत्रिभुवनीं २१ सकळसिद्धऋषीनिर्जर । विधीवाचस्पतीशचीवर । दत्तात्रेयदर्शनासादर । त्रिका
ळयेतीनिजभावें २२ अद्यापिसह्याद्रीपर्वतीं । देवांचेभारउभेराहाती । सर्वब्रह्मांडांचींदैवतेंधांवती । अवधूतमूर्तीपाहावया २३ घेतांदत्तात्रेय

१ स्वातीच्या पाण्यानें. २ मोत्यें. ३ जांभळीचा वृक्ष. ४ लोणी. ५ ऊंस. ६ सुवास. ७ केळ. ८ कस्तुरी. ९ समुद्र. १० स्त्री. ११ नक्षत्रें. १२ सहा महिने. १३ पंधरा दिवस.

दर्शन । देवांसीचढेसामर्थ्यपूर्ण । मगतेइतराहोतीप्रसन्न । वरदानद्यावयातें २४ ज्यासीप्रयागींप्रातःस्नान । पांचाळेश्वरींअनुष्ठान । करवीर
पुरांतयेऊन । भिक्षाटणमाध्यान्हीं २५ अस्ताजातांवासरमणी । सह्याद्रीसजायपरतोनी । तोंदेवांचेभारकरजोडोनी । वाटपाहातीअगोदर
२६ दृष्टींदेखतांदिगंबर । एकचिहोयजयजयकार । असंख्यवाद्यांचेगजर । अद्यापिभक्तऐकती २७ दत्तात्रेयभक्तदेखतांदृष्टीं । सकळदैवतें
जींजींसृष्टीं । तींतींघालितीमिठी । पुढेंटाकतीकरजोडूनी २८ करितांदत्तात्रेयस्मरण । भूतेंप्रेतेंपळतीउठोन । मगउपासकांसींविघ्न ।
कवणकरूंशकेल २९ असोऐसास्वामीअवधूत । जोअत्रीचामहापुण्यपर्वत । तयासवंदोनीरघुनाथ । अत्रिदर्शनघेतलें ३० तंवतेअनुसूयास
ती । सीतारामतियेसीवंदिती । सीतेसीआलिंगूनिप्रीतीं । वरदेतीजाहली ३१ आपुलेनिढळींचेंकुंकुमकाढिलें । सीतेच्यामस्तकींलाविलें । अमल
वस्त्रनेसविलें । नमळेनविटेकल्पांतीं ३२ गळांघातलासुमनेंहार । जोकधींनसुकेसाचार । जैसानित्यनूतनदिवाकर । तेजअणुमात्रढळेना ।
३३ सीतेचेंसुवासशरीर । अनुसूयाकरीनिरंतर । जेसुवासेंअंबर । परिपूर्णहोयपैं ३४ भेटतांराक्षसदुर्धर । सीतेसिभयनवाटेअणुमात्र । ऐसा
दिधलाअभयवर । अनुसूयेनेंतेधवां ३५ सवेंचिरेणुकेचेंदर्शन । घेतरविकुळभूषण । जीच्यावरदेंभार्गवेंपूर्ण । निःक्षत्रीकेलीधरित्री ३६ ते
मूळपीठनिवासिनीशक्ती । तीसवंदीअयोध्यापती । श्रीरामाचीमूळप्रकृती । आदिमायानिर्धारें ३७ तेप्रथमअवताराचीजननी । जेकौसल्याझा
लीदुसरेनी । श्रीरामस्तवीह्मणोनी । ऐकाश्रवणींसादर ३८ जयजयआदिकुमारिके । जयजयमूळपीठनायिके । सकळसौभाग्यदायके । जग
दंबिकेमूळप्रकृती ३९ जयजयभार्गवप्रियभवानी । भवमोचकभक्तवरदायिनी । सुभद्रकारकेहिमनगनंदिनी । त्रिपुरसुंदरीमहामाये ४० ज
यजयआनंदकासारमराळिके । जयजयचातुर्यचंपककळिके । जयजयशुंभनिशुंभदैत्यांतके । सर्वव्यापकेमृडांनी ४१ जयजयशिवमानसकनक
लतिके । पद्मनयनेदुरितवनपावके । जयजयत्रिविधतापमोचके । निजजनपाळकेअन्नपूर्णे ४२ तवमुखकमळशोभादेखोनी । इंदुबिंबगेलेंविरोनी ।
ब्रह्मादिकेंबाळेंतीन्हीं । स्वानंदसदनींनिजविसी ४३ जीवशिवदोनीबाळकें । अंबेतुवांनिर्मिलींकौतुकें । जीवतुझेंस्वरूपनोळखे । ह्मणोनिपडियेला
आवर्तीं ४४ शिवतुझेस्वरूपींसावचित्त । ह्मणोनितोनित्यमुक्त । ब्रह्मानंदपदहातायेत । तुझेकृपेनेंजननीये ४५ मेळवूनिपंचभूतांचामेळ । तुवां
रचिलाब्रह्मांडगोळ । इच्छापरततांतत्काळ । क्षणेंनिर्मूळकरिसीहें ४६ ऐसेंस्तवोनिचापपाणी । सह्याद्रीवरीदिनत्रयक्रमोनी । अत्रिऋषिचीआ

१ फुलांची माळ. २ परशुरामाची आई. ३ परशुराम. ४ हिमालयाची कन्या. ( पार्वती. ) ५ सरोवर. ६ भवानी. ७ पाप. ८ भवचक्रीं. ९ श्रीराम.

ह्मघेउनी। दक्षिणपंथेंचालिले ४७ अत्रीह्मणेरघुपती । येवनींराक्षसबहूवसती । जतनकरीसीतासती । क्षणहीपरतीनकीजे ४८ अवश्य ह्मणोनीजलजनेत्र। पुढेंचालिलास्मरारिमित्र । पाठीसीभोगींद्रअवतार । वीरसौमित्रयेतसे ४९ त्यामागेंमंगळभगिनी। मंगलकारकविश्वज ननी । स्थीरस्थीरहंसगमनी । मंगळजननीवरीचाले ५० दुरावतांभूमिकन्या। सौमित्रह्मणेराजीवनयना। जानकीमागेंराहिलीजगन्मोहना। उ भाराहेंक्षणभरी ५१ वचनऐकतांजगन्नायक । उभाराहिलाक्षणएक । परमउदारसुहास्यमुख । परतोनपाहेसीतेकडे ५२ तंवतेसुकुमारजन कबाळी । हळूहळूआलीजवळी । जेवीसारांसारविचारनव्हाळी । आत्मसुखासीपाविजे ५३ असोतेंपतिव्रतामंडण । विलोकीश्रीरामाचेंवदन। जयावरूनकोटिमदन । ओंवाळूनटांकावे ५४ परमसलज्जहोऊन । केलेंकिंचितहास्यवदन । जेणेंनिवतोराघवकर्ण । ऐसेंवचनबोलिली ५५ ह्म णेजगद्वंद्यारविकूळभूषणा । विषकंठहृदयचिन्मयलोचना । चरणींचालतांरघुनंदना । बहुतश्रमातेंपावलेती ५६ परमसुकुमारलक्ष्मण । चरणीं चालतांपावलाशीण। वृक्षच्छायेसीजाऊन। गुणसागराबैसावें ५७ रातोत्पलसुकुमार। त्याहूनिपदतुमचेअरुवार। अरुणसंध्यारागाहूनिमिश्र। चर णतळवेसुरवाडले ५८ जेंजान्हवीचेंजन्मस्थान । तेंमीनिजकेशींझाडीन । शीतलउदकेंधुवोन । मगचुरीनक्षणभरी ५९ आजिचेंपेणेंकितीदूर । आहेनकळेसाचार । ऐकतांपद्माक्षीचेंउत्तर । द्रवलारघुवीरअंतरीं ६० ह्मणेसुकुमारचंपककळी । चरणींचालतांबहुश्रमली । ऐसेंबोलतांनेत्रक मळीं । अश्रुआलेराघवाचे ६१ मगआपुलेहस्तेंकरून । कुरवाळीसीतेचेंवदन । मस्तकावरीकरठेवून । श्रमसंपूर्णहरियेला ६२ पर मसुखावलीजनकनंदिनी । पूजोनियांदिव्यसुमनीं । मगआपुल्यामुक्तकेशेंकरूनी । प्रक्षाळूनिचरणचुरीतसे ६३ मगउठोनिचालिलारघुवीर । पाठीसीउभाभोगींद्रअवतार । त्याचेमागेंसीतासुंदर । हंसगतिचमकतसे ६४ तोंवैरभावसांडोनी । वनचरेंपळतीभयेंकरूनी । विराधराक्षस तेक्षणीं । आलाधांवोनिअकस्मात ६५ महाभयानकविशाळशरीर । खदिरांगाराऐसेनेत्र । कपाळींचर्चिलासेंदुर । बाबरझोटीमोकळया ६६ जैसाअग्नीचाओघथोर । तैसीजिव्हालळलळीतभ्यासुर । काजळाचापर्वतथोर । तैसेंशरीरदिसतसे ६७ गळांनरशिरांच्यामाळा। हातींऊर्ध्वशूळ धरिला । सिंहगजवनचरांचामेळा । टोंचिल्यामाळाशूळावरी ६८ शतांचेशतब्राह्मण । रगडीदाढेखालींधरून । वाटेसीलत्ताप्रहारेंकरून । वृ क्षपाडीसमूळीं ६९ पुढेंजातजोंरघुनाथ । मागोनिविराधआलाधांवत । जानकीसधरूनअकस्मात । जाताझालातेवेळीं ७० जैसागृहींतस्करें

---

१ शंकराचा मित्र श्रीराम. २ लक्ष्मण. ३ सीता. ४ पृथ्वी. ५ तत्वविचार. ६ शंकर. ७ कमल. ८ कोमल. ९ भागीरथी. १० खैराच्या निखाऱ्याप्रमाणें ११ चोर.

रिघोनी । धनकुंभजायघेउनी । कींअकस्मातव्याघ्रयेउनी । नेतउचलोनिहरिणीतें ७१ कींहोमशाळेंतरिघेश्वानें । जायचोरूनिपात्रंघेऊन ।ते
साविराधदुर्जन । जातवेगेंकरूनियां ७२ करुणास्वरेंकरूनिदेखा । जानकीह्मणेमित्रकुळटिळका । धांवधांवअयोध्यानायका । जगद्वंद्यादोनबं
धू ७३ परतोनिपाहेराजीवाक्ष । तोंसघननलागलेवृक्ष । नयनींनदिसेप्रत्यक्ष । कोणीकडेगेलातो ७४ क्षणनलगतांलक्ष्मण । धनुष्यासियोजीअ
र्धचंद्रबाण । तात्काळवृक्षछेदून । केलेंवननिर्मूळ ७५ धनुष्यवोढोनिजनकजामातें । पाचाँरिलेंविराधातें । जैसामृगेंद्रमहागजातें । तैसीलक्ष्म
णेंहाकफोडिली ७६ अरेराक्षसाधरींधीर । माझाबाणघटोद्भवथोर । तुझेआयुष्याचेंनीरं । प्राशीलआजनिर्धारें ७७ महाव्याघ्राचाविभा
गदेख । कैसानेऊनवांचेलजंबुक । आदित्याच्याकळामशक । तोडीलकैसानिजांगें ७८ काळाचेहातींचादंडअभंग । केवींनेऊंशकेझोटिंग ।
वासुकीचाविषदंतसवेग । दर्दुरकेवीपाडील ७९ विराधह्मणेतूंमानवधीट । गोष्टीसांगसीअचाट । तरीतुझेंकरीनपीठ । मुष्टिघातेंआतांची ८०
ऐसेंराक्षसबोलोन । जानकीसखालींठेऊन । धांविन्नलापसरूनवदन । रामसौमित्रावरीतेधवां ८१ करितीधांवत्यावायूचेंखंडण । रामेंसोडिले
ऐसेदोनबाण । तिहींदोनीभुजाउडवून । गेलेनिघोनिनिराळपंथें ८२ सवेंचिसूर्यमुखशरें । तेणेंशिरच्छेदिलेंकौसल्याकुमरें । विमानींदेवजयज
यकारें । पुष्पवर्षाववर्षिती ८३ विराधपावलादिव्यशरीर । रामासिविनवीजोडोनिकर । ह्मणेमीगंधर्वतुंबर । नाममाझेंरघुवीरा ८४ गाय
नकरावयावहिलें । यक्षपतीनेंबोलाविलें । तंवम्यांमद्यपानअसेकेलें । भ्रांतझालेंशरीर ८५ कंठींनउमटतांस्वर । मगकुबेरेंसोडिलेंशापशस्त्र ।
ह्मणेतूंहोईंनिशाचर । महाघोरवनांतरीं ८६ मगम्यांकरुणाभाकितांथोर । प्रसन्नजाहलाकुबेर । तुजवनींवधीलरघुवीर । तैंउद्धारहोयतुझा ८७ रा
घवावर्षेंदाहासहस्त्र । मीविचरेंयेथेंरजनीचर । माझ्यानिभेणेंदशशिर । चळचळांकांपतसे ८८ असोमाझाउद्धारझालायेथें । ह्मणोनिवंदिलेंरघु
नाथातें । विमानींबैसोनिलवरितें । स्वस्थानासिपातला ८९ विराधरामेंमारितांवनीं । चहूंकडेपसरेकीर्तिध्वनी । जैसेंतैलपडतांजीवनीं । पसरो
निजायक्षणार्धें ९० कींसत्पात्रींदानदेतांनिर्मळ । कीर्तीनेंभरेभूमंडळ । कींदुर्जनासिगुह्यकेवळ । सांगतांविस्तारेचहूंकडे ९१ कींकुलवंतासिक
रितांउपकार । कीर्तिजैसीवाढेअपार । कींसंतसमागमेंथोर । दिव्यज्ञानप्रकटेपैं ९२ असोजानकीप्रेमेंयेऊन । वंदीश्रीरामाचेचरण । ह्मणेतुम
चापराक्रमआणिसंधान । आजिम्यांदृष्टींपाहिलें ९३ विराधउद्धरूनिजातां । तेणेंप्रार्थिलेंरघुनाथा । स्वामीतवदर्शनींआस्था । शरभंग

१ द्रव्याचा कलश. २ कुत्रें. ३ भांडें. ४ श्रेष्ठ राम. ५ दाढ. ६ नेत्र ७ बोलाविलें. ८ सिंह. ९ अगस्ति. १० पाणी. ११ सूर्य. १२ बेडूक.

ऋषीनेंधरिलीअसे ९४ हंसविमानघेऊनिइंद्र । त्यासमूळआलासाचार । परीतुजपाहिल्यावांचूनमुनीश्वर । नजायचिब्रह्मपदा ९५ केव्हां
उगवेलरोहिणीवर । ह्मणोनिइच्छीतचकोर । तैसेंदृष्टींपाहावयारामचंद्र । शरभंगऋषीइच्छित ९६ एसेंविराधेंसांगून । मगतोगेलाउद्धरोन ।
त्याचेआश्रमासिरघुनंदन । जाताझालातेकाळीं ९७ मगपुढेंजातरघुनंदन । मागेंचालतजानकीरत्न । त्याचेपाठींसीतालक्ष्मण । चहूंकडेपाहत ९८
आणीकयेतीलरजनीचर । ह्मणोनिचापासिलाविलाशर । बळियासुमित्रेचाकुमर । पाठिराखायेतसे ९९ तोंवृक्षच्छायेसिक्षणक्षणां । ठायीं
ठायींबैसेपद्मनयना । श्वासटांकूनिलक्ष्मणा । ह्मणेकांहोराहानाआजिकोठें १०० तोंवृक्षातळींसर्वसाक्षी । जोचराचरचित्तपरीक्षी । तोपद्माक्षी
चामार्गलक्षी । उभाराहूनिक्षणेक १ पुढेंशरभंगाच्याआश्रमारमावर । येताझालाकृपासागर । चहूंकडोनिधांवलेऋषीश्वर । जैसेपूरगंगेचे २
सांडूनिसमाधितपाचरण । लगबगांधांवलेब्राह्मण । शरभंगनिघेवेगेंकरून । रामदर्शनातेकाळीं ३ शरभंगतोमहाऋषी । परीगलितकुष्ठभरलें
त्यासी । दिव्यशरीरधरूनभेटीसी । येताझालाश्रीरामाचे ४ पहिलेंशरीरझांकून । घरींठेवीतोब्राह्मण । क्षणभरीदिव्यरूपधरून । श्रीरामद
र्शनापातला ५ असोदेखोनिऋषीश्वरांचेभार ।साष्टांगनमितीसीतारामसौमित्र । शरभंगसहितविप्र । राघवेंद्रेंआलिंगिले ६ शरभंगाच्याआ
श्रमांत । राहताझालारघुनाथ । सीतासौमित्रासमवेत । श्रीरामपूजिलाशरभंगें ७ लक्ष्मणऋषीतेंपुसत । कंथेखालींकायकांपत । शरभंगउघ
डोनिदावित । सौमित्रातेंतेधवां ८ ह्मणेहेंकर्मशरीरभोगिल्याविण । नसुटेकदादेहबंधन । राजाहोकांसज्ञान । कर्मगहनसोडीना ९ चिळसउ
पजलीलक्ष्मणा । ह्मणेवरमागाजीरघुनंदना । ऋषीह्मणेउष्णोदकस्नाना । मजनमिळेसर्वथा ११० शीतोदकेंस्नाननित्य । तेणेंशरीरहेंडुळत ।
ऐसेंऐकोनिअवनिजाकांत । कायबोलेऋषीतें ११ असोतुह्मांसिउदकदेऊन । प्रातःकाळींकरूंगमन । तोंरात्रसंपतांचंडकिरण । उदयाचळींउग
वला १२ ऋषिआज्ञाघेऊनित्वरित । पुढेंचालेरघुनाथ । ऋषिवचनाचाविसरपडत । श्रीरामयेतगौतमीतीरा १३ तोंगौतमींतकरितांस्नान । तेव्हां
आठविलेंऋषीचेंवचन । मगधनुष्यासिअग्निबाण । लावूनसोडिलाक्षणांत १४ चपळेऐसाबाणआला । ऋषीआश्रमापुढेंकूपकेला । बाणप्रवेश
लापाताळा । कूपउचंबळलाउष्णोदकें ११५ तेथेंस्नानकेल्यासाचार । ऋषीचेंझालेंदिव्यशरीर । मगविमानींबैसवूनिविप्र । शक्रेंनेलासत्यलोका
१६ मगसुतीक्ष्णाच्याआश्रमाप्रती । जाताझालाजनकजापती । मार्गींतापसीबहुतमिळती । श्रीरामाच्यासमागमें १७ नानाप्रकारचेसर्वतापसी ।
कित्येकअसतीवृक्षाग्रवासी । एकवृद्धअत्यंतवाचेसी । शब्दनफुटेबोलतां ११८ एकदंतहीनदुर्बळ । फळेंठेंचावयाकाखेसिमुसळ । नग्नमौ

नीजटाधारीसकळ । दुग्धाहारीफळाहारी ११९ असोसुतीक्ष्णआश्रमासी । आलाशरयूतीरनिवासी । मगपरमानंदहोतविप्रांसी । रघुपतीस
भेटतां १२० तेथेंक्रमोनिदिवसतीन । जेंत्रिनेत्राचेंजीवन । त्रिभुवनपतीरघुनंदन । पुढेंतेथोनचालिला २१ तोंगौतमीतीरींपावन । पाहतांपां
चाळेश्वररम्यस्थान । तेथेंभूमींतूनगायन । रामचंद्रेंऐकिलें १२२ रघूत्तमातेंसांगतीतापसी । येद्रुमींमंदकर्णमहाऋषी । परमतपियातेजोराशी ।
जैसाआकाशींभास्कर १२३ क्षयकरावयातपातें । पांचअप्सराअमरनाथें । पाठवितांऋषीत्यातें । देखोनियांभाळला २४ भूगर्भींविवरकोरू
न । त्यांतसर्वदाऐकेगायन । त्याकरितांऊर्वीमधून । ध्वनीउमटतराघवा २५ असोऋषीपाहेज्ञानी । श्रीरामआलाकळलेंमनीं । मगतेंविवरउ
घडोनी । बाहेरआलाभेटावया २६ रामेंवंदिलेऋषीचेचरण । आदरेंभेटलेदोघेजण । मगआश्रमांतयेऊन । मित्रकुळभूषणापूजिलें १२७ ते
थेंक्रमोनीएकरात्र । पुढेंचालिलामदनारिमित्र । नवमेघरंगरघुवीर । सुतीक्ष्णआश्रमापावला १२८ मगअगस्तीचेंदर्शन । घ्यावयाउदितरघु
नंदन । तोमहाऋषीसुतीक्ष्ण । पुरुषार्थसांगेअगस्तीचा २९ आतापीवातापीइल्वल । तिघेदैत्यपरमसबळ । शिववरदेंमहाखळ । कापट्यस
कळजाणती १३० अन्नरूपहोयएक । दुजानिजांगेंहोयउदक । तिजाअन्नदातादेख । होऊनिबैसलेवनांतरीं ३१ आतापीअन्नदातापूर्ण । प्रा
र्थूनिआणीतब्राह्मण । पूजाकरूनउदकअन्न । उदारेंसिंसमर्पित १३२ मगआतापीबाहेनामघेऊन । बातापीइल्वलदोघेजण । तयाविप्राचेंपोट
फोडून । येतीधांवोनिबाहेरी ३३ ऐसेअसंख्यातद्विजगण । भक्षिलेतिहींमारून । मगकलशोद्भवासिशरण । सकळब्राह्मणगेलेपैं १३४ मग
तोऋषीकलशोद्भव । जयासिभितीस्वर्गींचेदेव । ऋषिकैवारेंकरुणार्णव । दैत्यस्थानापावला ३५ तंवतोधरीअगस्तीचेचरण । ह्मणेआश्रमकरा
जीपावन । अन्नअथवाफळसेवून । शीतळजीवनप्राशिजे ३६ मुखींसदावेदाध्ययन । पाठीसिसदांधनुष्यबाण । तंवआतापीब्राह्मण । कापट्य
वेषेंपातला ३७ शुभ्रधोत्रेंयज्ञोपवीत । टिळेकुशमुद्रामिरवत । धोत्रेंवोलींसरसावित । क्षमाबहुतधरिलोअसे ३८ लटिकाचिदावीतआचार । प
रिअंतरींदुसराविचार । अंतरकडूवरीसुंदर । वृंदावनफळजैसें ३९ कींवरपांगेंजारिण । दावीभ्रताराचीसेवाकरून । कींशठमित्राचेंलक्षण । आ
रंभींवचनगोडजैसें १४० बचनागमुखींघालितां । प्रथमगोडवाटेतत्वतां । सावचोरगांवींअसतां । बहुतस्नेहवाढविती ४१ विषकुंभभरलासम
स्त । वरीअमृतघातलेंकिंचित । कींदांभिकशिष्यदावित । गुरुसेवाकरूनिवरिवरी ४२ कुसुंब्याचाआरक्तरंग । आरंभींदावीतसुरंग । किंवान
टेंधरिलेंसोंग । विरक्ताचेंव्यर्थजैसें ४३ ऐसाआतापीमावकर । ऋषीसदावीआदर । वरीशब्दरसाळफार । अंतरींजैसादुरात्मा १४४ असो

आतापीकापटचवेषी । आश्रमानेतअगस्तीसी । वातापीफळेंवेगेंसीं । होऊनियांबैसला १४५ अगस्तीनेंभक्षिलींफळें । उदकनाहींजोंप्राशि
लें । कापटचअवघेंसमजलें । कायकेलेंकलशोद्भवें १४६ उदरावरीफिरवूनिहस्त । दैत्यभस्मकेलापोटांत । दोघेनामघेऊनिबाहत । बाहेर
त्वरितयेआतां ४७ तंवतोनेदीप्रत्युत्तर । मगदोघेरूपधरितीथोर । महाविक्राळभयंकर । धांवलेसत्वरऋषीवरी १४८ धनुष्यासिचढवोनिगु
ण । अगस्तीनेंसोडिलाबाण । आतापीचेंशिरछेदून । नेलेंउडवूनिआकाशीं ४९ दोघेनिमालेदेखोन । इल्वलपळालातेथून । तंवतोकलशोद्भव
क्रोधायमान । पाठीलागलातयाचे १५० पळतांसरलीअवघीजगती । परीपाठनसोडीचअगस्ती । तंवतोउदकहोऊनिकापटचगती । समुद्रोद
कींमिसळला ५१ परीतोक्रोधायमानऋषीश्वर । तात्काळपसरूनिदोनीकर । आचमनकरूनिसागर । उदरामाजीसांठविला ५२ ह्मणेउदारा
रघुपती । ऐसापुरुषार्थीअगस्ती । त्याचीभेटीघेऊनिपुढती । सीतापतीजायतूं ५३ मगसुतीक्ष्णाचीआज्ञा । घेऊनियांरामराणा । चालिलातो
कर्दळीवना । अगस्तीच्याआश्रमासी ५४ तोंमार्गीअगस्तीचाबंधू । महामतिनामतपसिंधु । त्याचेआश्रमींआनंदकंदू । सीतावल्लभराहिला ।
५५ तेथेंक्रमोनिएकदिन । पुढेंजातरविकुळभूषण । तोंदेखिलेंअगस्तीचेंवन । शोभायमानसदांफळीं ५६ छायाशीतळसघन । माजीनादिसे
सूर्यकिरण । नारळीपोफळीरातांजन । गेलेभेदोनिगगनातें ५७ अशोकवृक्षउतोतिया । रायआंवळीखिरणिया । निंबवटपिंपळवाढोनियां ।
सुंदरडाहालियाशोभती ५८ दाळिंबेंशेंवरीपारिजातकमांदार । चंदनमोहवृक्षअंजिर । चंपकजाईजुईपरिकर । पोवळवेलीआरक्त ५९ तुलसी
बिल्वदेवदार । कनकवेलीनागवेलीसुंदर । शेंवतीचंपावृक्षपरिकर । बकुळमोगरेचमेली १६० कल्पवृक्षआणिचंदन । गरुडवृक्षआणिकांचन ।
वाळियाचींबेटेंसुवासिकपूर्ण । कर्पूरकर्दळीडोलती ६१ शालतमालपारिजातक । शिरीषरायचंपकअशोक । फणसनंबोळीमातुलिंगीसुरेख ।
अगरकृष्णागरसुवास ६२ मयूरबदकेंचातकें । कस्तूरीमृगजवादीबिडाळकें । राजहंसबहिरीचक्रवाकें । कोकिळाकौतुकेंबोलती ६३ धन्यधन्यऋ
षीअगस्ती । श्वापदेंनिर्वैरविचरती । पक्षीशास्त्रचर्चाकरिती । पंढितबोलतीजेरीतीनें ६४ ठायींठायींवनांत । शिष्यवेदाध्ययनकरीत । न्यायमी
मांसासांख्यपढत । तर्कघेतनानापरी ६५ पातांजलीव्याकरण । एकवेदांतशास्त्रप्रवीण । एकसमाधिसुखींतल्लीन । एकमौन्येंचडोलती ६६
नानाग्रंथींचेंपुराणश्रवण । ठायींठायींहोतअध्ययन । अष्टांगयोगनानासाधन । मनोजयकरिताती ६७ असोशिष्यगेलेधांवून । अगस्तीसीसां
गतीहर्षेंकरून । श्रीरामसीतालक्ष्मण । जवळीआलेगुरुवर्या ६८ ऐसेंऐकतांतेअवसरीं । ऋषीचाआनंदनमायेअंबरीं । सकळिकांसिह्मणेउठाझ

ढकरी । जाऊंराघवासमोर ६९ समाधीजपतपअनुष्ठान । करूनियांपावावेजयाचेचरण । तोरघुवीरराजीवनयन । आश्रमाआपणपातला
१७० जोजगद्वंद्यआदिसोयरा । जोअगम्यविधिशक्रकर्पूरगौरा । मूळनजातांआमचेमंदिरा । पूर्वभाग्येंपातलातो ७१ जैसानदनदीभरूनि
यां । जायनदेश्वरासीभेटावया । तैसाअगस्तीलवलाह्यां । श्रीरामाजवळींपातला ७२ देखोनियांऋषींचेभार । रामसौमित्रघालितीनमस्कार ।
घटोद्भवेंधांवोनिसत्वर । श्रीरामासीआलिंगिलें ७३ रमापतीआणिउमापती । प्रीतीनेंजैसेभेटती । कींइंद्रआणिबृहस्पती । आलिंगितीपरस्परें
७४ परमसद्गदऋषीचेंमन । ह्मणेधन्यधन्यआजिचादिन । कौसल्यागर्भरघुनंदन । नेत्रींदेखिलाधरणीवरी ७५ असोइतरहीमुनीश्वरां । भे
टलाअनादिसोयरा । ब्राह्मणींवेष्टिलेंजनकजावरा । याचकींवेष्टिलादाताजैसा ७६ कींचंदनवेष्टितफणिवर । कींभूपतीभोंवतादळभार । कींतेब
हुतमिळोनिचकोर । निशापतीसविलोकिती ७७ कींविलोकितांसौदामिनीपती । नीलकंठआनंदेंनाचती । कींमहावैद्यदेखोनिधांवती । व्यथाभू
तजैसेकां ७८ कींउगवतांसहस्त्रकर । चक्रवाकेंतोषतीअपार । तैसादेखतांजगदोद्धार । मुनीश्वरसंतोषले ७९ देखोनियांऋषिमंडळी । प
रमलज्जितजनकबाळी । मगजाऊनिनिराळीं । उभीठाकलीक्षणएक १८० तंवऋषिपत्न्याअसंख्यात । पाहूंधांवल्यारघुनाथ । तोंऋषींमाजी
सीताकांत । कोणतोनयेप्रत्यया ८१ जगींअसोनिजगदीश्वर । नेणतीजैसेभ्रांतनर । तैसाऋषींतअसोनिश्रीरामचंद्र । ऋषिपत्न्यांसीदिसेना
८२ साधकशरणसद्गुरूसी । तैशात्यायेतीसीतेपासीं । ह्मणतीरघुवीरप्रत्ययासी । आणूनिदेईंआह्मांतें ८३ जैसीआदिमायाभगवती । तीसवे
ष्टितअनंतशक्ती । तैशाऋषिपत्न्यासीतासती । वेष्टोनियांपुसतीतीतें ८४ पुराणपुरुषरघुनंदन । ऋषिदृष्टांतआहेपूर्ण । परीअमुकाचिरामह्मणो
न। दावींआह्मांसीजननीये ८५ अवघेजटाजूटतापसी । एकाहूनिएकतेजोराशी । परीतवनेत्रचकोरशशी । दावींआह्मांसीजननीये ८६ जव
ळीअसोनिराघवेंद्र । नव्हेआह्मांसीकांगोचर । तरींमंगळभगिनीतुझावर । मंगलकारकदावींकां १८७ चौऱ्यायसींलक्षयोनीगर्भवास । हिंड
तांश्रमपावलोंबहुवस । परीतोविश्वपाळकसर्वेश । आदिपुरुषदावींकां ८८ मृगनाभीसअसोनिमृगमद् । परीतोनेणेचिमतिमंद । कींजवळींरत्नअ
सोनिगर्भांध । नेणेजैसाअभाग्यें ८९ जैंवेदवल्लीचेंदिव्यफळजाण । जोसरसिजोद्भवाचेंआराधन । जोनारदादिकांचेंगायन । ध्येयध्यानविषकं
ठाचें १९० ऐशानानापरीपुसती । परिनबोलेसीतासती । मगऋषिस्त्रियाध्यानेंवर्णिती । नानाऋषींचींतेवेळीं ९१ ज्याज्याऋषींचेंवर्णितीध्यान
तेंतोंजनकात्मजाह्मलवीमान । जैसादृश्यपदार्थसंपूर्ण । वेदश्रुतीनिरसिती ९२ जेंजेंदिसेतेंतेंनाशिवंत । तेंचिन्मयनव्हेअशाश्वत । ऋषिस्त्रियास्व

रूपवर्णित । मानहालबितसीतातेथें १३ वेदशास्त्रांपडलेंमौन । तोकेविबोलिजेलशब्देंकरून । यालागींनबोलवेवचन । हालवीमानजानकी १४ हस्तसंकेतेंकरून । जरीदावावारघुनंदन । तरीतोएकदेशीनव्हेपूर्ण । जोनिर्गुणनिर्विकार १५ योगयागसाधनेंअपार । करितांशिणताति साधकनर । तेवींऋषिस्त्रियाशिणल्यासाचार । रूपेंवर्णितांऋषींचीं १६ जैसीवेदाचियेशेवटीं । स्वरूपींपडेऐक्यामिठी । तैसाश्रीरामदेखिलादृष्टीं । ऋषिस्त्रियांनींअकस्मात १७ ह्मणतीसजलजलदवर्ण । आकर्णनेत्रसुहास्यवदन । वाटेब्रह्मानंदचिमुरोन । मूर्तिवोतिलीचिन्मय १८ जटाजूट मुकुटपूर्ण । आजानुबाहूवल्कलवसन । हातींविराजितचापबाण । पतीहोयकींहातुझा १९ऐसेंऐकतांवचन । सीतेनेंकेलेंहास्यवदन । हालवितां राहिलीमान । उन्मीलितनयनजाहले २०० ऋषिपत्न्यांसिकळलीखूण । प्रत्ययाआलारघुनंदन । विलोकितांराघवध्यान । धाल्यापूर्णब्रह्मानंदें १ मगसीतेचियाचरणींमिठी । घालितीसकळत्यागोरटी । ह्मणतीमातेधन्यसृष्टी । रामजगजेठीदाखविला २ जैसामौनेंचिकरूनिवेद । संतांसि दावीब्रह्मशुद्ध । तैसासीतेनेंपरमानंद । ऋषिपत्न्यांसीदाविला ३ आतांअसोहाविस्तार । अगस्तीनेंश्रीरामचंद्र । आश्रमानेऊनिसाचार । परमा नंदेंपूजिला ४ अक्षयचापअक्षयभाते । अक्षयकवचरघूत्तमातें । शस्त्रास्त्रेंमंत्रसामर्थ्यें । दाशरथीतेंदीधलीं ५ जैसानवग्रहांतचंडकिरण । तैसा दीधलाएकबाण । ह्मणेयाचशरेंरावण । शेवटींधाडींनिजधामा ६ एकमासपर्यंत । तेथेंकाळक्रमीरघुनाथ । मगघटोद्भवासिपुसत । आह्मींआतांराहावें कोठें ७ अगस्तीह्मणेगोदातटीं । वस्तीसिस्थानपंचवटी । तेथेंतूंराहावेंजगजेठी । सीतागोरटीजतनकरीं ८ आज्ञाघेऊनितेवेळां । पंचवटीसश्रीरा मचालिला । तंववाटेसजटायूदेखिला । राघवेंद्रेंअकस्मात ९ वृक्षींवैसलाजैसापर्वत । श्रीरामसौमित्रासदावित । ह्मणेहाराक्षसयथार्थ । आणील रितधनुष्यबाण १० दोनीतूणीरघननीळें । पाठीसिदोहींकडेआकर्षिले । तंवतोजटायूतेवेळे । कायबोलेदुरूनियां २११ ह्मणेतूंयावनांतरींको ण । टाकूंइच्छितोसिमजवरीबाण । सांगतुझीनामखूण । मगरघुनंदनबोलत १२ रविकुळमंडणदशरथ । त्याचापुत्रमीरघुनाथ । ऐसीऐकतां चिमात । जटायूजवळीपातला १३ कश्यपसुतअरुण । तोमाझाजनिताजाण । पितृव्यमाझासुपर्ण । जटायूजाणनाममाझें १४ माझाज्येष्ठबंधू संपाती । तोदक्षिणसागरींकरीवस्ती । तुझापितादशरथनृपती । मजबंधुत्वमानीतसे १५ शक्रासियुद्धकरितां । मीसाह्यजाहलोंदशरथा । मज बंधुत्वमानीतत्वता । अजराजपुत्रेंतेकाळीं १६ ऐसीऐकतांचिमात । सद्गदितझालारघुनाथ । जटायूचेकंठींमिठीघालित । ह्मणेतूंनिश्चितपितृव्यमा झा १७ मगजटायूचेमिअनुमतें । श्रीरामजायपंचवटीतें । पर्णशाळासुमित्रासुतें । विशाळरचिलीतेवेळे १८ फळेंमूळेंआणून । नित्यदेईसुमि

त्रानंदन । आपणनिराहारनिर्वाण । चतुर्दशवर्षैंपर्यंत १९ जानकीभावीऐसेंमनीं । लक्ष्मणफळेंभक्षितोवनीं । मगआणितोआह्मांलागुनी । फळेंभक्षा
वयाकारणें २० सीतेचेआज्ञेविण । सौमित्रनकरीफळेंभक्षण । नित्यउपवासीनिर्वाण । तोलक्ष्मणमहाराज २१ पुढीलजाणोनिभविष्यार्थ । फ
ळघेनह्मणेरघुनाथ । याचिप्रकारेंदिवसबहुत । उपवासझालेतयासी २२ पर्णकुटीचाद्वारपाळ । सर्वकाळसुमित्राबाळ । तोविष्णुशयनफणिपा
ळ । सेवाप्रबळकरीतसे २३ रात्रींमाजीलक्ष्मण । हातींघेऊनिधनुष्यबाण । राक्षसयेतीलह्मणून । सावधानसर्वदा २४ निद्राआणिआहा
र । कधींनस्पर्शेसौमित्र । भक्तराजपरमपवित्र । जैसामित्रनिर्मळसदां २५ पंचवटीसराहिलारघुनाथ । चहूंकडेप्रकटलीमात । तोंवनींभिल्लस्त्रिया
मिळोनिबहुत । ह्मणतीराघवपाहूंचला २२६ अयोध्याधीशरघुपती । बहुतऐकतोंत्याचीकीर्ती । एकवचनएकपत्नीव्रती । चलानिश्चितींपाहूंतो
२७ निरंजनींराहिलारघुनाथ । तोडोळेभरीपाहावयायथार्थ । अरिदर्पहरणसीताकांत । पाहूंचलाएकदां २८ जोनिर्विकारपरब्रह्म । तोसगुण
वेषश्रीराम । ज्याचेंश्रुतीनेणतीवर्म । तोपूर्णकामपाहूंचला २९ ह्मणतीपरब्रह्मसांवळें । भेटीसन्यावींअपूर्वफळें । पूर्वपुण्यअसेलआगळें । तो
रामडोळांदेखोंपैं २३० अपारमिळोनिभिल्लिणी । उत्तमफळेंवेंचितीवनीं । नाचतनाचतकामिनी । गुणगातीश्रीरामाचे ३१ ज्याचेंनामघेतांनि
र्मळ । शीतळझालाजाश्वनीळ । चरणरजेंतत्काळ । गौतमललनातारिली ३२ एकजानकीवेगळीकरून । सकळस्त्रियाकौसल्येसमान । जोदश
कंठदर्पहरण । मखरक्षणमखभोक्ता ३३ अहोपूर्वकर्मनिर्मळ । हेंचउत्तमसांचवोनिफळ । पाहावयापरब्रह्मउतावेळ । पंचवटीसपातल्या ३४
पंचभूतात्मकपंचवटी । नरदेहासआल्यागोरटी । श्रीरामदेखतांदृष्टीं । घालितीसृष्टींलोटांगण ३५ आपुलींपूर्वफळेंजींहोतीं । समस्तअर्पिलींर
घुपतीप्रती । देखोनितयांचीदृढभक्ती । फळेंभक्षितसीताराम ३६ नित्यकाळभिल्लिणी । फळेंदेतीरामासआणोनी । येथेंकितीएककविजनानीं ।
विपरीतवाणीबोलिजे ३७ ह्मणतीउच्छिष्टफळेंभक्षिली । हेसर्वथाअसत्यबोलीं । तरीत्यांहींउत्तमफळेंरक्षिलीं । श्रीरामभेटीकारणें ३८ मूळनपा
हतांयथार्थ । भलतेंचिकविवलजोस्थापित । त्यासिबंधनहोयनिश्चित । चंद्रार्कवरीजाणिजे ३९ असोश्रीरामविजयग्रंथ । हाचिअमृतवृक्षयथा
र्थ । येथींचींफळेंरघुनाथभक्त । सदांभक्षितीप्रीतीनें ४० ब्रह्मानंदाजगदोद्धारा । पंचवटीवासियाश्रीधरवरा । आदिपुरुषानिर्विकारा । अचळअ
भंगानिश्चया ४१ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मीकीनाटकाधार । सदांपरिसोतपंडितचतुर । त्रयोदशोऽध्यायगोडहा २४२
श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ अध्याय ॥ १३ ॥ ॥ ओव्या ॥ २४२ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

# अध्याय १४ वा



श्रीगणेशायनमः । ।श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । श्रीरामकथाऐकतांसादर । सुखउपजेअपार । शशांकदेखतांसाचार । सिंधुजैसाउचंबळे १
कींसद्गुरुवर्षतांकृपाघन । शिष्यसरितेसियेस्वानंदजीवन । कींउगवतांसूर्यनारायण । अरविंदेंजेवींविकासती २ कींदुर्बळासिसांपडेधन । कींव
णव्यांतजळतांवर्षेघन । कींवसंतकाळदेखोन । वृक्षजैसेफुलती ३ ऐसीकथाऐकतांउपजेसुख । जेकथेसिभुललाकैलासनायक । पार्वतीसप्रेमदे
ख । रामकथाहृदयींधरी ४ जेमोक्षतरूचेंबीजदेखा । जेभवनदीमाजीतारकनौका । अज्ञानतिमिरदीपिका । वाल्मिकानेंपाजळली ५ कीं
अविद्याकाननवैश्वानर । कींऐश्वर्यपीठींचीदेवीसुंदर । कींमनोरथकल्पलतासाचार । कींआनंदजळसरिताहे ६ कींपुण्यवैरागराचीखाणी । कीं
धर्मार्थकाममोक्षाचीजननी । कींपापतापभंजनी । मंदाकिनीप्रत्यक्षहे ७ श्रीरामकथाअत्यंतपावन । श्रवणकरोतपंडितजन । तेरावेअध्यायीं
कथन । आलारघुनंदनपंचवटीये ८ जोद्विपंचमुखदर्पहरण । जोकमळणीमित्रकुळमंडण । जोमेदिनीगर्भरत्नजीवन । पंचवटीयेराहिला ९
जोभूधरअवतारलक्ष्मण । जोनरवीरपंचानन । सुरसफळेंनित्यनूतन । काननींहूनिआणीतसे १० ऐसेंऐकतांकोणेऐकेकाळीं । लक्ष्मणविलो
कीवनस्थळीं । तोंदेखिलीवंशजाळी । सरळगगनचुंबित ११ तेवंशजाळियेभीतरी । दशकंठाचाभाचाशंबरी । विषकंठाचेंआराधनकरी । का
ळखर्गप्राप्तीकरणें १२ साठहसस्त्रवर्षेंपर्यंत । तपदारुणकरीतेथ । । वंशजाळीमाजीगुप्त । बाहेरनदिसेकोणातें १३ माध्यान्हासि
आलाआदित्य । तोंकाळखर्गअकस्मात । गगनेंपंथेंउतरत । सुमित्रासुतेंदेखिलें १४ तंवतोभावीशस्त्रदेवता । मीनध्वजायशंबराच्याहाता । शर
णजाईनसुमित्रासुता । हरीनजीविताशंबरीच्या १५ सभाग्यापुढेंचिंतामणी । पडेअकस्मातयेउनी । तैसेंकाळखर्गतेक्षणीं । सौमित्राजवळीपा
तलें १६ सौमित्रेंहातींघेतलेंशस्त्र । ह्मणेकृपाळूतोत्रिनेत्र । ऐसेंह्मणूनिअजराजपौत्र । परमानंदेंतोषला १७ मगउन्मिळाप्राणप्रियकर । वस्त्रें
पुसिलेंकाळशस्त्र । ह्मणेयाचाप्रतापथोर । पाहूंधारकैसीते १८ जेणेंपुष्पप्रायधरिलीधरणी । तेणेंनिजबळेंशस्त्रउचलोनी । वंशजाळीतयेक्षणी ।
दुखंडकेलीतत्काळ १९ तंवशोणिताचाचाललापूर । साशंकितपाहेउन्मिळावर । ह्मणेकवणहोतायेथेंविप्र । नेणोनिसाचारवधिलाम्यां २० चिं
तातुरराघवानुज । तापसीवधिलानेणोनिसहज । आतांकोपेलरघुराज । मुखांबुजकोमाइलें २१ असोयावरीसौमित्रपरतला । जानकीमार्गल
क्षीवेळोवेळां । ह्मणेमध्यान्हकाळटळला । सौमित्रेंलाविलाउशीरकां २२ ऐसेंविलोकीक्षणक्षणां । तोंयेतांदेखिलेंलक्ष्मणा । शस्त्रदेखोनिमृग

१ चंद्र. २ कमळें. ३ शंकर. ४ मोक्षरूप वृक्ष. ५ आज्ञानरूप अंधकारांतील दिवटी. ६ अग्नि. ७ भागीरथी. ८ सीता. ९ शेष. १० बांबूचें बेट. ११ सूर्य. १२ आकाशमार्गानें

नेयना । अहिल्योद्धारणाकडेपाहे २३ ह्मणेस्वामीरघुनंदना । लक्ष्मणयेतसेम्लानवदना । तंवतोपूर्णसाक्षअंतरखुणा । समजलावृत्तअंत
रीं २४ तंवतोपातलामहावीर । रघुपतीपुढेंठेविलेंशस्त्र । जोडोनियांदोनीकर । समाचारसांगतसे २५ ह्मणेअयोध्याधीशासमर्था । अकस्मात
खर्गआलेंहाता । वंशजाळीहाणोनिपाहतां । तपस्वीघातपावला २६ मगसुहास्यवदनजनकजामात । ह्मणेद्विजनव्हेतोराक्षससत्य । शूर्पनखे
चापुत्रयथार्थ । दशग्रीवाचाभाचाओळखें २७ तोबहुतादिवसतपकरीतहोता । काळखर्गयावेंहाता । मगइंद्रादिदेवांसमस्तां । अजिंक्यव्हावें
याहेतू २८ दुजयाचाचिंतीघात । त्यासिनिर्दाळीउमाकांत । ज्याचीक्रियात्यासबाधित । अतिअनर्थसूचकजो २९ जैसेंखणूंजातांवारुळ । म
हासर्पेंडंखिलेंतत्काळ । कींहातींधरितांतप्तलोहगोळ । भस्महोयतेधवां ३० जैसाशुष्ककाष्ठछिद्रींचरण । बळेंचिघालीनेऊन । वरीखीळबैसवि
लीठोकून । मगकरितांरुदननिघेची ३१ जैसीआपणक्रियाधरावी । तेतेसवेंचिलागेभोगावी । परीसौमित्राआतांसीतारक्षावी । वनींनविसं
बावीक्षणएक ३२ आतांयेथूनमहाद्वंद्व । मांडेलअसावेंसावध । राक्षसीमोवनानाविध । ब्रह्मादिकांनकळेते ३३ हेंएकबरवेंझालें । काळखर्गहाता
सिआलें । ऐसेंऐकतांतेवेळे । मनसंतोषलेंसौमित्राचें ३४ तंवतेरावणाचीभगिनी । शूर्पनखाशंबराचीजननी । रात्रींदुष्टस्वप्नदेखोनी । सावधझा
लीतत्काळ ३५ मगविचारकरूनमानसीं । सवेंचौघीघेतल्याराक्षसी । वेगेंचालिलीवनासी । निजपुत्रासीपाहावया ३६ लंकेबाहेरजोंआली ।
तोंदिनकरेंप्रभाकेली । मार्गचालतांवेळोवेळीं । वंशजाळीविलोकी ३७ तंवतोनदिसेचिपाहातां । देखेगृध्रमंडळफेरेघालितां । धापादाटेधांवतां । स्थ
ळबीभत्सदेखोनी ३८ जवळीयेऊनजंवपाहे । तोंपुत्रासहितजाळीघायें । द्विखंडहोऊनिपडिलीआहे । रुधिरवाहेभडभडां ३९ मगधायमोकलो
निकेसी । गडबडांलोळेभूमीसी । जळावेगळीमासोळीजैसी । तडफडितअतिशोकें ४० मगउठवोनिसाखियानीं । बैसविलीसावधकरूनी । ह्म
णेपुढीलकार्यार्थमनासिआणी । कोणेंसुतवनींवधियेला ४१ मगतेराक्षसीउठोन । भोंवतेंपाहेविलोकून । तोंमानवीपदमुद्रावोळखून । विस्मयक
रीमानसीं ४२ शंबरासहितवंशजाळी । एकेघायींदुखंडकेली । तरीकायराक्षसांचीसीमाझाली । आयुष्याचीयेथोनियां ४३ असोदहनकरूनशंबरा
सी । वनशोधीततेव्हांराक्षसी । तोंदूरदेखिलेंसौमित्रासी । जैसातेजस्वीचंडांशू ४४ शूर्पनखाह्मणेहाचिकाळ । येणेंग्रासिलेंमाझेंबाळ ।
मगकापटयवेषतत्काळ । धरित्याझाल्याराक्षसी ४५ रंभेहूनिसुंदरदेखा । स्वरूपेंनटलीशूर्पनखा । सवेंचौघीजणीसख्या । भुलवितीज्याअनंगा

१ सीता· २ श्रीराम· ३ दहा कंठांचा रावण ह्मणून दशग्रीव· असें ह्मणतात· ४ युद्ध, वैर· ५ माया, कपट· ६ आई· ७ सूर्य· ८ बांबूचें बेट· ९ गिधाडांचा समुदाय· १० मनुष्याचीं पाउलें·

४६ चौघीजणीदोहींकडे । मध्येंशूर्पनखादिव्यरूपडें । जिच्यास्वरूपाचाप्रकाशपडे । काननामाजीहिंडतां ४७ चौघीचियास्कंधावरीहात । पादुकापायींरत्नजडित । हावभावकटाक्षदावित । गायनकरीतमधुरस्वरें ४८ आल्हादकारकचंद्रवदन । वदनींबोलतांझळकतीदशन । चालेगजगतीमोडीनयन । उन्मिळाजीवनदेखोनियां ४९ हळूचसख्यांसीबोलत । येणेंचवधिलामाझासुत । तरीयासिसगळेंचिमुखांत । घालोनिगिळीननिर्धारें ५० तोंसौमित्रकरीतश्रीरामस्मरण । काननामाजीकरीभ्रमण । जैसेकमळावरीभ्रमरपूर्ण । ठायींठायींरुणझुणती ५१ तोंशूर्पनखातेवेळीं । वेगेंपातलीसौमित्राजवळी । कामचेष्टाकरीवेळोवेळीं । वचनमाधुर्यबोलोनियां ५२ ह्मणेजीसुंदराअवधारा । बहुतहिंडल्येंवसुंधरा । परीनमिळेमजयोग्यनवरा । कुशळचतुरप्रतापी ५३ तरीआजिमाझेंधन्यभाग्य । पावलेंस्वामीचेंअर्धांग । आजितपफळाआलें सांग । ह्मणोनिआल्येंपुढारी ५४ घेऊनिनवरत्नाचीमाळा । घालावयाआलीगळां । तंवतोमहाराजसलागळा । जोअवतरलाभोगींद्र ५५ गुणसिंधूजानकीजीवन । त्याचीकृपात्यावरीपूर्ण । विषयसंगेंत्याचेंमन । काळत्रयींमळेना ५६ जेणेंप्राशिलासुधारस । त्यासकायबाधेलमहाविष । जोसूर्यासमीपकरीलवास । तयासतमकायबाधी ५७ कामधेनुज्याचेमंदिरीं । तोकधींचनव्हेदरिद्री । जोपहुडलास्वानंदसमुद्रीं । कमेंवधर्नींनपडेतो ५८ कल्पवृक्षआंगणींदेख । तोकशासमागेलभीक । जयासिभेटलावैकुंठनायक । तोनपूजीभूतेंप्रेतें ५९ उर्वशीसमानज्याचीललना । तोकदांहीप्रेतकवळीना । नंदनवनींचाभ्रमरजाणा । अर्कीवरीनबैसे ६० जोभ्रमरमंचकावरी । पहुडणारअहोरात्रीं । तोनिजेलखदिरांगारीं । हेंकालत्रयींघडेना ६१ ज्याचेआंगींमृगमदाचीउटी । तोकाकविष्ठानपाहेदृष्टीं । जोबैसलाक्षीराब्धीच्यातटीं । तोकांजीनइच्छीकदां ६२ असोऐसाजोलक्ष्मण । जोआहाररहितनिर्वाण । तोशूर्पनखेप्रतिवचन । कायबोलताजाहला ६३ मगह्मणेवोसुंदरीपाहें । आह्मांससीतारामवडीलआहे । पैलवस्तीहेपंचवटीये । उमामहेशजयापरी ६४ मायबापगुरुबंधु । रघुवीरमाझाकृपासिंधु । त्याचेआज्ञेवीणसंबंधु । कालत्रयींघडेना ६५ शेषसांडीलधराभार । पूर्वेसमावळेलदिनकर । परीरामआज्ञेवीणसाचार । तुजमीनवरींसर्वथा ६६ तोंशूर्पनखाबोलेवचन । तरीमीआणित्यैंरामाचीखूण । अवश्यह्मणेलक्ष्मण । येरीतेथोनिचालिली ६७ सांगातेंसखियाचौघीजणी । विचारसांगेत्यांलागुनी । रामलक्ष्मणसीतातीनी । रात्रींगिळूनजाऊंलंके ६८ आमचीकार्यसिद्धीयेथोन । सख्यानोझालीपरिपूर्ण । मग

---

१ अरण्यांत. २ खांद्यावर. ३ दांत. ४ लक्ष्मण. ५ पृथ्वी. ६ शेष. ७ समुद्र. ८ अमृत. ९ अंधकार. १० निजला. ११ विष्णु. १२ रुईच्या वृक्षावर. १३ खैराच्या निखाऱ्यावर. १४ कस्तूरी.

येवनींब्राह्मण । भक्षूंशोधूनिसाक्षेपें ६९ ऐसेंविचारूनिमानसीं । वेगेंआलीपंचवटीसी । देखोनिसीतारामासी । साष्टांगनमनपकेलें ७० आजिमाझेंभाग्यपूर्ण । देखिलेभावोजीचेचरण । बाईमीतुह्मांसींशरण । जाऊतुमचीजाहल्येंजी ७१ मजस्नेहकरावाबहुत । भावोजीसप्रार्थोंनित्व रित । मजजवळद्यावेंलिखित । प्राणनाथेंवरावया ७२ चरणत्यांचेकोमलचांगले । वनींहिंडताताितिएकले । तळहातीनकरकमळें । सुमंनशेजे घालूनियां ७३ भावोजीचेआज्ञेवीणपाहें । मजतेनवरीतकरूंकाये । आहात्यांचावियोगनसाहे । विरहेंजायप्राणमाझा ७४ डोळांअश्रुआ लेलवँलाहीं । परीत्यांसमाझाविश्वासनाहीं । पुढेंजन्मकंठणेंएकेठायीं । भावोजीसबाईसांगातुह्मीं ७५ मीकेवळपतिव्रतासाचार । कर्णकुमारीप रमपवित्र । मजएकहीपुरुषाचाकंर । बाईनसेलागला ७६ त्यावीणपुरुषनवरींसाचार । मागुतोउदकेंभरलेनेत्र । सलंज्जपत्रवारंवार । ह्मणेमजद्या वेंआतां ७७ सीतेसिसुखवाटलेंफार । ह्मणेबरवाझालाविचार । मजजाऊमिळालीसुंदर । ईससौमित्रवँरसाजे ७८ मगह्मणेजीरघुराया । ई सखूणद्यावीजीलवलाह्यां । स्वामीसौमित्रायोग्यजार्या । मिळालीहेनिर्धारें ७९ मगसर्वात्मारघुनायक । चराचरचित्तपरीक्षक । जोमायाच ऋचाळक । कर्ताहर्तापाळिताजो ८० तिच्याउलटबाहुल्यानेत्रांत । न्याहाळूनपाहेजनकजांमात । ह्मणेनिशांचरीहेयथार्थ । छळावयासआली असे ८१ नेत्रवेंक्रांचेविकार । तयावरूनसमजेअंतर । सुमंनावरूनसाचार । वृक्षचतुरवोळखिती ८२ बोलावरूनकळेचित्त । आचरणाव रूनपूर्वार्जित । क्रियेवरूनवर्णाश्रमसत्य । परीक्षकजाणती ८३ रहणीवरूनपरमार्थ । शब्दाशब्दींकळेपांडित्य । प्रेमावरूनिभक्त । जाणती चतुरपरीक्षक ८४ दानावरूनिकळेउदार । रणींसमजेप्रतापशूर । लक्षणांवरूननृपवर । जाणतीचतुरपरीक्षक ८५ वासयेतांकळेकाष्ठ । स्वरावरूनसमजेकंठ । कीकोंभावरूनिस्पष्ट । भूमीचेंमार्दवजाणिजे ८६ अगणावरूनसमजेसदन । भूतदयेवरूनब्रह्मज्ञान । प्रभेवरूनकळेरत्न । परीक्षकजाणती ८७ असोसर्वांतरात्माश्रीरघुवीर । शूर्पनखेचेंवोळखिलेंअंतर । आंतशठत्वमृदुत्वबाहेर । जाणताचतुरश्रीराम ८८ मु खशोभेजैसेंकमल । परीअंतरींकुतर्ककुटिळ । शब्दचंदनशीतळ । तमालनीळेंवोळखिलें ८९ श्रीरामह्मणेतेअवसरीं । लग्नपत्रिकालिहूंदेपाठीं वरी । ऐकतांभयाभीतनिशाचरी । विश्वासअंतरींउपजेना ९० सीतेसह्मणेबाईऐकआतां । भावोजीसमोरमजबोलतां । लज्जावाटेतत्वतां । तुह्मी प्रार्थातयांसी ९१ भावोजीचतुरआणितरुण । मीलज्जावेष्टितकामिन । त्यांपुढेंबैसतांजाण । जाईलप्राणवाटतसे ९२ मगबोलेरघुनंदन ।

१ फळ. २ फुलें ३ वियोग. ४ सत्वर. ५ हात. ६ लज्जायुक्त. ७ लक्ष्मण पति. ८ स्त्री. ९ श्रीराम. १० राक्षसी. ११ मुख. १२ फूल. १३ वागणुक. १४ घर. १५ शठपणा. १६ मृदुपणा.

पाठीवरीलिहिल्यावीण । आणिकआह्मापासींखुण । दुजीनाहींसर्वथा ९३ मगशूर्पनखाबोलेवचन । तरीपाठीवरीलिहाजीखूण । अवश्यह्मणो
नीरघुनंदन । लिहिलीखूणपाठीवरी ९४ श्रीरामह्मणेजायसत्वर । उशीरनलावीसौमित्र । ऐसेंबोलतांशतपत्रनेत्र । पवनवेगेंचालिली ९५
मगलक्ष्मणाजवळींयेऊन । सांगेपरमहर्षेंकरून । भावोजीनींमजदेऊनिमान । मुख्यवचनसांगीतलें ९६ अवश्यरामेंतुह्मासी । ऐसेंसांगीतलें
मजपासीं । गांधर्वलग्ननिश्चयेसीं । तत्काळचिलावावें ९७ मगबोलेलक्ष्मण । नदेखतांश्रीरामाचीखूण । तुजमीनवरींचपूर्ण । सत्यवचनहें
माझें ९८ येरीह्मणेतेसमर्यी । माझाविश्वासतुह्मांनाहीं । पुढेंजन्मकंठणेंएकेठायीं । दुजेंकांहींनसेची ९९ येथेंलटिकेंबोलोन । भावोजीसका
यदाखवूंवदन । मीतयांलागींभेटोन । आल्येंआतांतत्वतां १०० भावोजीजलदवर्णसुंदर । बाईचंपककळीसुकुमार । जवळलिहावयानवतेंपत्र ।
सांगीतलेंतुह्मांवरावें १०१ तुह्मांसिश्रमझालेफार । चरणचुरींनमीक्षणभर । वनींशिणलेतीसाचार । निद्राकराक्षणभरी १०२ परीनमानीचलक्ष्म
ण । शूर्पनखाबोलिलीहांसोन । म्यांतोंआणिलीआहेखूण । परीतुमचेंमनपाहिलें ३ येरीखुणदाखवीपाठीची । तोंआज्ञाऐसीश्रीरामाची ।
शूर्पनखाभगिनीदशमुखाची । इचेंनासीककर्णशांतीकरीं ४ कर्णआणिनासिकसकळ । सपाटकरींनलावींवेळ । नवरीशृंगारूनअमंगळ । लंकेक
डेपाठवावी ५ स्त्रीवधनकरावाजाण । यालागींराखेंइचाप्राण । ऐसेंलक्ष्मणेंपत्रवाचून । ह्मणेचलाजाऊंएकांता ६ दूरकेल्याचौघीजणी । धरि
लीशूर्पनखेचीवेणी । सौमित्रपाडीतिजलाधरणीं । पापखाणीतेंतत्काळ ७ मगतीह्मणेप्राणनाथा । मीसिद्धआहेंयाअर्था । झोंबोनिकांहोपाडितां ।
नवलमजवाटतसे ८ लक्ष्मणेंनलावितांक्षणमात्र । छेदिलेंनासिकआणिश्रोत्र । तांतेआँक्रंदेअपवित्र । विशाळशरीरधरियेलें ९ अत्यंतविशा
ळभयंकर । कपाळींचर्चिलासेंदुर । नासिकापासोनिपूर । अशुद्धाचाभडकतसे १० चौघीजणीसमवेत । पळतीवाटेसशंखंकरित । ह्मणतीधांवा
धांवारेसमस्त । राक्षसहोशीघ्रकाळ ११ पळतांपाहातीमागेंपुढें । तोंसौमित्रचिद्दृष्टीपडे । भोंवतादिसेचहूंकडे । कोणीकडेजाऊंह्मणती १२
अडखळूनभूमीसपडती । मुखींनासिकींभरलीमाती । पद्मपुराजवळीयेती । शंखकरीतत्याकाळीं १३ आक्रोशऐकतांथोर । त्रिशिराआणिदू
षणखर । सिद्धकरूनिदळभार । आलेसत्वरबाहेरी १४ असुरपार्यीचेनेटकें । पुढेंचमकतीकौतुकें । हातींअसिलतावरीखेटकें । कटीझळकेयमदं
ष्ट्रा १५ चालिलेचतुरंगदळभार । जैसेलिहिलेचित्राकार । याहूनअतिसादर । सर्वालंकारडवरिले १६ वीरभयंकररगरगडे । जैसेकाळाचे

१ कन्या व वर यांची परस्पर प्रीति होवून जो विवाह होतो त्यास गांधर्व विवाह ह्मणतात. २ रावणाची. ३ नाक व कान. ४ ओरडे. ५ रक्ताचा. ६ शंखध्वनि.

संवगडे । एकधांवतीएकापुढें । सिंहनादेंगर्जती १७ निघालेगजभारउन्मत्त । कींतेऐरावतीचेसुत । श्वेतवर्णआणिचौदंत । किंकाटतधांवती १८ जिहींयुद्धसमरंगणीं । सुरांचेमुकुटपाडिलेधरणीं । तेगजस्कंधावरीबैसोनी । शस्त्रेंतुळितीअपार १९ त्यामागेंरथांचेभार । वरीशस्त्रसामग्रीअपार । चौदासहस्त्रमहावीर । एकवटलेतेकाळीं १२० त्रिशिराखरदूषण । दळभारींमुख्यतिघेजण । तोंशूर्पनखापुढेंयेऊन । शंखकरीतउभीठाके २१ जैसासेंदुरेंमाखिलापर्वत । तैसीरक्तचर्चितआरक्त । ह्मणेराक्षसआटावयासमस्त । आलारघुनाथपंचवटीये २२ नवमेघरंगरघुवीर । सौमित्रगौरवर्णसुकुमार । सीतास्वरूपपाहातांसुंदर । पंचशरवरूनिओंवाळिजे २३ तरीआतांबहुतअरुवारलक्ष्मण । त्याचेगळयाचा घोंटघेईन । तुह्मीसंगेंयाअवघेजण । रक्तपानकरवामज २४ तेणेंमाझेंनासिकछेदिलें । आतांतयामींगिळीनसगळें । त्रिशिराखरदूषणहांसले । बीभत्सरूपदेखोनी २५ ह्मणतीमानवरघुनंदन । त्यावरीआह्मीजावेंहेंनवलपूर्ण । मगराक्षसचौदाजण । निवडोनियांकाढिले २६ तेशूर्पनखेसंगेंदेऊन । ह्मणतीमारूनरामलक्ष्मण । ईसकरवारक्तपान । समाधानहोयतों २७ मगशूर्पनखाआणिराक्षस । वेगेंजातीपंचवटीस । ह्मणतीधरूं रामसौमित्रास । जीवंतनेऊंखरापासीं २८ एकह्मणतीयेथेंचमारून । आह्मीकरूंमांसभक्षण । करवावेंआधींरक्तपान । शूर्पनखेसीसाक्षेपें २९ जैसीमृगेंद्राचीनिंदादेख । मागेंकरितीजंबुक । अळिकाह्मणेपक्षिनायक । धरूनआणूंक्षणार्धें १३० घृतपुतळेमिळोनिसमस्त । वडवानळासिधरूं ह्मणत । कींद्दर्यींभावीखद्योत । आदित्याखालींपाडीनमी ३१ शलभह्मणतीमिळोनी । कल्पांतवीजघालूंवदनीं । तोंराक्षसआलेधांवोनी । पंचवटीसतेधवां ३२ रघुपतीसजाणवीलक्ष्मण । राक्षसआलेचौदाजण । ऐसेंऐकतांरविकुळभूषण । वाहातगुणधनुष्यासी ३३ पर्वतदरीमधून । अकस्मातनिघेपंचानन । तैसाकौशिकमखरक्षण । गुंफेबाहेरपातला ३४ श्रीरामनरवीरपंचानन । चतुर्दशगजलक्षिलेपूर्ण । कींशार्दूळलक्षीदुरून । तेवीरघुनंदनपाहतसे ३५ तंवतेचौदानिशाचर । भोंवतेफिरतीभयंकर । दारुणशस्त्रेंअनिवार । सोडितेजाहलेतेधवां ३६ जैसेंमूर्खाचेंवाग्जाळसमस्त । एकेचिशब्देंवारीपंडित । तैसींअरिशस्त्रेंवारूनिसमस्त । केलेंअद्भुतश्रीरामें ३७ वोढीकाढूनिआकर्ण । सोडिलातेव्हां सूर्यमुखबाण । चौदाजणाचींशिरेंछेदून । धरणीवरीपाडिलीं ३८ मृगेंद्रविदारीवारण । तैसेपडिलेचौदाजण । कींअरुणानुजेंदारुण । भुजंगपाडिलेजैसेकां ३९ रामसाक्षातप्रळयाग्न । त्यांतचतुर्दशअसुरांचेंअवदान । प्रथमारंभींतेंजाण । शूर्पनखेनेंसमर्पिलें १४० सौमित्रेंकाढिलाएकशर । शूर्पनखेचेंछेदावयाशिर । तंवतीह्मणेदावेदार । अद्यापिमजसोडिना ४१ श्रीरामह्मणेसुमित्रासुता । तूंनवधावेंईसआतां । हेसांगो

निराक्षसांसमस्तां । आणीलयेथेंवधावया ४२ असोनिर्नासिकाशंखकरीत । येऊनखरदूषणासीसांगत । राक्षसमारिलेसमस्त । तुह्मीसत्वरचला
तेथें ४३ ऐसेंशूर्पनखासांगोंसरे । तोंरणतुरेंवाजतीगजरें । भारनिघालेअतित्वरें । पवनवेगेंकरूनी ४४ खरतोअसेखरमुख । दूषणाचेंपांढरें
नाक । शुभ्रकुष्ठनिःशेषदेख । दूषणनामत्याकरितां ४५ त्रिशिरायासशिरेंतीन । तींव्हावयाकायकारण । त्याचेमातेनेंवाणेंविस्तारून । ती
नएकासदीधलीं ४६ दूषणाचेपुत्रतिघेजण । कपाळीप्रथमीस्थूळलोचन । वाटेसिजाहलेअपशकुन । विघ्नसूचकतेधवां ४७ सुटलाअद्भुतप्र
भंजन । धुळीनेंभरलेंअसेवदन । रथध्वजमोडून । पडिलेखालींबहुसाल ४८ रामेंभारदेखिलादुरीं । गगनगर्जेरणतुरीं । नादभरलादिशांतरीं ।
कांपेधरित्रीतेवेळीं ४९ सौमित्रासिह्मणेरघुनंदन । तूंसीतेसीकरींजतन । आजयुद्धकरूनदारुण । वधीनसर्वराक्षसां १५० यापर्वतमस्तकीं
जाण । सीतेसहितराहेंएकक्षण । आज्ञावंदोनिलक्ष्मण । चढेघेऊनजानकीतें ५१ पर्वतशिखरींजनकनंदिनी । जैसीमूळपीठआदिभवानी । ज
वळीपरशुरामकरजोडोनी । सौमित्रतेवींदिसतसे ५२ असोयेरीकडेरघुनंदन । धनुष्यासिचढवोनिगुण । कानाडीवोढितांआकर्ण । झणत्कारितीकिं
किणी ५३ तोंयेरीकडेराक्षस । सिंहनादकरितीकर्कश । भोंवतावेढिलाअयोध्याधीश । पुराणपुरुषजगदात्मा ५४ राक्षसभारींकडकडाट ।
वाद्यांचेहोतीदणदणाट । तेणेंमंगळजननीचेंपोट । उलोंपाहेतेकाळीं ५५ अपारउठावलेभार । रणकर्कशभयंकर । जैसावृषभींकोंडिलामृगेंद्र । तै
सारामवेष्टिला ५६ कींदेखोनिदीपाचारंग । झेंपावतीजेविपतंग । कींवासुकीमहाभुजंग । मुषकींजैसावेढिला ५७ किंवारामरणरंगधीर । कै
सालक्षीशत्रूंचाभार । कलशोद्भवेंलक्षिलासागर । कींसूर्येंआंधारजैसा १५८ कींव्याघ्रेंलक्षिलेअजाकळप । कींकुठारपाणींविलोकीपादप । कीं
सुपर्णेंलक्षिलेसर्प । अयोध्याधीशतेविपाहे ५९ तोंअसुरंवोढोनिवोढी । सोडिल्याबाणाच्याकोडी । कींबैसलींसातवांकडीं । सायकाचींतेवेळीं
१६० सिंहनादकरितीवेळोवेळां ।लोटलावाहिनीचामेळा । जैसासागरखवळला । प्रळयींलोटलाभूमीवरी ६१ जैशाजलकल्लोळीं । चपळाझळ
कतीनिराळीं । तैशातळपतीवेळोवेळीं । असिलताअतिसतेज ६२ शस्त्रास्त्रांचेसंभार । रघुपतीवरीहोतीअपार । राक्षसह्मणतीकैंचारघुवीर । खं
डविखंडपैंझाला ६३ एकह्मणतीरक्तपान । शूर्पनखाकरीलकोठून । तिच्यातोंडींस्मृत्तिकापूर्ण । पडलीऐसेंवाटतसे ६४ इतकाहोतोशस्त्रमार ।
परिरणरंगधीररघुवीर । ठाणनचळवीनिर्धार । ऐक[illegible]चतुरहोदृष्टांत ६५ बाणहाणितांकुठारप्रहार । बैठकनसांडीतरुवर । कींपर्जन्यवर्षतांअपा
र । अचळनचळेसर्वथा ६६ कींनिंदकनिंदितांअपार । नचळेसाधूचेंअंतर । कींप्रल्हादासिलाविलेविखार । परीसाचारडळमळीना ६७

ज्यासिलागलेंअंतरसुख । तोनमानीचसंसारदुःख । अयोध्यानाथतैसादेख । बाणेंसुरेखचळेना ६८ असोयावरीजानकीरंग । ठाणमांडीसुरंग ।
जैसापक्षियांचापाळासवेग । उडतअसेआकाशीं ६९ आवेशेंधांवतीबाण । जैसेसफळतरुदेखोन । विहंगमांचेपाळेउडोन । अकस्मातपैंयेती
१७० जैसेंकृषीवळएकसरें । कणसेंसंवगीतअपारें । तैसींराक्षसांचींशिरें । बहुततेव्हांपाडिलीं ७१ वरीकोणीकरितीहस्त । तेव्हांभुजातोडि
तीशस्त्रासहित । लक्षाचेलक्षबाणसुटत । चापापासूनतेवेळीं ७२ श्रीरामाचातूणीर । अक्षयींभरलासेसाचार । कुंडामाजीवैश्वानर । संदीप्तजैसा
झांकिला ७३ कींवासुकीचेमुखींहाळाहळ । कींसरितापतीमाजीवडवानळ । कींमेघींविद्युल्लतातेजाळ । तूणीरांतशरत्याचपरी ७४ कपटीराक्ष
सबाराजण । रामावरीआलेधांवोन । अग्नीसविझवावयाप्रभंजन । आवेशेंकरूनलोटला ७५ कींवारणविदारणापुढें । मार्जारदाऊंआलेपवाडे ।
कींबृहस्पतीपुढेंमूढें । वादकरूंधांवती ७६ कींरासभेंब्रीदबांधोन । गंधर्वसभेसीआरंभिलेंगायन । तैसेराक्षसबाराजण । रामावरीधांवले ७७
क्षणनलागतांरणरंगधीरें । छेदिलींबाराजणांचींशिरें । जैसींतीक्ष्णशस्त्रें । अरविंदेंजेवींछेदिजेती ७८ ऐसेंदेखतांचिदूषण । पुढेंधांवलावर्षतबाण ।
जैसावर्षतपर्जन्य । योद्धानिपुणराक्षस ७९ दूषणाचेंबाणजाळथोर । साहोनरामेंवारिलेंसाचार । जैसाउगवतांदिनकर । उडुगणेंजेवींलोपती
१८० कींअनुतापहोतांअपार । होयपापाचासंहार । कींसिद्धांतज्ञानेंसाचार । दुःखजैसेंवितळेपैं ८१ तैसेंदूषणाचेशरतोडून । अश्वासहिततो
डिलास्यंदन । मगराक्षसगदाघेऊन । चरणचालीधांविन्नला ८२ मगरावणदर्पहरण । वेगेंसोडीअर्धचंद्रबाण । गदाहातींचीछेदून । एकीकडे
पाडिली ८३ मगपरिघवीरभद्रदत्त । घेऊनदूषणधांवत । देवझालेचिंताक्रांत । ह्मणतीअनर्थमांडला ८४ यापरिघाचेंनिवारण । केवीकरी
लरघुनंदन । श्रीरामेंकाढिलादिव्यबाण । वायूचेंखंडणकरणारजो ८५ परिघासहितहाततेथें । छेदूनपाडिलारघुनाथें । सवेंचबाणसीताकांतें
चंडांशुमुखकाढिला ८६ दूषणाचाकंठलक्षून । श्रीरामेंसोडिलाबाण । शिरउडविलेंनलागतांक्षण । पडलादूषणतेकाळीं ८७ मगदूषणाचेति
घेसुत । त्यांहींरणमांडिलेंबहुत । पित्याचासूडघेऊंयथार्थ । ऐसापुरुषार्थधरियेला ८८ तिघेकरितीशरसंधान । रामनरवीरपंचानन । बाणेंखि
ळिलेतिघेजण । परितेआंगवणनसांडिती ८९ बिळींप्रवेशतांविखार । अर्धेदिसतीबाहेर । तैसेराक्षसांचेआंगींशर । श्रीरामाचेखडतरले १९०
कींपक्षपसरतीनीळकंठ । कींफणसफळावरीकांटेदाट । तैसेबाणरुतलेसधट । प्रतापउद्भटरामाचा ९१ असोतयांचींशिरेंरघुनाथें । उडवोनिधाडि
लींनिराळपंथें । मगत्रिशिराआवेशेंबहुतें । रामावरीलोटला ९२ रथारूढानिशाचर । सोडितबाणांचापूर । रघुवीरतोडीजैसासमीर । जळदजा

ळविभांडी १३ रघुपतीचेबाणतीक्ष्ण । त्रिशिऱ्याचाछेदिलास्यंदन । मगकुमारदत्तशक्तीघेऊन । पिशिताशनधांवला १४ निजबळेंशक्तीझोंकि
ली । परीतेरामासीवशझाली । चरणाजवळीजाऊनिपडली । दासीमीतुमचीह्मणोनी १५ रंभापर्णवतऱ्याबाणाचेंमुख । लक्षोनिसोडीअयोध्या
नायक । त्याबाणतेजेंसकळिक । पद्मभवांडउजळिलें १६ त्रिशिऱ्याचींतीनशिरें । तत्काळछेदिलींरघुवीरें । ऐसेंदेखोनियांखरें । रथारूढधां
विन्नला १७ असंख्यबाणतेअवसरीं । खरेंसोडिलेरामावरी । श्रीरामएकलारणचक्रीं । रजनीचरींवेष्टिला १८ चहूंकडोनिबाण । रामावरीयेती
दारुण । परीतितक्यांचेंहीसंधान । रघुनंदनछेदीतसे १९ जैसेंयोगेश्वरेंमायाजाळ । कींसहस्त्रकिरणेंतपेरविमंडळ । कींअरुणानुजेंसर्पकुळ । वि
दारूनसांडीजैसा २०० कींशुष्कवनहुताशन । भस्मकरीनलागतांक्षण । कींजलदजाळप्रभंजन । विदारूनसांडीजैसें १ खरबाणसोडीरण
रंगीं । अगस्तीदत्तकवचरामाचेअंगीं । त्याचेंबिरडेंछेदूनिसवेगीं । खालींपाडिलेंराक्षसें २ ऐसेंविपरीतदेखिलें । विमानींदेवगजबजिले । समस्त
हीचिंतूंलागले । रघुवीरासीकल्याण ३ राक्षसेंमांडिलेंविंदाण । शक्तीवरदचारबाण । सहस्त्राक्षहीनिवारण । करूंनशकेजयांचें ४ प्रळयीं
च्याचारसौदामिनी । तैसेंबाणसुटलेतेक्षणीं । परीनवलझालेंतेंनयनीं । भूचरखेचरपाहाती ५ चारीबाणतेवेळे । रघुपतीचेभात्यांतरिघाले । ब्रह्मया
चेमुखींस्थिरावले । चारीवेदजैसेकां ६ कींचारीनद्यासमुद्रांत । येऊनिमिळतीअकस्मात । कींआनंदवनींच्याकमळांत । भ्रमरचारीबैसले ७
असोदेवकरितीजयजयकार । पुढेंअसिलताघेऊनिखर । सुरकैवारियावरीअसुर । चपळेऐसाधांविन्नला ८ मगचंडीशकोदंडभंजन । प्रचंडदोर्दं
डेंकरून । सोडिलावसिष्ठदत्तबाण । अनिवारअखंडजो २०९ तेणेंखराचेंशिरछेदून । तत्काळपरतलादिव्यबाण । श्रीरामतूणीरामाजीयेऊन ।
आपलेआपणप्रवेशला २१० विजयीझालारघुनंदन । वृंदारकटांकितीसुमन । विषकंठहृदयमनमोहन । निजभावेंपूजिला ११ चौदासहस्त्र
राक्षसअद्भुत । त्यांतउरलानाहींएकजीवंत । रणींउभाएकरघुनाथ । सीतासौमित्रपाहती १२ महाप्रळयनिरसून । एकपरब्रह्मउरेनिर्वाण । तै
सादशकंठदर्पहरण । एकलारणींविराजे १३ कींसर्वनिरसोनिकर्मजाळ । निवृत्तीतटींसंतनिर्मळ । तैसाश्रीरामतमाळनीळ । एकलारणींविराजे
१४ बहुतकाष्ठेंजाळूनअग्न । एकलाउरेदैदीप्यमान । त्याचपरीकौसल्यानंदन । एकलाविपिनींविराजे १५ शब्दध्वनीनिरसूनी । एकलाचअ
र्थबैसेमनीं । कींजडत्वसांडोनिधरणी । क्षमारूपेंउरेजेवीं १६ कींशीतळत्वसांडोनिजल । जीवनउरेनिर्मळ । दाहकत्वसांडोनिसोज्वळ । प्रकाश
उरेपैंजैसा १७ कींसमीरेंसांडोनिचंचळपण । एकपवनत्वउरेनिश्चळपूर्ण । कींशून्यत्वसांडोनिगगन । व्यापकत्वउरेजैसें १८ कींशब्दजा

ळनिरसोनिसमस्त । वेदस्वरूपींहोयसमाधिस्थ । तैसाअसुरसंहारूनिरघुनाथ । उभानिःशब्दउगाची १९ कामक्रोधआणिमत्सर । हेचित्रि
शिरदूषणखर । हेसंहारूनिसमग्र । निजभक्तसुखीरक्षिले २२० दुर्वासनाहेशूर्पनखा । विरक्तशस्त्रेंघेऊनिदेखा । बोधलक्ष्मणरावसखा । नि
र्नासिकाकेलीतेणें २२१ आशामनशाममताकल्पना । भ्रांतीभूलीइच्छातृष्णा । ह्यादेखोनिबोधलक्ष्मणा । पळत्याजाहल्याराक्षसी २२२ झाड
लियाजैसाकेर । शुद्धदिसेजेवीमंदिर । तैसेंदंडकारण्यगोदातीर । असुररहितजाहलें २३ स्थूळलिंगआणिकारण । निरसोनिउरेशुद्धचैतन्य ।
तैसेस्वस्थानींब्राह्मण । सुखेंनांदोंलागले २४ ब्राह्मणमारितीलह्मणूनी । शूर्पनखाघेऊनिराक्षसिणी । भिऊनपळालीतेक्षणीं । लंकेसजाऊनशं
खकरी २२५ सेवकसांगतीदशमुखा । निर्नासिकजाहलीशूर्पनखा । शंखकरीतेणेंलंका । दुमदुमिलीसमग्र २२६ मगतीसपाचारूनिरावण ।
एकांतींपुसेवर्त्तमान । तीह्मणेसीतारामलक्ष्मण । जनस्थानासीआलारे २७ लक्ष्मणेंगौरविलेंमजलागुनी । तुह्मांसिहोत्येंभगिनीह्मणोनी । त्रि
शिराखरदूषणसमरंगणीं । सहपरिवारेंवधियेले २८ शंबरीवधोनिसवेग । सौमित्रेंनेलेंकाळखर्ग । चालोंलागलेसन्मार्ग । यागजपतपआणिव्रतें
२९ गोदातीरजनस्थान । तेथेंसुखेंनांदतीब्राह्मण । अखंडकरितीवेदाध्ययन । निःशंकपूर्णसर्वदा २३० आतांतुझीलंकाघेऊन । तीहीब्राह्मणा
सिदेतीलदान । जळोतुझीआंगवण । कशासवदनदावितोसी ३१ तुझेउरावरीधनुष्यपडिलें । तेंक्षणमात्रेंरामेंभंगिलें । तेव्हांचतुझेंकाळेंवदनझा
लें । सकळरायांदेखतां ३२ सीतेसारिखीनोवरी । नाहींब्रह्मांडमंडपामाझारी । तेहातींचीदवडोनिनिर्धारी । पळोनियेथेंआलासी ३३ तरीपु
रुषार्थतुझाजनीं । जरीसीताआणिसीधरूनी । तिचेंसौंदर्यरूपपाहुनी । वनचरेंहीभुलतीपैं ३४ ऐसीशूर्पनखाअनुवादली । मगरावणेंतीससंबो
खिली । तेव्हांमनामाजीतेवेळीं । युक्तीसुचवितापैंझाला ३५ ह्मणेमृगवेषधरूनिनिर्मळ । पाठवूंमारीचमातुळ । मृगवधावयातत्काळ । काकुत्स्थ
येईलवनातें ३६ मगमीआणीनजानकीचिद्रत्न । ऐसेंद्विपंचवदन । असोइकडेजानकीलक्ष्मण । पर्वताखालींउतरलीं ३७ सद्गदहोऊनजन
कनंदिनी । मिठीघालीश्रीरामचरणीं । ह्मणेधन्यधन्यलीलादाविलीनयनीं । जेकांअतर्क्यवेदशास्त्रां ३८ झालेउदंडअवतार । परीकोणाचेपरत
लेनाहींतशर । तोंऋषिधांवलेसमग्र । श्रीरामचंद्रवेष्ठिला ३९ ह्मणतीजयजयकौसल्यगर्भरत्ना । जलदगात्राशतपत्रनयना । ताटिकांतकामखपा
ळणा । भवमोचनाभवहृदया ४० जयजयकारकरितीऋषीश्वर । पूर्णब्रह्मानंदरघुवीर । अभंगविजयीश्रीधरवर । शरयूतीरविहारीजो ४१ स्व
स्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मीकीनाटकाधार । सदांपरिसोतभक्तचतुर । चतुर्दशोध्यायगोडहा । अध्याय १४ । ओव्या । २४२ । शुभं० ।

# अध्याय १५ वा.



श्रीगणेशायनमः । । श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः। भवाब्धिभरलापरमतुंबळ । द्वैतभावाचातटोंकसबळ । माजीकुबुद्धीचेकल्लोळ । मोहजाळअसं
भाव्य १ मदमत्सरथोरआंवर्त । कामक्रोधादिसमस्त । आशातृष्णाभ्रांतीतेथ । मगरीथोरतळपती २ लोभमोहनक्रथोर । ममतेच्यालाटाअतिदु[३]
र्धर । दंभआणिअहंकार । विरोळेहेतळपती ३ अविवेकहेडांकिणीतत्वतां । अविद्याभ्रांतीजळदेवता । पीडितजीवांसमस्तां । आशातृष्णाकल्पना
४ ऐसाअगाधभवनिधीथोर । तेथेंरामकथाजाहाजसुंदर । शिल्पिँकारवाल्मिकऋषीश्वर । तारूतेणेंनिर्मिलें ५ नानाचरित्रेंसुंदर । याचिकळा
दृढथोर । विवेकजोडूनिसमग्र । अभेदत्वसाधिलें ६ साहित्यतगडेंलोहबंद । आनंदपदखिळेविविध । दृष्टांतदोरप्रसिद्ध । ठायींठायींआंवळले
७ अर्थरसतेलनिखिळ । तेणेंसांधेबुझिलेसकळ । रामप्रसादस्तंभविशाळ । कीर्तीशीडफडकतसे ८ सप्तकांडसप्तखण । लोटीतभावप्रभंजन ।
निजबोधकर्णधारपूर्ण । सकळसुजाणदेखणा ९ ज्ञानवैराग्यआणिभक्ती । हींचआवलींआंवलिती । याजाहाजावरीतेचिबैसती । अद्भुतग्रंथींपुण्य
ज्यांचें १० रामनामघोषथोर । हेचियंत्राचेभडमार । नादेंजळचरसमग्र । भयाभीतपळताती ११ ऐसेंभवसागरींतारूथोर । गुरुकृपेचेंकेणेंअ
पार । भरूनमोक्षद्वीपांतर । लागवेगेंपाविजे १२ तरीतुह्मीश्रोतेसज्जन । याचिजाहाजावरीबैसोन । भवाब्धीहाउल्लंघून । जावेंसत्वरपैलतीरा
१३ चौदावेअध्यायींकथन । शूर्पनखेचेंवर्तमान । निमालेत्रिशिराखरदूषण । दँशकंठासीश्रुतकेलें १४ श्रीरामप्रतापअद्भुत । ऐकतांसर्चिंतलं
कानाथ । सद्भक्तांचीस्तुतिऐकोनिसमस्त । दुर्जनकैसेक्षोभती १५ पतिव्रतेचीऐकोनिराहाटी । जारिणहोयजेविकष्टी । कींमृंगेंद्रगर्जनाऐको नेपो
टीं । वोरणजैसेदचकती १६ कींविष्णुमहिमाऐकतांअद्भुत । क्रोधावतीजैसेदैत्य । असोतेवेळेमयजाकांत । मारिचगृहाप्रवेशला १७ मा
रीच्यानेंसन्मानदेउनी । रावणातेंबैसविलाआसनीं । त्याउपरीमधुरवचनीं । दशकंठबोलताजाहला १८ ह्मणेपंचवटीसआलारघुनंदन । मारिलेत्रि
शिराखरदूषण । शूर्पनखाविटंबून । शंबरीहीमारिला १९ शत्रूनागकृशान । हेह्मणोंनयेलहान । क्षणेंहरीतीलप्राण । यास्तवसावधअसावें २०
यास्तवमातुळाविचारऐसा । तुवांधरूनमृगवेषा । पंचवटीसजाउनराघवेशा । भुलवूनदूरनेईजे २१ राघवनेलियादूरवनीं । मगपद्मा
क्षीआणीनकाढूनी । हेंकार्यसाधल्यातुजलागोनी । गौरवीनबहुसाल २२ जैसेंमूढाचेंवाग्जाळ । पंडीतछेदीतत्काळ । तैसेंवचनरसाळ । बोले
मातुळरावणाचा २३ पूर्वींकरितांयागरक्षण । सुबाहूटाकिलामारून । त्याचाबाणवातेंकरून । मीपडलोंसागरीं २४ वीसकोटीमारीलेंपिशिताश

१ तन्त्रें. २ भोंवरा. ३ कठीण. ४ कारागीर, सुतार. ५ सुकाणुवाला. ६ गांठीस. ७ रावण. ८ चिंतायुक्त. ९ वागणूक. १० मृगाचा इंद्र ह्मणजे राजा ( सिंह.) ११ हत्ती.

न । तेणेंरामप्रतापआठवून । मारीचपडलामूर्च्छायेऊन । करीरावणसावधतया २५ मारीचह्मणेरावणा । अभिलाषितांसीतापरांगनो । तूंमुकशील आपुल्याप्राणा । सत्यनिर्धारजाणपां २६ सद्विवेकहृदयींधरून । अंनुचितकर्मींनघालीमन । सद्गुरूसांगेतेंवचन । अवश्यहृदयींधरावें २७ नकरींकोणाचेंहेळण । कदानबोलावेंदुष्टवचन । पराचीवेदनाजाणून । परोपकारकरावा २८ सर्वांभूतींएकभगवंत । हावेदशास्त्राचामथितार्थ । ह्म णोनिद्वेषनकरावासत्य । साधिजेपरमार्थअवश्य २९ क्षणिकजाणोनिशरीर । साधावासारासारविचार । मीभाग्येंइंद्र।नेंथोर । हाअभिमाननधरा वा ३० कामक्रोधमदमत्सर । हेशत्रुजिंकावेअनिवार । दशमुखातूंज्ञानसंपन्नथोर । सखारघुवीरकरींवेगें ३१ सखाकरितांचापपाणी । मगसु खासीनाहींवाणी । जोंवरीशंशीआणितरंणी । तोंवरीसुखेंनांदसी ३२ रामकेवळपरमपुरुष । आदिनारायणसर्वेश । तुझेउरावरीपडिलेंधनुष्य । सीतास्वयंवरींआठवीतें ३३ तुझाचालिलाजेव्हांप्राण । मगउठिलारामपंचानन । चंडीशेकोदंडभंगून । जीवदानतुजदीधलें ३४ तेव्हांश्री रामेंवांचविलें । त्याचेंकायहेंफळझालें । जेणेउपकारबहुतकेले । त्यासीकायमारावेंशस्त्रघेउनी ३५ जेणेंपाजिलासुधारस । त्यासीपाजिजेमहा विष । जेणेंरणींहूनसोडविलेंनिःशेष । त्याचेगृहासअग्नलावावा ३६ जन्मवरीजेणेंकेलेंपालन । आपत्कांळींरक्षिलेंपूर्ण । तोनिद्रिस्थअसतांपाषा ण । कैसावरीघालावा ३७ नौकाबुडतांकांसेलाविलें । कींजळत्यागृहांतूनकाढिलें । शिरछेदितांसोडविलें । तोपित्यातुल्यवेदह्मणे ३८ त्याला गींदशकंठातूंसुबुद्ध । रामासींनकरावाविरोध । रामकेवळब्रह्मानंद । आनंदकंदजगद्गुरू ३९ तुझास्वामीजोशंकर । तोहीरामभजनींसादर । त याचीभार्यातूंपामर । हिरूनिआणूंइच्छिसी ४० ऐसींमातुळानेंस्ववचनें । सुधारसाहूनिगोडगहनें । कींविवेकसागरींचींचिद्रत्नें । रावणाहातींदीध लीं ४१ परममतिमंदकुळांलदेख । परीक्षानेणेमहामूर्ख । रोगिष्टापुढेंअन्नेंसुरेख । व्यर्थजैसींवाढिलीं ४२ अवदांनसमर्पिलेंभस्मांत । कींउ करडांवोतिलेंअमृत । कींमद्यपानींउन्मत्त । त्यासपरमार्थकासया ४३ असोपरमक्रोधायमान । रावणबोलततयातीक्ष्ण । जैसेंसाधूचेंछळण । निंदककरीसाक्षेपें ४४ माझियाप्रतापापुढें । राममनुष्यकायबापुडें । करीनचूर्णदेहाचींहाडें । तुजदेखतांसमरंगणीं ४५ त्याचाप्रता पतूंवानिसीं । तरीतुजवधीननिश्चयेसीं । ह्मणोनिहातघातलाशस्त्रासी । मारीचमनींविटलासे ४६ ह्मणेतूंपरमअधमदुर्जन । होयमार्गेंन बोलेवचन । मीआतांमृगवेषधरून । जातोंशरणराघवा ४७ रामबाणेंहोतांमरण । मीअक्षयीसुखभोगीन । तुझेहातेंकरून । अधःपातज

१ परस्त्री. २ अयोग्य. ३ चंद्र ४ सूर्य. ५ शिवधनुष्य. ६ अमृत. ७ संकटसमयीं. ८ रावण. ९ स्त्री. १० कुंभार. ११ आहुती. १२ वर्णन करिसी.

न्मवरी ४८ आतांपंचवटीसचलावेंलौकरी । मगदोघेबैसोनिरथावरी । वायुवेगेंतेअवसरीं । जनस्थानासीपातले ४९ वर्नीगुप्तउभारावण । मारीच्यानेंमृगवेषधरून । अंतरींरामस्मरण । ह्मणेधन्यधन्यआजिमी ५० आलाचमकतपंचवटी । श्रीरामरूपन्याहाळीदृष्टीं । जाहलापरमसंतुष्टी । अंतरींकष्टीनव्हेची ५१ जैसेंसुवर्णतगटसुरंग । तैसेंमृगाचेंदिसेअंग । ऐसेंदेखतांसीतारंग । हातघालीधनुष्या ५२ मृगक्षणक्षणांपरतोन । पाहेराघवाकडेविलोकून । तंवतेपद्माक्षीबोलेवचन । पद्मजातजनकाप्रती ५३ ह्मणेऐसामृगआजपर्यंत । म्यांदेखिलानाहींयथार्थ । याचेत्वचेचीकंचुकीसत्य । उत्तमहोईलकेलिया ५४ अयोध्येसीप्रवेशकरितां । तेकंचुकीलेईनसर्वथा । षण्मासउरलेआतां । मनुसंवत्सरामाजीपैं ५५ सीतेच्छासरितासाचार । कर्महाचितुंबळपूर । दुःखसमुद्राप्रतीसादर । भेटावयाजाउंपाहे ५६ जाणोनिजानकीचेंमानस । आणिपुढेंहोणारभविष्य । सत्वरचालिलाअयोध्याधीश । धनुष्यासीबाणलाउनी ५७ ह्मणेसौमित्रासावधान । रक्षींजानकीचिद्रत्न । परमकपटीपिशिताशंन । नसतींचाविघ्नेंकरितील ५८ असोगुंफेंतसीतारत्न । द्वारींरक्षपाळलक्ष्मण । जैसामहाभुजंगअनुदिन । निधानकुंभरक्षीतसे ५९ पार्वतीजवळीजैसाकुमार । इंदिरेपासींखगेश्वर । तैसातोभूधरावतार । रक्षीद्वारगुंफेचें ६० इकडेमृगाचापाठिलाग । राघवजातलागवेग । गौतमीतीराचापूर्वमार्ग । करीतमृगपलायन ६१ मनाहूनिवेगअत्यंत । त्याहूनमनमोहनत्वरेंजात । ध्वजवज्रेरेखामंडित । पदउमटतधरणीवरी ६२ पद्मोद्भवआणिभोगींद्र । नीलग्रीवआणिवज्रधर । चरणरजइच्छितीनिरंतर । दुर्लभसाचारसर्वांसी ६३ मृगाचेंवर्मांगलक्षून । रामेंसोडिलादिव्यबाण । भूमीवरीपाडिलाहरिण । अचुकसंधानरघुपतीचें ६४ सादरपाहेरघुवीर । तोंपडलेंराक्षसाचेंशरीर । श्रीरामबाणेंनिशाचर । पावलापरत्रनिर्धारें ६५ आश्चर्यकरीअयोध्याधीश । ह्मणेकपटीपरमराक्षस । असोअश्वत्थाखालींपुराणपुरुष । श्रमोनियांबैसला ६६ इकडेकायझालेंवर्तमान । वर्नीगुप्तउभारावण । गुंफेद्वारींलक्ष्मण । बैसलारक्षकअंत्यग्र ६७ शांतींजवळपरमार्थ । कींतपासीरक्षीशुचित्व । तैसाद्वारींसुमित्रासुत । मगलंकानाथकायकरी ६८ श्रीरामासारिखीशब्दध्वनीं । राक्षसउठवीकानर्नीं । सौमित्राधांवधांवह्मणोनी । सीताश्रवणींऐकत ६९ सौमित्राधांवबालवकरी । वर्नीवेढिलेंरजेनीचरीं । संकटपडियेलेंमजवरी । तूंकैवारीपाठिराखा ७० रणभूमीसबंधूविण । उडीघालीलसांगकोण । राक्षसींघेतलामाझाप्राण । मगयेऊनिकायपाहसी ७१ ऐसेंऐकतांजनकनंदिनी । परमघाबरलीअंतःकरणीं । ह्मणेश्रीरामसांपडलेवनीं । करुणावाणीबाहतीतुह्मां ७२ रणीं

१ राम. २ सीता. ३ ब्रह्मदेवाचा बाप राम. ४ चर्माची. ५ चोळी. ६ राक्षस. ७ द्रव्यघट. ८ कार्तिकस्वामी. ९ लक्ष्मी. १० गरुड. ११ शेष. १२ स्वस्थ. १३ राक्षस.

बंधूसंकटींमित्र । वृद्धापकाळींवोळखिजेकलत्र । विषमकाळींसत्पुत्र । सांभाळितीपितयातें ७३ कींशस्त्रमारहोतांअत्यंत । करींचेंवोढणपुढेंहोत । कींसंसारतापेंसंतप्त । तेसाधुसंगेंनिवताती ७४ मगबोलेलक्ष्मण । जानकीहेंकापटयवचन । संकटींपडेलरघुनंदन । हेंकदापीघडेना ७५ तोदेवाधिदेवँसर्वोत्तम । सचराचरविजयफलांकितद्रुम । त्यांसिसंकटपडेलहेंदुर्गमँ। कल्पांतींहीघडेना ७६ जरीतमेंझांकेलचंडांश । जरीशीतज्वरबाधेलअग्नीस । जगद्रक्षककाळास । भूतबाधाजरीहोय ७७ ऊर्णनाभींचेतंतुवेंसहज । जरीबांधिजेलमहागँज । तरीसंकटींपडेलमहाराज । जनकतनयेजाणपां ८८ ऐसेंबोलतांलक्ष्मण । सीताझालीक्रोधायमान । तीक्ष्णशब्देंकरून । लक्ष्मणासिताडिलें ७९ ह्मणेतुमचेंकळलेंबंधूपण । वोळखिलीम्यांमनींचीखूण । माझाअभिलाषधरूनपूर्ण । पत्नीकरूंपाहासी ८० रामासिराक्षसेंवधिल्यावरी । मगकरूंइच्छिसीमातेंपत्नी । जैसामैंदक्षमाधरूनी । सेवाकरीसाक्षेपें ८१ सन्मुखदेखोनिरघुनाथा । ह्मणसीजानकीजगन्माता । कींवनींरामवधावयातत्वतां । तुजकैकेयीनेंपाठविला ८२ तूंदायांदपरमदुर्जन । सापत्नबंधूकपटीपूर्ण । जळोतुझेंकाळेंवदन । कळलेंज्ञानवैराग्य ८३ रघुपतीसविपरीतहोतां । प्राणत्यजीनमीतत्वतां । निर्दयपाहतांतुजपरता । भुवनत्रयींदिसेना ८४ माझाअभिलाषधरून । रामासिइच्छिसीमरण । ऐसेजानकीनेवाग्बाण । सौमित्रावरीसोडिले ८५ तप्तेंशस्त्राचेघायपूर्ण । त्याहूनितेबोलअतितीक्ष्ण । कींपर्वताचेकडेजाण । आंगावरीकोसळले ८६ वचनेंतप्ततीव्रबहुत । दुखवल्लींचींफळेंनिश्चित । परमदुःखीसुमित्रासुत । प्रत्युत्तरदेतसे ८७ ह्मणेमातेजनकनंदिनी । मीनिःकपटबोलिलोंवाणी । कींविजयीसदाचापपाणी । दुःखवनींत्यासकैचें ८८ पृथ्वीआपतेजवायुआकाश । तुजमजसाक्षचंडांश । मीबोलिलोंनिर्दोष । जैसेंयशसोज्वळ ८९ मीबालकतुंजननी । हाचिभावमाझेमनीं । तुझीतुजफळेलकरणी । पडसीपतनींषणमास ९० पुढेंजोंभेटेरघुनाथ । तोंभोगिसीमहाअनर्थ । ऐसेंबोलोनिसुमित्रासुत । चालिलात्वरितवनासी ९१ मगतोउन्मिळाप्राणनाथ । जनकाचाकनिष्ठजामात । गुंफेद्वारीरेषावोढित । धनुष्यानेंतेधवां ९२ ह्मणेतूंयारेषेबाहेरजासी । तरीपरमअनर्थपावसी । जोरघुवीरअयोध्यावासी । त्याचीचआणतुजअसे ९३ मगशोधीतघोरअरण्य । सौमित्रकरीतजायरुदन । ह्मणेहोतांचश्रीरामदर्शन । प्राणत्यागीनसर्वथा ९४ श्रीरामपदांकितमुद्रादिसत । ध्वजवज्रादिचिन्हेंमंडित । मार्गकाढितसुमित्रासुत । ऐकादृष्टांतयेथेंकैसे ९५ जैसेंश्रुतीच्याआधारेंनिश्चित । स्वस्वरूपींप्रवेशतोसंत । त्याचपरीसुमित्रासुत । रघुनाथासीपाहातसे ९६ कींसंसारतापेंसंतप्तपूर्ण । तोसद्गुरूसीजायश

१ स्त्री. २ ढाल. ३ विष्णु. ४ अशक्य. ५ सूर्य. ६ कोळी. ७ हत्ती. ८ सीते. ९ ठक. १० भाउ. ११ तापवलेलें हत्यार. १२ उदक. १३ सूर्य.

रण । कींतृषितजान्हवीजळलक्षून । जातधांवोनित्वरेने ९७ तैसासत्वरजातलक्ष्मण । तोंअश्वत्थाखालींमनमोहन । श्यामसुंदरदैदीप्यमान । म
खपाळणबैसलाअसे ९८ कोमाइलेंश्रीरामाचेंवदन । तोंयेतांदेखिलालक्ष्मण । शोकेंदिसेम्लानवदन । मगलोटांगणघातलें ९९ कंठझालासद्गदि
त । नयनींवाहतीअश्रुपात । श्रीरामचरणक्षाळित । पाहेतटस्थरघुवीर १०० श्रीरामह्मणेलक्ष्मणा । कांसीतांटाकोनिआलासीवना । येरूह्मणे
रघुनंदना । माझावधकरीवेगें १ ऐसेंवाटेमाझेमनीं । देहसमर्पावारामचरणीं । रामेंहृदयींधरिलातेक्षणी । कायसामनींखेदसांगे २ सौमित्रसद्ग
दितहोऊनिबोले । सीतेनेंवाग्बाणसोडिले । तेणेंसर्वांगमाझेंखोंचलें । तेंबोलिलेंनवजाय ३ मगबहुतप्रकारेंसमाधान । सौमित्राचेंकरीसीताजीवन ।
तैसेचपरतलेदोघेजण । आश्रमपंथलक्षुनियां ४ इकडेकथानककैसेंझालें । मागेंदशग्रीवेंकायकेलें । रूपअतीताचेंधरिलें । कापट्येंकरूनीतेधवां ५
जानकीचंद्रमंडळसुंदर । तेथेंराहूआलादशशिर । उभाराहिलारेषेबाहेर । अतीतवेषेंकरूनियां ६ कींहरिणीदेखोनिसुकुमार । न्यावयासीजपेव्या
घ्र । तैसाराक्षसउभारेषेबाहेर । दुराचारदुरात्मा ७ रावणपरमभयाभीत । रेखानुलंघवेयथार्थ । जैसावडवानळअद्भुत । शलभजैसावोलांडी ८
पुढेंउभादशमुख । परीजानकीनिर्भयनिःशंक । जैसामहेशापुढेंरंक । तैसादशकंठउभाअसे ९ इंद्रापुढेंजैसारंक । कींज्ञानियापुढेंमहामूर्ख । कींके
सरीपुढेंजंबुक । कींखद्योतसूर्यापुढें १० कींअग्नीपुढेंपतंग । कींखगेंद्रापुढेंउरगँ । कींराजहंसासमोरकाग । तैसाखळउभातथें ११ नामापुढें
पापदेख । कींवेदापुढेंचार्वाक । कींशंकरापुढेंमशक । मीनकेतनेंजेविदिसे १२ पंडितापुढेंअजापालक । कींश्रोत्रियापुढेंहिंसक । कींवासुकीपुढें
मूषक । लक्षणपाहूंपातला १३ कींअग्नींपुढेंजैसेंतृण । कींज्ञानापुढेंअज्ञान । कींमहावातापुढेंजाण । जलदजाळवितळे १४ तैसासीतेपुढेंरावण ।
त्याहाळूनपाहेतिचेंवदन । मनींह्मणेऐसेंनिधान । त्रिभुवनामाजीदिसेना १५ जगन्माताआदिशक्ती । तिचाअभिलाषधरितांचित्तीं । अवदसाआली
रावणाप्रती । झोळीहातींघेतली १६ कामधेनूअभिलाषितांजाण । क्षयपावलासहस्त्रार्जुन । जालंधरपार्वतीलागुन । अभिलाषितांभस्मझाला ।
१७ तृणाचेवळयीमाजीदेखा । कैसीराहीलदीपिका । तैसेंवाटेदशमुखा । स्पर्शकदांनकरवे १८ कर्पुराचापुतळा । केवींगिळीलप्रळयज्वाळा ।
तैसीनस्पर्शवेजनकबाळा । रावणाचेनीसर्वथा १९ सीतेप्रतीपुसेरावण । येवनींतुंकोणाचीकोण । कांबसविलेंघोरविपिन । कायकारणपुढेंअसे ।
१२० मगजगन्माताबोलेवचन । अयोध्याप्रभुरघुनंदन । मीत्याचीललनापूर्ण । कन्यकाजाणजनकाची २१ चंडीशकोदंडदारुण । रामेंभंगि

१ दुर्भाषणें . २ श्रीराम. ३ पर्णकुटीचा मार्ग. ४ रावणानें. ५ शंकर. ६ सिंह. ७ सर्प. ८ नास्तिक. ९ मदन. १० धनगर. ११ अग्निहोत्री. १२ उंदीर.

लेंनलागतांक्षण । जेंरावणबलदर्पहरण । मखरक्षणताटिकांतक २२ पाळावयापितृवचन । वनासिआलारघुनंदन । शुर्पनखेसीविटंबून । त्रिशि
राखरदूषणमारिले २३ आतांरावणकुंभकर्ण । यादोघांदुष्टांसवधून । बंदीचेवृंदारकसोडवून । अयोध्येसीमगजाऊं २४ वनागेलेरामलक्ष्मण ।
तेआतांयेतीलनलगतांक्षण । तोंवरीबैसावेंआपण । मनस्वस्थकरोनियां २५ मगस्वहस्तेंकरून । तुह्मासीपुजितीलरघुनंदन । नावेकबैसावेंह्मणो
न । तृणासनघातलें २६ भयाभीतलंकानाथ । प्रवेशनकरवेगुंफेंत । सीताबाहेरनयेसत्य । चापरेषाउल्लंघोनी २७ अतीतह्मणेहेंराक्षसवन ।
तूंएकलीयेथेंकामिन । बहुतेकआहेसराक्षसीण । आंतनेऊनगिळिसीमज २८ त्वांआसनघातलेंगुंफेंत । तरिमीआंतनयेंयथार्थ । मजतुंखासीहानि
श्चितार्थ । कळलेंमतसर्वतुझें २९ मगसीताह्मणेशिवहरहर । आह्मीनव्हेराक्षससाचार । असोंअतीताचेकिंकर । सत्यनिर्धारजाणपां १३०
रावणविचारीअंतरीं । हीनयेचिगुंफेबाहेरी । मगमूर्च्छायेऊनिउर्वीवरी । लटिकाचतोपडियेला ३१ ह्मणेआतांफळाहारेंविण । माझाग्रेथेंजातोप्राण ।
तूंगुंफेबाहेरयेऊन । वदनींमाझ्याफळघालीं ३२ तोंगुप्तरूपेंदेवसमस्त । जगन्मातेचेंस्तवनकरित । त्वांलंकेसजाऊनत्वरित । बंदमोचनकरींआह्मां
३३ तुजस्पर्शकरितांरावण । भस्महोईलनलगतांक्षण । मगआह्मांसबंदींहून । सर्वथाकोणीनसोडवी ३४ तुझेंकरूनिनिमित्त । लंकेसयेईलरघु
नाथ । तरीमुख्यरूपतुझेंअग्नींत । गुप्तकरींजननीये ३५ तुझेंप्रतिबिंबस्वरूपजाण । स्वयेंनटेलहुताशन । रावणासीभस्मकरून । कार्यसिद्धीकरी
लपैं ३६ तरीमुख्यरूपगुप्तव्हावें । छायारूपतेथेंजावें । ऐसेंदेवविनवितीसद्भावें । अवश्यह्मणेजानकी ३७ असोइकडेरावण । ह्मणेधांवधांवजा
तोप्राण । मगजगन्माताफळघेऊन । रेषेजवळीपातली ३८ भिक्षाघालावयासाचार । सीतेनेंहातकेलारेषेबाहेर । तैसीचवोढोनियांसत्वर । निशाच
रेंउचलिली ३९ आपुलेंस्वरूपलंकेश । दाविताझालाजानकीस । ह्मणेम्यांवंदींघातलेत्रिदश । वरींनिःशेषमजआतां ४० सीतेलागींआलिंगन ।
द्यावयाइच्छीमनींरावण । सीताह्मणेजासीभस्महोऊन । नलागतांक्षणआतांची ४१ अग्नीसबोळंबाकेविलागे । पतंगनुरेदीपसंगें । तुझामृत्युलागवे
गें । जवळीआलाराक्षसा ४२ रामपंचाननाचीवस्तुपूर्ण । जंबुकानेंशिंचोरून । जैसेंअन्नसदनींनिघेश्वान । तैसाजाणदशमुखातूं ४३ खदिरांगारा
तेंवृश्चिक । पुच्छहाणूंजातांदेख । तैसातूंभस्महोसीनिःशंक । सोडींमजराक्षसा ४४ परीनसोडीचरावण । घातलीरथावरीनेऊन । गुंफेभोंवतेब्राह्म
ण । तेभयेंकरूनपळाले ४५ गृहस्थासीपडतांविषमकाळ । आश्रितपळतीजैसेसकळ । तैसेब्राह्मणरानोमाळ । भयेंकरूनपळतीपैं ४६ सीता



१ अग्नि. २ राक्षसानें. ३ रावण. ४ देव ५ सिंह. ६ स्वयंपाकघरांत. ७ कुत्रें. ८ गरिबी. ९ सेवक.

झालीदीनवदन । ह्मणेकोठेंरामलक्ष्मण । करुणास्वरेंहांकफोडोन । धांवाकरीराघवाचा ४७ तोंनिराळमार्गेंरथ । घेऊनिजायलंकानाथ । दीर्घस्व
रेंआक्रंदत । जनकदुहितातेकाळीं ४८ नानावृक्षवनचरांप्रती । हांकफोडोनिसीतासती । ह्मणेसत्वरसांगारघुपती । राक्षसनेतोमजलाहें ४९
सीतेचीकरुणादेखोनी । पशुपक्षीअश्रुवाहतीनयनीं । वृक्षआणिपाषाणी । दुःखेंकरूनउलताती ५० सीताह्मणेश्रीरामा । अपर्णावरमनविश्रामा ।
पद्मजातजनकापूर्णब्रह्मा । धांवेआतांलवकरी ५१ हेताटिकांतकारघुवीरा । हेमखपालकासमरधीरा । अहिल्योद्धारापरमउदारा । धांवेंसत्वरयेवेळे
५२ रावणहासर्पदारुण । जिव्हेसिझोंबलाजातोप्राण । त्वांसुपर्णवहनागारुडीहोऊन । अतिसत्वरधांववेगीं ५३ रावणन्व्हेकेवेळमातगं । पंचा
ननाधांवतूंसवेग । वियोगानळजाळितोसर्वांग । करुणाघनवर्षेंतूं ५४ परमसाधूसुमित्रासुत । पवित्रपणेंकेवळआदित्य । त्यासिछळितारघुनाथ।
मजअंतरलाआतांची १५५ जोकरीलसाधूचेंछळण । त्यावरीठेवीलनसतेंचिदूषण । तरीत्याचेंहोईलवंशखंडण । नरकदारुणभोगीलतो ५६
साधूछळकदुराचारी । त्याचेभारेंकांपेधरित्री । ईश्वरसर्वदोषक्षमाकरी । तारीभवसागरींपतितांसी ५७ परीपतितजोकांसंतछळक । त्यासदुःखें
भोगवीअनेक । त्यादुष्टाचेंनपाहावेंमुख । पापीनिष्टंकसाधुद्रोही ५८ दरिद्रदुःखविघ्नेंबहुत । त्यावरीचकोसळतीसमस्त । सध्यामजचिआलीप्र
चीतँ । नेतोराक्षसधरूनियां ५९ जानकीचाविलापऐकोन । चराचरजीवकरितीरुदन । जटायूधांवलादेखोन । क्षोभलापूर्णकाळजैसा ६० का
र्याथोरगिरीसमान । वज्रचंचूपरमतीक्ष्ण । तिखटनखेंविद्रुमवर्ण । रावणावरीकोसळला ६१ जटायूह्मणेरेदुर्जना । महानिष्ठुराखळामलिना । सो
डवेगींरामललना । नातरीप्राणामुकशील ६२ दीपाचेपोटींहोयकाजळ । तैसाब्रह्मवंशींतूंचांडाळ । तुझेंछेदीनशिरकमळ । सोडीवेल्हाळजानकी
६३ कशासकेलेंवेदाध्ययन । कायकोरडेंब्रह्मज्ञान । जळोतुझेंतपाचरण । शिवभजनव्यर्थगेलें ६४ जोजगद्वंद्यजगदोद्धार । त्याचीललनातूंनेतो
सितस्कर । तुझेंकर्णनासिकसत्वर । छेदोनिआजटाकीन ६५ असोधनुष्यघेऊनिरावण । जटायूवरीसोडीबाण । येरेंचंचुघातेंकरून । शरमोडोनि
टाकिले ६६ तोंरिताझालातूणीर । जटायूसनलागेएकशर । परमप्रतापीअरुणपुत्र । केलेंविचित्रतेकाळीं ६७ चंचुघातेंकरून । मारिलेअश्व
मोडिलास्यंदन । सारथ्याचेंशिरछेदून । नलगतांक्षणटाकिलें ६८ मुकुटधनुष्यतूणीर । झडपाघालोनिनेलेसमग्र । चूर्णकेलेवस्त्रालंकार । दश
कंधरनग्नउभा ६९ रावणमस्तकींचेकेश । उपटोनिटाकिलेनिःशेष । क्षपणीकजैसालंकेश । निःशस्त्रीउभाअसे ७० गगनांतूनअकस्मात । राव

१ पार्वतीपति ह्मणजे ( शंकर. ) २ ब्रह्मदेवाचा पिता. ३ हत्ति. ४ पृथ्वी. ५ पातक्यास. ६ अनुभव. ७ वृक्षपाषाणादि व पश्वादि संपूर्ण प्राणी. ८ शरीर. ९ पर्वतासारखा.

णावरपडेजैसापर्वत । चंचुघातेंसमस्त । शिरेंतेव्हांफोडिली ७१ रुधिरेंझालाबंबाळ । जैसाकुंकुमेंमाखिलाशैल । सांडोनिजानकीवेल्हाळ । घे
तलापळरावणें ७२ हृदयींबोधठसावतांसमग्र । निःशेषपळेअहंकार । सीताटांकोनिदशकंधर । पळेतैसाभयानें ७३ मनींविचारीलंकानाथ ।
पाखरेंमजगांजिलेंबहुत । मगउभाराहूनितेथ । पाचारीतजटायूसी ७४ ह्मणेतुजरघुनाथाचीआण । सांगेंतुझेंमृत्यंगकोण । मीहीसांगतोंआपुलें
मरण । युद्धकंदनकरूंमग ७५ जटायुह्मणेपक्षउपटितां । मजमृत्युयेततत्वतां । तुझेंमरणलंकानाथा । तैसेंचसांगत्वरेनें ७६ येरूह्मणेचरणांगुष्ठ
फोडितां । मीमृत्युपावेनक्षणनलागतां । जटायुधरावयासितत्वता । राक्षसेंकेलाउपाय ७७ जटायूनेंधांवोनिआंवळिला । दशमुखाचाचरणांगुष्ठ
फोडिला । येरेंझडपघालोनितेवेळां । दोनीपक्षउपटिले ७८ भडभडांचालिलेंरुधिर । कासावीसझालाद्विजवर । ह्मणेकेव्हांयेईलरघुवीर । हा
समाचारसांगेनतया ७९ स्कंदतातमित्रांगना । स्कंधींघेऊनराक्षसराणा । गतीथोडीवाटेपवना । निराळमार्गेंतेविजाय १८० जटायूकारणेंअत्यंत
जनकतनयाशोककरित । निजकरेंलल्लाटपिटित । आक्रंदतदीर्घस्वरें ८१ ह्मणेजटायूभक्तपूर्ण । मजकारणेंवेंचिलाप्राण । रामेंपितृव्यह्मणून । द
शरथासमानमानिला ८२ ऐसीसीताशोककरित । रावणनिराळमार्गेंजात । तोंमातंगपर्वतावरीअद्भुत । पांचवानरउभेअसती ८३ सुग्रीवनळनी
ळजांबुवंत । पांचवामहारुद्रहनुमंत । व्यासवाल्मिकादिवर्णित । ख्यातीजयाचीअभिनव ८४ उपजतांचिबाळपर्णी । क्षणेंआकळिलाजेणेंतरणी ।
इंद्रादिनिर्जरसमरंगणीं । जर्जरकेलेप्रतापें ८५ अंतरिक्षजातांदशकंधर । जानकीफाडीचीरपदर । अलंकारबांधोनिसमग्र । मारुतीकडेटांकिले ।
८६ तेग्रंथीघेऊनहनुमंतें । निराळमार्गेंलक्षिलेंवरुतें । तोंराक्षसगगनपंथें । जानकीघेऊनजातसे ८७ हांकफोडितसुंदरा । ह्मणेधांवश्रीरामरा
जीवनेत्रा । घनःश्यामाकोमलगात्रा । वंद्यत्रिनेत्राविधीतें ८८ हेरामजगदंकुरकंदा । हेताटिकांतकाब्रह्मानंदा । हेराक्षसांतकाजगद्वंद्या । पावेंएक
दांमजलागीं ८९ ऐसेंऐकतांहनुमंत । मनींआवेशलाअत्यंत । ह्मणेकोणेसभाग्याचीवस्त । राक्षसनेतोचोरुनी १९० मारूनियांरजनीचर । सो
डवूंआतांहेसुंदर । तिच्याशोधासयेईलभ्रतार । देऊंतयासिसाक्षेपें ९१ जैसादेखतांवारण । अकस्मातउठेपंचानन । तंवभयाभीतझालारावण ।
ह्मणेहेंविघ्नदुसरेंअसे ९२ मारुतीउड्डाणघेऊनअद्भुत । गेलाध्रुवमंडळपर्यंत । तोंरावणप्रवेशलालंकेंत । अदृश्यहोयक्षणमात्रें ९३ काळाचेदाढेंतप
डतांउरला । सर्पमुखींचामूषकपळाला । मृगेंद्रकवेंतूनवांचला । पूर्वभाग्येंजंबुक ९४ व्यर्थगेलेंकपीचेंउड्डाण । मनींह्मणेअंजनीनंदन । पुढेंयाचासूड
घेईन । बहुगांजीनराक्षसां ९५ मगअवनिजेचेअलंकार । अवनीगर्भींठेवीवानर । इकडेलंकेंतदशकंधर । कायकरिताजाहला ९६ परम

सबळअठराराक्षस । त्यांसिआज्ञापीलंकेश । ह्मणेजाऊनपंचवटीस । शोधारामासीसाक्षेपें १७ रामआणिलक्ष्मणा । वधोनियावेंदोघांजणा । त्या
णींमस्तकींवंदोनिआज्ञा । उत्तरपंथेंचालिले १८ काळेंबोलावूंपाठविलें । आयुष्यसिंधूचेंजळआटलें । कींमृत्युपुरीसचालिले । स्थळपाहावयाराव
णा १९ रावणसीतेसएकांतीं । नेऊनियांबहुतप्रार्थी । पायींलागेलंकापती । काकुळतीयेतसे २०० वैभवसंपत्तीदाखवीसमस्त । आपुलावर्णी
पुरुषार्थ । म्यांबंदींघातलेदेवसमस्त । मजवरितवरींकां १ लज्जानधरीकामातुर । मरणनेणेप्रतापशूर । मद्यपियाससारासार । कांहींविचारसम
जेना २ कामिकासिनहोयविरक्ती । मैंदासीकायहरिभक्ती । व्याघ्रासिउपजेशांती । कालत्रयींघडेना ३ असोलाजसोडूनिदशवदन । एकरा
शीरामरावण । ह्मणेजानकीऐकवचन । लावीलग्नऐक्यत्वें ४ चित्रानक्षत्रतूळराशी । समानरामरावणासी । तरीतूंअवज्ञाकांकरिसी । बोलवेगीं
शुभानने ५ जानकीह्मणेदशमुखा । तस्करामहामलिनामूर्खा । आलिंगितांपतंगदीपिका । कैसामगवांचेल ६ प्रळयाग्नींतस्नानकरुनी । कैसा
मेशकयेईलवांचोनी । वासुकीचाविषदंतपाडुनी । मूषककैसायेईल ७ मृगेंद्रजिव्हेचेंमांसदेख । तोडोनिकेवीराहेजंबुक । आदित्यमंडळमंडूक
पाडीकैसाभूमीतें ८ सौंदंणीआणिसमुद्र । दोनीएकराशीसाचार । वायसआणिवैनतेयपक्षींद्र । एकराशीहोतसे ९ सिंहआणीसृगालजाण ।
मशकमहेश्वरासीसमान । तमआणितरणीपूर्ण । केवीसमानसांगपां २१० रजकआणिरमावर । कुक्कुटआणिकुंजर । रजनीचरआणिरघुवीर । के
वीसमानसांगपां ११ कीकटआणिकमललोचन । कविठआणिकमलासन । तैसारामआणिरावण । राशीगुणकायसा १२ मदनेंसर्वांसीजिंकि
लें । परीशिवापुढेंतेंनचाले । अग्नीनेंसर्वांसीजाळिलें । परीमेघापुढेंबळहीन १३ सर्वांसिगांजिसीतूंपरम । परीमजस्पर्शतांहोसीभस्म । आतांतु
जवधावयारघूत्तम । पूर्णकामयेईल १४ मनींभावीतसेरावण । हिचेंजोंस्थिरावेमन । तोंवरीअशोकवनींठेवून । रक्षावीहेबहुतांपरी १५ मगअशो
कवनींठेवूनजानकीतें । रक्षावयाबहुठेविलेभोंवते । त्रिजटेचेअनुमतें । ठायींठायींरक्षक १६ अशोकवनाबाहेर । पांचकोटीरजनीचर । अव्यग्रबै
सलेअहोरात्र । नव्हेसंचारवायूचा १७ निधानाभोंवत्याभूतावळी । रक्षितीजैशासर्वकाळीं । तैशाराक्षसीसीतेजवळी । वेष्टोनियांबैसल्या १८ स
त्वशीळविभीषण । परमपुण्यपरायण । ह्मणेसीतारावणेंआणून । कुळक्षयमांडिला १९ रावणपरमकामातुर । झालाउन्मत्तअविचार । तप्तझालें
शरीर । नावडेउपचारविलास २० ब्रह्मयांसिह्मणेरावण । पुरेतुझेंवेदाध्ययन । अंगिरापतीतुझेंज्ञान । ठेवींझांकोनक्षणभरी २१ किन्नरहोपुरे

---

१ ठक, लुटारु. २ घुंगुर्डें. ३ उंदीर. ४ सिंह. ५ कोल्हा. ६ पाण्याचें डबकें. ७ गरुड. ८ सूर्य. ९ हत्ति. १० राक्षस.

गायन । नकाचेतवूंपंचबाण । सीतिच्याभोगालागींप्राण । कासावीसहोताती २२ सकळगंगाघरींराबत । तयांसीह्मणेलंकानाथ । शीतळउपचार
बहुत । करावाआधींमजलागीं २३ बोलावूनिराक्षसिणी । रावणसांगेत्याचेकर्णीं । सीतेसितुह्मीभेडसाउनी । मजशयनींवशकरा २४ अवश्य
ह्मणतीनिशाचरी । अमंगळाधांवल्यालवकरी । ह्मणतींतूंरावणासीवरीं । नाहींतरीतुजआह्मीभक्षूं २५ विकटरूपविशाळकर्ण । एकवक्रएकलंब
स्तन । बाबरझोंटीआरक्तनयन । भेडसावितीसीतेतें २६ खरमुखव्याघ्रवदन । सूकरमुखलंबचरण । ज्यांच्यानासिकांतजाण । केशींगजगुंतले
२७ एकीस्तनचपेटेंकरूनी । झाडेंटाकितीमोडोनी । एकपदाद्विपदात्रिचरणी । खाउंह्मणतीसीतेतें २८ परमकुश्चितकुरूपवर्ण । अमंगळदुर्गंधी
विटेमन । एकह्मणेइचेंनरडेंपिळोन । घोंटघेऊंआतांची २९ एकह्मणतीशिराकाढा । दांतखातीकडकडा । डोळेवटारितीपुढां । हांकादेतीआक्रोशें
३० ऐसेंकरितीराक्षसिणी । परीतेंत्रिभुवनपतीचीराणी । निर्भयपरमअंतःकरणीं । कदांनगणीतयांसी ३१ संसारदुःखेंनानारिती । ज्ञानिया
आंगींआदळती । परीतेसहसानगणिती । सीतासतीतैसीच ३२ बहुतभुंकतीश्वान । परीनभीकदावारण । कींजंबुकभयेंपंचानन । कदांदचकोनि
उठेना ३३ कींसुटलाझंझामारुत । धुळीनेंबहुतउडत । परीबैसंकनसांडीपर्वत । तैसीनिर्भयसीतासती ३४ जैसीकागांमाजीकोकिळा । तै
सीत्रिजटापुण्यशीळा । राक्षसीदटाऊनिसकळा । दूरकेल्याप्रतापें २३५ त्रिजटाह्मणेजनकनंदिनी । तूंचिंतासहसानकरींमनीं । तुजभेटेलकोदंड
पाणी । अल्पकाळेंकरूनियां ३६ वर्तमानअयोध्येपासोनी । जेंजेंझालेंजनस्थानीं । त्रिजटेप्रतिजनकनंदिनी । सांगेसकळप्रीतीनें ३७ सिंहा
वलोकनेंकरून । परिसामागीलचरित्रगहन । मृगवधोनिरामलक्ष्मण । आश्रमासीपरतले ३८ तेकथागोडअत्यंत । श्रवणकरोतज्ञातेपंडित ।
रसिकश्रीरामविजयग्रंथ । श्रवणेंसमस्तकोडेंपुरे ३९ अयोध्याधीशाब्रह्मानंदा । श्रीधरवरदाआनंदकंदा । अभंगअक्षयअभेदा । वेदवंद्यासुखाब्धी
४० स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मीकीनाटकाधार । सदांपरिसोतभक्तचतुर । पंचदशोध्यायगोडहा २४१ श्रीकृष्णार्पणमस्तु ।
श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥ ओव्या ॥ २४१ ॥ ॥ आध्याय ॥ १५ ॥ ॥ ७ ॥ ७ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥

१ कुत्रे· २ हत्ति· ३ फार मोठा वारा· ४ ठिकाण· ५ कावळ्यांत· ६ सीते· ७ राम· ८ नाशिक येथें· ९ हरिण· १० गुंफेस· ११ इच्छापूर्णहोय·

श्रीगणेशायनमः । । श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । रामकथाअतिसुरस । सकळतीर्थांहूनिविशेष । गंगेपरीसनिर्दोष । निजभक्तांसीप्रियहोय
१ इहपरत्रेंतीरसाचार । रघुवीरचरित्रनिर्मळनीरें । दाटलापूर्णप्रेमपूर । गर्जेथोररामनामें २ गंगेमाजीवाहेजीवन । कथासरितेंतजगज्जीवन ।
चित्तवृत्तीजळचरेंपूर्ण । माजीनिमग्नतळपती ३ तेथेंहळूहळूडहुळेपाणी । येथेंरामकथानिर्मळअनुदिनीं । ब्रह्मानंदउचंबळोनी । पुनीतकरीत्रिभु
वना ४ गंगेमाजीबुडतांमरावें । येथेंबुडीदेतांतरावें । हेंविशेषकर्तृत्वस्वभावें । गंगेहूनिअधिक ५ श्रीरामकथाकरितांश्रवण । सकळहीतीर्थेंकरिती
स्नान । तेंफळहाताआलेंपूर्ण । विशेषजाणरामकथा ६ ऐसीरघुवीरकथापावन। करितांसंतश्रोतेसावधान । तरीवक्ताहर्षपूर्ण। गगनामध्येंनसमा
ये ७ पंधरावेअध्यायींसुंदर । सीतेसघेऊनगेलादशकंधर । मृगवधोनिरामसौमित्र । पंचवटीसपरतले ८ मार्गींहोतीअपशकुन। चालतांजडझा
लेचरण । आश्रमांतपाहातीयेऊन । दिसेशून्यभणभणित ९ जैसेंप्राणावीणकलेवर । कींउदकावीणसरोवर । कींनासिकावीणवर्क्र । शोभिवंतन
दिसेपैं १० कींफळेंवीणतरुवर । कींसैन्यावीणनृपवर । कींनसतांस्वाहास्वधाकर । व्यर्थमंदिरज्यापरी ११ कींभूतदयेवीणज्ञान । कींप्रेमेंवी
णकीर्त्तन । कींबुबुळावीणनयन । गुंफाशून्यतेवीदिसे १२ ऋषीप्रतिपुसावेंवर्त्तमान । परीतेपळालेकुटुंबघेऊन । दशदिशादिसतीशून्य । रघुनंद
नगाहिंवरे १३ नेत्रींचालिल्याविमळांबुधारा । सीताकोठेंसांगसौमित्रा । ऐसेंबोलतांनवपंकजनेत्रा । मूर्छनाआलीतेवेळीं १४ निचेष्टितपडेर
घुनंदन । वाराघालीलक्ष्मण । नेत्रांसलावूनियांजीवन । जगज्जीवनसावधकेला १५ देवाधिदेवआत्माराम । नीलग्रीवजपेज्याचेंनाम । त्यासिकां
जडलामोहभ्रम । नवलपरमहेंवाटे १६ अंधकारींबुडालादिनेंकर । प्रळयाग्नीसबाधीशीतज्वर । कल्पवृक्षदारोदार । मागेभिक्षानवलहें १७
काळासिभूतेंझडपिती । मृगजळींबुडालाअगस्ती । ह्मणोनिसीतेकरितांरघुपती । करीखंतीनवलहें १८ तरीपुराणपुरुषरघुनंदन । मायातीतशु
द्धचैतन्य । परीमायेचाअभिप्रायपूर्ण । दावीवनींजगद्गुरू १९ असोवसिष्ठेंउपदेशिलेंज्ञान । कींसर्वद्रष्टाएकआपण । हाजगडंबरभासपूर्ण । मा
यामयलटिकाची २० जैशास्वप्नींच्याजन्मपंक्ती । यातनाभोगीनानागती । जागाहोतांनिश्चिती । मिथ्यामयसर्वही २१ स्वप्नामाजीपति
व्रता । मरणदेखेप्राणनाथा । परीसवेंचिजागेंहोतां । सौभाग्यपाहतांतैसेंची २२ घटफुटतांचंद्रबिंब । तैसेंचिअसेस्वयंभ । तरीलीलासीतावल्ल
भ । संपादोनीदावितसे २३ असोसौमित्रह्मणेरघुनाथा । भोंवतालियांवृक्षपर्वतां । यांसिपुसावेंयथार्था । सीताशुद्धीसांगतीते २४ गिरिकंद

१ मृत्युलोक आणि स्वर्गलोक. २ उदक. ३ नदी. ४ मासे वगैरे. ५ पवित्र. ६ रावण. ७ शरीर. ८ मुख. ९ वृक्ष. १० वैश्वदेवादि पंचमहायज्ञ. ११ शंकर. १२ सूर्य.

रींगवाक्षमाळ । शोधीतजाततमाळनीळ । गोदेचेतीरींनिर्मळ । शोधीसकळसौमित्र २५ वनोवनींरामधांवत । सीतेसीतेह्मणोनिआळवित । कु
रंगनयनेभेटत्वरित । शोकेंबहुव्यापिलों २६ बदकचातकराजहंस । मयूररावेसाळयांस । तयांसिपुसेअयोध्याधीश । कोठेंडोळसजानकी २७
गजसिंहशार्दूळकुरंग । नकुळशुककस्तूरीमृग । कोकिळाचक्रवाकभृंग । सीतारंगपुसेतयां २८ कोणीनदेतीउत्तर । त्यांवरीकोपलारघुवीर । ह्म
णेसौमित्राआणींधनुष्यशर । छेदीनकांतारसर्वहें २९ सौमित्रह्मणेरघुनंदना । हेकेवीजाणतीतुझीअंगना । यांवरीकोपराजीवनयना । नकरावा
त्वांसहसाही ३० सीताविरहेंरघुनंदन । भुलोनिबोलेकायवचन । लक्ष्मणासिह्मणेतूंकोण । कायकारणउभायेथें ३१ तेव्हांसौमित्रबोलेवचन ।
श्रीरामाचाबंधुपूर्ण । मगबोलेरघुनंदन । रामतोकोणकोठील ३२ भवकोदंडभंगिलेंथोर । तोचिरामसमरधीर । मगबोलेसीतावर । धनुष्यकोठें
भंगिलें ३३ जनकाच्यामंडपांत । धनुष्यभंगिलेंयथार्थ । जनककोणाचाकोणयेथ । ह्मणेसांगआतांची ३४ जानकीचाजोपिता । तोजनकजाण
तत्वता । आहाजानकीगुणसरिता । मजआतांचिदावींत्वरें ३५ सौमित्रासिह्मणेरघुवीर । आमुचेंकोठेंग्रामंदिर । येरूह्मणेअयोध्यापूर । सेविलें
कांतारपितृआज्ञें ३६ वनाआलोंकोणकोण । उत्तरदेतलक्ष्मण । तुह्मीआह्मीसीताचिद्रत्न । तिघेजणआलोंवना ३७ तरीजानकीदावींत्वरित ।
ऐसेंबोलतांरघुनाथ । भूमीसीपडेमूर्च्छागत । सौमित्रेंमगसांवरिला ३८ तोंअस्तागेलादिनकर । रात्रीमाजीप्रकटेरोहिणीवर । रामह्मणेरेजाळि
तोमित्र । अतितीव्रबहुतकां ३९ मगबोलेसुमित्रासुत । स्वामीहाआदित्यनव्हेचंद्रसत्य । शीतळकिरणतावीतप्त । सीताविरहेंकरूनियां ४०
श्रीरघुनाथदेवाधिदेव । दावीइत्यादिनानाभाव । जोअजअजितस्वयमेव । उमाधवध्यायजया ४१ सीतेसीतेह्मणोन । आलिंगितवृक्षपाषाण ।
तोंतत्काळतेउद्धरून । जातबैसोनविमानीं ४२ सौमित्रासिह्मणेरघुनंदन । चलाघेऊंअगस्तीचेंदर्शन । त्यासिसांगोंवर्तमान । बुद्धीपूर्णसांगेलतो ४३
अगस्तीचेआश्रमाप्रती । रामसौमित्रदोघेजाती । तोंद्वारपाळजाऊंनदेती । उभेराहतीतेथेंची ४४ कलशोद्भवासीवर्त्तमान । शिष्यसांगतीजाऊ
न । तोंसीताघेऊनिगेलारावण । ऋषीसज्ञानेंसमजलें ४५ अंतरींविचारीमुनी । श्रीरामराज्यसांडोनि । हिंडतोवनीं । हारविलीजनकनंदिनी । शोकें
करूनविव्हळ ४६ स्त्रीविरहितरघुनंदन । आतांनघ्यावेंत्याचेंदर्शन । मगसेवकाहातींसांगोन । पाठविलेंतेकाळीं ४७ आजिदर्शननहोयतुह्मांतें
मागेंजावेंआलियापंथें । हांसेंआलेंरघूत्तमातें । ह्मतजाणोनिऋषीचें ४८ परतोनिचालिलारघुवीर । परीक्रोधावलासौमित्र । ह्मणेनिर्दयकठिणवि

१ बाप. २ गांव घर. ३ अरण्य. ४ सूर्य. ५ चंद्र. ६ लक्ष्मण. ७ शंकर. ८ अगस्तिऋषीस. ९ अंतःकरण. १० व्याप्त.

प्र । जगदोद्धारपरतविला ४९ ज्योतिर्लिंगजाणोन । लत्ताप्रहारेंकेलेंताडण । कामधेनूआलीआपण । शुष्ककाष्ठेंमारिलेंतिये ५० कल्पतरूदारीं उगवला । देखतांअभाग्येंउपडिला । परीसजाणोनिगोफणिला । चिंतामणीघातलापायरीस ५१ अमृतकुंभदेवेंलाभला । तोजाणोनिबळेंचिउ लंडिला । तैसाजगद्वंद्यघरासिआला । माघारादवडिलासमजोनी ५२ मगह्मणेरघुनंदन । अगस्तीपरमसज्ञान । तोसीतेवीणमाझेंदर्शन । सहसा हीनघेची ५३ मीनिर्विकारनिर्गुण । सीतासर्वांसीकारण । तिणेंमजजागाकरून । सगुणत्वासीआणिलें ५४ तिणेंनिर्मूनपंचभूतें । त्रिगुणआ णितत्वेंसमस्तें । अवतारखेळकौतुकेंबहुतें । नानापरीदावीतसे ५५ मीअरूपअनामनिश्चिती । हेंसर्वजाणेंअगस्ती । तोॠषीमाजीकेवळगभस्ती । तपेंज्ञानेंतेजस्वीजो ५६ असोश्रीरामजगजेठी । परतोनिआलापंचवटी । वृक्षलताकवळीपोटीं । सीतासीताह्मणोनियां ५७ पंचवटीचात्यागक रून । तत्काळचालिलारघुनंदन । जैसाअहंदेहबुद्धीसांडोन । योगीविचरेनिरंजनीं ५८ कींप्राणत्यागीकायाजैसी । कींकोपत्यागीजमदग्नीॠ षी । कींसंसारमायानिश्चयेसीं । विरक्तत्यागीमनींहुनी ५९ जीर्णदेहत्यागितीउरंग । कींतपोधनकरीकर्मत्याग । कींपवित्रत्यागीकुमार्ग । भ्रष्टक र्मजाणोनियां ६० कींपरनिंदासज्जनटांकिती । आत्मस्तुतीसांडिजेसंतीं । कींअमंगळाचीसंगती । नकरितिश्रोत्रीकदांही ६१ कींसंसारदुःखें दारुण । विवेकीत्यागीजैसेंवमन । पंचवटीतैसीत्यागून । रामलक्ष्मणचालिले ६२ तोंमागदेखेरघुनंदन । द्वादशहातलांबपूर्ण । चारहातरुंदप्रमाण । राक्षसपाउलेंउमटलीं ६३ त्याजवळीकुंकुमांकितजाण । उमटलेसीतेचेचरण । मुक्तेंविद्रुमपडलींगळोन । लक्ष्मणविस्मितपाहातसे ६४ कमळ मित्रकुळभूषण । शोधीतजातघोरविपिन । तोंजटायूदेखिलादुरोन । रक्तेंकरूनबंबाळ ६५ किंशुकफुललाबहुत । तोदुरूनआरक्तनगदिसत । तै साजटायूपडिलातेथ । रामस्मरणकरीतची ६६ रघुनाथेंधनुष्यघेतलें । शीतवेगींचढविलें । श्रीरामासीऐसेंभासलें । कींहाराक्षसबैसला ६७ भक्षोनियांजनकनंदिनी । बैसलातृप्तहोउनी । रक्तवाहातचहूंकडोनी । पर्वतजैसापाझरत ६८ जवळीआलाचापपाणी । तोंरामनामाचीमधुरध्व नी । तीरघूत्तमेंऐकतांश्रवणीं । येतधांऊनतयापासीं ६९ डोळांउरलासेप्राण । जटायूपडिलासेकरीतस्मरण । रघुनाथेंतोभक्तदेखोन । हृदयींपूर्ण गहिंवरला ७० जटायूसपुढेंघेऊनदेख । शोककरीअयोध्यानायक । जैसेंएकुलतेंमरतांबालक । मातातळमळीज्यापरी ७१ कींपरमआप्तबं धुजनीं । रणींपडिलियावाटेहानी । त्याचपरीचापपाणी । हृदयींधरूनिविलपत ७२ परमखेदकरीसौमित्र । ह्मणेजटायूभक्तआणिमित्र । जोमित्र

१ पृथ्वि उदक अग्नि वायु आकाश. २ सत्वगुण रजोगुण तमोगुण. ३ मीच देह अशी बुद्धि. ४ उरस्थलानें चालतो ह्मणून उरग ( सर्प ) ५ मोत्यें व पोवळीं. ६ अरण्य. ७ पळस.

सारथीयाचापुत्र । ऐसापवित्रनाढळे ७३ जटायूसह्मणेरघुवीर । बारेकायझालासमाचार । तोमजसांगेंअणुमात्र । जरीशक्तीअसेलबोलावया
७४ श्रीरामाचेश्रवणकमळीं । हळूहळूजटायूसांगेतेवेळीं । रावणानेंसीतानेली । म्यांसोडविलीहोतीयेथें ७५ भोंवतेंपाहेरघुनंदन । तोंअश्वसारथी
आणिस्यंदन । रावणाचींवस्त्रेंअलंकारपूर्ण । चूर्णहोऊनिपडियेलीं ७६ पाहतांजटायूचापराक्रम । पुढतीगर्हिंवरेरघूत्तम । सीतचेशोकाहूनिपरम । शो
कवाटेजटायूचा ७७ जटायूबोलेवचम । रघुपतीतुझीघालोनिआण । राक्षसेंघेतलामाझाप्राण । पक्षउपडोनिटांकिले ७८ माझेनआतांनबोलवेदेख
ह्मणोनिपर्दीठेविलामस्तक । रामाचेंस्त्रवेनेत्रोदक । अभिषेकझालाजटायूसी ७९ मगबोलेरघुनंदन । जटायूमीतुजउठवीन । मजतूंसाह्यहोईंपूर्णं ।
दशरथाऐसासत्वर ८० मगबोलेअरुणनंदन । ऐसेंपुढेंमजनयेमरण । तुझेनिजांगावरीजाण । सोडीनप्राणआतांची ८१ जटायूविलोकीरामवदन
तैसेंचिहृदयींरेखियेलेंध्यान । मुखेंकरीनामस्मरण । चालिलाप्राणतेकाळीं ८२ श्रीरामेंहोताहृदयींधरिला । तेथेंजटायूनेंप्राणसोडिला । ब्रह्मांहं
सविमानघेऊनिआला । बरीबैसविलाजटायू ८३ जटायूसह्मणेरघुनंदन । तुजलास्वर्गींदशरथभेटेलजाण । त्यासिसीतानेलीहेंवर्तमान । सहसाही
नसांगावें ८४ परमप्रतापीदशरथपिता । कर्मभूमीसयेईलमागुता । यालागींनसांगावीवार्त्ता । जाणतत्वताजटायू ८५ मीरावणासीवधोनी । पाठ
वीनस्वर्गभुवनीं । मगतोस्वमुखेंकरूनी । वृत्तांतसर्वसांगेल ८६ असोजटायूस्वर्गींपातला । रघुनाथेंपितृव्यमानिला । दशरथेंबंधूह्मणविला । शक्रा
चियायुद्धकाळीं ८७ यालागींजनकजामातें । पितृव्यमानिलाजटायूतें । त्याचेनिसंगेंसीताकांतें । पंचवटीसकाळक्रमियेला ८८ घडिघडीयेऊनि
यांबैसे । श्रीरामत्यासींगोष्टीपुसे । जटायूभक्तविशेषें । रघुपतीसआवडता ८९ त्याचींउत्तरक्रियासमस्त । करिताझालाकौसल्यासुत । सौमित्रेंका
ष्ठेंमेळवूनिबहुत । अग्नीदीधलातयासी ९० ऐसाभक्तकरुणाकर । शरणागतावज्रपंजर । पुढेंचालिलाराघवेंद्र । सीतासुंदरशोधावया ९१ दक्षिण
पंथेंदंडकारण्यांत । जेथेंजेथेंराहिलारघुनाथ । शिवलिंगस्थापिलेंतेथ । बाणचिन्हांकितअद्यापी ९२ मयूरगिरीपरमगहन । तेथेंराहिलाआहिल्यो
द्धारण । आहासीताह्मणोन । वृक्षपाषाणआलिंगी ९३ तोंकैलासींवर्त्तलेंनवल । बैसलाअसतांजाश्वनीळ । हातींघेऊनिजपमाळ । जपेकोमलरा
मनाम ९४ जेणेंशमलेंहाळाहळें । तेंसहस्त्रनामांहूनिअतिनिर्मळ । चंद्रापरीसअतिशीतळ । अमृताहूनगोडपैं ९५ दिनकरोंपरीसतेजाळ । जें
कांआकाशापरीविशाळ । जेंसकळआनंदाचेंमूळ । नामकेवळपरब्रह्म ९६ रूपसगुणनामनिर्गुण । रूपमायामयनामआनंदघन । रूपझांकेनाम

---

१ अरुणाचा. २ रथ. ३ गळे. ४ अरुणाचा पुत्र जटायू. ५ ब्रह्मदेव. ६ मृत्युलोकास ७ चुलता. ८ श्रीराम. ९ शंकर १० विष. ११ सूर्य.

पूर्ण । अनंतयुगींठसावे ९७ रूपसर्वेंचनामनिर्वच । रूपक्षणिकनामसाच । नामअर्थकरितांउगेच । वेदतटस्थराहिले ९८ असोतेंनामसर्वां
तसार । अखंडजपतकर्पूरगोर । तेथेंहिमाद्रीकन्याजोडोनिकर । विनवीसादरशिवातें ९९ ह्मणेस्वामीजपआणिध्यान । कोणाचेंकरितांरात्रदिन ।
कोणताथोरअसेतुह्मांहून । मजलागोनिसांगातें १०० शिवह्मणेऐकशुभकल्याणी । सकळगुणसरितेलावण्यखाणी । जोरविकुळदिव्यमुगुटमणी ।
मीध्यातोंमनींतयातें १ जोराक्षसकाननवैश्वानर । जोभक्तहृदयारविंदभ्रमर । जोअज्ञानतमनाशकदिवाकर । जोउदारधीरश्रीराम २ जोत्रैलो
क्यस्तंभविशाळ । जोनिगमवल्लीचेंपक्कफळ । जोजगदंकुरकंदनिर्मळ । तमाळनीळश्रीराम ३ जोद्विपंचमुखदर्पहरण । जोभवगजपंचानन । जोज
नकजामातमखपाळण । त्याचेंध्यानकरितोंमी ४ ऐकतांहांसलीभवानी । तोरामहिंडतोवनोपवनीं । सीतासीताह्मणोनी । वृक्षपाषाणआलिंगितो
५ रावणेंनेलीत्याचीयुवती । स्त्रीचेवियोगेंभ्रंशलीमती । त्याचेंध्यानअहोरात्रीं । करितांतुह्मीनवलहें ६ शिवह्मणेतोरघुवीर । लीलावतारीनिर्विकां
र । वेदआणिभोगींद्र । नेणतीपारजयाचा ७ तोपूर्णब्रह्मानंदनिर्गुण । देवांचीकरावयासोडवण । सगुणलीलावेषपूर्ण । भक्तांलागींदावीतसे ८
विश्वरूपएकरघुवीर । जेवीसुवर्णएकबहुअलंकार । कींबहुतसदनेंएकअंबर । सीतावरव्यापकतैसा ९ कींबहुलहरियाएकसमुद्र । लोहएकशस्त्रें
अपार । तंतुएकपटविचित्र । तैसारघुवीरव्यापकत्वें १० बहुबिंदुएकजलधर । घृतएकगाईअपार । अनेकवाद्येंसाचार । परिनादएकची ११
एकउर्वीबहुतवनस्पती । एकवेदबहुतश्रुती । कींएकाचनभोंझळकती । भगणेंजैसींअपार १२ तैसारामव्यापकतत्वता । मगबोलेहिमनगसुता ।
तुह्मीएवढामहिमावर्णितां । त्यारघुनाथाभुलवीनमी १३ मगजनकजेचेंरूपधरूनी । रामासन्मुखआलीकाननीं । कांचनवर्णीसुहास्यवदनी । प
द्मनयनीसुरेख १४ बोलतांझळकतीदंतपंक्ती । तेजतळपतसेक्षितीं । अन्नपूर्णातेआदिशक्ती । अतर्क्यगतीतियेची १५ आंगींचासुगंधअपा
र । त्यासुवासेंतृप्तकांतार । सुगंधासीवेधोनिसमग्र । षट्पदचक्रेंधांवती १६ विद्युत्प्रायपीतवसन । सर्वालंकारमंडितपूर्ण । राघवेंतेदृष्टींदेखोन ।
मुखमुरडोनिचालिला १७ तिकडेनपाहेचिसर्वथा । तंवतेपुढेंयेतजगन्माता । ह्मणेस्वामीरघुनाथा । आल्येंमीसीतापाहामज १८ मागुतीतिये
सटांकून । रामआलिंगीवृक्षपाषाण । आश्चर्यकरीलक्ष्मण । जानकीसुटोनआलीकीं १९ मगह्मणेआत्मारामा । विषकंठहृदयापूर्णकामा जान
कीलागींपूर्णब्रह्मा । आलिंगनद्यावेंजी १२० व्याघ्राचियेकवेंतूनी । पूर्वभाग्येंवांचेकुरंगिणी । अयोध्यानाथातुझीराणी । आलीतेवींसुटोनियां

---

१ मुख्य. २ शंकर. ३ पार्वती. ४ श्रेष्ठ श्रीराम. ५ अग्नि. ६ सूर्य. ७ रावणाचा गर्व. ८ यज्ञरक्षक. ९ स्त्री ( सीता ) १० सहाविकारांपासून मुक्त. ११ शेष. १२ आकाश.

२१ सुरवरपाहातीगगनीं । ह्मणतीजानकीजवळीअसोनी । तिकडेनपाहेचमोक्षदानी । कोपमनींकांधरियेला २२ सौमित्रह्मणेपद्मदलाक्षा । मन
मोहनानिर्विकल्पवृक्षा । सीतेसीआलिंगीसर्वसाक्षा । पुरवीअपेक्षातियेची २३ मगबोलेरघुवीर । तूंनेणसीकापटयविचार । हेअपर्णादेवीसाचार ।
ठकवावयाआलीआह्मां २४ शिवासिकरूनियांपण । ठकवावयाआलीआपण । तुह्मांसनेणवेहीखूण । मीअंतरींजाणतसें २५ कैलासींच्याखुणा
समस्त । सौमित्रासिसांगेरघुनाथ । स्कंदमाताझालीतटस्थ । ह्मणेहाअजितपूर्णब्रह्म २६ मगतेमूळपीठनायिका । प्रकटरूपदावीअंबिका ।
विश्वजनकाचियाजनका । वरद्यावयापुढेंआली २७ श्रीरामह्मणेहोमाते । ज्ञानगंगेहिमनगसुते । शिवआज्ञामोडोनियेथें । किमर्थकेलेंआगमन
२८ ऐसेंबोलोनिकौसल्यासुत । सीतेसीतेह्मणोनिबाहत । तोंवृक्षपाषाणआलिंगित । पाहेतटस्थअंबिका २९ दुर्गाह्मणेरघुनंदना । भार्गवजि
ताशिवमनरंजना । नरश्रेष्ठाआनंदसदना । जगद्वंद्याजगद्गुरू १३० तूंनिर्विकारज्ञानघन । तरिकांआलिंगिसीवृक्षपाषाण । श्रीरामह्मणेहेंवर्तमान ।
पूसजाऊनशिवासी ३१ तुझेअंतरींनाहींविश्वास । नेणसीअध्यात्मज्ञानास । मीकांआलिंगितोंवृक्षांस । परमपुरुषशिवजाणे ३२ मगअंबिका
बोलेवचन । तुह्मींएकरूपदोघेजण । एकएकाचीअंतरखूण । परस्परेंजाणतां ३३ आकाशाचेंथोरपण । एकजाणेप्रभंजन । कींसमीराचेंसर्वग
मन । अंबरपूर्णजाणतसे ३४ सर्वसांडूनिअभिमान । विरिंचीजनकातुजमीशरण । कांआलिंगिसीवृक्षपाषाण । सांगखूणएवढी ३५ मगअन्नपू
र्णेचेहृदयींपूर्ण । रामेंप्रगटविलेंदिव्यज्ञान । ह्मणेआतांवृक्षपाषाण । पाहेंनिरखोनिकोणहे ३६ सावधपाहेभवानी । तोंतेमहापुरुषबैसलेध्यानीं ।
श्रीरामत्यांसीआलिंगोनी । कैवल्यपदापाववी ३७ सीतेचेंकरूनियांमिष । उद्धरिलेरामेंतापस । मगह्मणेहापुराणपुरुष । लीलावेषदावीतसे ।
३८ असोअंबिकेचेंपूजन । स्वयेंकरीरविकुळभूषण । मगदेवीनेंवरदान । रघुवरादीधलें ३९ ह्मणेराजीवाक्षारघुनंदना । तूंसत्वरवधिसीलदशा
नना । जानकीघेऊनिनिजसदना । अयोध्येसीजासील ४० अहोतेचिहेरामवरदायिनी । अंबातुळजापुरवासिनी । रघुनाथपुढेंचालिलातेथोनी
दक्षिणपंथेंशोधित ४१ तोंपुढेंदेखिलीकृष्णावेणी । तेथेंबैसलेमहाऋषीध्यानीं । दोषनुरेचिस्मरणीं । कोदंडपाणीतेथेंबैसला ४२ स्नानकरावयार
घुनंदन । कृष्णेंतप्रवेशलाजगज्जीवन । करूनियांअघमर्षण । जगन्मोहनबुडीदेत ४३ विष्णुतनूकृष्णासाचार । देखोनियांराजीवनेत्र । क्षणेकउ
दकमयझालेंशरीर । कडेसीसौमित्रपाहातसे ४४ तनुझालीउदकमय । तंवसौमित्रतेथेंघाबराहोय । घटिकाएकवाटपाहे । ह्मणेकायकरूंआतां



१ वायु. २ आकाश. ३ न्याहाळून. ४ मोक्षपदास. ५ ऋषि, तपस्वी. ६ रावणास. ७ आपल्या घरास. ८ रामास वर देणारी. ९ तुळजापुरची देवी. १० राम. ११ श्यामवर्ण.

४५ कायझालीमूर्तीसांवळो । कोठेंगेलीअनाथाचीमाउली । श्रीरामतूंजगाचीसाउली । माझीकेलीकांउपेक्षा ४६ सौमित्रेंआंगघातलेंधरणीं । ह्म
णेरामाधांवपावयेक्षणीं । तूंमाझीजनकजननी । मजवनींसांडिलेंकां ४७ कांराघवाउबगलासी । मजसांडिलेंघोरवनासी ।मीत्यागीनआतांप्राणा
सी । निश्चयेसींराघवेंद्रा ४८ जानकीमाताउवगली । तीहीमजटांकूनिगेली । रधुपतीतवआशाधरिली । तुवांहीकेलीउपेक्षा ४१ मगउठोनि
सुमित्रासुत । चहूंकडेपाहेतटस्थ । धनुष्यबाणकरींघेत । क्रोधअद्भुतनावरे १५० ह्मणेकृष्णेतुजमूळापासूनी । निर्जलंकरीनयेक्षणीं ।बाणकाढिला
विचारूनी । मुखींप्रळयाग्नीतयाच्या ५१ आणोनिदेमाझारघुवीर । नवमेघरंगराजीवनेत्र । तेंजाणोनिअहिल्योद्धार । निघेबाहेरतेकाळीं ५२
सुमित्रासुतचरणींलागला । तेस्थळींशंकरस्थापिला । बाहोक्षेत्रह्मणतीतयाला । पुढेंचालिलारामचंद्र ५३ अठराराक्षसरावणेंपाठविले । रामा
सीमारावयावहिले । तेकबंधाचेकवेआंतसांपडले । क्षणएकनलागतां ५४ त्याकबंधाचेकवेआंत । सांपडलेरामसुमित्रासुत । सांचलऐकतांदोनी
हात । पसरूनियांआवरिले ५५ द्वादशयोजनेंदोन्हीहस्त । जैसेआडपाडिलेपर्वत । शिरउतरलेंहृदयांत । वज्रघातेंघरूनियां ५६ नाहीं
तयासींशिरेंचरण । बैसलादोन्हींहस्तपसरून । त्याचेकवेंतरामलक्ष्मण । अकस्मातसांपडले ५७ आश्चर्यजाणोनिअद्भुत । धनुष्यसज्जोनिअयो
ध्यानाथ । तीक्ष्णशरेंदोनीहात । छेदोनियांपाडिले ५८ श्रीरामेंकबंधउद्धरिला । तंवतोदिव्यदेहपावला । रघुपतीच्याचरणांसीलागला । उभारा
हिलाकरजोडूनियां ५९ मीदनूचेउदरींकश्यपसुत । मद्यपानेंझालोंउन्मत्त । स्थूळशिराऋषितपकरित । सेविलेंएकांतकार्नन ६० त्यासिम्यां
हांकफोडून । भेडसाविलातपोधन । तेणेंशापशस्त्रेंकरून । मजताडिलेंतेकाळीं ६१ ह्मणेतूंचांडाळपापखाणी । केंबंधहोऊनिपडेंवनीं । मगलाग
लोंत्याचेचरणीं । उश्शापवाणीबोलिला ६२ दशरथसुतदंडकारण्यांत । दशमुखवधावयाजातांसत्य । दशातुझीउजळेलयथार्थ । दनुपुत्राजाण
पां ६३ इंद्रपदघ्यावयाजाण । मीजपतहोतोंबहुतदिन । वज्रधरेंवज्रउचलून । मस्तकींमाझेताडिलें ६४ मस्तकउदरांतउतरलें । दोनीचरणछे
दिले । पूर्वकर्मफळासिआलें । कष्टभोगिलेबहुदिवस ६५ जाहलामाझाउद्धार । रामापडिलेंमाझेंशरीर । यासिदेऊनिवैश्वानर । भस्मकरींआतां
ची ६६ काष्ठेंमेळवूनिसौमित्र । अग्नींतघालीकलेवर । मगतोपावोनिदिव्यशरीर । विमानांतबैसला ६७ परिसझगटतांजाण । होयलोहा
चेंसुवर्ण । तैसाकबंधउद्धरून । वैकुंठधामाचालिला ६८ शंखचक्रादिचिन्हांकित । चतुर्भुजविष्णुभक्त । कबंधउद्धरोनियथार्थ । तोहीजाहलातैसा

१ कंटाळणें, रुसणें. २ उदकरहित. ३ रामलक्ष्मण. ४ अष्टेचाळीस कोस. ५ मस्तक आणि पाय. ६ कश्यपाची स्त्री. ७ कश्यपाचा पुत्र. ८ अरण्य. ९ तपस्वी. १० शिररहित देह.

ची ६९ तोविमानींबैसोनिजातां । ह्मणेअयोध्याप्रभुरघुनाथ । सुग्रीवासीमैत्रीतत्वतां । करींआतांयेथूनियां १७० जगद्वंद्याजनकजामाता । जल
दगात्राजन्मरहिता । जलजनेत्राजलजासनताता । जनार्दनाजगद्गुरू ७१ असोनमस्काररूनिरघूत्तमा । कबंधपावलानिजधामा । नंतरशब
रीच्याआश्रमा । जगदात्मायेताजाहला ७२ परमतपस्वीशबरी । तपकरितांजाहलीह्मातारी । तिच्याआश्रमींरावणारी । राहताजाहलादिनत्र
य ७३ तिणेंफळमूळआणून । भावेंअर्चिलारघुनंदन । ह्मणेतपफळजाहलेंपूर्ण । राजीवनयनदेखिला ७४ शवरीसउपदेशिलेंज्ञान । तीतत्का
ळगेलीउद्धरोन । शरीरसांडोनिकैवल्यसदन । पावलीपूर्णतत्काळीं ७५ सौमित्रह्मणेपुराणपुरुषा । मजनिजज्ञानअयोध्याधीशा । जगदोद्धारासर्वे
शा । कृपाकरूनउपदेशीं ७६ मगरामगीताजेंआत्मज्ञान । सारासारविचारनिरूपण । लक्ष्मणाप्रतिसांगून । निःसंशयतयाकेला ७७ मायि
कजगदाभासपूर्ण । सत्यशाश्वतरूपनिर्वाण । तेचिन्मयवस्तूआपण । निजज्ञानजाणपां ७८ असोयाउपरीरघुपती । आलाहंपीविरूपाक्षाप्रती ।
पुढेंपंपासरोवरनिश्चिती । विश्रांतिस्थानशिवाचें ७९ दिव्यवल्लीदिव्यद्रुम। सदांसुफळभेदीतव्योमें । तेथेंस्फटिकगुहाउत्तम । परमआरामस्थळ
जेकां १८० स्फटिकशिळेवरीश्रीराम । बैसलातेव्हांघनश्याम । जेवींकैलासाद्यावयाक्षेम । बलाहकउतरला ८१ सौमित्राचेमांडीवरी । शिरठे
वूनिरावणारी । श्रमोनियांनिद्राकरी । निर्विकारीअजितजो ८२ शेषशायीनारायण । तोचरामइंदिरारमण । सौमित्राचेअंकींशिरठेऊन । त्याच
परीशोभला ८३ असोतेसमयींरघुनंदन । मनींजानकीआठवूनिपूर्ण । श्वासोश्वासघालून । कायबोलताजाहला ८४ आहाजानकीमृगांक ।
वेदने । गुणसरितेपद्मलोचने । सकळलावण्यगुणानिधाने । कधींभेटसीमजलागीं ८५ रामासिजाहलाविरहज्वर । तंवकोकिळाबाहातीसुंदरस्व
र । तयांसीह्मणेसर्वेश्वर । खुंटोस्वरसदातुमचा ८६ तयेवेळींतमळनीळा । शरणआल्यासर्वकोकिळा । श्रीरामह्मणेवसंतकाळा । माजशिब्दफुट
ल ८७ मृगमृगीसह्मणेरघुनाथ । तुह्मांसघाटपारधीवधितीलसत्य । तंवतींजाहलींशरणागत । उःशापदेततयांसी ८८ तुह्मांसरात्रीसवधिती
लसत्य । वरकडदिवसांतुह्मीमुक्त । तोंदेखिलींगजगजींरमत । कायबोलतत्यांप्रती ८९ दोघांसीसंयोगहोतांयथार्थ । गजपडेलमूर्च्छागत । सातदि
वसपर्यंत । अचेतनप्रेतापरी १९० तंवतींआलींश्रीरामासीशरण । उःशापबोलेराजीवनयन । जळांतकरितांमैथुन । मूर्च्छेनानयेसर्वथा ९१
मयूरांसीह्मणेरघुनायक । तुह्मीव्हारेनपुंसक । तंवतींशरणयेतीदेख । कायबोलेजगद्गुरू ९२ नयनींजेअश्रुस्त्रवती । तेणेंचिवाढेतुमचीसंतती । च

---

१ वृक्ष. २ आकाश. ३ विश्रांति. ४ लक्ष्मीचा पति श्रीराम. ५ चंद्रवदनें. ६ हरिण व हरिणी. ७ हत्ती व हत्तीण. ८ उदकांत.

ऋवाकांसह्मणेरघुपती। सूर्योदयींभेटतुह्मां ९३ रात्रींहोयतुह्मांवियोग। तोंदृष्टींदेखेकागिणीकाग। त्यांसीह्मणेजन्मांतसंग। एकदांचसंसारीं ९४ मीसीतेवीणभ्रमतोंदेख। तुह्मीभोगितांरातिसुख। यालागींदंडहानिःशंक। तुह्मांसीकेलानिर्धारें ९५ सीतावियोगेंरघुनाथ। ह्मणेराक्षसयेऊनबहुत। यांच्यास्त्रियाहरूनिसमस्त। नेईनातकांसीतेऐशा ९६ रतिचेष्टोमजसमोर। कांहेकरितीवारंवार। माझीजानकीसुकुमार। तीमजभेटलीनाहींजों ९७ इत्यादिभावतेसमर्थी। दावीजनकाचाजांवई। ह्मणेसीतेचेगुणासगणनानाहीं। कोटीवरुषेंशोधितां ९८ असोऋष्यमूकपर्वतावरूनी। वानरविलोकीतचापपाणी। नळनीळजांबुवंततरणी। कुमरपाहेसुग्रीव ९९ आणिपांचवातोहनुमंत। जोअवतरलाउमाकांत। त्याचेंजन्मकर्मअद्भूत। तृतीयाध्यायींवर्णिलें २०० श्रीरामविजयग्रंथराशी। हेचिकेवळवाराणसी। रामकथाविश्वेश्वरासी। प्रियह्मणूनराहिला १ रामकथाकरितांश्रवण। सकळपातकेंजातीझडोन। संतींएकाग्रचित्तेंकरून। ग्रंथपठणकरावा २ कष्टनहोतांअपार। यात्रेसीधांवतीमुमुक्षुनर। श्रवणींबैसतीसादर। संसारकार्यटाकुनी ३ येथोनिअरण्यकांडसंपलें। पुढेंकिष्किंधाकांडआरंभिलें। जैसेंरत्नाहूनिरत्नआगळें। वैरागरींनिपजेपैं ४ याचेपरीक्षकसंतजन। जेब्रह्मरसेंचिपरिपूर्ण। श्रीधरतयांसीअनन्यशरण। अभंगअक्षयीसर्वदा ५ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर। संमतवाल्मीकीनाटकाधार। सदांपरिसोतभक्तचतुर। षोडशोध्यायगोडहा २०६ श्रीकृष्णार्पणमस्तु। श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ ओव्या २०६ ॥ ७ ॥

१ विषयक्रीडा. २ सूर्य. ३ पार्वतीपति शंकर. ४ काशीक्षेत्र. ५ मोक्षाची इच्छा करणारे लोक.

श्रीगणेशायनमः । श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । संतआणिइतरजन । दिसतीजैसेसमसमान । परीसंतसदांआनंदघन । ब्रह्मानंदेंडोलती १
बकासंगेंअसतीमराळ । दिसतीसारिखेशुद्धधवळ । परीक्षीरंआणिजल । करितीवेगळेंहंसची २ वायसांतवसेकोकिळ । त्यांचसारिखीदिसेकेव
ळ । परीयेतांवसंतकाळ । पंचमस्वरआळवी ३ जंबुकवनांतदाढलाकेसरी । परीकायतोपावेजंबुकसरी । क्षणमात्रेंगजविदारी । हांकेंभरीनिराळें ४
स्फटिकांतमुर्क्ताफळजाण । दिसेसारिखेंसमसमान । मुक्तजोहरीकाढितीनिवडोन । करितीजतनजीवेसी ५ पाषाणांतपरिसपूर्ण । दिसेतैसा
चिजडकठिण । परीतोकरीलोहाचेंसुवर्ण । कृष्णवर्णीतेंलपवोनी ६ कस्तूरीआणिमृत्तिका । दिसेरंगएकसारिखा । परीमृगमदसुवासेंसकळिकां ।
श्रीमंतांसीनिववीतसे ७ तक्रदुग्धएकवर्ण । परीदुग्धगोडसकळांसीमान्य । तैसेंसंतांचेंरूपजाण । इतरांसमाननगणावें ८ ऐसेसंतआनंदघ
न । रामविजयपरमपावन । करावयाबैसलेश्रवण । अतिआदरेंकरूनियां ९ आतांकिष्किंधाकांडकमलावरी । क्रीडेलवाग्देवीभ्रमरी । तरीतोसुरस
अंतरीं । सदांचतुरींसाठविजे १० षोडशाध्यायींपारिकर । पंपासरोवरासीरघुवीर । आलासजलजलदगात्र । ध्यायत्रिनेत्रेंजयातें ११ तोंऋ
ष्यमूकपर्वतावरी । उभेपांचवानरतेअवसरीं । किंवातेपंचकेसरी । स्वेच्छेंउभेठाकले १२ कनकाद्रीचींरत्नेंमंडित । पंचशृंगेंविराजित । कींउगव
लेपंचआदित्य । उदयाचळींएकदांची १३ कींसाह्यव्हावयारघूत्तमातें । अवतरलींपंचमहाभूतें । कींपंचायतनेंशोभिवंतें । ऋष्यमूकपर्वतावरी १४
तोंपंपासरोवराचेतीरीं । श्रीरामस्फटिकशिळेवरी । सौमित्राचेमांडीवरी । शिरठेऊनिपहुडला १५ देखतांसौमित्रराघव । भयाभीतझालासु
ग्रीव । ह्मणेवालीनेंहेदोघेमानव । वीरयेथेंपाठविले १६ माझाघातकरावया । शत्रूनेंदीधलेपाठवूनियां । ह्मणोनिसुग्रीवतेथोनियां । जाताझाला
सत्वर १७ चौघांसनपुसतांतेथोन । पळेवेगेंमित्रनंदन । वनोपवनेंलंघोन । समीरवेगेंचालिला १८ मगसवेगधांवोनिहनुमंत । उभाकेला
सूर्यसुत । ह्मणेतूंकांभीतोसियेथ । कायविपरीतदेखिलें १९ सुग्रीवह्मणेदोघेधनुर्धर । दिसतीपरमप्रचंडवीर । त्यांसिविलोकितांभयअपार ।
माझेहृदयींसंचरलें २० आजिम्यांस्वप्नदेखिलें । दोघेधनुर्धरसाह्यझाले । वालीसवधोनिराज्यदीधलें । किष्किंधेचेंमजहनुमंता २१ अरुणोद
यींदेखिलेंस्वप्न । सवेंचिपातलेदोघेजण । परीमजधीरनधरवेजाण । भयेंकरूनव्यापिलों २२ यावरीबोलेवायुनंदन । आह्मींअसतांचौघेजणप्र
धान । कृतांतासीशिक्षालाऊन । तुजलारक्षूंसुग्रीवा २३ तरीहेपंपातीरींदोघेजण । बैसलेवीरदेदीप्यमान । कींबृहस्पतिआणिसहस्त्रनयन । तै

१ हंस. २ शुभ्र. ३ दुध. ४ कावळे. ५ सिंह. ६ फाडी. ७ आकाश ८ मोत्यें. ९ काव्यारंग १० कस्तूरी ११ शंकर १२ आपले इच्छेनें सहज १३ मेरुपर्वत.

सेदोघेदिसताती २४ कींएकतपस्वीएकदास । एकऔदार्यएकधैर्यविशेष । कींएकपुण्यएकयश । तैसेदोघेदिसतीपैं २५ कींएकज्ञानएकविज्ञा
न । एकआनंदएकसमाधान । एकसगुणएकनिर्गुण । दोनीस्वरूपेंहरीचीं २६ एकसाधकएकसिद्ध । एकवैराग्यएकबोध । एकमोक्षएकब्रह्मा
नंद । तैसेदोघेदीसती २७ यांचियाआगमनेंपाहीं । आनंददाटलामाझेहृदयीं । त्यांचासमाचारलवलाहीं । जाऊनिआतांआणितों २८ त्यांचि
याबोलावरून । कळेलत्यांचेंअंतरज्ञान । कींदाहकत्वनिरसतांपूर्णअग्न । शांतझालाजाणिजे २९ अरुणोदयावरून । रजनीचेंकळेलज्ञान । स्वाद
घेतांरसपूर्ण । चतुरजैसेजाणती ३० कींअनर्थसमयावरून । जाणिजेबंधुमित्रजन । कींइंद्रियनिग्रहेंपूर्ण । योगेश्वरजाणिजे ३१ कींदयेवरूनकळे
शांती । कींतर्कावरूनसमजेधृती । कींवेदांतश्रवणेंनिवृत्ती । दशाबाणलीजाणिजे ३२ कींप्रेमरसावरूनिभक्ती । कींनिरपेक्षतेवरूनविरक्ती । तोपा
वलाअद्वयमुक्ती । इहपरत्रींजाणिजे ३३ तैसेंत्यांचेंअंतरसमस्त । मीआणितोंतूंराहेंस्वस्थ । जरीतेथेंअसेलविपरीत । हस्तसंकेतदावीनतूतें ३४
ऐसेंबोलोनिहनुमंत । पंपातीराआलात्वरित । वटवृक्षातळींरघुनाथ । पहुडलासेश्रमोनियां ३५ स्फटिकशिळादैदीप्यमान । जेवीशेषतल्पकशुभ्र
वर्ण । त्यावरीश्रावणारिनंदन । विराजमानदिसतसे ३६ तंवत्यावटावरीहनुमंत । कौतुकेंकरूनउड्डाणकरित । लक्षोनियांरघुनाथ । हर्षेंदावि
तवांकुल्या ३७ ऐसादेखोनिवानर । सौमित्रासिदावीरघुवीर । पैलपाहेंतोकपिवर । पंचशरतोंढरींअसे ३८ झळकताहेहेमकौपिन । वज्रबंध
ननचळेमदन । माझेंचित्तस्नेहेंकरून । यासिदेखोनिपूर्णअसे ३९ मातेचेंवचनहनुमंत । आठवीतेव्हांहृदयांत । जोवोळखेकौपीनगुप्त । तोचिस्वांमि
तुझाअसे ४० तेंप्रत्ययाआलेंसकळ । परीमाझेंअद्भुतबळ । हादिसतसेकोमल । तमाळनीळसाजिरा ४१ शिष्यापरीसआगळेंबळ । स्वामीस
असावेंबहुसाल । मगवटशाखामोडोनिसकळ । रामावरीटांकिल्या ४२ तेंदेखतांउन्मिळाजीवन । चापासित्रेगेंचढवीगुण । मगबोलेकौसल्यानं
दन । स्थीरराहेंनावेंकं ४३ बाळकौतुकपाहेसाचार । त्यावरीकायटांकिसीशंर । तोंउताणापहुडलारघुवीर । शाखासत्वरआलीवरी ४४ कोदं
डदंडेंतेअवसरीं । शाखाउडविलीवरचेवरी । तेउडोनिगेलीअंबरीं । तृणासारखीतेधवां ४५ आणीकहीवृक्षपाषाण । वरीटांकितवायुनंदन । तेहीकौ
सल्यागर्भरत्न । कोदंडेंकरूनियांउडवित ४६ मगगर्जोनियांहनुमंत । सोडीतेव्हांपांचपर्वत । तरीनउठेचिरघुनाथ । कौतुकेंहांसततेकाळीं ४७
मगरघुनाथेंएकबाण । चापासीलाविलानलागतांक्षण । पांचपर्वतपीठकरून । गगनभेदितबाणगेला ४८ शरांपिसारालागलाकिंचित । तेणेंउडो

---

१ पलंग २ दशरथाचा पुत्र राम. ३ मदन. ४ वाळ्यास. ५ सुवर्णाची लंगोटी. ६ गुरु. ७ वडाच्या फांद्या. ८ लक्ष्मण. ९ क्षणभरी. १० बाण.

निगेलाहनुमंत । गगनींगरगरांभोंवत । प्राणहोतकासाविस ४१ वातचक्रींपडतांतृण । तेंभूमीसनपडेमागुतेन । त्यापरीवायुनंदन । कासावा
सहोतसे ५० पवनेंधांऊनतेसमयीं । आत्मजधरिलादृढहृदयीं । ह्मणेबारेशरणलवलाहीं । श्रीरामचंद्रासीजाईंकां ५१ हाअवतरलाशेषशां
यीं । जाणक्षीराब्धीचाजांवई । दृढलागेंत्याचेपायीं । कायावाचामानसें ५२ मगश्रीरामासहनुमंत । येऊनलोटांगणघालित । मागुतीउठोनि
धरित । श्रीरामचरणप्रीतीनें ५३ उठोनियांरघुवीर । हृदयींधरिलावायुकुमर । एकजाहलेहरिहर । जयजयकारदेवकरिती ५४ श्रीरामह्मणे
हनुमंता । जोंवरीशशीआणिसविता । तोंवरीअक्षयीहोसीतत्वता । बलार्णवआणिविजयी ५५ कैकेयीहस्तींचापूर्णपिंड । अंजनीहातींपडिलाअखं
ड । तोहावीरजन्मलाप्रचंड । राघवाहूनिपूर्वींच ५६ असोजोडूनदोनीकर । हनुमंतउभाराहेसमोर । ह्मणेहेरामकरुणासमुद्र । दीनोद्धारदीनबंधू
५७ हेरामभुवनसुंदरा । हेरामजनकजावरा । हेरामनवपंकजनेत्रा । पुराणपुरुषाजगदात्मया ५८ परमभक्तजाणोन । हनुमंतासिभेटला
लक्ष्मण । करींधरूनिवायुनंदन । सीतावल्लभेंबैसविला ५९ श्रीरामचरणचुरितमारुती । ह्मणेरघुवीराऐकविनंती । पैलऋष्यमूकपर्वतीं । वसेकपि
पतीसुग्रीव ६० अभयवरदेसीलत्यातें । तरीआतांभेटवीनतयातें । बहुतकामतयाचेहातें । पुढेंसाधेलश्रीरामा ६१ मगबोलेरघुनंदन । सुग्रीवहा
कोणाचाकोण । हनुमंतसांगेपूर्वकथन । तेंसावधानपरिसावें ६२ कमलोद्भवकरितांध्यान । प्रेमोदकबिंदुनेत्रींहून । अंजुळींतपडतांचिपूर्ण । ऋ
क्षराजजन्मला ६३ तोब्रह्मयाचाप्रियनंदन । वानरवेषबळगहन । हिंडतांवनोपवन । शिवलोकाप्रतिगेला ६४ तंवदेखिलेंरम्यसरोवर । भों
वतेसफळतरुंवर । परीतेथेंशापदुर्धर । अपर्णेचाहोतापूर्वीं ६५ जोनरसेवीलयेथीचेंपाणी । तोनारीहोईलतत्क्षणीं । हेंऋक्षराजेंनेणोनी । उडी
जीवनींघातली ६६ स्नानकरूनानिघतांबाहेर । झालेंस्त्रियेचेंशरीर । रंभेहूनपरमसुंदर । होयविचित्रतेकाळीं ६७ तोंमित्रइंद्रदोघेजण । आ
लेसुंदरस्त्रीवरूंह्मणोन । तंवतोब्रह्मपुत्रलाजोन । स्त्रीहोऊनिबैसलाअसे ६८ नघडेतयांसींसुरत । दोघींत्यागिलेंतेथेंरेत । आधींशक्रबीर्यमस्तकीं
पडत । वालीतेथेंजन्मला ६९ मागूनसूर्यवीर्यपडिलेंग्रीवेबरी । तेथेंसुग्रीवजन्मलातेअवसरीं । विरिंचीपातलाझडकरी । तोंपुत्रनारीझालाअसे
७० मगतेणेंप्रार्थूनिपार्वती । उश्शापमागेपुत्राप्रती । कामिनीभावहरूनिमागुती । पुत्रकेलापूर्ववत ७१ दोघेपौत्रआणिसुत । घेऊनिचालिलाप
द्मजात । मगवस्तीकरावयाअद्भुत । किष्किंधानगररचियेलें ७२ धाकुटासुग्रीववडिलवाली । ऋक्षराजघेऊनितेकाळीं । किष्किंधेचेंराज्यभूमंड

१ मारुति. २ वायूनें. ३ पुत्र. ४ शेषावर शयन करणारा नारायण. ५ चंद्र. ६ सूर्य. ७ मारुतीची आई. ८ सीतापति. ९ वानरांचा राजा. १० ब्रह्मदेव. ११ ओंजळींत १२ वृक्ष.

ळीं । केलेंतेणेंबहुकाळ ७३ वालीसुग्रीवासीतत्वता । ऋक्षराजचिमातापिता । पुढेंवालीसदेऊनिराज्यार्था । धरिलेंछत्रसुमुहूर्ते ७४ करूनियां योगसाधन । ऋक्षराजपावलाब्रह्मभुवन । पुढेंवालीसुग्रीवदोघेजण । बंधूसमानसारिखे ७५ इंद्रेंवालीसविजयमाळ । दिधलीह्मणोनितोसबळ । समरींशत्रुहोयानिर्बळ । वालीप्रतापदेखतां ७६ सूर्यैंसुग्रीवधरिला । आणोनिमाझेहातींदिधला । तूंसदांसांभाळींयाला । ह्मणोनियांप्रार्थिलें ७७ सुग्रीवआणिवालीमध्यें । वैरलागलेंराज्यसंबंधें । पुढेंसुग्रीवासीवालीक्रोधें । वधावयाधांविन्नला ७८ सुग्रीवाचीस्त्रीरुमारूपवंत । वालीनेंघेतली आहेघरांत । सुग्रीवेंधरिलाऋष्यमूकपर्वत । युद्धहातेंषण्मासां ७९ माझीसूर्यैंघेतलीभाक । तूंसुग्रीवाचीपाठीराख । ऐसेंऐकतांअयोध्यानायक । कायबोलताजाहला ८० हनुमंतामाझीभाकघेपूर्ण । मजअत्यंतप्रियसूर्यनंदन । सत्वरआणीबोलावून । भेटीसमीउतावेळ ८१ तयाचाशत्रूवधोन । त्यासीदेईनछत्रसिंहासन । याउपरीजानकीचिद्रत्न । शोधूनकाढूंसाक्षेपें [1]८२ ऐसेंबोलतांजनकजामात । तेथूनिउडोनिआलाहनुमंत । येऊनिसुग्रीवाससांगत । भाग्यअद्भुतउदेलें ८३ सीतावियोगेंदुःखीरघुराज । रुमावियोगेंदुःखीतूंसहज । तरीएकएकाचेंपूर्णकाज । कराआतां परस्परें ८४ ऐकोनिमारुतीचेंवचन । आनंदेंनाचेसूर्यनंदन । हनुमंतासीआलिंगनदेऊन । पाठीत्याचीथापटिली ८५ रघुनाथप्राप्तीसीतत्वतां । तूंसद्गुरुझालासीमजआतां । तुझेउपकारसर्वथा । कदाकाळींनविसरेंमी ८६ दशरथात्मजरघुपती । त्याचीपूर्वींचऐकिलीकीर्ती । पंचवटीसकरूनवस्ती । पिशितांशनसंहारिले ८७ असोघेऊनवानरदळसमग्र । नळनीळजांबुवंतवीर । सुग्रीवआलाजेथेंरघुवीर । त्रिभुवनसुंदरदेखिला ८८ कोट्यानकोटीमीनकेतन । वोवाळावेजयावरून । तमाळनीळचैतन्यघन । नेत्रींसुग्रीवेंविलोकिला ८९ लोटांगणघालीतसुग्रीव । नळनीळादिवानरसर्व । ऐसेंदेखोनिसीताधव । पुढेंधांवतभेटावया ९० धरूनियांदोनींकर । उठविलाभानुकुमर । ह्रदयींधरितांरघुवीर । सुखअपारसुग्रीवासी ९१ अत्यंतझालाक्षुधातुर । तयाभेटलाक्षीरसागर । कींदरिद्रियाससुखअपार । द्रव्यघटसांपडतां ९२ कींआळशाचेंगृहशोधित । कल्पवृक्षआलाअकस्मात । कींचुकलेंबाळकभेटत । जननीसयेऊनप्रीतीनें ९३ कींतृषाक्रांतपडिलावनीं । त्यापुढेंलोटेमंदाकिनी । ऐसासुग्रीवाचेमनीं । ब्रह्मानंदउचंबळला ९४ जीवाशिवएकभाव । तैसेंचभेटीचेंवैभव । तेव्हांविमानारूढदेव । सुमनसंभारवर्षती ९५ नळनीळजांबुवंत । आणिकहीवानरसमस्त । तयांसीरामआलिंगित । आनंदगगनींनसमाये ९६ हनुमंतेंतयेवेळे । पसरिलेंवृक्षटाहाळे । मध्येंअग्नीससाक्षठेविलें । दोघांबैसवि

१ पिशित. ह्मणजे मांस त्याचें अशन ह्मणजे भक्षण करितात सबब राक्षसांस पिशिताशन ह्मणतात. २ मदन. ३ राम. ४ हात ५ द्रव्याची घागर. ६ भागीरथी.

लेंदोहींकडे १७ सुग्रीवआणिरघुनाथ । उभयतांतेंह्मणेहनुमंत । एकमेकांचाकार्यार्थ । साह्यहोऊनिसाधावा १८ रघुवीरह्मणेराज्यआणिदारा । सोडवूनिदेतोंरविकुमरा । हामाझानिर्धारखरा । उदयीकचिपाहाल १९ अर्कजह्मणेजेणेंनेलीसीता । त्याससंहारूनितत्वता । अयोध्येसीनेईनर घुनाथा । मंगलभगिनीसमवेत १०० ऐसेंऐकतांचिउत्तर । भुभुःकारेंगर्जतीवानर । तेणेंनादेंपैंअंबर । दणाणिलेंतेसमयीं १ सुग्रीवह्मणेरघुनंद ना । कालचिएकसुंदरललना । राक्षसघेऊनिगेलाजाणा । निराळमार्गेंत्वरेनें २ आह्मींसमस्तींदेखिलीनयनीं । आक्रंदेतेकरुणावचनीं । ह्मणेरामा धांवधांवनिर्वाणीं । चापपाणीकरुणाकरा ३ क्षणभरीह्मणेसौमित्रा । धांववेगींपरमपवित्रा । मागुतीह्मणेस्मरारिमित्रा । राजीवनेत्राधांववेगीं ४ तिणेंउत्तरीयवस्त्रफाडोनी । आभरणेंटांकिलींबांधोनी । आह्मींतींठेविलींजतनकरूनी । रामऐकूनविस्मित ५ ह्मणेनवलसांगतीवानर । त्वरेंआण लेअलंकार । घेऊनिआलावायुकुमर । रघुवीरकरींदेततेव्हां ६ लवलाहेंग्रंथीसोडित । आभरणेंवोळखिलींसमस्त । आहाप्रियेह्मणूनिरघुनाथ । शरीरटांकितधरणीवरी ७ हृदयींधरूनिअलंकार । शोकार्णवींपडिलारघुवीर । सद्गदहोतीसकळवानर । नयनींनीरलोटलें ८ आठवोनिसी तेचेगुण । विलापकरीरघुनंदन । धांवोनियांलक्ष्मण । धरीचरणरघुपतीचे ९ लक्ष्मणासिह्मणेरघुवीर । सखयावोळखींअलंकार । होयकींनहोय साचार । पाहेंबरवेंविलोकुनी १० सौमित्रेंअलंकारघेउनी । सादरहोऊनिपाहेनयनीं । ह्मणेहींनेपुरेंसीतेचेचरणीं । वोळखिलींम्यांसाचपैं ११ नेपुरेंवोळखिलींसाचार । वरकडनेणेंमीअलंकार । रामह्मणेनिरंतर । जनकजालेतहोतीहे १२ सौमित्रह्मणेसीतामाउली । म्यांकधींनाहींपूर्णपा हिली । त्रिकाळनमनाचेवेळीं । नेपुरेंचरणींदेखिलींम्यां १३ ऐसेंबोलतांलक्ष्मण । आनंदलारघुनंदन । ह्मणेबारेतूंदिव्यरत्न । वैराग्यवैरागरींचें १४ तूंभक्तसरोवरींचाराजहंस । कींज्ञानमुक्ताफळमांदुस । कींशत्रुविपिनदाहकहुताश । सदांनिर्दोषसूर्यजैसा १५ सुग्रीवह्मणेरविकुळमंडणा । जरीतुजजानकीभेटवीना । तरीभोगीनयमयातना । कल्पपर्यंतनिर्धारें १६ नळनीळजांबुवंत । माझेप्रधानजगविख्यात । भूगोळहाक्षणनलागतां येथ । उचलोनिघालीनपालथा १७ आतांरघुपतीतुझीचआण । स्वर्गमृत्युपाताळशोधून । जानकीआणीनहेंप्रमाण । सत्यसत्यत्रिवाचा १८ मगबोलेमखपाळण । तुजराज्यतारादिधल्यावांचून । सीताशुद्धीनकरींआण । श्रावणारीचीजाणपां १९ तुझेंकार्यनहोतांआधीं । कदांनकरींमीसी ताशुद्धी । ऐसानेमबोलिलाविधी । तोकाळत्रयींटळेना १२० गुरुकृपेवीणज्ञान । कींआवडीवीणभजन । कींप्रेमावीणकीर्तन । स्नानावीणअनुष्ठान

---

१ सीता, २ आकाश. ३ ओरडे. ४ शंकराचा मित्र राम. ५ आंगावरील वस्त्र. ६ अलंकार. ७ हनुमंत. ८ ज्ञानरूप मोत्यांची पेटी. ९ शत्रुरूपी अरण्यास जाळणारा अग्नि.

पैं २१ कींअतिथीवीणभोजन । कींवीरश्रीवीणरण । कींविप्रेंजैसाविद्येवीण । सर्वजननिंदिती २२ तैसेंतुझेंकार्यनहोतां । सीताशुद्धीनकरींस
र्वथा । ऐसेंबोलतांरघुनाथा । वीरश्रीअंगींदाटली २३ चढविलाचापासीगुण । ह्मणेबोलावींशक्रनंदन । सुग्रीवधांवोनिधरीचरण । करजोडोनि
विनवीतसे २४ ह्मणेवालीचामारअनिवार । आपणयुद्धनकरावेंसमोर । अकस्मातटांकिसीशर । तरीसंहारहोयत्याचा २५ मंगळजननीजा
माँत । सुग्रीवासीपुसेवृत्तांत । त्यासइतुकेंबळप्राप्त । कैसेंनियांपैंझालें २६ सुग्रीवातुजवालीसवैर । पडावयासकायविचार । तेंचिसांगावेंसविस्त
र । येरूसांगताजाहला २७ सुग्रीवतेव्हांसांगत । महिषासुरनामेंदैत्यअद्भुत । त्याचेपोटींदुंदुभीसुत । परमबळिष्ठजन्मला २८ महाउन्मत्त
मद्यपानीं । कलहमाजवावयाहिंडेवनीं । परीत्यासीसमरंगणीं । योद्धाकोणीभेटेना २९ मगदैत्यगेलायमाजवळी । ह्मणेमजसींमाजवींयुद्धफळी
येरूह्मणेकिष्किंधेसीवाली । तयाजवळीजायतूं १३० रागेंआलाकिष्किंधेजवळी । जैसामूषकनिघेव्याळांबिळीं । कींव्याघ्राचीपाहावयाजाळी । जै
साजंबुकपातला ३१ दैत्यहांकफोडीतयेवेळीं । ऐकतांधांविन्नलावीरवाली । जैसामृगेंद्रकवघाली । मातंगदूरदेखतां ३२ शतयोजनेंशरीरविशा
ळ । वालीनेंपदींधरिलातत्काळ । फिरवूनिआपटिलासबळ । भूमंडळदणाणिलें ३३ कोंयेंतूनिगेलाप्राण । मगत्याचेंप्रेतभवंडून । रागेंदीधलेंभि
रकावून । ऋष्यमूकपर्वतावरी ३४ शतयोजनेंकलेवर । ऋषीचेआश्रेममोडलेसमग्र । तेथेंमातंगऋषीश्वर । तेणेंशापदीधला ३५ यापर्वतास
स्पर्शतांशक्रनंदन । तत्काळतयाचाजाईलप्राण । दुंदुभीचेंप्रेततेथेंजाण । पडिलेंआहेअद्यापी ३६ मगमयासुरदुंदुभीचासुत । पितृसूडघ्यावयापा
तलातेथ । पतंगअग्नीसमागत । सूडखांडववनाचा ३७ सर्पाचासूडसमूळीं । सुपर्णासिमागतसेअंळी । तैसामयासुरतेकाळीं । बाहेवालीसयुद्धा
तें ३८ शक्रसुतधांविन्नलात्वरित । जैसेंपर्वतावरीवज्रपडत । तैसामयासुरासमुष्टिघात । देतांवमीरक्तासी ३९ पाताळविवरद्वारें । मयासुरपळा
लात्वरें । त्याचेपाठिमागेंशक्रकुमरें । धांवघेतलीपाताळीं १४० विवरद्वारींमीरक्षण । राघवाबैसलोंबहुतदिन । तोंयक्षगंधर्वमिळून । किष्किंधाघेऊं
धांवले ४१ रायावीणकोणराखेपुरी । धाकेंदुर्गवोलांडिलेंवानरीं । प्रधानप्रजातेअवसरीं । मजसांगतीगाऱ्हाणें ४२ मगविवरद्वारींटांकिलाप
र्वत । किष्किंधेसीपावलोंत्वरित । शत्रूआटोनिसमस्त । प्रजासुखीराखिल्या ४३ विंशतिमासपर्यंत । वालीविवरांतझालागुप्त । मगप्रधानप्रजा
समस्त । ह्मणतीशक्रसुतनिमाला ४४ सकळींआग्रहकरूनिबळें । राज्यछत्रमजदीधलें । तोंमयासुराचेंशिरतेवेळे । वालीघेऊनपातला ४५

१ युद्ध. २ ब्राह्मण. ३ वाली. ४ पृथ्वीचा जांवई. ५ उंदीर. ६ सर्प. ७ कोल्हा. ८ सिंह. ९ हत्ति. १० शरीर. ११ घरें. १२ गरुडास. १३ कीड.

वीसमासतोंनिराहार । दृष्टींनादिसेविवरद्वार । परमउतरलामुखचंद्र । घाबरावीरजाहला ४६ उगवलाअसतांउष्णकर । किंचितदिसोंलागलेंछि
द्र । मगनखाग्रींचनगसमग्र । उलथोनियांपाडिला ४७ हर्षेंगर्जनाकेलीथोर । तेणेंनादावलेंअंबर । परीमजलागींचिंतातुर । बहुतझालातेकाळीं
४८ ह्मणेबंधूदैत्यांनींमारिला । घाबराकिष्किंधेसीपातला । तोंमजराज्यपदींदेखिलेंडोळां । परमक्षोभलातेवेळीं ४९ ह्मणेमहापर्वतघालुनी । म
जकोंडिलेंदाटोनी । म्यांमरावेंतुझेमनीं । सिंहासनींबैसावेंत्वां १५० स्नेहेंवीणबंधुवर्गजाण । त्यागावेहेंशास्त्रप्रमाण । दुर्मुखास्त्रियाटांकून । संन्यास
ग्रहणकरावें ५१ गुरुत्यजिजेज्ञानहीन । प्रीतीविणमित्रजन । ऐसेंबोलोनिशक्रनंदन । शस्त्रघेऊनिधांविन्नला ५२ मगनळनीळजांबुवंत । प्रा
णसखामाझाहनुमंत । मजघेऊनिपळालेत्वरित । ठावनिश्चितनेदीकोणी ५३ हिरूनिघेतलीबळेंचिदारा । नित्ययेऊनिकरीमारा । मगऋष्यमूकप
र्वतींसीतावेरा । केलाथाराआह्मीयेथें ५४ वालीसअसेयेथेंशाप । यालागींमीराहेंसुखरूप । साहामासांयुद्धअमूप । दोघांसीहोतरघूत्तमा ५५ आ
ह्मांदोघांसमानबळ । परीत्याचेगळांविजयमाळ । तेणेंप्रतापत्याचासबळ । शत्रूसपळसुटतसे ५६ विंकटविषमताडसात । एकेचबाणेंजोछेदित । त्या
चेहातेंवालीसमृत्य । भविष्यपूर्वींकेलेंअसे ५७ ऐसेंबोलतांसूर्यसुत । धनुष्ययोजीअवनिजाकांत । अर्धचंद्रबाणत्वरित । आकर्णवरीवोढिला ५८
मांडोनिदृढदेहुडाठाण । पाठींउभाकेलालक्ष्मण । त्याचाचरणांगुष्ठरघुनंदन । पायांखालींरगडित ५९ दडपितांशेषेंचरणांगुष्ठ । सातहीताडजाह
लेनीट । मगएकाचिबाणेंसपाट । सातहीकेलेराघवें १६० साततालडशेषपृष्ठीवरी । यालागींनिटावलेझडकरी । तोंदुंदुभीचेंप्रेततेअवसरीं । मित्रसु
तेंदाखविलें १६१ हेंजोउचलीलपुरुषार्थी । वालीचामृत्युत्याचेहातीं । चरणांगुष्ठेंरघुपती । प्रेतढकलीतेधवां १६२ तेंहीतृणप्रायउडून । प
डिलेंदिगंतरींजाऊन । अद्भुतप्रतापदेखोन । सुग्रीवचरणींलागला १६३ मगह्मणेचापपाणी । सुग्रीवातूंकिष्किंधेसीजाउनी । वालीसशीघ्रबाहे
रआणी । समरंगणींयुद्धातें ६४ कमलदलाक्षकृपाघन । वर्षेस्वानंदजीवन । तेंकर्णद्वारेंसेवून । सूर्यसुततृप्तझाला ६५ रामचंद्रामृतबोलें ।
सुग्रीवकर्णचकोरधाले । कीर्तिकर्णयाचकतृप्तझाले । श्रीरामवचननिधानें ६६ मगवासरमणीचासुत । दशकंठरिपूसविनवित । ह्मणेविषकंठवंद्याए
कहेत । पूर्णमाझाकरींकां ६७ तरीअकस्मातटाकूनिबाण । घ्यावाजीवालीचाप्राण । अवश्यह्मणेजगन्मोहन । भक्तवचनपाळकजो ६८ मगकि
ष्किंधेसमीपसूर्यकुमर । करीतथोरबुभुःकार । दणाणिलेंअवघेंनगर । इंद्रपुत्रदचकला ६९ गळांघालूनिविजयमाळ । वेगेंधाविन्नलावालीसबळ ।

---

१ राम. २ फार, मोठे. ३ सुग्रीव. ४ शेषावतार लक्ष्मण. ५ श्रीरामच्या शब्दरूप द्रव्यानें. ६ रावणाचा शत्रु राम. ७ शंकर. ८ वाली.

ह्मणेअरीचाआजिथोरकल्लोळ । कोणसाह्यझालाअसे १७० ताराह्मणेस्वामीपरियेसीं । अंगद गेलाहोतापारधीसी । तेथेंबोलतहोतेॠषी । रामसु
ग्रीवासीसाह्यझाला ७१ तरीराजेंद्राअवधारा । आपणनजावेंआजिसमरा । ह्मणोनिचरणालागलीतारा । तरीशक्रपुत्रानमानेतें ७२ ऐकूनि
कुंजराचेंगर्जन । कैसाउगाराहेपंचानन । बळेंचमृगआलाचालून । मगशार्दूळकैसास्थिरावे ७३ शुष्ककाननींप्रळयाग्न । कैसाराहीलशांतीधरून ।
असोसहस्त्राक्षनंदन । तारेप्रतिबोलत ७४ ह्मणेप्राणप्रियेपरियेसीं । षण्मासांयेतहोतायुद्धासी । आजिआलातिसरेदिवशीं । उह्नाळेसीगर्जत
७५ घायेंशरीरत्याचेंजर्जर । तैसेंचमाझेंझालेंचूर । त्याससाह्यझालावायुकुमर । तेणेंवीरआणिलाकोणी ७६ तरीतारेतूंआणिअंगद । सुखेंभोगींरा
ज्यपद । आजिसुग्रीवाचाकरीनवध । तरीचयईनमाघारा ७७ नाहींतरीभेटीहेची । बोलूनवालीउठेतैसाची । जैसीउडीपंचाननाची । येतहस्ती
लक्षोनियां ७८ जैसापर्वतावरीपर्वतपडियेला । तैसासुग्रीवावरीआदळला । आवेशेंकरूनझोंबतीतेवेळां । कांपोंलागलीधरित्री ७९ मल्लयुद्ध
होतांअनिवार । गुप्तपाहेअवनिजावर । तोंदोघेसारिखेदिसतीवीर । कोणावरशरटांकावा १८० मारुतीह्मणेअयोध्यापती । हेदोघेसारिखेचिदि
सती । मगसुमनहारत्वरितगती । समीरसुतेंगुंफिला ८१ सुग्रीवाचेगळांघालीतेक्षणीं । दुरूनविलोकीकैवल्यदानी । दोघेहाकादेतत्यांचीगगनीं ।
प्रतिध्वनीउठतसे ८२ वज्राऐसेकठोर । हाणितीतेव्हांमुष्टिप्रहार । भूगोळकांपेसमग्र । दणाणिलेंपाताळ ८३ शतयोजनांतीलझाडेंउपडोनी ।
निजबळेंघालितीउचलोनी । वातेंतरूधांवतीगगनीं । जैसेपक्षीतळपती ८४ चक्राकारफिरवितीपर्वत । नकळतांटांकितीअकस्मात । क्षणक्षणांभू
कंपहोत । श्रीवाभोगींद्रसरसावी ८५ हृदयींसमर्पितवज्रमुष्टी । तेणेंउडुगणाचीहोतवृष्टी । गगनींदेवांचीझालीदाटी । युद्धदृष्टींपाहावया ८६
असोतोसहस्त्राक्षाचासुत । सुग्रीवासीहाणीमुष्टिघात । कासावीससूर्यसुत । मागेंपाहेमुरडोनी ८७ वीरसांपडलारणमंडळीं । बंधूचीवाटपाहेतेवेळीं ।
तैसासुग्रीवहृदयकमळीं । दोनॅबंधूसीआठवी ८८ ह्मणेकांनपुरेमाझाभोग । कृपानकरीअवनिजारंग । जोविषकंठहृदयपद्मभृंग । दशकंठदमन
जो ८९ असोइकडेकौसल्यानंदन । तूणीरांतूनवोढीदिव्यबाण । जैसीकल्पांतीचेमेघांतून । चपळानिघेबाहेरी १९० धनुष्यावरीलावूनिबाण । ल
क्षसाधिलेंदुरून । वालीचेहृदयींयेऊन । अकस्मातखडतरला १९१ बाणकैसालागलासतेज । जैसीगिरिवरीपडेवीज । कींकोद्रवेयदखतांअरुणा
नुज । येऊनिझडपीजैसाकां १९२ कींअभाग्यावरीविघ्नपडे । कींराहुमुखींशशीसांपडे । कींतपस्वियांवरीसांकडें । व्यसनपडेकामाचें १९३

१ चारशें कोश. २ मान. ३ शेष. ४ नक्षत्रांची, ५ वाली. ६ सुग्रीव. ७ श्रीराम. ८ सीतापति. ९ शंकर. १० रावणास दमविणारा. ११ सर्प. १२ गरुड.

कींतृतीयनेत्रींचाअग्न । मन्मथावरीपडेयेऊन । तैसावालीचेहृदयींबाण । एकाएकींसंचरला १९४ महावृक्षउन्मळिला । कींपर्वतपातगजासिझा
ला । तैसावालीनेंदेहटांकिला । भूमंडळींतेकाळीं १९५ वालीचादेहांतजाणोनी । जवळीआलाचापपाणी । इंद्रतनुजतेक्षणीं । कायबोलताजा
हला १९६ तूंक्षत्रियएकपत्नीव्रती । दुसरीकांवरिलीअपकीर्ती । अन्यायनसतांरघुपती । बाणव्यर्थकांटांकिला १९७ तूंसत्यवचनीयशवंत ।
महाप्रतापीरणपंडित । तुझीअपकीर्तीत्रिभुवनांत । झालीसत्यराघवेशा ९८ नहटकितांटांकिलाशर । मगबोलतजानकीवर । मर्कटातूंपालाखाणा
र । तुजकायरेहटकावें ९९ वीरअसेलत्यासीहटकावें । वनचरांसीगुप्तचिवधावें । पारधींयेंमृगसाधावे । पाचारावेंकासया २०० तूंपरमअ
न्यायीवानर । बंधुस्त्रीअभिलाषीसाचार । म्यांदुष्टदंडावयाअवतार । घेतलाअसेमर्कटा १ ऐसेंऐकतांतेकाळीं । हृदयींसद्गदझालावाली । ह्मणें
मीपावनझालोंयेवेळीं । तुझेनिहस्तेंराघवा २ थोरसुकृताचेपर्वत । दृष्टींदेखिलारघुनाथ । माझेंसार्थकझालेंयथार्थ । नाहींअंतनिजभाग्या ३
येचमार्गींजनकनंदिनी । दशग्रीवगेलाघेउनी । मीत्यासिआणितोंबांधोनी । एकक्षणनलगतां ४ कक्षेंभाजीदाटून । चतुःसमुद्रींकेलेंस्नान । पा
ळण्यावरीबांधून । अंगदासीखेळविला ५ मगपौलस्तीनेंभिक्षामागोन । नेलादशकंठसोडवून । त्यामशकाचापाडकोण । कायउशीरआणावया
६ माझेंकर्ममहाबळी । तुझीसेवानाहींघडली । राजीवाक्षतेवेळीं । स्नेहेंकरूनबोलिला ७ तुझेहृदयींचाउपडोनिबाण । आतांतुजसावधकरीन । मग
ह्मणेइंद्रनंदन । ऐसेंमरणपुढेंनये ८ तुझेनिहातेंदेहांत । तूंदृष्टीपुढेंरघुनाथ । ऐसेंबोलेशक्रसुत । तंवसुग्रीवजवळीपातला ९ नेत्रींस्त्रवतीजळबिंदू ।
उचंबळलाशोकसिंधू । मगवालीनेंकनिष्ठबंधू । प्रीतीनेंजवळीबैसविला २१० काढोनियांविजयमाळा । घातलीसुग्रीवाचेगळां । ह्मणेधन्यअनुजा
वेल्हाळा । दृष्टींदाविलाश्रीराम ११ धन्यधन्यतुझेंवैर । अंतींदाविलारघुवीर । वैरनव्हेहास्नेहथोर । म्जलागींतुवांकेला १२ आतांरघुनाथसे
वाप्रीतीं । तुह्मीकरावीसमस्तीं । साह्यहोऊनिसर्वार्थी । सीतासतीसोडवीजे १३ ऐसेंशक्रतनुजबोलोन । विलोकिलेंराघवध्यान । तत्काळदेहसो
डून । वालीझालाविदेही १४ विष्णुदूतयेऊन । नेलाविमानींबैसवून । यावरीतारेचेंसमाधान । रघुनंदनकरील १५ तेसुरसकथाअपार । संं
तींपरिसावीसादर । ब्रह्मानंदेंश्रीधरवर । अभंगचरित्रवर्णीकां १६ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मीकीनाटकाधार । सदांपरिसोतपं
डितचतुर । सप्तदशोध्यायगोडहा २१७ ॥ ॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ अध्याय १७ ॥ ॥ ओव्या २१७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

१ पुण्याचे. २ सीता. ३ रावण. ४ कांख. ५ ठेवून. ६ रावणाचा बाप. ७ वाली. ८ वाहणें. ९ कनिष्ठबंधु.

श्रीगणेशायनमः । श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । अखिलरघुनाथगुणसमुद्र । रामउपासकतेथेंजलचर । ब्रह्मानंदेंक्रीडतीसाचार । प्रेमबळेंमाजो
नियां १ स्वानंदाचेउमाळेदेती । सारासारविचारेंतळपती । जीवनावांचूनियांगती । दुर्जनसेतयांतें २ अविद्याविपिनशुष्कबहुत । तेथेंवा
सकदांनकरित । नंदनवनींचामिलिंदसत्य । अर्कींपुष्पींनबैसे ३ जोकरीसुधारसपान । तोकंटाळेदेखोनिवमन । जेणेंआत्मशय्येकेलेंशयन । तो
भवकाननसेवीना ४ कल्पद्रुमज्याचेआंगणीं । कामधेनूदुभेसदनीं । तोतृणबीजकाढोनी । कदांकाळींभक्षीना ५ तैसेरघुवीरभजनींसाद
र । तेविषयींनधरितीआदर । प्रारब्धभोगेंवावरेशरीर । हेंहीनेणतीकदांते ६ सत्रावेअध्यायींगतकथार्थ । श्रीरामेंमारिलाशक्रसुत । सुग्रीवउसांमां
डीदेत । देहांतसमयींवालीच्या ७ तोंअंगदसमवेततारासती । सत्वरआलीजेथेंपती । मगह्मणेअयोध्यापती । कायऐसेंतुवांकेलें ८ आतांटाकूनि
एकबाण । राघवाघेईंमाझाप्राण । मीपतिसमागमेंजाईन । कायवांचोनिव्यर्थआतां ९ कवळोनिवालीचेंप्रेत । ताराअत्यंतशोककरित । ऐसेंजाणोनि
जनकजाकांत । कायबोलतेंऐका १० कोण्याअर्थालागींदेख । तारेतूंकरिसीशोक । येरीह्मणेपतिवियोगपावेंक । तेणेंदग्धझाल्येंमी ११ ताटि
कांतकह्मणेतेवेळीं । कलेवराचेंनामवाली । तरितेंपडिलेंतुजजवळी । जैसेंतैसेंसंचलें १२ ज्यालागींशोककरिसीबहुत । तरितेंपडलेंवालीचेंप्रेत । येरी
ह्मणेहृदयस्थ । आत्मागेलानिघोनियां १३ शरीरतंवनाशिवंत । आत्माअविनाशशाश्वत । तरिशोककरावाकिमर्थ । पाहेंबरवेंविचारुनी १४ म
गबोलेअयोध्याविहारी । तूंकायआत्म्याचीअंतुरी । कींशरीराचीनिर्धारी । सांगेंमजविचारुनी १५ जैसाघटींआणिरांजणीं । बिंबलाएकवासरमणी ।
तैसास्त्रीपुरुषअभिमानी । आत्माएकअव्यंग १६ घटमठमोडितांनिःशेष । जेविनमोडेचिआकाश । कींतरंगमोडतांसागरास । नाशनसेसहसा
ही १७ मायामयलटिकाखेळ । जैसेंनसतांचिदिसेमृगजळ । कींगंधर्वनगरकेवळ । मिथ्याभासआभासे १८ सुधापानीस्वर्गींअसती । तेहीना
शपावतीकल्पांतीं । जेंजेंदिसेआकाररीतीं । नाशनिश्चितीअसेतेथें १९ भग्नपात्रींचेंगळेनीर । मार्जीबिंबलारोहिणीवर । तोनदिसेह्मणोनिअपार ।
शोककरितीअज्ञानें २० मळेपिकवावयाअपार । आपणतपेरोहिणीवर । तोगुप्तहोतांसाचार । शोककरितीमूर्खलें २१ सकळपिंडांसमवेत ।
ब्रह्मांडअवघेंमिथ्याभूत । आत्माअक्षयशाश्वत । शोककिमर्थेंकरिसीतूं २२ ऐसीरावणारीचींवचनें । अमृताहूनिगोडगहनें । कींबोधसमुद्रींचींचिद्रत्नें
तारेलागींदीधलीं २३ कींतींविश्रांतीचींमंदिरें । कींअनुभवनभींचींनक्षत्रें । कींस्वानंदाचींपात्रें । मुखावरीउचंबळती २४ कींश्रीरामवचनअ

१ मासे. २ उदक. ३ अज्ञानरूप कोरडें रान. ४ भ्रमर. ५ रुईचें फुल. ६ ब्रह्मसुखाचा. बिछाना. ७ संसाररूप अरण्य. ८ वाली. ९ राम. १० अग्नि. ११ स्त्री.

गस्तीथोर । शोषिलातारेचाशोकसागर । कींवचनरूपेंदिनकर । अज्ञानतिमिरनाशक २५ मगमदनारिमित्राचेचरण । तारेनेंधरिलेप्रीतीकरून ।
श्वासोच्छ्वासटांकून । तटस्थरूपेंराहिली २६ श्रीरामह्मणेतारेलागुन । माझेंवचनमानीप्रमाण । सुग्रीवासीमाळघालून । सुखेंकरूनवर्त्तावें २७
ताराह्मणेचापपाणी । हीवेदविरुद्धदिसेकरणी । मगह्मणेकैवल्यदानी । वचनमानीमाझेंहें २८ तूंपतिव्रतेमाजीविख्यात । तारेहोशीलयथार्थ । अ
घटितघडवीरघुनाथ । महिमाअद्भुतजयाचा २९ देवाचेंआचरणअघटित । तेंमानवआपणकरूंह्मणत । तरीनरकासीकारणनिश्चित । होईलऐ
सेंजाणिजे ३० अघटितघडवीरघुनंदन । स्तंभाविणराहिलेंगगन । उदकावरीपृथ्वीसंपूर्ण । नबुडेजाणसहसाही ३१ त्याचेंकर्तृत्वकरितीइतर ।
तरीअनर्थासीनसेपार । स्वेच्छावर्तेसर्वेश्वर । नह्मेकोणह्मणेतया ३२ असोतेतारासुंदरी । रामेंबोधिलीऐशियापरी । सुग्रीवासीद्यावीनिर्धा
री । निश्चयपूर्णकेलाहा ३३ यावरीउत्तरक्रियासमस्त । वालीचीकरीसूर्यसुत । अंगदावरीरघुनाथ । प्रीतीअत्यंतकरीतसे ३४ मगतारेनेंसुमन
माळ । सुग्रीवासीघातलीतत्काळ । जेणेंप्रसन्नहोयतमाळनीळ । आचरणतेंचिउत्तम ३५ सकळकपीजयजयकारें । गर्जनाकरितीबहुथोरें । नभ
नादावलेंभुभुःकारें । महागजरेंदुमदुमिलें ३६ राघवह्मणेसुग्रीवास । आह्मीयेथेंराहिलोंचारमास । तुह्मीभोगूनिराज्यविलास । सत्वरपरतोनियेईं
जे ३७ अर्कजह्मणेरघुनाथा । आपणकिष्किंधेसीचलावेंआतां । श्रीरामह्मणेमाझियाभरता । कारणेंमीव्रतस्थ ३८ माझियाजिवलगाविण । मी
नकरींमंगळस्नान । आठवोनिभरताचेगुण । रघुनंदनगहिंवरला ३९ मीचित्रकूटींहूनिनिघतां । भरतासीझालीजेअवस्था । सुग्रीवातेंनयेसांगतां ।
धीरचित्तानधरवे ४० जैसेंबालकपरदेशी । माताटाकूनजायदूरदेशीं । मजविणेंमाझ्याभरतासी । तैसेंझालेंअसेल ४१ सांगतांभरताचेगुण । स
द्गदझालारघुनंदन । सुग्रीवेंधांवूनिधरिलेचरण । लक्ष्मणहीगहिंवरला ४२ असोयावरीराजीवनेत्र । बोलताझालानीरदगात्र । ह्मणेसुग्रीवावरीधरीं
छत्र । सौमित्रासत्वरजाऊनियां ४३ रघुपतीचेंचरणांबुज । वंदीतेव्हांसुमित्रातनुज । आशीर्वाददेतभरताग्रज । विजयीहोईंसर्वदां ४४ मगसौ
मित्रेंजाऊनिसत्वर । सुग्रीवावरीधरिलेंछत्र । अमात्यपदविचित्र । वालीपुत्रासीदीधलें ४५ सर्वेंचिपरतोनिलक्ष्मण । आलाजेथेंजानकीजीवन । ज
वळीउभावायुनंदन । करजोडोनिसर्वदां ४६ किष्किंधेसीनित्यजाऊन । राघवापासींयेईपरतोन । तोंचातुर्मास्यलोटलेंपूर्ण । सुग्रीवास्मरणन्हेचीं
४७ देखोनियांशरत्काळ । बोलताझालातमाळनीळ । ह्मणेसुग्रीवमदांधकेवळ । राज्यमदेंकरूनियां ४८ विषयसंगेंरमलेंमन । धनविद्यामदेंगे
लेंभुलोन । तरीसज्जनींत्यासदंडोन । सन्मार्गातेंलावावें ४९ तरीकिष्किंधेसीजाईलक्ष्मणा । आठवदेईंसूर्यनंदना । तोजरीनमानीमाझियेवचना ।

तरीवधोनित्यार्तेयेइजे ५० तारारुमादोघीघेऊन । नित्यकरीमद्यपान । जोनकरीमाझेंस्मरण । त्यासअवश्यदंडावें ५१ जोब्राह्मणदेखोनिउप
हासकरी । संतभक्तांसींद्वेषधरी । दुरुक्तीबोलेनानापरी । त्यासीअवश्यदंडावें ५२ निंदीहरिहरांचींचरित्रें । अपमानीजोसत्पात्रें । अपूज्यासीपूजी
आदरें । त्यासीअवश्यदंडावें ५३ ऐश्वर्यमदेंजेमातले । हिंसाकरितांजोनकंटाळे । धर्मपंथजेणेंमोडिले । त्यासीअवश्यदंडावें ५४ कमळाआणि
चक्रपाणी । भेटोंइच्छितीधर्मसदनीं । कार्पण्यदोषेंविघडीदोनी । त्यासीअवश्यदंडावें ५५ यालागींवीरचक्रचूडामणी । किष्किंधेसीजाईंयेचक्षणीं ।
तोजरीमाझेंवचनअवगणी । तरीतेचक्षणींवधावा ५६ वालीनिर्दाळिलाज्याबाणें । त्याचशरेंत्याचाप्राणघेणें । ऐसेंऐकतांलक्ष्मणें । राघवचरणवंदिले
५७ धनुष्यासीचढवोनिगुण । वेगेंचालिलाउन्मिळाजीवन । किष्किंधेसमीपयेऊन । लाविलाबाणचापासी ५८ तोंइकडेपूर्वीचमारुती । सूचनाजा
णवीसुग्रीवाप्रती । ह्मणेएकलावनींरघुपती । चालवेगींदर्शना ५९ सीताशुद्धीसत्वरित । वानरधाडावेनिश्चित । तूंझालासीबहुतउन्मत्त । रामका
र्यार्थनाठविसी ६० तारुण्यमदेंआधींचउन्मत्त । त्यावरीमद्यपानींरत । उपरीधनमददाटलाबहुत । मान्यविशेषत्याहीवरी ६१ जाणतअत्यंतवाचा
ळपण । कोणासीबोलोंनेदीवचन । जेवीमद्यपियाचेंभाषण । सव्यापसव्यनेणेंची ६२ तैसातूंझालासिनिश्चित । स्त्रियांच्यासंगेंअतिउन्मत्त । वि
सरलासीरामकार्यार्थ । सूर्यसुतमगबोले ६३ झालेघूर्णितलोचन । बोलेउदासीनवचन । ह्मणेवानरसेनामिळऊन । सिद्धकराहळूहळू ६४ ऐ
सेंबोलोनिसूर्यसुत । राणिवसामाजींप्रवेशत । तोंनगरद्वारींउन्मिळानाथ । येऊनिउभाठाकला ६५ धनुष्यासीलावूनिबाण । क्षोभलाजैसाप्रळया
ग्न । पळोंलागलेवानरगण । जातीशरणसुग्रीवा ६६ सुग्रीवतेव्हांगजबजिला । ह्मणेहनुमंतारक्षींमजला । येरूह्मणेसौमित्रकोपला । तोनाटोपेक
वणातें ६७ मगउभयदारांसमवेत । शरणयेतसूर्यसुत । आणिकवानरभारसमस्त । संगेंहनुमंतघेतला ६८ हनुमंतह्मणेनम्रताधरून । अ
वघेघालालोटांगण । तैसेंचकरितीवानरगण । सुग्रीवासहिततेधवां ६९ तारारुमापुढेंहोऊन । सौमित्रासीमागतीचुडेदान । सुग्रीवधरीदृढचरण ।
उन्मिळापतीचेतेधवां ७० सौमित्रह्मणेक्रोधायमान । ऐसेतुह्मीनिर्दयपूर्ण । श्रीरामसच्चिदानंदघन । वनींसांडोनिराज्यकरितां ७१ जोअनंत
ब्रह्मांडनायक । अयोध्यानाथपुंण्यश्लोक । त्यासवनींसांडोनिराज्यसुख । गोडकैसेंवाटतसे ७२ हनुमंतबोलेनम्रवचनें । सर्वअपराधक्षमाकरणें । सु
ग्रीवाउठवोनिआलिंगनदेणें । प्रीतीकरूनयेसमयीं ७३ मगउठवोनिसूर्यसुत । राघवानुजआलिंगित । तंववानरभारअद्भुत । चहूंकडोनिधांविन्न
ले ७४ वानरचमूसमवेत । चालिलातेव्हांतमारिसुत । जैसीनदीउचंबळोनिबहुत । मिळूंजायजलार्णवा ७५ आवेशेंवानरगणधांवत । गोक

ळपजैसेतृषाक्रांत । सरितापंथेंजलपानार्थ । वेगेंकरूनलोटती ७६ कींदात्याचेंगृहलक्षोन । धांवतीजैसेयाचकजन । कींपाहावयासद्गुरुचरण । स
च्छिष्ययेतीत्वरेनें ७७ कींलग्नघडीउरलीथोडी । देखोनिधांवतीजैसेवऱ्हाडी । कींमिलिंदचक्रेंधांवतीतांतडी । पद्ममकरंदसेवावया ७८ तैसेआ
लेरघुपतीजवळी । लोटांगणेंघालितीसकळी । रामेंआलिंगिलाहृदयकमळीं । मित्रतनुजआदरें ७९ आणीकहीसकळवानरां । भेटलापरात्परसोय
रा । करजोडोनिपुढारा । किष्किंधेशस्तवीतसे ८० जयनिगमागमवंद्यरघुवीरा । भक्तकैवारियाआनंदसमुद्रा । पंचद्वयरथराजपुत्रा । विश्वनेत्रावि
श्वपाळका ८१ शरणागतासीतूंवज्रपंजर । कदांनुपेक्षीशार्ङ्गधर । जैसेंसबळकाष्ठतारीनीर । आपणवाढविलेंह्मणोनी ८२ तिळभरपाषाणन
तरेजळीं । वृक्षासीतारीसर्वकाळीं । शरणागताचीमाउली । तैसाकेवळतूंश्रीरामा ९३ पद्मासीढकानलावीभ्रमर । काष्ठेंतात्काळकरीचूर । तेवी
भक्तपाळणअभक्तसंहार । सीतावल्लभाकरिसीतूं ८४ असोभूगर्भरत्नशुद्धीसीवानर । जावयाइच्छितीसमग्र । मगबोलेविषकंठमित्र । जाऊंद्यासत्व
रचहूंकडे ८५ अर्कसुतेंपाठवूनदूत । आणविलेवानरसमस्त । अष्टादशपद्मेंबलाद्भुत । समरींकृतांतजिंकिती ८६ सुग्रीवेंघालोनिआण । आण
विलेसप्तद्वीपींचेहरिगण । समस्तांसीह्मणेसूर्यनंदन । ऐकावचनसत्यमाझें ८७ सीताशुद्धीकरूनितत्वता । जानकीभेटवूंरघुनाथा । हेंकार्यसिद्धीस
नपावतां निजनगरासीनजावें ८८ सीतानभेटवितांरघुवीरा । जोकोणीजाईलमाघारा । तोमात्रागमनीअवधारा । ब्रह्महत्यारीपापिष्ठ ८९
त्यासरासभावरींबैसवून । तत्काळछेदीननासिककर्ण । पृथ्वीवरीफिरवीन । स्वामीद्रोहीह्मणोनियां ९० सीताशुद्धीनोहेह्मणून । जोकोणीयेईलप
रतोन । त्यासीमीस्वहस्तेंदंडीन । खंडीनचरणपैंत्याचे ९१ तोंद्वीपींद्वीपींचेवानर । गिरिकंदरींजेराहाणार । मेरुपाठारवासीसमग्र । देतभुभुःका
रपातले ९२ नादनमायेगगनीं । चालतांदणाणिलीमंगळजननी । शेषकूर्मदचकलेमनीं । भुभुःकारध्वनीऐकूनियां ९३ एकहरीपर्वतउचलो
नी । कंदुकवतझेलितसेगगनीं । एकवरचेंवरझेलोनी । दुसरीकडेभिरकाविती ९४ एकमहावृक्षउपडोनिबळें । झोडोनियांभक्षितीसुरसफळें ।
पृथ्वीअंबरसमग्रभरलें । रीसवानरींतेधवां ९५ एकगगनपंथेंउडियाघेती । खालतापाडूंह्मणतीगभस्ती । खुंटलीसमीराचीगती । वाटनफुटेचा
लावया ९६ एकपश्चिमसमुद्राधांवती । तोंअस्तासीगेलादिनपती । एकसमुद्रींपुच्छेंबुडविती । वोढूनिकाढितीजलचरें ९७ दशलक्षयोनीउदकां
त । जलचरांच्याजातीबहुत । आणोनिराघवासीदाखवित । चतुःसमुद्रधुंडोनियां ९८ नानाजातीचेवानर । बहुरंगीबहुतक्रूर । एकउभेराघवासमो
र । वांकुल्यादावितीविनोदें ९९ हातींधरूनिविशाळद्रुम । आनंदेंनाचतीप्लवंगम । एकगायनकरितीसप्रेम । श्रीरामडुल्लतऐकोनियां १०० राग

रबांधिलेसकळ । फिरवूनियांतात्काळ । भूमीवरीआपटिले १७० जैसींतुंबिनीचींओलींफळें । बळेंआपटितांहोतीशकलें । तैसेवनरक्षकतेवेळे चूर्णझालेसकळही १७१ सवेंचसमुद्रजीवनीं । प्रेतेंदेतभिरकावुनी । भुभुःकारेंगर्जतांध्वनी । गगनगर्भीनसमाये १७२ घायाळउरलेकिंचित । तेरावणासमीपआलेधांवत । ह्मणतीएकवानरअद्भुत । अशोकवनींप्रकटला १७३ सकळवनविध्वंसून । वनरक्षकमारिलेसंपूर्ण । ऐसेंराक्षसेंद्रें परिसोन । परमविषादपावला १७४ घृतेंशिंपिलावैश्वानर । तैसाक्रोधायमानदशकंधर । ह्मणेकोणरेतोवानर । माराजाऊनवेगेंसी १७५ ते व्हांऐशींसहस्त्रमहावीर । पाठविताझालादशकंधर। ह्मणेधरूनआणारेवानर। नानाप्रकारेंकरूनियां १७६ जरीप्लवंगमनाटोपेतुह्मांलागून । त रीमजदाऊंनकारेवदन । असोऐशींसहस्त्रपिशिताशन । गर्जतवनापातले ७७ नानाशस्त्रेंघेतलींहातीं । हांकेंनिराळगाजविती । ऐसेंदेखोनिमा रुती । विशाळरूपजाहला १७८ जैसामंदराचळविशाळ । तैसादिसेअंजनीचाबाळ । वासुकीऐसेंपुच्छसबळ । लंबायमानसोडिलें ७९ लंकेचेमहाद्वारींचीअर्गळा । लोहबंदींवेष्टिलीतेवेळां । मारुतीमारीतउठिला । सिंहनादेंगर्जत ८० वृक्षावरूनिपक्षीउडोनी । प्रातःकाळींभरती गगनीं । तैसींअरिमस्तकेंतुटोनी । उसळोनधरणींपडतातीं ८१ बांधोनशत्रुसमुदायभार । गगनींफिरवीवायुकुमर । आपटितांचहोतीचूर । करचरणादिअवयव ८२ तोंत्यांतमुख्यजंबुमाळी । हांकदेतपातलातेवेळीं । ह्मणेवानरारणमंडळीं । तुजआजिमारीन ८३ शूळघेऊनितेवेळां । त्वरेंमारुतीवरीधांवला । तोंहनुमंतेंलत्ताप्रहारदिधला । कोथळाफुटलातेक्षणीं ८४ जैसेंशस्त्रबैसतांप्रबळ । चूर्णहोयफळसफळ । कींवज्रघातें महाशैल । चूर्णजैसाहोयपैं ८५ तैसाजंबुमाळीपडिला । चिरूनहनुमंतेंभिरकाविला । दशमुखासमाचारकळला । अत्यंतकोपलातेकाळीं ८६ मगपाठविलेलक्षवीर । पांचसेनाधिपतीथोर । मल्लप्रतिमल्लनामेंअसुर । प्रचंडचंडजघनपैं ८७ रावणाचीआज्ञाघेऊन । वेगेंपावलेअशोकवन । हेंदेखोनिवायुनंदन । अर्गळाहातींतुळितसे ८८ करोनिपुच्छाचेंउखळ । हातींघेऊनिलोहमुसळ । कांडीतसेलंकेशाचेंदळ । साळीऐसेंतेधवां ८९ असुरदेंहपडतीअचेतन । हाचिसाळींचाकोंडाझाडून । सूक्ष्मदेहतांदूळपूर्ण । जातउद्धरूनकपिहस्तें ९० करकरांकपीदाढाखात । नेत्रगरगरांभोंवं डित । शस्त्रास्त्रेंएकदांचिवर्षत । पिशिताशनतेकाळीं ९१ मेरूऐसापैंसबळ । असेतोअंजनीचाबाळ । तोंतेथेंदेखिलेंदेऊळ । सहस्त्रस्तंभीदेवीचें ९२ तेरावणेंदेवीस्थापिली । ब्राह्मणाचादेतनित्यबळी । वायुसुतेंतेवेळीं । तेंविदारिलेंदेवालय ९३ पायासहउपडोनी । आकाशपंथेंभिरकावुनी । पाषाणगेलेदशदिशांनीं । पक्षाऐसेउडोनियां ९४ असोयावरीहनुमंतें । लोहार्गळाघेऊनिहातें । मांडिलेंवीरकंदनातें । रामगीतआळवूनी ।

१५ अशोकवनतेंखळेंकेवळ । माजीवीरहेंधान्यसकळ । हनुमंततिवडामध्येंसबळ । पुच्छपोतेंपिळीतसे ११६ तयाखळियाजवळी । खेचरदेवी
जनकबाळी। महावीरांचेदीधलेबळी । राशिकेल्याशिरांच्या १७ रेणुकेच्याकैवारेंपरशधरें। सर्वक्षत्रियांचींछेदिलींशिरें। तैसींसीतेकारणेंराघवकिंकरें
पाडिलींशिरेंराक्षसांची १८ असोहनुमंतेंतेवेळां । पुच्छेंराक्षसकरूनिगोळा। आपटोनिसमुद्रजळा। माजीनिक्षेपीसाक्षेपें १९ लक्षवीरमृत्युपंथागेले।
मगसातपुत्रपाठविले । तेहीहनुमंतेंचूर्णकेले । आर्गळाघातेंकरूनियां २०० हांकगेलीरावणापासीं । वानरेंसंहारिलेंसमस्तांसी । मगपाठवि
लेंअखयासी । दळभारेंसींतिधवां १ अखयादेखोनिहनुमंत । अर्गळाघेऊनिनाचत । गदगदांहांसूनबोलत । लंकेशात्मजासीतेधवां २ अरेअ
खयातुझेंनामव्यर्थ । जैसेअजागळींचेस्तनयथार्थ । कींमूर्खासिअलंकारघातलेसत्य । श्रोत्रजैसेंबधिराचे ३ कींगर्भांधाचेनयन । व्यर्थकायवि
शाळदिसोन । कींनासिकावीणवदन । नामकरणतैसेंतुझें ४ रासभासीभद्रासन । श्वानासीअग्रपूजामान । कींदिव्यांबरपरिधान । व्यर्थप्रेता
सकरविलें ५ तैसेंअखयानामदशमुखें । तुजठेविलेंव्यर्थशतमूर्खें । आतांचितुझाक्षणेकें । करीनसंहारपाहेपां ६ तोंअखयाधनुष्यघेऊन । सो
डीबाणापाठींबाण । क्षणएकवायुनंदन । उगाचउभाराहिला ७ काडियापडतांबहुत । बैसकानसांडीपर्वत। कींसुमनवृष्टीनेंमदोन्मत्त। खेदसह
सानमानी ८ तैसेअखयाचेबाण । येतांनशंकेवायुनंदन । मगलोहार्गळाघेऊन । कृतांतवतधांविन्नला ९ बैसतांलोहार्गळेचाघाय । अखयाचा
झालाक्षय । समीरात्मजपावलाजय । सुरसमुदायआनंदला १० ऐकोनिअखयाचासमाचार । शोकार्णवींपडिलालंकेश्वर । आसाळीराक्षसी
भयंकर । अशोकवनाधाडिली ११ दाहासहस्त्रगजांचेंबळ । उदरांतसांठवीअचळ । एकयोजनमुखविशाळ । पसरूनियांधांविन्नली १२ कपा
ळींचर्चिलासेंदूर । बाबरझोटीभयंकर । तिणेंधांवोनिसत्वर । वायुसुतधरियेला १३ उचलोनिघातलामुखांत । दांतांसिदांतजोंमेळवित्त । तंव
तोउतरलाउदरांत । क्षणमात्रनलगतां १४ लंकेशासीसांगतीहेर । आसाळीनेंगिळिलावानर । ऐकतांआनंदलादशकंधर । असुरसभेसीतेध
वां १५ रावणशर्करावांटित । तोंदूतआलेशंखकरित । आसाळीचाझालाअंत। पोटहनुमंतेंफाडिलें १६ शंकाकुलितद्विपंचवदन । ह्मणेहेंअद्भुतप्र
कटलेंविघ्न। यावरीशक्रजितजाऊन। युद्धकरीलऐकातें १७ रामविजयग्रंथसुरस। सुंदरकांडकौतुकविशेष। श्रवणकरितीसावकाश । रघुवीरभक्तआ
दरें १८ रविकुळमंडणापुराणपुरुषा। श्रीमद्भीमातटनिवासा। ब्रह्मानंदाअविनाशा। श्रीधरवरदाजगद्गुरू १९ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमत
वाल्मीकीनाटकाधार। सदांपरिसोतपंडितचतुर। विंशतितमोध्यायगोडहा २२० श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु। शुभंभवतु। अध्याय २० ओव्या २२०

श्रीगणेशायनमः । । श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । क्षीराब्धितटींबैसलासर्वकाळ । त्यासीक्षुधाकासयाबाधील । दीपाचीचिंताकांलागेल । दिनमणी समीपअसतांपैं १ राहातांकल्पतरूजवळी । कांदुःखितकामनाव्याळीं। गंगाजळींशेजजेणेंकेली। त्यासवणवाकरीलकाय २ वारणविदारकाचेसंगतीं । जोबैसलाअहोराती । जंबुकत्यासीबाधाकरिती । कल्पांतींहिघडेना ३ जोनित्यकरीसुधारसपान । त्यासीविषबाधेलकायदारुण । स्वरूपींसदांसावधान । दुष्कृतकैचेंत्यापासीं ४ कामधेनुघरींअसतां । मगकल्पनानबाधीतत्वतां । हुताशनसतेजधडकतां । शीतकैंचेंउरेल ५ तैसीरघुवीरकृपाज्यावरीपूर्ण । त्यासनबाधीविषयहुताशन । रामचरित्रींगुंतलेंमन । इतरश्रवणनावडे ६ असोविसावाअध्यायसंपतांतेथें । आसाळीविदारिलीहनुमंतें । त्यावरीइंद्रजितासीलंकानाथें । आज्ञापिलेंसत्वर ७ तोंनग्नकुमारीशिंकेपाठींसी । शकुनपुसेब्रह्मदेवासी । विधिह्मणेदोघांतूनएकासी । अपयशयेईलदिसतसे ८ रावणपाहेक्रोधयुक्त । विधिह्मणेहोईलहस्तगत । तैसाचचालिलाइंद्रजित । अशोकवनासीतेवेळे ९ सवेंघेऊनिचतुरंगसेना । शक्रारिनिघालाअशोकवना । शायशींअयुतेंगजजाणा । रथतुरंगमागणनानाहीं १० देवबैसोनिविमानीं । कौतुकपाहातीतेचक्षणीं । अशोकवनांतरावणी । निजभारेंसीप्रवेशला ११तोंपाठमोराहनुमंत । बैसलासेफळेंझेलित । असुरगर्जतीबहुत । परितोतिकडेनपाहे १२ क्षणक्षणापाठकुरवाळित । परतोनवांकुल्यादावित । राक्षसशस्त्रेंअसंख्यात । वर्षतेझालेकपीवरी १३ इंद्रजितेंशरटांकिले । हनुमंतेंवरचेवरझेलिले । मुष्टीमाजीआकळिले । बहुसालतेधवां १४ अकस्मातपुच्छसोडिलें । रावणीचेंधनुष्यहरिलें । हनुमंतेंआकर्णवोढिलें । बाणलाऊनतेसमयीं १५ अचुकमारुतीचेंसंधान । सोडिताझालाअसंख्यबाण । जैसेंशब्दामागेंशब्दपूर्ण । मुखांतुननिघतीपैं १६ तोंविमानारूढसुर्धापानी । पुष्पेंवर्षतीक्षणक्षणीं । ह्मणतीमारुतीधन्यअंजनी । तुजचिएकप्रसवली १७ राक्षसांचींशिरेंतेकाळीं । हनुमंतेंअसंभाव्यउडविलीं । रावणीचामुकुटतळीं । छेदोनियांपाडिला १८ बाणसरलेतयेवेळा । सवेंचघेतलीअर्गळा । वायुवेगेंधांवूनआला । शक्रारीचेरथापासीं १९ अर्गळाघालोनितेवेळा । अश्वासहितरथभंगिला । इंद्रजितविरथजाहला । घाबरलापाहातसे २० लोहार्गळाचेघायसबळ । झोडिलेंइंद्रजिताचेंदळ । वाहातीरक्ताचेकल्लोळ । समुद्राजातभेटावया २१ जैसेंअलातचक्रफिरे । तैसाहनुमंतअसुरांतवावरे । रावणीअर्गळाप्रहारें । झोडिताजाहलातेधवां २२ रावणात्मजेंतेअवसरीं । पाशटांकिलाहनुमंतावरी । तोंमारुतीहोयमोहरी । उडोनिजायएकीकडे । २३ मागुतीलहानपाशकरून । कपीवरीटांकीआणून । पर्वताकारसीताशोकहरण । होऊनिपाशतोडित २४ शस्त्रास्त्रेंबहुसाल । टांकितांनाटोपेक

१ हत्तीचें विदारण करणारा सिंह. २ कोल्हे. ३ हत्ती, घोडेस्वार, रथ आणि पायदळ. ४ इंद्रजित. ५ एक अयुत ह्मणज दहा हजार. ६ घोडे. ७ राक्षस ८ देव. ९ लोहस्तंभ.

पीसबळ। यावरीअंजनीचाबाळ। इंद्रजितावरीलोटला २५ मल्लयुद्धासीप्रवर्तला। इंद्रजीतबळेंआपटिला। नग्नकरूनिभिरकाविला। चरणींधरू
नहनुमंतें २६ इंद्रजिततेव्हांरडत। ह्मणेमजकायआलामृत्य। दळसंहारिलेंसमस्त। नदिसेतेथेंकोणीही २७ ह्मणेमजनिराहारीयाचेहातेंमरण
हातोंकरीफळभक्षण। परीरामापासींनेईलधरून। विटंबीलनानापरी २८ सुटेजोंजनकनंदिनी। मजतोवालीलबंदिखानीं। जैसारावणासींधरू
नी। पांचपाटकाढिले २९ मगनग्नइंद्रजितपळाला। विवरामाजीदडाला। कपीनेंद्वारींपाषाणठेविला। विवरींकोंडिलातयासी ३० इंद्रजितका
सावीसहोय। ह्मणेकांमरणमजनये। शस्त्रनाहींकरूंकाय। प्राणत्यागकरावया ३१ विवरींकोंडिलाइंद्रजित। हेंदशमुखासीजाहलेंश्रुत। परमझाला
भयाभीत। विनवितसेविरिंचीतें ३२ ह्मणेतुझेंवचनसाचार। हस्तगतहोईलवानर। तरीतुवांजाऊनिसत्वर। धरूनत्वरेंदेईंआह्मां ३३ तरींतूंते
थबरीजाऊन। मजद्यावेंपुत्रदान। काळरूपतोवानरजाण। तुजवीणकोणानाटोपे ३४ मगकमलोद्भवपातलातेथ। तंवतोनग्नचिइंद्रजित। दडाला
असेविवरांत। भयाभीतहोवोनियां ३५ मगरावणीबोलेकरुणावचन। आतांमजसोडवीयेथून। त्यावानरासीधरिल्यावांचोन। मीविवराबाहेरनयेंची
३६ कमलासनह्मणेतेअवसरीं। तूंआतांनिघेविवराबाहेरी। ब्रह्मपाशघालोनिझडकरी। कपीबळेंचधरावा ३७ रावणीदेतप्रत्युत्तर। ब्रह्मपाशेंनावरे
वानर। विरिंचीह्मणेतूंअपवित्र। तरींचअस्त्रनचाले ३८ मगविष्णुसुतेंतेवेळीं। राघवप्रियेंचीस्तुतीकेली। तूंवज्रशरीरीमहाबळी। निर्जरचळचळांकां
पतीतूतें ३९ आमुचेंवचनसाचकरावें। ब्रह्मपाशींसांपडावें। सभेपर्यंतउगेंचयावें। मगदावावापराक्रम ४० ऐसेंकमलोद्भवेंविनविलें। समीरात्मजें
मान्यकेलें। मगविरंचीनेंपाशमांडिले। माजीबांधिलेंहनुमंता ४१ हनुमंतबांधिलापाशीं। शक्रारीधांवलावेगेसीं। दृढबांधिताझालाकपीसी। निजहस्तें
करूनियां ४२ एकतृणवेंटीनेंपायबांधिती। एकवृक्षसालीनेंआंवळिती। एकदोरआणावयाधांवती। नगरामाजीसत्वर ४३ हनुमंतदिसेबांधिला।
परीतोसर्वदांहीमोकळा। जैसाज्ञानीसंसारींगुंतला। परीसर्वदामुक्तअसे ४४ नलिनीपत्रजळींखेळे। परीत्यावरिबिंदूनातळे। कींशीतोष्णधुळीनेंन
मळे। निराळजैसेंसर्वदां ४५ समीरसर्वांवरूनजात। परिकोठेंहीनव्हेलिप्त। तैसाचिवीरहनुमंत। बंधमोक्षातीतजो ४६ असोपरमेष्ठीआणिइंद्रजित
सभेसिआणिलाहनुमंत। वाटेसीराक्षसठोकित। नानाप्रकारशस्त्रांनीं ४७ शस्त्रेंभंगिलींसमग्र। वज्रशरीरतोवानर। अंसुरींउचलोनितोसत्वर। सभे
समोरआणिला ४८ दृष्टींदेखतांहनुमंत। रावणकरकरांदांतखात। याउपरीरघुनाथभक्त। कायकरिताजाहला ४९ बंधनेंतोडोनिसमस्त। पुच्छा

१ ब्रह्मदेवास. २ इंद्रजित. ३ रामभक्त मारुतीची. ४ देव. ५ मारुतीनें. ६ कमळिणीचें. ७ आकाश. ८ वायु. ९ राक्षसानीं.

सन्नींबैसलाहनुमंत । रावणाहूनएकहस्त । उंचआसनींमारुती ५० मगपुसेप्रधानप्रहस्त । तूंकोणाचाआहेसदूत । ऐसेंविचारूननिश्चित । पाहेच
कचकितचहूंकडे ५१ मगपुसेंद्विपंचवदन । तूंआहेसकोणाचाकोण । यावरीजनकजाशोकहरण । कायवचनबोलिला ५२ ह्मणेरेमशकारजनीचरा ।
महादुर्जनापामरा । मीकोणआहेंरेतस्करा । नकळेचतुजअद्यापी ५३ जेणेंसीतास्वयंवरींतुजवांचविलें । उरावरीलचापकाढिलें । त्याचादासजाणव
हिलें । शिरकमळेंछेदीनतुझीं ५४ जेणेंताटिकासुबाहुमारून । केलेंकौशिकमखरक्षण । त्याचादासमीआहेंपूर्ण । करीनकंदनलंकेचें ५५ तुझेभगि
नीचेंनासीकछेदिलें । खरदूषणत्रिशिरामारिले । त्याचादूतमीआलोंबळें । शिक्षातुजलावावया ५६ जैसेंअन्नसदनींरिघेश्वान । तैसापंचवटीसयेऊन
चोरिलीजानकीचिद्रत्न । महामलिनाअपवित्रा ५७ रामपंचाननाचीवस्त । कैशीतुजजिरेलनिश्चित । पाडूनवासुकीचादंत । मंडूककैसावांचल ५८
व्याघ्रअसतांनिद्रिस्थ । बाहेरजिव्हालोंबत । तीजंबुकेंतोडिलियायथार्थ । कैसावांचेलसांगपां ५९ तुझाअखयामारोन । विध्वंसिलेंम्यांअशोकवन
तुझेंदळसंहारून । इंद्रजितगांजिला ६० राक्षसकुळवैश्वानर । अहिल्योद्धारकौसल्याकुमर । तुझेंछेदावयाशिर । समरधीरयेतोआतां ६१ तोविषं
कंठवंद्यरघुनंदन । तुझेदशकंठछेदून । दशादिशांसीबळीदेऊन । सीताघेऊनजाईल ६२ ऐसेंऐकतांद्विपंचवदन । झालापरमक्रोधायमान । याचेंपु
च्छनासीककर्ण । जिव्हाछेदूनटांकारे ६३ ऐसेंबोलतांलंकेश । चौताळलेमहाराक्षस । पुच्छावरीआसमास । शस्त्रघायमारिती ६४ धापादाटलेहा
णतांवैभवें । त्याचेंरोमहीवक्रनव्हे । भयघेतलेंदशग्रीवें । ह्मणेबरवेंदिसेना ६५ मगविचारीनिजमनीं । हारामउपासकसत्यवचनी । तरीयाचामृत्यु
कैसेनी । आणघालूनिविचारूं ६६ ह्मणेतुजरघुपतीचीआण । सत्यसांगतुझेंमृत्यांगकोण । येरूह्मणेमजनाहींमरण । ऐकोनिरावणहांसत ६७ ब्र
ह्मयासहीआहेमरण । तेथेंतुझापाडकोण । येरू[illegible]गेपुच्छासिहोईलदहन । तेंचिमरणआह्मासीं ६८ तैलेंवस्त्रेंभिजवून । पुच्छागुंडाळूनिलावाअग्न ।
क्षणामाजीभस्महोऊन । सर्वजाईलनिर्धारें ६९ वस्त्रेंगुंडाळाबहुत । अग्नीकराप्रदीप्त । क्षणामध्येंहोईलअंत । उशीरयेथेंनलगेची ७० रावणह्मणेहें
साचार । मगस्नेहेंसहितवस्त्रभार । पुच्छागुंडाळितांसमग्र । वायुकुमरकायबोले ७१ ह्मणेंपुच्छउघडेंराहतां । मगनाटोपेंमीसर्वथा । राक्षसभागले
वस्त्रेंगुंडाळितां । पुच्छसर्वथानसरेची ७२ वस्त्रराशीआटल्यासमग्र । अधिकाधिकवाढेपुच्छाग्र । जैसापंडितबुद्धीचापार । बोलतांबहुतनसरेची ७३
कींमहाकवीचीपद्यरचना । अपारलिहितांतेसरेना । रामगुणाचीवर्णना । वर्णितांशेषानाटोपे ७४ तैसेंमारुतीचेंपुच्छअद्भुत । राक्षसांसीनगणवेगणित ।

---

१ दशमुखी रावण. २ सीता. ३ विश्वामित्राचा यज्ञ. ४ संहार. ५ पाकशाळेमध्यें. ६ चित्स्वरूप. ७ रामरूप सिंहाची. ८ बेडूक. ९ शंकर.

जैसेंअजारक्षकांसीनिश्चित । वेदार्थपारसमजेना ७५ असोसरल्यावस्त्रांच्याराशी । शेवटींनग्नकेलेनगरवासी । कोठेंनमिळेएकदशी । बहुतप्रयासें शोधितां ७६ राणींविसानग्नकेला । तरिपुच्छाग्रउघडाठेला । शेषतंतुमात्रउरला । नाहींकोठेंनगरांत ७७ हनुमंतह्मणेअणुमात्ररितें । राहतांबो लनाहींमातें । एककाढूनियज्ञोपवीतें । भयेंगुंडाळितीपुच्छासी । ७८ तैलघृतनवनीत । शोधितांनमिळेनिश्चित । विंशतिचक्षूसीसांगतीदूत । स्नेहवस्त्रें नमिळतीकोठें ७९ राजसेवकफिरतीनग्न । उभयद्वारेंमुक्तसोडून । कोणीकोणानबोलेवचन । कपाटेंझांकूनबैसले ८० एकनिघालेआंधारीं । एकनिघालेविवरीं । एकनेत्रलाऊनिरात्रीं । दिवसअसतांकेलीहो ८१ वृद्धवृद्धाएकाबोलती । पुढेंनदिसेबरीगती । हेंलंकानगरअंतीं । भस्महोईलदि सतसे ८२ असोवस्त्रेंनमिळतीनिश्चित । पुच्छउघडेंएकहस्त । रावणह्मणेअशोकवनांत । वस्त्रेंअसतीसीतेपासीं ८३ ऐकोनितयाच्याउत्तरा । हनुमंतआ वरीपुच्छाग्रा । दूतसांगतीदशकंधरा । अणुमात्रपुच्छउरलेंनसे ८४ तेथेंकासयापाहिजेवस्त्र । लंकेशह्मणेलावारेवैश्वानर । चुडच्यापाजळतीरजनी चर । अनलसाचारस्पर्शेना ८५ नानाउपाययोजिती । परीनलागेअग्नज्योती । रावणपुसेमारुती । अनलकांरेस्पर्शेना ८६ मगबोलेअशोकव नारी । पुच्छयज्ञहोतोतुझेद्वारीं । तरीसेवकांहातींनिर्धारीं । मूर्खाकिमर्थफुकविसी ८७ तरीतूंस्वमुखेंकरून । चेतवींसत्वरकृशान । नलागतांएकक्षण । ज्वाळायेथेंऊठती ८८ ऐसेंबोलतांअंजनीसुतें । तेंमानलेंदशमुखातें । परीअंतरींपावलाभयातें । मगधैर्यधरूनऊठला ८९ तेवेळेनिजमुखेंदाहक । बळेंफुंकीलंकानायक । हनुमंतेंबंधुआणिजनक । अनलअनिलस्मरियेला ९० तोंएकाएकींअग्निधडकला । दाहीमुखेंज्वाळापेटल्या । दाढ्यामि शातिव्हांसकळा । भस्मकेल्याजाळुनी ९१ रावणेंपापकेलेंबहुत । पुढेंरामबाणेंयासीदेहांत । यालागींअगोदरप्रायश्चित्त । राघवप्रियेंदीधलें ९२ दशमुखींपोळलादशकंधर । दिसेजैसेंदग्धकांतार । असोमुखासीलाऊनियांवस्त्र । निजासनींबैसला ९३ तंवधडकलापुच्छवन्ही । हनुमंतगडबडां लोळेधरणीं । काकुळतीयेतह्मणेसोडाकोणी । असुरमनींआनंदले ९४ ह्मणतीहेंबरवेंझालें । अखयादिकांसियेणेंमारिलें । मर्कटेंबहुतांशींसंहारिलें । विटंबिलेंइंद्रजिता ९५ मगविरिंचीनेंधरिलायुक्ती । दशमुखेंऐसीयोजिलीगती । अग्नीलाविलापुच्छाप्रती । मरेलआतांचिनिश्चितहा ९६ येरूचड फडीतडफडी । रडेभूमीवरीलोळेगडबडी । आपलीमांडीथापटोनीदाढी । रावणाचीगेलाधरावया ९७ तोंदाढीचनाहींनिःशंक । तेणेंरावणासिबसला दचक । देखोनकरीहास्यमुख । ह्मणेअनर्थदिसतोपुढें ९८ हनुमंतह्मणेअसुरांप्रती । मजसोडवावेंसमस्तीं । ऐकामाजीएकविनंती । धांवेमारुतीपुढें

१ धनगरांस. २ अंतःपुरांतील स्त्रिया. ३ लोणी. ४ रावणास. ५ रावणास. ६ अल्पसुद्धां. ७ अग्नि. ८ राक्षस. ९ निश्चयानें. १० अशोकवनाचा नाश करणारा मारुति. ११ वायु.

ची ९९ तंवतेपळतीदूरसमग्र । पुच्छेंआकर्षितअसुर । दाढ्याजाळियेल्यासमग्र । प्रळयथोरमांडिला १०० गरगरांपुच्छतयेवेळां । भवंडितांझळकतीप्रळ
यज्वाळा । राक्षसकरूनियांगोळा । पुच्छाग्नीनेंभस्मकरी १ सभासांडोनिपळतीअसुर । हनुमंतह्मणेउभेस्थीर । मजसोडवातुह्मीसमग्र । ह्मणोनिभेटेत
यांतें २ शतांचींशतेंतेक्षणीं । योमिनीचरआणीबांधोनी । रावणापासींनेउनी । ह्मणेकांहेपळताती ३ असोसीतेसराक्षसीसांगत । तुझावानरमेलागेय
थार्थ । ऐकतांजानकीशोककरीत । ह्मणेविपरीतकेवींघडे ४ मशकेंसागरशोषिला । जंबुकानींसिंहकेवीधरिला । खद्योतानींसूर्यपाडिला । खालींकैसाआ
सडोनी ५ वज्रभंगलेंतात्काळ । पतंगेंग्रासिलावडवानळ । भोगेंद्राचेंफणीमंडळ । वटबीजभारेंदडपलें ६ मक्षिकेच्यापक्षवातेंकरूनी । प्रळयमेघगेला
विदारुनी । पिंपीलिकाभारेंदडपोनी । कनकाद्रीकैसापडेल ७ पुष्पप्रहाराचेवृष्टीं । केवींदणाणेलकूर्मपृष्ठी । चित्रींचालेपउठाउठी । प्रळयचंपळाग्रासी
लकाय ८ असोरुद्रावतारहनुमंत । तोराक्षसींजाळिलाअग्नींत । कैसीघडेलहीमात । विचारितराघवप्रिया ९ जठराग्नीससीतापुसत । तोह्मणेक्षेम
आहेहनुमंत । नगरमीजाळीनमस्त । बंधुसाह्याकारणें १० असोइकडेसमस्तअसुर । हनुमंतावरीकरितीशस्त्रमार । तोंपुच्छाग्नीधडकलासमग्र । पळ
तीअसुरचहूंकडे ११ नानाशस्त्रेंबाणशक्ती । दुरोनिकपींद्रावरीटाकिती । मगमीसघेऊनमारुती । गतप्राणपडियेला १२ मूर्छितपडतांचि
वानर । जवळीयेतीमगअसुर । जोतोह्मणेम्यांघायथोर । वर्मपाहूनदीधला १३ ह्मणोनिमेलाहावानर । जोतोह्मणेहाप्रचंडवीर । सांगतीरावणासी
बडिवार । सुखेंनिद्राकरीआतां १४ मेलियासारिखेंमीसघेउनी । दोनघटिकापडिलामेदिनीं । राक्षसबहुतमिळोनी । सभोंवतेविलोकिती १५ फेंस
वाहतसेवदनीं । वैद्यनाडीपाहतीविलोकूनी । ह्मणतीकेवढापुरुषार्थकरूनी । वानरशेवटींनिमाला १६ ऐसेंसमस्तजोंपाहत । तोंहनुमंतउडालाअक
स्मात । पुच्छेंबांधलेसमस्त । राक्षसजळतधडधडां १७ कितेकपळालेअसुर । एकलाउरलादशकंधर । त्यासीह्मणेरक्षणार । तुजकोणअसेआतां १८
मगइंद्रजितेंपाशघालून । बांधिलातेव्हांवायुनंदन । नगरामाजीनेऊन । हिंडविलेंहनुमंता १९ जैसेंपुटींपडतांसुवर्ण । तेंजेवीदिसेदेदीप्यमान ।
त्यापरीसीताशोकहरण । अग्निसंगेंशुद्धदिसे २० आळोआळीफिरवित । हनुमंतसहजपाळतीवेत । निंदकांचींतोंडेंलासित । लोकपळतीबिदोबिदीं
२१ जाहलाएकचिहाहाःकार । स्त्रियाह्मणतीभलत्यासीभ्रतार । मजयेथूनकाढीबाहेर । लावीलवानरअग्नीआतां २२ हनुमंतह्मणेसमस्तअसुरां ।
ह्मणेमजतुह्मीदृढधरा ; सर्षपप्रायहोऊनिसत्वरा । निघोनिगेलाक्षणमात्रें २३ हनुमंतगदगदांहांसत । राक्षसांसीवांकुल्यादावित । लंकेसीअग्निला

---

१ राक्षस. २ कोल्ह्यानीं. ३ काजवे. ४ शेष. ५ मुंग्याच्या. ६ मेरुपर्वत. ७ वीज ८ सीता. ९ पृथ्वी. १० मुखांतून. ११ रावण. १२ मारुती. १३ मोहरी.

वित । सुटलाअद्भुतप्रभंजन २४ माडयागोपुरेंधवळारें । राणीवसाचींसुंदरमंदिरें । सकळरम्यमहाद्वारें । एकसरेंधडकलीं २५ कपीनेंमांडिलेंलंका
दहन । त्यासीसाह्यजाहलापवन । नग्नहोऊनिनगरजन । सदनेंसोडूनपळाले २६ थोरविषयसंसारींधन । त्याहूनआगळेंअपत्यपूर्ण । त्याहूनदा
राविशेषजाण । त्याहूनआस्थाप्राणाची २७ त्याहूनविशेषनिजप्राणत्याग । इंद्रियांवरीउदारमग । देहममताधरीनिःसंग । विषयभोगसांडिलिया
२८ त्यासिनसेमोहममता । मगइतरजनाचीकायकथा । कोणीकोणाचीनधरीआस्था । पळतीजीवघेऊनियां २९ पुरुषाहूनमोहेअत्यंतनारी। उडीघा
लीजळतेघरीं । बळेंवोढूनकाढितांबाहेरी । जीवित्वावरीउदासत्या ३० असंभाव्यदाटल्याज्वाळा । ग्रासूंइच्छितीनभमंडळा । कींकल्पांतरुद्रक्षोभला।
रावणावरीतेकाळीं ३१ धूम्राचीदशदिशादाटी । कोणीकोणासनदिसेदृष्टी । वंशनळेनभाच्यापोटीं । असंख्यातउडतीहो ३२ आतांअसोहीबहुतबो
ली । तृतीयभागलंकाजाळिली । परीसुवर्णमयझाली । श्रीरामभक्तप्रतापें ३३ लोहघणेंपरिसताडिला । परितोअवघाचिसुवर्णझाला। तेवीलंकानग
रतेवेळां। हेममयओतिलें ३४ हनुमंतलंकादहनकेलियावरी। निजमानसींविचारकरी। श्रीरामदर्शनासीझडकरी। जावेंआतांत्वरेनें ३५ मगउडालावा
युकुमर । समुद्रतीराआलाबळसागर । पुच्छविझवितांनदेश्वर । काकुळतीबहुआला ३६ जळचरेंउकडोनिमरती । तूंकडेसबैसेंगामारुती । यावरी
अवंनिजापती । दासतीरींबैसला ३७ सरितापतीनेंनिजबळें । निजलाटेनेंपुच्छविझविलें । कींयाज्ञिकेंअग्नीसआच्छादिलें ।कुंडामाजीस्वकरेंसी ३८
कपाळींचास्वेदेंपुसोनीटांकिला । तोपुढेंमकरध्वजजन्मला । असोकपीमागेंपाहूंलागला । तोंलंकाभडभडांजळतसे ३९ असंभाव्यचेतलाअग्न । जन
कजाजाईलभस्महोउन । कार्यनासेलह्मणून ।वायुनंदनशोककरी ४० मगह्मणेकरितांनामस्मरण । मजनबाधीकदाअग्न । माझेजगन्मातेसीविघ्न । के
वीकृशानकरूंशके ४१ स्मरतांरघुवीरनामनिर्मळ । शिवकंठींचेंहाळाहळ। शीतळझालेंतत्काळ । नामामृतेंकरूनियां ४२ तोंवायुदेवसांगेतेवेळां ।
सुखीआहेजनकबाळा । जेंत्रिभुवनपतीचीचित्कळा । ब्रह्मांडमाळाघडमोडी ४३ यावरीलोकप्राणेशनंदन । ह्मणेक्षुधितझालेनयन । मित्रकुळभूषणा
चेचरण। पाहावयालागींउदित ४४ तोमंगळभगिनीजीवन । मजपुसेलवर्तमान । तरीकीर्तीस्वमुखेंकरून । वर्णितांदूषणलागेल ४५ यशधर्मविद्या
पुरुषार्थ । बळपराक्रमआणितीर्थ । हेंस्वमुखेंजोवर्णित । तरीहानीसत्यशास्त्रह्मणे ४६ मगगुप्तरूपेंवायुनंदन। घेतपरमेष्ठीचेंदर्शन। ह्मणेमीअयोध्या
पतीचेचरण । पाहावयाजातसें ४७ तरींयेथेंवर्त्तलाजोवृत्तांत । तोपत्रींलिहावासाद्यंत । ऐकतांविष्णुनाभसुत । ब्रह्मानंदेंउचंबळला ४८ ह्मणेधन्य

१ बळसमुद्र. २ समुद्र. ३ सीतापति राम. ४ नद्या. ५ घाम, ६ अग्नी. ७ आदिमाया. ८ मारुति. ९ रामाचे. १० मंगळाची बहिण सीता तिचापति राम.

हनुमंतसज्ञान । मजहीतुवांकेलेंपावन । मगतत्काळपत्रलिहून । हनुमंतापासींदीधलें ४९ ब्रम्ह्याचीआज्ञाघेउनी । प्रवेशलाअशोकवनीं । साष्टां
गेंसीजनकनंदिनी । सद्गदहोवोनिनमियेली ५० मगबोलेजनकबाळा । आतांकधींयेशीवेल्हाळा । विमलांबुधारातेवेळां । नेत्रींआल्याजानकीचे ५१
जोदशरथाचामहापुण्यमेरू । जोब्रह्मांडनायकजगद्गुरू । जोभक्तमंदिरांगणसुरतरू । तयाचेदर्शनाजातोंआतां ५२ हनुमंतह्मणेजगन्माते ।राघववल्ल
भेगुणसरिते । कमळप्रियेकमळोद्भूते । चिंतानकरिजसर्वथा ५३ मातेउदईकजाणदोनप्रहरां । राघवआणितोंसमुद्रतीरा । तोराक्षसांसहदैत्येंद्रा । वधून
तुजसोडवील ५४ मजकांहींखूणद्यावीयथार्थ । जेणेंधन्यह्मणेरघुनाथ । मगवेणीचामणीदेदीप्यवंत । मारुतीचेहातींदीधला ५५ मागुतीअंजनीहृदयरत्न । ह्म
णेकांहींअंतरखुण । तोताटिकांतकमखंपाळण । जेणेंकरूनसंतोषे ५६ जानकीह्मणेचित्रकूटपर्वतीं । जैंआह्मींकाळक्रमिलामारुती । सुमित्रात्मंजवना
प्रती । गेलाहोताएकदां ५७ एकांतींचेअवसरीं । रघुपतीच्याअंकावरी । शिरठेऊनिनिर्धारीं । हनुमंतामीनिजल्येंपैं ५८ प्रीतीकरूनतमाळनी
ळ । परमसुवासजोमलयानीळ । तोगाळूनस्वकरेंतात्काळ । टिळकरेखिलाभाळींमाझे ५९ हीगोष्टीजाणेरघुनंदन । मारुतीसांगहेअंतरखुण । ऐसें
ऐकतांवायुनंदन । परमसंतोषपावला ६० जानकीह्मणेसमुद्रजळ । शतयोजनेंभरलेंतुंबळ । असंख्यातवानरदळ । कैसेंयेईलऐलतीरा ६१ येरूह्म
णेराघवशरीं । सेतुबांधीलसमुद्रावरी । अथवामाझियापुच्छदोरीं । सेतूबांधीलअभंग ६२ नातरीराघवबाणवडवानळ । शोषूनटांकीलसमुद्रजळ ।
अथवाउड्डाणकरूनसकळ । सुवेळेसीपैंयेऊं ६३ जेणेंस्तंभाविणेंधरिलेंनभ । जीवनावरीपृथ्वीठेवीस्वयंभ । तोजानकीतुझावल्लभ । कायएककरूंनश
के ६४ जननींचेजठरकुहरीं । प्राणीअसेनवमासवरी । तेथेंरक्षीनानापरी । तोकायएककरूंनशके ६५ बाहेरउपजतांचअवधारा । मातेचेस्तनीं
दुग्धधारा । लावितोपरात्परसोयरा । कायएककरूंनशके ६६ क्षणेंहेंब्रह्मांडदावी । सवेंचमागुतेंलपवी । तोरामत्रिभुवनगोसावी । कायएककरूंनशके
६७ जैसागगनींएकचिमित्र । परीप्रकाशकरीसर्वत्र । तैसाजगद्व्यापकरघुवीर । कायएककरूंनशके ६८ वपुनवच्छिद्रभग्न । परीमर्यादेवेगळानजायप्रा
ण । तोअयोध्यानाथजगन्मोहन । कायएककरूंनशके ६९ गोष्टीअसोतबहुआतां । वेदशिणलेकीर्तीगातां । उदईकदोंप्रहरांरघुनाथा । समुद्रतीराआणितों
७० तुजमीआतांनेतोंमाते । परिशुद्धीसांगीतलीरघुनाथें । पुढीलभविष्याचींमतें । ठाउकअसतीतुजलागीं ७१ असोसीतेचीआज्ञाघेऊन । साष्टांगेंनमी
वायुनंदन । यशस्वीरघुनाथह्मणोन । गगनपंथेंउडाला ७२ सकळदेवह्मणतीहनुमंता । त्वरितगतीआणावारघुनाथा । तूंचआमचाप्राणदाता । सोडवीयेथू

१ मारुति. २ विश्वामित्राचा यज्ञ रक्षण करणारा श्रीराम. ३ लक्ष्मण. ४ आईचे. ५ आकाशीं. ६ सूर्य. ७ वायुपुत्र मारुति.

नआह्मांसी ७३ हनुमंतह्मणेदेवांसी । नकाचिंताकरूंमानसीं । उदईकरामसमुद्रतीरासी । निर्धारेसींआणितों ७४ यावरीलंकागिरिशिखरीं । उभा
राहिलावानरकेसरी । भुभुःक्कारऐलतीरीं । सकळवानरींऐकिला ७५ लंकागिरीहूनिउडाला । योजनेंद्वयपाठारदडपिला । उड्डाणासरसासमुद्रभ्या
ला । मारुतीआलाऐलतीरा ७६ निशांतींउगवेचंडकिरण । कींवैकुंठींहूनउतरेसुपर्ण । कींमानससरोवरलक्षून । राजहंसउतरला ७७ महेंद्रप
र्वतावरीहनुमंत । उभाठाकलाअकस्मात । जांबुवंतादिवानरसमस्त । भेटावयाधांवती ७८ थोरथोरवानरभेटती । एकजघनासीआलिंगिती । एकजानु
जंघाआवळती । एकलागतीपायांतें १७९ एकपुच्छासीदेतीआलिंगन । एकपुच्छासीदेतीचुंबन । एकमानघुलकाउन । वांकुल्यादावितीउर्ध्वपंथें ८०
एककरताळियावाजवूननिवाडें । गायनकरितीमारुतीपुढें । एकचक्राकारउडे । वर्णितीपवाडेश्रीरामाचे ८१ एकदेतीभुभुःक्कार । एकसाष्टांगघालिती
नमस्कार । एकह्मणतीजेथेंश्रीरामचंद्र । तेथेंसत्वरजाऊंचला ८२ पुष्पेंआणूनितेअवसरीं । हनुमंतपूजिलावानरीं । जैसासकळसुरवरीं । अन्नपूर्णावरपूजि
येला ८३ मारुतीचेआंगावरीलमळ । देखोनिकपीपुसतीसकळ । लंकेंतप्रतापकेलासमूळ । सांगआह्मांहनुमंता ८४ परिकदांनसांगेमारुती ।
ब्रह्मलिखितदेतहातीं । परितेंवानरनउकलिती । विरिंचीमुद्रांकितजें ८५ मगह्मणतीवानर । कळेलकिष्किंधेसीसमाचार । मध्येंउकलोनिपाहतांपत्र ।
चतुरसर्वहांसती ८६[1] असोमारुतीसहवानरगण । किष्किंधेसीआलेनलगतांक्षण । सुग्रीवाचेंमधुवन । मोडिलेंतेव्हांक्षणमात्रें ८७ सुग्रीवासिसां
गतीवानरगण । वानरांसहआलावायुनंदन । तुझेंआवडतेंक्रीडास्थान । तेंमधुवनमोडिलें ८८ ऐकतांतारापतीसीतापती । ह्मणतीविजयीझालामारुती ।
जयजयकारपरमकरिती । आनंदेंकरूनवानर ८९ असोमधुवनीहूनअंजनीसुत । वानरांसहउडालाअकस्मात । पंपासरोवरींअसेरघुनाथ । आलातेथें
स्वानंदें १९० सपक्षउतरलापर्वत । कींभूमीवरीआलाआदित्य । कींमायाचक्रनिरसोनिसमस्त । योगीपावेस्वस्वरूपीं ९१ लंकेमाजीविजयीजाहला ।
ह्मणूनदक्षिणबाहूउभारिला । रघुनाथेंहनुमंतदेखिला । प्रसन्नवदनतेकाळीं १९२ साधकसाधूनिमहानिधान । दिसेतैसासुप्रसन्न । कींसुधारसहरलिया
सुपर्ण । विराजमानपरतेजैसा १९३ कींसंजीवनीअद्भुत । साधूनआलागुरुसुत । सहस्राक्षजैसाआनंदत । सीतानाथतोषेतैसा १९४ अयोध्या
पतीकिष्किंधापती । आसनेंसोडूनपुढेंधांवती । तोंलोटांगणघालीमारुती । ब्रह्मानंदेंकरूनियां ९५ परमस्नेहाळूरघुनंदन । मारुतीचेहस्तधरून । दे
ताझालाआलिंगन । भरलेंगगनआनंदें ९६ प्राणसखाहनुमंत । ह्रदयींधरीरघुनाथ । पुढतीसोडावाहाहेत । मनामाजीउपजेना ९७ असोहनुमंता

१ वानरश्रेष्ठ मारुति. २ आठकोश. ३ सूर्य. ४ गरुड. ५ बृहस्पतीचा पुत्र कच. ६ इंद्र. ७ आकाश.

सीक्षेंमदेउनी । सकळकपीसीभेटेचापंपाणी । जांबुवंतअंगदप्रीतीकरूनी । हृदयींधरिलेरघूत्तमें १८ सुग्रीवधांवोनिप्रीतीं । हृदयींधरिलामारुती । इंद्रासिभेटलाबृहस्पती । आलिंगनशोभलेंतैसें २१९ मगराजाधिराजसमर्थ । सभाकरूनिबैसलारघुनाथ । तेव्हांमणीआणिब्रह्मलिखित । पुढेंठेवित हनुमंतपैं २०० मगआनंदेंसकळवर्तमान । दंडीऋषीच्यापुत्रापासून । पुढेंसुप्रभेचेंउद्धरण । तेंहीकथिलेंतेधवां १ पुढेंसमुद्रतीरपर्यंत । अंगदें कथिलेंसमस्त । शुद्धीनव्हेह्मणोनिअद्भुत । अग्निचेतविलावानरीं २ प्राणदेतांसकळवानरीं । हनुमंतेंरक्षिलेतेअवसरीं । मगसंपातीभेटलासमुद्रतीरीं । तेणेंशुद्धीसांगीतली ३ यापरीवायुकुमर । शतयोजनेंउडालासागर । पुढेंलंकेंतझालासमाचार । तोहनुमंतनसांगेची ४ मगरामेंहनुमंताकडेपाहिलें । तंवयेरूह्मणेजेंवर्तमानझालें । विरंचीनेंअसेपत्रलिहिलें । निजहस्तेंकरूनियां ५ जगद्वंद्याअयोध्यापती । सुखरूपअसेसीतासती । मणीखूणादिधलीमाझेहातीं । परमसद्गदहोऊनियां ६ अंतरखूणसांगीतली । मनशीळलाविलाआपणभाळीं । रघूतमेंऐकतांहृदयकमळीं । तयेकाळींगहिंवरला ७ मणीधरूनरघुनाथ । अत्यंतझालाशोकाकुलित । आहासीतासीताह्मणत । देखतांअर्कजगहिंवरला ८ हनुमंतह्मणेरघुराजा । सुखीआहेजनकात्मजा । परितुझियावियोगेंभरताग्रजा । अत्यंतकृशजाहलीअसे ९ म्यांमुद्रिकादिधलीनेऊन । तेमनगटींखेळेजैसेंकंकण । मगह्मणेरघुनंदन । केवीप्राणउरलाअसे १० रघुपतीचेंनामामृत । तेणेंजानकीवांचलीसत्य । जैसाशशांकराहुग्रस्त । चिंतेनेंतैसीझांकली ११ मगबोलेतमालनीळ । कैसातरलासीसमुद्रजल । त्यावरीअंजनीचाबाळ । कायबोलताजाहला १२ तुझियेमुद्रिकेचेंअद्भुतबळ । क्षणेंजिंकेलकळिकाळ । नखाग्रींसमुद्रजल । सांठविजेलसर्वही १३ मगविरंचीचेंपत्र । सौमित्राजवळीदेतराजीवनेत्र । वाचिताझालाभोगींद्र । सावधानवानरऐकती १४ स्थीरराहिलासमीर । ऐकावयाविरंचीचेंपत्र । सौमित्रेंउकलिलेंसाचार । जेवीचंद्रपौर्णिमेचा १५ जोसरस्वतीचाजनिता । त्याचियाअक्षराचीकौशल्यता । कोणासीनवर्णवेतत्वता । तेंश्रोतींआतांपरिसावें १६ परब्रह्मकेवळरघुवीर । त्यासब्रह्मदेवेंलिहिलेंपत्र । तेंब्रह्मानंदकृपश्रोघर । अतिपवित्रबर्णिलेंपैं १७ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमत वाल्मीकिनाटकाधार । सदांपरिसोतभक्तचतुर । एकविंशतितमोध्यायगोडहा । १८ । ओव्या । २१८ । अध्याय । २१ । शुभंभवतु ॥ ॥छ॥ ॥छ॥

---

१ आलिंगन. २ धनुर्धारी रामचंद्र. ३ जटायूचा बंधु. ४ चारशें कोस. ५ ब्रह्मदेवानें. ६ सुग्रीव.


अध्याय २२वा
वानरसेना.
मारुती
लक्ष्मण
पत्र
श्रीराम
वानर

श्रीगणेशायनमः ।   । श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । उकलोनिकमलोद्भवाचेंपत्र । वाचिताझालासौमित्र । सावधऐकेराजीवनेत्र । सूर्यपुत्रादिकपीसर्व
हीं १ अनंतकोटीब्रह्मांडनायका । हेदयार्णवाविश्वपाळका । वैकुंठपतीसुखदायका । प्राणप्रियाश्रीरामा २ हेरामासकळबंधछेदका । हेरामासज्जनप्रति
पाळका । रजनीचरदुष्टसंहारका । जानकीनायकाजगद्गुरू ३ श्रीरामाजगदंकुरमूळकंदा । साधुहृदयारविंदमिलिंदा । निजजनचातकजलदा । ब्रह्मानंदाप
रात्परा ४ संसारगजविदारकमृगेंद्रा । दुःखपर्वतभंजनवज्रधरा । निजभक्तरक्षकासुधाकरा । अतिउदारासीताधवा ५ त्रिभुवनजनकादुःखहरणा । जनक
जामातजगपाळणा । जनकजापतिजलजनयना । जलदवर्णाजगत्पती ६ जयरामवेदोद्धारका । कमठरूपासृष्टिपाळका । नमोसकळदैत्यांतका । वराहवेषा
दीनबंधू ७ नमोहिरण्यकशिपुमर्दना । नमोत्रिविक्रमबलिबंधना । नमोब्राह्मणकुळपालना । भार्गवकुळदिवाकरा ८ नमोपौलस्तिकुळवनदहना । मी
नँकेतनारीहृदयजीवना । नमोचतुर्दशलोकपालना । मखरक्षणारघुवीरा ९ जयजयविश्वपालना । विश्वव्यापकाविश्वकारणा । विश्वमतिचाळकाविश्व
जीवना । विश्वरक्षणाविश्वेशा १० नमोमायाचक्रचाळका । नमोअज्ञानतिमिरांतका । नमोवेदरूपावेदपाळका । वेदस्थापकावेदवंद्या ११ नमोकम
लनाभाकमलजीवना । नमोपापारण्यकुठारतीक्ष्णा । नमोत्रिविधदाहतापशमना । अनंतशयनाअनंता १२ नमोदशावतारचरित्रचाळका । नमो
अनंतब्रह्मांडनायका । नमोअनंतवेषकारका । ताटिकांतकापापहरणा १३ नमोजननमरणरोगवैद्या । सच्चिदानंदासर्ववेद्या । मायातीताजगद्वंद्या ।
भेदाभेदातीततूं १४ नमोसर्गस्थित्यंतकारका । नमोकैवल्यपददायका । अजअजितसर्वात्मका । करुणालयासुखाब्धी १५ जयजयषड्विकाररहिता
नमोषड्गुणअलंकृता । अरिषड्वर्गप्रतापवंता । शब्दातीतानिरंजना १६ तूंनिर्विकारनिरंजन । आह्मांलागींझालासिसगुण । बंदीचेसोडवावेसुरगण ।
पिशिताशनवधोनियां १७ पितृआज्ञेचेंकरूनिव्याज । काननाआलासिरघुराज । पंचवटीसराहूनसहज । बहुतराक्षसवधियेले १८ दशमुखेंकेलेंसी
ताहरण । त्याचेंकरावयाशोषण । ह्मणोनिकिष्किंधेसिआगमन । जाहालेंतुझेंश्रीरामचंद्रा १९ शुद्धीलागींरुद्रावतार । अंजनीहृदयारविंदभ्रमर । तो
ब्रह्मांडासीदेणारधीर । तरलासागरनिमिषार्धें २० अगाधमारुतीचेंउड्डाण । बहुतींवाटेसकेलेंविघ्न । परितोअनिवारकिराण । कोणासीहीनाटोपे २१
पडलंकेसीयेऊनहनुमंत । राक्षससंहारिलेबहुत । प्रवेशलाक्रौंचेच्यामुखांत । दंतांसिदंतमेळवीते २२ उदरफोडोनिआलाबाहेर । मगशोधिलेंनिकुंबलन
गर । सुलोचनादेखोनिसुंदर । ह्मणेहेचहोईजानकी २३ तिजवरीघालावयापाषाण । सिद्धझालावायुनंदन । मगतिचेशब्दपरिसतांपूर्ण । सीतानव्हेक

१ ब्रह्मदेव. २ लक्ष्मण. ३ रामचंद्र. ४ सुग्रीवादिक. ५ राक्षस. ६ भक्तरूप चातकांस मेघ. ७ मदनाचा शत्रु शंकर त्याचें हृदयजीवन. ८ यश, श्री, कीर्ति, विज्ञान, औदार्य, वैराग्य.

ळलेंहें २४ मगअणुप्रमाणहोऊन । प्रवेशलालंकाभुवन । विटंबिलेसकलजन । करूननग्नबिदीसी २५ पत्रऐकतांजनकजापती । ह्मणेधन्यधन्य
वीरमारुती । अद्भुतकर्तव्यअगाधकीर्ती । त्रिजगतींऐसानाहीं २६ ऐकोनियांविनोदरीती । वानरगदगदांहांसती । एकावरीएकपडती । मुरकुंड्या
वळतीऐकोनियां । २७ नानावस्तुउत्तमआणून । वानरटांकितीओवाळून । एकसप्रेमेंहृदयींधरून । ह्मणतीधन्यबलाढ्यतूं २८ पत्रवाचितांउन्मिळा
जीवन । क्षणक्षणाकरीहास्यवदन । मागुतीतटस्थझालेहरिगण । पत्रपुढेंपरिसती २९ शोधिलेंबिभीषणाचेंघर । कीर्तनऐकोनिझालानिर्भर । मगकुं
भकर्णाचेंमंदिर । देखोनियांकंटाळला ३० रावणस्त्रियाऐशींसहस्र । तितुक्याशोधूनिवायुकुंमर । राक्षससभाविटंबिलीसमग्र । तेंअगाधचरित्रनवर्णवे
३१ रावणशेजेमंदोदरी । ह्मणेहीचहोईलसीतासुंदरी । तंवतेझालीघाबिरी । दुष्टस्वप्नदेखोनियां ३२ दशकंठासीसांगेवर्त्तमान । विषँकंठप्रियरघु
नंदन । त्याचीसीताद्याहोसोडून । परीरावणनमानीतें ३३ सीतापाहावयापाठविलीदूती । तिच्यामागेंगेलामारुती । तोंअशोकवृक्षातळींसीतासती । दे
खोनियांकपिनमितसे ३४ पुढेंमुद्रिकाठेऊन । वृक्षावरीबैसलाजाऊन । अपारराक्षसीझोडून । पाडिल्यातेथेंपराक्रमें ३५ मुद्रिकादेखोनिसीतास
ती । शोकसमुद्रींकरीवस्ती । मगपुढेंयेऊनमारुती । प्रत्यक्षभेटलातेधवां ३६ सांगीतलेंसकळवर्तमान । मगक्षुधेचेंमिषकरून । विध्वंसिलेंअशोकवन ।
जेंविस्तीर्णयोजनत्रयोदश ३७ रावणेंपाठविलादळभार । त्याचातत्क्षणीकेलासंहार । मारूनिरावणाचापुत्र । शक्रजितविटंबिला ३८ मगमीहनु
मंतासीप्रार्थून । ब्रह्मपाशींनेलाबांधोन । रावणासीशब्दशस्त्रेंकरून । सभेसीनिर्भर्त्सिलेंहनुमंतें ३९ मारुतीसमाराबयासत्वर । पुच्छासीलाविलावैश्वान
र । स्नेहेंसहितवस्त्रेंअपार । गुंडाळोनिसाक्षेपें ४० पुच्छपेटवितांसत्वर । उडोनिगेलाबायुपुत्र । तृतीयभागलंकानगर । जाळिलेंक्षणनलागतां ४१
परीनवलवर्तलेंअद्भुत । लंकासुवर्णमयझालीसमस्त । धन्यतोलोकप्राणेशसुत । थोरसामर्थ्यदाविलें ४२ मगसागरींपुच्छबिझवून । पुन्हांघेतलेंजानकी
चेंदर्शन । जैसेंबाळखेळतांश्रमून । जननीपासींयेतपैं ४३ ऐसेंपत्रवाचितांचिसौमित्र । ऐकतांघनश्यामगात्र । रामेंधांवूनबायुपुत्र । हृदयींधरिलासप्रेमें
४४ धन्यधन्यतेअंजनी । ऐसेंरत्नानिपजलेंषड्गुणी । मारुतीचेंमुखकुर्वाळोनी । निजासनींरामबैसे ४५ किष्किंधेहूनिरत्नेंआणूनी । ओंवाळिलींमारु
तीवरूनी । ह्मणेधन्यमारुतात्मजअवनीं । ब्रह्मांडभरलेंकीर्तीनें ४६ धन्यधन्यतोदिवस । स्वामीस्वमुखेंगौरवीविशेष । तुच्छत्यापुढेंसुधारस । स्वर्ग
भोगादिसर्वही ४७ असोयावरीचापपाणी । हृदयींधरीदिव्यमणी । श्रीरामासिवाटलेंतेक्षणीं । कींजनकजाआणिलीहनुमंतें ४८ ह्मणेधन्यमारुतीस्ने

१ लक्ष्मण. २ वानरसमुदाय. ३ मारुति. ४ शंकर. ५ निमित्त. ६ तेरा योजनें ह्मणजे बावन्न कोस. ७ अग्नि. ८ तेल. ९ लक्ष्मण. १० मेघासारखा शामवर्ण राम. ११ पृथ्वी १२ अमृत.

ह्याळा । मजभेटविलीजनकबाळा । तुझाप्रतापउजळला । निराळमंडपींअवघाची ४९ एवढासागरउल्लंघुनी । जानकीआलासीघेउनी । तुवांउपकारऋ
णेकरूनी । मजबांधिलेंहनुमंता ५० हनुमंतविचारीमनीं । म्यांखूणआणिलीसीतेचामणी । यालागींकोदंडपाणी । आनंदलाअत्यंत ५१ मजथो
रचूकपडलीतेथें । जरीसीताचआणितोंयेथें । तरीआनंदेंश्रावणारिसुतें । भरलेंअसतेंब्रह्मांड ५२ मगमनींविचारीसीताशोकहरण । आतांकायमाझें
बळक्षीण । नलोटतांयामिनीअर्धपूर्ण । घेऊनयेईनपद्माक्षी ५३ मगह्मणेगारघुनाथा । क्षणेकधीरधरींआतां । घेऊनयेतोंजनकदुहिता । सकळराक्षसांनि
वटोनियां ५४ हनुमंतकरीउड्डाण । सावधजाहलासीतारमण । ह्मणेहनुमंतानकरीगमन । आहेकारणपुढेंबहू ५५ आवेशेंनिघालामारुती । नाटो
पेचतोकवणाप्रती । मगस्वयेंधांऊनिरघुपती । आवरीतहनुमंता ५६ उचलोनियांरघुनाथ । निजस्कंधींवाहेहनुमंत । ह्मणेलंकेसीनेतोंत्वरित । रावणा
सीवधावया ५७ तोंउन्मिळापतिआणिअर्कसुत । धांविन्नलेअंगदजांबुवंत । चौघेहनुमंतासीआवरीत । परितोसर्वथानाटोपे ५८ चौघांसहीतउच
लून । उडोंपाहेसीताशोकहरण । ह्मणेइतकेचलंकेसीजाउन । असुरमर्दूनयेऊंआतां ५९ वरकडन्यावेजरीवानर । तरितेकैसेतरतीलसागर । या
लागींनिवडथोरथोर । पांचजणनेऊंहे ६० पांचजणासीउचलून । स्कंधींवाहेवायुनंदन । कींतोपंचशृंगांचापूर्ण । नगोत्तमाचिशोभला ६१ कींपंच
फळेंलागलींवृक्षासी । तींजडकदांनहोतीतयासी । कींउदयाद्रीवरीतेजोराशी । पंचसूर्यउगवले ६२ असोघेऊनपांचजण । हनुमंतकरूंपाहेगमन ।
यावरीमंगळभगिनीचारमण । हनुमंतासीविनवीतसे ६३ मारुतीऐकेप्राणसखया । विचाराविणेंभलतीक्रिया । नकरावीहेश्रेष्ठवर्या । असेनीतिपू
र्वीची ६४ ऐसेंविनवितांरघुनंदन । मगउतरलेपांचहीजण । जनकजापतीचेचरण । सप्रेमधरिलेमारुतीनें ६५ सुग्रीवजांबुवंतनळनीळ । वर्णितीअ
निळात्मजाचेंबळ । यावरीतोतमाळनीळ । सभाकरूनीबैसला ६६ श्रीरामपुसेमारुतीप्रती । कैसीअसेलंकेचीगती । राक्षसवर्ततीकोणेरितीं । कायआ
चरतीपुण्यकर्म ६७ यावरीचातुर्यरत्नाकार । बोलेलोकप्राणेशकुमर । जैसाशक्रआणिअंगिराकुमर । करितीविचारएकांती ६८ तीनशेंगांवअसेलं
का । रेखोनिदाविलीरघुनायका । सकळमदनांचीसंख्या । ठायींठायींदाखविली ६९ जेकांमर्गजपाषण । त्यांचींपंचलक्षगृहेंजाण । आणिसातल
क्षदैदीप्यमान । विटेबंदीमंदिरें ७० ताम्रआणिकांसेनिखिळ । पंचकोटिसदनेंनिर्मळ । सुवर्णाचींअत्यंतसबळ । सातकोटिराघवेंद्रा ७१ हेमर
त्नींअळंकृत । नवकोटीशिवालयतेथ । रुद्राभिषेकनैवेद्यबहुत । त्रिकाळचालवितीराक्षस ७२ असुरांच्यागृहींपूर्ण । अग्निहोत्रवेदाध्ययन । रुद्राक्षमा

१ आकाश. २ कोदंड ह्मणजे धनुष्य तें हातांत धारण करितो ह्मणून रामास कोदंडपाणी असें ह्मणतात. ३ श्रावणाचा शत्रू दशरथ त्याचा पुत्र राम. ४ रात्र. ५ कन्या. ६ कर्म. ७ मारुती.

ळाभूषण । विभूतीचर्चनकरितीपैं ७३ मुख्यरावणसुबुद्धीपूर्ण । टांकिलींवेदांचींखंडेंकरून । तपआचरतीदारुण । ठायींठायींराक्षस ७४ ऐसेंबो
लतांवायुनंदन । रघुनाथझालाउद्विग्न । ऐसीलंकापुण्यपरायण । तेमजसर्वथानाटोपे ७५ ऐसेंजेथेंसत्कर्माचरण । तेथेंनांदेयशकीर्तिकल्याण । तरि
तेंनयेलंकाभुवन । बहुयत्नकरितांही ७६ तेंव्हांक्षणएकरघुनाथ । उगाचनबोलेचिंताक्रांत । भोंवतेवानरतटस्थ । पाहूंलागलेतेकाळीं ७७ मग
श्रीरामह्मणेमारुती । तुवांसांगीतलीराक्षसांचीस्थिती । परीदयाक्षमाउपरती । शांतीविरक्तीमुख्यज्या ७८ शौचआणिधर्मदान । असुरकरितीकींअ
नुदिन । यावरीसीतासंतापहरण । कायवचनबोलिला ७९ क्षमादयाशुद्धअंतर । शौचदानपवित्र । हेंलंकेमाजीअणुमात्र । सर्वथाहीनसेची
८० परमअधर्मीनिर्दयअसुर । कापटयाचारतपेंक्रूर । अत्यंतखळदुराचार । मद्यप्राशकउन्मत्तते ८१ मारुतीचेंवचनऐकुनी । हास्यमुखहोयचा
पपाणी । तरीलंकाचेईनयेक्षणीं । पापखाणीवसतीत ८२ अंतरींक्षमादयानाहीं । मगव्रतेंतपेंजाळिसीकाई । तोजरीपढिलाशास्त्रेंसाही । व्यर्थकायतेव
टवट ८३ नटामाजीलकामिन । कींकोलाटियाचेंशूरत्वपूर्ण । कींभ्रष्टाचेंतत्वज्ञान । कींशांतीपूर्णमैंदाची ८४ कींविधवेचेंनवयौवन । कींग्रामथिल्ल
रीचेंजीवन । कींअनामिकाचेंरम्यसदन । कींमुखमंडणवेश्येचें ८५ कींगभांधाचेंविशाळनयन । कींबधिराचेशोभामात्रकर्ण । कींअजाकंठीचेस्तन ।
कींआचरणजाराचें ८६ कींसावचोराचेगोडबोल । कींवाटपाडियाचीशांतीखोल । कींपाशपारधीनिर्मळ । निरंजनीबैसले ८७ कींदाटलागलेंकंटक
वन । कींदांभिकाचेंव्यर्थभजन । तैसेंभूतदयेवांचून । ज्ञानसर्वव्यर्थची ८८ त्याचाएकांतव्यर्थदेख । जैसेबिळींबैसलेमूषक । शांतीधरूनबैसलाबक । ज
पतमत्स्यधरावया ८९ भस्मआंगींचर्चितसाचार । जैसाउकरडांलोळेखर । कींअरण्यांतवसतीनिरंतर । वृकव्याघ्रजैसेकां ९० तेणेंतीर्थींकेलावा
स । तरीकायथोडेआहेतवायंस । कींतीर्थजळींमंडूकविशेष । वटवटतीविशेषें ९१ तेणेंपाहिल्याचौसष्टीकळा । तितुक्याहीजाणव्यर्थसकळा । दयाक्ष
मेचानसतांजिव्हाळा । कळात्याविकळाजाणिजे ९२ तेणेंकेलेंवेदाध्ययन । जैसाखरपृष्ठींवाहिलाचंदन । कींषड्रसींदर्वीफिरवून । परितीस्वादनेणें
ची ९३ जैसेंमद्यपियाचेंभाषण । कींभक्तिरहितांचेंकीर्तन । कींगोरियाचेंगायन । शब्दजाणतैसेंत्याचे ९४ जैसेंवृंदावनफळ । वरिवरीदिसे
निर्मळ । कींकनकंफळेंदिसतीरसाळ । फणसफळासारिखीं ९५ अवघावेळचुनाघुसळितां । परीनवनीतनलाभेहाता । सिकताहरळेंशिजवितां ।
मवाळनव्हेकल्पांतीं ९६ तूंबीचेंअत्यंतकडूफळ । शर्करेंतठेविल्यासर्वकाळ । परीअंतरींगोडहोईल । हेंकल्पांतींघडेना ९७ चुनामाखोनिवायस ।

१ राक्षस. २ नूतन तारुण्य: ३ चांडाळ. ४ बकरी' ५ कावळे. ६ बेडूक' ७ गर्दभ, ८ पळी. ९ कंवडल. १० धोत्र्याचीं' ११ लोणी. १२ खडे.

बळेंचकेलाराजहंस । तोजायविष्ठाशोधावयास । स्वभावसर्वथानजाय ९८ यालागींऐकगाहनुमंता । दयाक्षमाद्दढदयींनसतां । जपतपध्यानतत्वता ।
व्यर्थगेलेंनिर्धारें ९९ तरितेलंकावासीअसुर । करीनत्याअवघ्यांचासंहार । ऐकतांहर्षलेवानर । देतीभुभुःकारएकदांची १०० असोब्रह्मपत्रमागें
वाचिलें । त्यातविरंचीनेंहोतेंहिलिलें । हनुमंतेंलंकादहनकेलें । परीनगरझालेंसुवर्णाचें १ तीऐकोनियांमात । आश्चर्यकरीकौसल्यासुत । मगजांबुवंता
सीपुसत । हावृत्तांतकैसाअसे २ तूंबहुकाळांचापुरुष । देखिलेंऐकिलेंबहुवस । तोब्रह्मयाचाअंश । अयोध्याधीशह्मणोनिपुसे ३ वयेंगुणेंतपेंबहुत । व
डीलअसेजांबुवंत । सांगेपूर्वीलवृत्तांत । जैंलंकावस्तीनव्हतीपैं ४ जैंकेलेंगजेंद्रोद्धारण । तैंपरतलारमारमण । तोंकरजोडूनिसुपर्ण । क्षुधेनेंबहुव्या
पिलोंह्मणे ५ तोंबोलेश्रीकरधर । गजेंद्रनक्राचींकलेवरेंथोर । तींभक्षूनयेईंसत्वर । तोंपक्षींद्रसत्वरउडाला ६ नक्रगजेंद्रांचींकलेवरेंदोनी । उरगारी
घेऊनउडेगगनीं । तोंभृभंगपक्षीयेउनी । विभागमागेखगेंद्रा ७ गरुडेंनलागतांएकक्षण । भृभंगाचाघेतलाप्राण । जंबुवृक्षाचीशाखाविस्तीर्णपाहून ।
विनतातनयबैसला ८ तोंसाठीसहस्त्रवालखिल्ले । तिहींशाखेप्रतिटांगूनघेतलें । अरुणानुजेंबळतुकिलें । तोंशाखाविशाळमोडिली ९ शतयोजनें
शाखाथोर । पडतांमृत्युपावतीलविप्र शाखाहातींगजनक्र । कश्यपसुतउडाला १० मगबोलेविष्णुवहन । ह्मणेमीकोणासजाऊंशरण । शाखासो
डितांब्राह्मण । साठसहस्त्रपडतील ११ कश्यपबैसलाअनुष्ठानीं । त्यावरीपक्षछायाधरिलीगगनीं । तोवरुतेंपाहेविलोकुनी । तंवसुतसंकटींपडियेला ।
१२ तेव्हांकश्यपऋषीनेंप्रार्थून । खालींउतरविलेब्राह्मण । मगह्मणतपुत्रालागून । येथूनलंकागिरीजवळअसे १३ शाखासोडूनगेलेब्राह्मग । मग
विहंगोत्तमेंशाखाउचलोन । आकाशपंथेंउडोन । लंकागिरीवरीआला १४ तेवढापायत्याचारुतला । तोचिहात्रिकूटाचळजाहला । गरुडेंआहारतेथें
घेतला । टांकूनिगेलाशाखातेथें १५ त्यावरीमगलंकावसिन्नली । तेसुवर्णशाखाअसेंतळीं । हनुमंतेंलंकाजाळिलीं । मूसवोतिलीशाखेची १६ याला
गींसुवर्णाचीलंका । झालीजाणअयोध्यानायका । तोंअर्कसुतह्मणेऐका । मुहूर्तअसेयावरी १७ विजयादशमीनक्षत्रश्रवण तेदिवसींनिघालारघुनंदन ।
पूर्वींरघूनेंहाचिमुहूर्तपाहोन । दिग्विजयासीगेलाहोता १८ सर्वशुभयोगतेक्षणीं । जयतिथीमाळाघेउनी । दशकंठरिपूचेचरणीं । घालितीमिठीतेधवां
१९ साह्यसुग्रीवकिष्किंधेश्वर । उठलेअठरापद्मेंवानर । बाहात्तरकोटीलक्षवीर । त्यांवानपवरजांबुवंत २० छपन्नकोटीगोलांगुळ । भुभुःकारदेतीएक
चिवेळ । दणाणिलेंउर्वींमंडळ । धाकेंनिरोळकांपतसे २१ काद्रवेयकुळभूषगतेव्हां । सरसावीतखालतीग्रीवा । वराहेंदंतबरवा । दृढधरिलासरसाउनी २२

१ राक्षस. २ ब्रह्मलिखित. ३ गरुड. ४ सर्पांचा शत्रु. ५ आकाशीं. ६ जांबुळ. ७ अरुणाचा लहान भाऊ. ८ सुग्रीव. ९ आश्विनशुद्ध दशमी. १० पृथ्वीमंडल. ११ आकाश. १२ शेष.

कूर्मपृष्ठीसरसावित । दिग्गजझालेभयाभीत । मंगळजननीकांपत । भुभुःकारकानींऐकतां २३ वनचरआणिखेचर । भयाभीतजाहालींथोर । धड
केवाद्यांचागजर । नादेंअंबरकोंदलें २४ रथारूढजैसासहस्रकर । श्रीकरधरगरुडावर । हनुमंतस्कंधींरघुवीर । त्याचियेपरीशोभला २५ नं
दीवरीबैसेकर्पूरगौर । कींऐरावतारूढसहस्रनेत्र । अंगदस्कंधावरीसौमित्र । त्याचपरीशोभला २६ किरणचक्रींविराजेतमारी । कींकुळाचळांमाजीक
नकाद्री । कींभूतगणामाजीस्मरारी । तैसावानरींवेष्टिलाराम २७ कींमंथावयाक्षीरसागर । जैसेनिघालेसुरासुर । तैसेचगर्जतवानर । दक्षिणपंथेंचा
लिले २८ शालतमालवृक्षउपडिती । छत्राकाररामावरीधरिती । वृक्षपल्लवघेऊनिहातीं। चवरेंवारितीरामावरी २९ दशयोजनेंरुंदसेनाजातां । मार्गीं
वानरह्मणतीरघुनाथा । आह्मीरावणघालूंआजपालथा । जनकदुहिताभेटवूंतुह्मां १३० एकबोलेवानरवीर । मीजाउंनमारीनदशवक्र। एकवदेनला
गतांक्षणमात्र । मोटबांधूनआणीन ३१ एकह्मणेस्वामीरघुनंदना । ऐसेंवाटतेमाझियामना । रावणाच्यानासिकाकर्णा । छेदूनयेईनझडकरी ३२ ए
कह्मणेएकलाचिजाईन । द्विपदेंहस्तखंडीन । ऐकोनिसुखावेरघुनंदन । ह्मणेहेसुरगणअवतरले ३३ दक्षिणपंथेंभारजात । मार्गींकपीउचलितीपर्वत
कंदुकाऐसेझेलित। धांवतातीआवेशें ३४ समुद्रतीरासआलेभार । भुभुःकारदेतीवानर । तेणेंभयाभीतसरितावर । झालापरमतेकाळीं ३५ जैसावेद
बोलतगेलाअद्भुत । स्वरूपदेखोनिझालातटस्थ । तैसेवानरवीरसमस्त । समुद्रतीरींस्थिरावले ३६ प्राप्तहोतांआत्मज्ञान । भ्रांतीतमजायनिरसोन
स्वयंप्रकाशअमृतघन । होयसिंचनउपरतीं ३७ अखंडलागलीअसेधार । खंडनसेगंगापसर । स्नानपानमुनेश्वर । नित्यनिरंतरकरिताती ३८
बहुतपुण्याचीजोडी प्रेमेंहोयसुरवाडी । भेदोनटांकीमुखप्रौढी । चुंबिफळचैतन्य ३९ कींराजहंसाच्यायेऊनहारी । स्थिरावतीमानससरोवरीं । मे
दिनीवसनांचेतीरीं । तेवीकपिकेंसरीतटस्थ १४० दशयोजनेंअद्भुत। सेनाउतरलीओतप्रोत । असोलंकेमाजीवृत्तांत । वर्त्तलातोचिपरिसावा ४१ क
पीसहितअयोध्याविहारी । पातलासागराचेपैलतीरीं । ऐसीध्वनीलंकेमाझारीं । राक्षसेंद्रेंआकर्णिली ४२ शक्रजितादिसकळकुमर । प्रहस्तादिप्रधा
नथोरथोर । त्यांसहितविंशतिनेत्र । बैसेविचारकरावया ४३ परमदुश्चितद्विपंचवदन । ह्मणेशत्रुदंदशूककृशान । हेसर्वथानह्मणावेलहान । नलाग
तांक्षणविघ्नकरिती ४४ तरीसहपरिवारेंसीयेऊन । परतीरींउतरलारघुनंदन । हाआकळेऐसामंत्रकोण । विचारूनिसांगाआतां ४५ एकलायेऊनि
वानर । जाळूनगेलालंकानगर । शुद्धीसांगोनिरामचंद्र । घेऊनिआलावेगेंसी ४६ ऐसेंबोलतांद्विपंचवदन । सकळकुमरआणिप्रधान । झालेअत्यंत

---

१ सूर्य. २ महादेव. ३ इंद्र: ४ देवदैत्य. ५ रावण. ६ चेंडू. ७ समुद्र. ८ श्रेष्ठ वानर. ९ इंद्रजितादिक. १० सर्प. ११ अग्नि.

क्रोधायमान । शस्त्रेंतुळोनिबोलती ४७ तेनरआणिवानररक्षस । आलेतरीआमुचेभक्ष । कृपाळूआह्मावरीविरूपाक्ष । तेणेंधाडोनीदीधले ४८ तु
ह्मींचिंतानकरावीसाचार । शत्रूचाआह्मींकरूंसंहार । रणकरूंनलागतांक्षणमात्र । ह्मणोनिशस्त्रेंझाडिती ४९ शक्रजितादिसर्वकुमर । देवांतकनरांतकमहो
दर । धूम्राक्षवज्रदंष्ट्रीमहाशूर । ह्मणतीनरवानरक्षणेंजिंकूं १५० दूरअसतांमृगनायक । मागेंनिंदाजल्पतीजंबुक । कींमिळोनिबहुतदंदशूक । वासुकीजिं
कूंइच्छिती ५१ तंवतेसभेंतबिभीषण । धर्मार्थीपुण्यपरायण । जैसावायससभेंतयेऊन । राजहंसबैसला ५२ जोविवेकरत्नाचाकिरीट । कींषड्गुण
गंगेचालोट । कींभाववैरागरींचामुगुट । दिव्यहिराप्रगटला ५३ कींविवेकभूमीचेंनिधान । भक्तिसरोवरीचेंभरतेंपूर्ण । कींपरमार्थवनीचेंसुमन । अ
म्लानसुंदरविकाशलें ५४ असोऐसाबिभीषणथोर । न्यायसिंधूअतिचतुर । सकळखळांसीप्रत्युत्तर । देताझालातेवेळे ५५ ह्मणेवाचाळतुह्मीपरमदु
र्जन । महाकपटीअंतरमलिन । दशमुखाभोंवतेमिळोन । नानाकुतर्ककरीतसा ५६ यशधैर्यसकळषड्गुण । सभाग्याचीकीर्तीऐकोन । परमखेदमा
नितीदुर्जन । नसतेंदूषणलाविती ५७ परमकुमतीजोबळहीन । निंदाजल्पेरात्रदिन । समरभूमीसीपळेउठोन । हेंतोंलक्षणश्वानाचें ५८ सकळद
ळासमवेत । जिंकूंह्मणतांअयोध्यानाथ । तरीएकलाचिहनुमंत । आलाहोतानिजबळें ५९ जैसेंकरतळीचेंआचमन । कींवत्सपदींचेंजीवन । तैसाज्याचेदृष्टी
समुद्रपूर्ण । लंघोनिक्षणेंआलातो ६० तेणेंविध्वंसिलेंसकळनगर । रावणसभानागविलीसमग्र । कोटयानकोटीनिशाचर । अशोकवनींसंहारिले ६१
राजसुतमारिलेसप्त । विवरींकोंडिलाशक्रजित । लंकाजाळूनअद्भुत । पुरुषार्थतेणेंदाविला ६२ तेवेळेतुमचेंबळ । कायझालेंहोतेंविकळ । आतांराव
णाभोंवतेसकळ । पुरुषार्थआपुलासांगतां ६३ नानापाखंडीदुर्जनयवन । इहींवेदांसीठेविलेंदूषण । परीवंदितीकीविद्वज्जन । ज्ञानसंपन्नधर्मात्मे ६४
कमळासीनिंदितीदुर्दर । परिसहसानविटेचिभ्रमर । चंद्रासीनिंदितीतस्कर । परीचकोरआनंदती ६५ पंडितासीखळनिंदित । परीकुशळवंदितीसम
स्त । वायसमुक्तेंवोसंडित । परीमराळनविटती ६६ मूढांसिनकळेकस्तुरी । पंकह्मणोनटाकितीदूरी । परीतीसश्रीमंतअहोरात्रीं । हृदयींशिरींधरिती
कीं ६७ दिवाभीतानावडेअर्क । परीआनंदतीचक्रवाक । अंधअव्हेरीरत्नेंसुरेख । परिपरीक्षकसंरक्षिती ६८ तैसाजगद्वंद्यरघुवीर । जयासीहृदयीं
ध्यायउमावर । कमलोद्भवसहस्रनेत्र । सहस्रवक्रस्तवीनया ६९ सनकादिकहृदयींध्याती । जोउदयाचळींचागभस्ती । तोपुराणपुरुषअव्यक्ती ।
मूळप्रकृतीसमवेत १७० ब्रह्मांडनरस्तंभअद्भुत । दशरथाचेमहत्पुण्यपर्वत । मायाचक्रचाळकशाश्वत । श्रीरामरूपेंप्रगटला ७१ तैसावेदवंद्यरघुवीर ।
त्यासितुह्मींनिंदितांपामर । रावणासीझोंबलाकामविखार । भुललासाचारह्मणोनी १७२ सहस्रार्जुनाचेबंदींजाऊन । पडिलाहोताद्विपंचवदन । प

रमपुरुषार्थीसहस्त्रार्जुन । भृगुपतीतयासवधी १७३ जोक्षत्रियांतकप्रळयरुद्र । त्यासजिंकीहारामचंद्र । मतिहीनझालाविंशतिनेत्र । नोळखेस्वरूपत
याचें १७४ वनचरनव्हतीद्रुमपाणी । अवघेअवतरलेसुधापानी । अजूनतरीहेंमनींजाणोनी । जानकीद्यावीरामचंद्रा १७५ चंडकोदंडअद्भुत ।
रावणासीनुचलेजडबहुत । तेंदुखंडकरीरघुनाथ । सकळरायांदेखतां १७६ यालागींसमुद्रतीराचेपैलपारीं । रामसमुदायआहेजोंवरी । तोंमंगळजन
नीचीकुमरी । राघवासीसमर्पारे ७७ उन्मिळाजीवनाचीचापरेखा । नुलंघवेचितुजदशमुखा । यालागींत्रिभुवननायका । जानकीनेऊनभेटवी ७८
जानकीसभेटवीरघुनंदन । बंदीचेसोडीसुरगण। मगचंद्रार्कवरीकल्याण । पुत्रपौत्रींनांदाल ७९ माझींवचनेंवाटतीकठिण । परिपुढेंगोडअमृताहून ।
औषधकडूवाटेजाण । परीरोगहरणपुढेंकरी ८० गोडअत्यंतनाबदीसाखर । मुखींघालितांकडकडफार । पुढेंगोडीतेअपार । तैसींसाचारवचनेंमाझीं
८१ तुरटवाटेआमलक । परिपुढेगोडीदेअधिक । तैसींमाझींवचनेंदुःखमोचक । हृदयींधरीदशकंधरा ८२ पितापढवीपुत्रालागुन । त्यासवाटेविषा
समान । परिपुढेंगोडसुधेहून । महिमाविशेषजाणिजे ८३ अशुभचिन्हेंअत्यंत । लंकेमाजीहोतातिबहुत । क्षणक्षणाउल्कापात । नभथरथरतेंवाट
तसे ८४ जलदजाळनसेकिंचित । रुधिरधारामेघवर्षत । दुष्टस्वप्नंअत्यंत । मंदोदरीसजाणविती ८५ विगतधवास्त्रियायेउंन । ओंटीभरतीमृत्तिकाघे
ऊन । मंगळसूत्रतोडून । कृष्णवर्णपुरुषनेतसे १८६ यालागींदशवदनातूंसुज्ञ । टाकिलींवेदांचींखंडेंकरून । तरीजाणतजाणतकुशान । पदरींके
साबांधिसी १८७ समजोनियांविषदारुण । कांकरावेंबळेंप्राशन । दंदशूकवोळखून । मगकांउसांत्याघ्यावा ८८ खदिरांगारजाणोन । मगकां
वरीकरावेंशयन । उदरींपाषाणबांधोन । महाडोहींकांनिघावें ८९ ऐसेंबोलतांबिभीषण । तटस्थजाहालेसभाजन । क्रोधेंव्यापलारावण । मौनधरून
उगाची १९० विभीषणासिह्मणेप्रहस्त । उगेचबैसाहोनिश्चित । सभेंतबोलतांअनुचित । मृत्युपावालनिर्धारें ९१ तुह्मींराजबंधुह्मणवितांजाण । प
रिशतमूर्खाहुनिबुद्धिहीन । तुह्मासनाहींचातुर्यज्ञान । तरीउठोनिगृहाजावें ९२ सक्रोधबोलेइंद्रजित। तूंअनुचितबोलिलासीसभेंत । तुजआतांचिवधि
तोंयथार्थ । परीपितृव्यह्मणोनीशंकलों ९३ शक्रजितह्मणेदशमुखा । हातुमचाबंधूसखा । परिहाशत्रुपक्षपातीदेखा । अनर्थकारकदिसतसे ९४
बिभीषणह्मणेतूंचांडाळ । महाकपटीकृतघ्नखळ । तुझेसंगतीनेंभूपाळ । मतिमंदजाहला ९५ अंकुशेंआकर्षिजेवारण । भुजंगआकळिजेमंत्रेंकरून ।
राजमतीआकळितीप्रधान । परमसज्ञानचतुरसे ९६ मातलाअत्यंतकुशान । तोविझविजेजलेंकरून । क्रोधोर्मीअतिदारुण । सद्विवेकेंआकर्षिजे ।
९७ नृपेंकरितांअनुचितकरणी । तत्काळआवरिजेप्रधानीं । परितुह्मीअवघेपापखाणी । निर्भयआणिकृतघ्न ९८ राजाआधीचखळ । प्रधानमि

ळालाअमंगळ । मगअविवेकवाढेप्रबळ । कुबुद्धीकल्लोळउठतीपैं १९शंखकरावयाचीहौसगहन । त्यांतपातलामासफाल्गुन । कींस्त्रीराज्यांतीलपारप
त्यपूर्ण । जारासिप्राप्तजाहलें २०० आधींचचाहाडतस्कर । त्यावरीपाठिराखानृपवर। कींउन्मत्तासीसरोवर । प्राप्तजाहलेंमद्याचें १ तैसाकुबुद्धीनें
वेष्टिलादशवदन । तैसेचतुह्मीमिळालेतप्रधान। जैसेंवृकाचेसदनींश्वान।कारभारीजाहलें २ अरेतुझेंमरणआलेंजवळी । ह्मणोनिआणिलीजनकबाळी
अयोध्याप्रभूप्रतापबळी । आलानिकटकाळतुझा ३ रावणेंअनुचितकर्ममांडिलें । ह्मणोनिमातेनेंमजप्रेरिलें । यालागींतुह्मातेंबोधिलें । मनींधरा
लक्षणोनी ४ परिहोणारबळिवंत । तुह्मीनायकाचिउन्मत्त । सीतानद्यालतरीनिश्चित । कुळक्षयहोईल ५ ऐसेंऐकतांरावण । क्रोधेंव्यापिलापरिपू
र्ण । बिभीषणावरीशस्त्रघेऊन । परमआवेशेंधांवला ६ बिभीषणकेवळभक्त । तयासिरक्षितारघुनाथ । तोंरावणाचाउखळलाहात । शस्त्रपडलेंधरेव
री ७ मागुताधांवेरावण । इंद्रजितेंधरिलाआवरून । मगझाडिलावामचरण । तोलागलाबिभीषणा ८ बिभीषणकेवळशांत । निर्मत्सरभेदरहि
त। रावणासीमागुताह्मणत । सखारघुनाथनकरींकांरे ९ बिभीषणक्षमाशीळ । वानितीराजेसकळ। तोंकैकसीमातायेऊनतात्काळ । सांगेहितार्थबि
भीषणा २१० पुत्रासिह्मणेतूंऊठआतां । शरणजाईंरघुनाथा । वज्रपंजरशरणागता । भवव्यथावारीलतो ११ ममउदराआलासीसाचार । तरीकरीमा
झाउद्धार । तनुमनधनेंसींसत्वर । शरणजाईंरघुनाथा १२ सांडोनसकळमायाचिंता । शरणजावेंरघुनाथा । रावणेंक्षयकेलातत्वतां । तूंजायपरतावे
थूनी १३ जेबळेंचविषभक्षिती । शाहाणेनबैसतीत्यांचेपंक्तीं । तरीतूंसखाकरींरघुपती । नाशकल्पांतींनव्हेतूतें १४ ऐकोनिमातेचेंवचन । बिभीष
णेंकेलेंसाष्टांगनमन । घेऊनिचौघेप्रधान । उभाठाकलातेकाळीं २१५ रावणासिह्मणेबिभीषण । मीश्रीरामासीजातोंशरण । तूंज्येष्ठबंधुह्मणोन । पु
सतोंतुजमागुती १६ ऐसेंबोलेनित्वरित । बिभीषणउडालाअकस्मात । चौघांप्रधानासमवेत। सर्वादेखतांतेकाळीं १७ जैसेंकलेवरसांडून । एकदां
चनिघतीपंचप्राण । कींपांचहीदिवाकरमिळोन । अस्ताचळावरीचालिले १८ कींकल्पांतींपंचमहाभूतें । जातीस्वरूपासीमिळावयातें । तैसेशरणज
नकजापतीतें । पांचहीजातीत्वरेनें १९ श्रीरामविजयग्रंथसुंदर । हाचिकेवळरामेश्वर । आवडीच्याकावडीसत्वर । सद्भक्तनरघालिती २२० भावप्र
यागींचेंप्रेमोदक । जेरामेश्वरावरीकारितीअभिषेक । त्यांचेमनोरथअयोध्यानायक । सत्यपरिपूर्णकरील २१ अयोध्याधीशाब्रह्मानंदा । श्रीधरवर
दावेदवंद्या । छेदोनियांअविद्याभेदा । अभंगपददेशीं कीं २२ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर ।संमतवाल्मिकीनाटकाधार। सदांपरिसोतपंडितचतुर ।
द्वाविंशतितमोध्यायगोडहा २३ अध्याय २२ ओव्या २२३ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ७॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ७ ॥

श्रीगणेशायनमः ॥ ॥ श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः। दुर्धरअहंकारदशानन। अहंबुद्धीलंकागहन। तेथेंवास्तव्यअनुदिन। क्रोधकुंभकर्णबंधुसखा १
अनर्थकारककामइंद्रजित। मदहामुख्यप्रधानप्रहस्त। मत्सरदंभतेनिश्चित। देवांतकनरांतक २ शोकमोहआणिअनर्थ। भेदवादअसुरबहुत। ख
ळकुटिळकुतर्कसमस्त। देहलंकेंतदुमदुमित ३ याचपरीमाजोनीरावण। बंदींघातलेसुरगण। आदिदैवतअध्यात्महोऊन। देहलंकेंतबंदींपडले।
४ रमेशतोअंतःकरण। रमाबंधूतेंचिमन। बुद्धिविरिंचीचित्तनारायण। रावणेंबंदींघातले ५ चक्षूच्याठायींसूर्यनारायण। रसनातेरसनायकवरु
ण। अश्विनौदेवदोघेघ्राण। रावणेंबंदींघातले ६ वाचाकेवळवैश्वानरँ। पाणीतेजाणपुरंदर। असोदेवआकळोनिसमग्र। सेवककरूनीरक्षिले ७ मा
यामृगछेदावयालागुन। निरंजनींप्रवेशलारघुनंदन। कापट्यशब्दउठवून। विवेकलक्ष्मणदवडिला ८ सद्बुद्धीजानकीचेंहरण। अहंकारेंकेलेंनलग
तांक्षण। अहंदेहलंकेंतआणून। दुराचारेंकोंडिलें ९ मगधांविन्नलावैराग्यहनुमंत। तेणेंदेहलंकाजाळूनसमस्त। कामक्रोधादिराक्षसांसहित। अहंलं
कानाथगांजिला १० सद्बुद्धीचेंकरूनसमाधान। घेऊनआलारघुनंदन। तोकेवळसद्भावबिभीषण। रावणेंत्रासिलासभास्थानीं ११ आत्मारामसद्गुरु
पूर्ण। त्यासशरणचाललाबिभीषण। बाविसावेअध्यायींजाण। हेंचिकथनसांगीतलें १२ देखोनिवायँसांचामेळ।त्रासोनिनिघेमराळँ। कींदेखोनीदु
ष्टनिंदकखळ। साधूउठेतेथोनी १३ तैसाप्रधानासहबिभीषण। उर्ध्वपंथेंक्रमीतगगनं। भवसिंधूउल्लंघोनिचरण। गुणसिंधूचेपाहूंइच्छी १४ हिरण्यक
शपेंगांजितांप्रल्हाद। तेणेंहृदयींधरिलागोविंद। तैसाचिजानकीहृदयाब्जमिलिंदं। बिभीषणेंजवळकेला १५ वानरअंतरिक्षविलोकिती। तोंपांचहीअ
सुरउतरलेक्षितीं। सेनाप्रदेशींउभेराहती। हस्तजोडूनितधवां १६ कित्येकधांवलेवानरगण। घेऊनियांवृक्षपाषाण। तोंबिभीषणह्मणेतुह्मासीशरण।
दावाचरणरघुपतीचे १७ रावणबंधुमीबिभीषण। तेणेंअपमानिलेंमजलागून। आलोंसीतावल्लभासीशरण। त्याचेचरणदाखवामज १८ जेसनकादि
कांचीध्येयमूर्ती। नारदादिगातीज्याचीकीर्ती। तोब्रह्मानंदअयोध्यापती। त्याचेचरणदावामज १९ जेंनिगमवल्लीचेंपक्वफळपूर्ण। जोविषकंठमनमांदुस
रत्न। जेंपद्मोद्भवाचेंदेवतार्चन। त्याचेचरणदाखवामज २० प्रतापमित्ररघुनंदन। जोअरिचक्रवारणपंचानन। जोखरदूषणप्राणहरण। त्याचेचरण
दावामज २१ वेदांतीह्मणतीपरब्रह्म। अजअजितपूर्णकाम। तोचिहादशरथात्मजराम। त्याचेचरणदावामज २२ व्याकरणकारशब्दसाधिती। ज्या
चेनामाचेअर्थकरिती। तोचिहामंगळभगिनीचापती। त्याचेचरणदावामज २३ पातांजलीयोगसाधून। योगीपावतीनिरंजन। तोचिहाचंडकिरणकुळभूष

---

१ अहंकार रूप रावण. २ जिव्हा. ३ अग्नि. ४ इंद्र. ५ मायारूपी मृग. ६ कावळे. ७ राजहंस. ८ आकाश. ९ गुणसमुद्र रामचंद्र. १० रामचंद्र.

ण। त्याचेचरणदावामज २४ प्रकृतिपुरुषसांगत। सांख्यशास्त्रअसेगर्जत। तोचिहाजानकीनाथ। त्याचेचरणदावामज २५ नैयायिकह्मणतीकर्ताईश्वर जीवासिनकळेत्याचापार। तोचिहाअजराजकुमर। त्याचेचरणदावामज २६ मीमांसकस्थापितीकर्म। कर्माचारेंपाविजेपरब्रह्म। तोपरात्परविश्रांतिधाम। त्याचेचरणदावामज २७ ऐसींबिभीषणाचींशब्दरत्नें। कींतेभक्तिनभींचींउडुगणें। कींतेवैराग्यवल्लीचींसुमनें। प्रेमसुवासेंघमघमिती २८ श्रीराम सुग्रीवासिजाऊन। कितेकसांगतीवर्तमान। चौयेप्रधानासहशरण। राक्षसएकआलाअसे २९ आपलाज्येष्ठबंधूरावण। आपुलेंनामसांगेबिभीषण। ऐसेंऐकतांजानकीजीवन। सुग्रीवाकडेपाहात ३० अर्कजबोलेउत्तर। वरीभाविकदिसतीसाचार। परीनोळखतांतयाचेंअंतर। जवळीसहसाठेवूंनये ३१ दिवाभीताचीसेवाकरून। कागेंलाविलाजैसाअग्न। तैसाजरीगेलाकरून। तरिमगकायविचार ३२ जांबुवंतह्मणेमारूनिवाली। किष्किंधातुह्मीसुग्रीवादीधली। हेकीर्तीऐकोनितत्काळीं। शरणआलातुह्मातें ३३ मारूनियांरावणा। लंकाराज्यद्यावेंआपणा। हेचिमनींधरूनवासना। शरणआलातुह्मातें ३४ सुषेणह्मणेसमयकाठिण। देखोनिसाह्यकरीबंधुजन। हारावणाससोडूनआलाशरण। हेंचनवलवाटतें ३५ बहुतर्कबहुविचार। करितेझालेतेव्हांवानर। मगअंजनीचाकुमर। निश्चयवचनबोलिला ३६ लंकेंतशोधितांजनककुमरी। मीप्रवेशलोंयाचेमंदिरीं। महासाधूनिष्कपटअंतरीं। तेचसमयीं वोळखिला ३७ वरीतुह्मासदिसतोराक्षस। परीअंतरींप्रेमळनिर्दोष। कंटकमयदिसतोफणस। परीअंतरींसुरसजैसा ३८ शरणांगतासीवज्रपंजर। रघुपतीब्रीदतुझेंसाचार। तरीजवळबोलाऊनअसुर। अभयतयातेंदेईजे ३९ इतरशास्त्रींचेबोलबहुत। एकाचवचनेंदमवीवेदांत। तैसेंबोलिलाहनुमंत तेंचसकळांमानलें ४० अंगदासिभ्रूसंकेत। दावीतेव्हांताराकांत। बिभीषणासआणावयात्वरित। येरूनिघालावायुवेगें ४१ बिभीषणासीबोलेवालिपुत्र। उदेलातुझाभाग्यमित्र। तुजबोलावितोस्मराररिमित्र। राजीवनेत्रअजितजो ४२ बिभीषणाचाधरूनहात। रामाजवळीआलातारासुत। जेवींसाधकासिसद्विवेकदावित। स्वरूपनिर्धारनिश्चयें ४३ असोबिभीषणेंपाहिलाश्रीराम। जोचराचरफलांकितद्रुम। जयजयकारकरूनपरम। लोटांगणघातलें ४४ दृष्टींपाहूनिरामचंद्र। उचंबळेबिभीषणभक्तसागर। प्रेमाचेंभरतेंअपार। दाटतेंझालेंतेधवां ४५ श्रीरामचरणारविंदसुगंध। तेथेंबिभीषणजडलामिलिंद। अष्टभावेंहोऊनसद्गद। आनंदमयजाहला ४६ रामचरणींठेविलामस्तक। संतोषोनिब्रह्मांडनायक। शिरींठेविलावरदहस्तक। अक्षयकल्याणदायकजो ४७ ह्मणेजोंवरीशशीआणितरणी। जोंवरीरामकथाआहेधरणीं। तोंवरीलंकाभुवनीं। बलीध्रुवासारिखें ४८

१ सीता. २ अंगद. ३ स्मर ह्मणजे काम त्याचा शत्रु शंकर त्याचा मित्र राम. ४ जगताला कल्प वृक्ष. ५ समुद्र. ६ कमल. ७ भ्रमर. ८ चंद्र. ९ सूर्य. १० पृथ्वी.

जेवींचिरंजीववायुनंदन । त्याचपरीराहेंतूंबिभीषण । कलिकाळातोडरींबांधोन । लंकेसीसुखेंनांदेंकां ४९ ऐसाआशीर्वाददेऊन । रामेंठेविलाबिभी
षण । सप्रेमेंदिधलेंआलिंगन । वानरगणआनंदले ५० मगसौमित्रआणिअष्टजुत्पती । तेहींबिभीषणासीभेटती । पुष्पवर्षावकरिती । वृंदारकतेधवां
५१ मगबिभीषणजोडूनिकर । उभाराहिलाश्रीरामासमोर । ह्मणेजयजयरामकरुणासमुद्र । जगदोद्धारदीनबंधू ५२ जयजयरामकमलपत्राक्षा । हेता
टिकांतकासर्वसाक्षा । मखंपालकानिर्विकल्पवृक्षा । कर्माध्यक्षाकर्ममोचका ५३ जयरामचंडीशकोदंडभंजना । हेरामदशकंठदर्पहरणा । हेराम
विषकंठदाहशमना । भक्तरंजनाजगद्वंद्या ५४ हेरामपद्मजातजनका । हेरामविबुधबंधछेदका । हेरामदुष्टअसुरांतका । सहस्रमुखानबर्णवेची ५५
ऐसीबिभीषणेंकरितांस्तुती । त्यासिहातींधरीसीतापती । आपणाजवळबैसविलाप्रीतीं । बहुमानदेऊनियां ५६ संतोषोनिबोलेरघुनंदन । आमुचापां
चवाबंधूबिभीषण । वानरह्मणतीधन्यधन्य । भाग्यरावणानुजाचें ५७ मगचतुःसमुद्रींचींउदकेंआणुनी । बिभीषणासिरामेंबैसउनी । लंकापतीहा
ह्मणूनी । अभिषेककेलायथाविधी ५८ लंकानगरींचान्रृपपूर्ण । येथूनअक्षयींबिभीषण । यावरीलोकप्राणेशनंदन । कायकरिताजाहला ५९
वाळूचीलंकाविशाळकेली । कपीचींकिराणेंबाहेरपडलीं । तींबिभीषणाजवळगाहाणठेविलीं । राघवेंद्रेंतेधवां ६० माझ्याहनुमंताच्यालंकेवरून ।
तेलंकासांडीनओंवाळून । परमप्रीतींसीताजीवन । लंकात्रिलोकीमारुतीची ६१ असोयावरीबिभीषणाप्रती । विचारीतजनकजापती । ह्मणेसागर
तरावयानिश्चिती । कायउपायकरावा ६२ यावरीबोलिलाबिभीषण । सागराचीपूजाकरून । मागावामार्गप्रार्थून । वानरदळउतरावया ६३
मगसमुद्रतीरींरघुनंदन । बैसलादर्भासनघालून । पूजासागराचीकरून । मित्रकुळभूषणमार्गमागे ६४ फळतोयवर्जूनिसमस्त । निराहारबैसला
सीतानाथ । हिमाचळींहिमेंनगजामात । तपकरीतज्यापरी ६५ तोंतेथेंरावणाचाहेर । शार्दूळनामेंहोताअसुर । जाऊनलंकेसीसत्वर । वार्तासांगेते
काळीं ६६ ह्मणेकमळणीत्रिकुळभूषण । अगाधवानरसमुदायघेऊन । प्रतापसिंधूरघुनंदन । जळसिंधुतीरींराहिला ६७ ऐसासमाचारऐकतांसा
चार । चिंतेनेंव्यापिलादशकंधर । मगशुकनामेंअसुर । दशकंधरत्यासिसांगे ६८ तूंआमचाबंधूहोसी । जाऊनसांगसुग्रीवासी । तुजकायकारणसी
तेसी । परतोनजाईमाघारां ६९ मगतोशुकनिघाला । क्षणेंसिंधूउल्लंघोनिआला । अंतरिक्षउभाराहिला । बोलोंलागलाधीटपणें ७० ह्मणेमज
पाठविलेंरावणें । वानरेश्वराऐकवचनें । तुवांशीघ्रपरतोनिजाणें । मर्कटसेनाघेऊनियां ७१ आह्मीजानकीआणिलीहिरून । तरितुह्मासियावयाकायका

---

१ मारुति. २ देव. ३ यज्ञरक्षक. ४ शेषास. ५ अनुज ह्मणजे लहान भाऊ. ६ वायुपुत्र, ७ सेना, ८ सूर्य. ९ उदक. १० हिमालयाचा जांवई महादेव.

रण । वृथावेचूंनकाप्राण । जावेंपरतोनिकिष्किंधे ७२ जरीनजायपरतोन । तरीमीशुकस्वकरेंकरून । तुमचींशिरकमळेंछेदून । नेईनआतांलंकेसी७३ ऐसेंबोलतांशुकनिशाचर । क्रोधावलेपरमवानर । बहुतजाऊनपालेखाइर । धरूनआणिलाशुकासी ७४ बहुतमिळोनिवानर । ताडितीजैसेमार्जार पाणिप्रहारेंतैसाअसुर । वानरवीरींताडिला ७५ परमकासावीसहोऊन । ह्मणेमजराघवासोडवींयेथून । कृपासागररघुनंदन । पाहेविलोकू नत्याकडे ७६ सुमित्रासुतह्मणेसोडासत्वर । तत्काळमुक्तकरितीवानर । सर्वेचिगगनींउडोनिअसुर । निंद्योत्तरबोलतसे ७७ ह्मणेयेथूनजाकि ष्किंधापती । नधरीयारामाचीसंगती । जैसेदेवांचेबुद्धींछळीउमापती । पुष्पचापभस्मजाहला ७८ तुह्मासिमारावयादेख । घेऊनिआलारघुनायक । तुह्मीवानरशतमूर्ख । नेणाहितआपुलें ७९ ऋषभह्मणेरेशुका । दुर्बुद्धीमळिनामूर्खा । जाऊनिसांगेदशमुखा । जनकात्मजासोडींवेगीं ८० तूंआ मुचाशत्रुसाचार । तुजवधावयाआलारघुवीर । तुझींदाहीशिरेंछेदूनसत्वर । बळीदेईनदशदिशां ८१ शुकह्मणेसीतागोरटी । पुन्हांनपडेतुमचेदृष्टी । मर्कटहोव्यर्थकष्टी । कासयाहोतांउगेंची ८२ ऐसेंऐकतांवालिनंदन । ह्मणेधराधरामागुतेन । तोंतत्काळवानरींआसुडोन । केलेंताडणतेवेळे ८३ म गकरचरणबांधोन । शुकठेविलारक्षून । असोइकडेरघुनंदन । समुद्रासीमार्गमागे ८४ तीनदिवसपर्यंत । गुणसमुद्ररघुनाथ । समुद्राचीवाटपाह त । परितोउन्मत्तसर्वदां ८५ परमक्षोभलारघुनाथ । समयनोळखेचह्मणेयथार्थ । यासमानमींदिल्हाबहुत । सागरनिर्मितह्मणोनियां ८६ लवणज लविषकरून । सर्पहापसरलालंबायमान । आतांयावरीबाणसुपर्ण । सोडितांभक्षीलक्षणार्धें ८७ माझाबाणवडबानळें । क्षणेंशोषीलसमुद्रजळ । जैसें ज्ञानप्रवेशतांसकळ । अज्ञानजायनिरसोनी ८८ कींमाझाबाणकलशोद्भव । क्षणेंशोषीलजळार्णव । सूर्यउगवतांतमसर्व । जायजैसेंवोसरूनी ८९ मागुतीक्षणएकवाटपाहून । उभाठाकलारघुनंदन । धनुष्यावरीयोजिलाबाण । अर्धक्षणनलागतां ९० बाणाचेमुखींब्रह्मास्त्र । जाहलास्थापितराजी वनेत्र । कींक्षोभलाप्रळयरुद्र । अन्यायिसमुद्रदेखतां ९१ आकर्णशरवोढितांप्रचंड । भयेंतडतडीविरिंचीअंड । जळचरखेचरेंउदंड । मूर्च्छनायेऊन पडियेलीं ९२ निशासंपतांसमग्र । उदयाद्रीवरीयेमित्रचक्र । तैसादिव्यरूपसमुद्र । सरितासहितप्रगटला ९३ यागींहोतांपूर्णआहुती । तत्काळप्रग टेआराध्यमूर्ती । तैसाप्रगटलासरितापती । परिवारेंसीतेधवा ९४ वंदूनिरघुवीरचरणा । ह्मणेराजीवाक्षारघुनंदना । स्मरारिमित्राआनंदसदना । जानकी जीवनारघुपती ९५ तूंकृपासमुद्ररघुवीर । वरीलहरीकांआलीक्रूर । माझाअन्यायनसतांशर । धनुष्यावरीघातला ९६ माझास्वभावरघुनंदना ।

१ ऋषभ नामक वानर. २ अंगद. ३ सगरपुत्रानीं. ४ गरुडास्त्रबाण. ५ वडवाग्नि. ६ अगस्ती. ७ कमलनेत्र. ८ ब्रह्मांड. ९ रात्र. १० सूर्यमंडल. ११ नया.

सर्वदांहीकरीगर्जना । तुजसींगर्वदर्पहरणा । सर्वथाहीकेलानाहीं ९७ मगह्मणेरघुनंदन । म्यांधनुष्यासीयोजिलाबाण । पुन्हांकाढितांनयेपूर्ण । यासी
कारणसांगकांहीं ९८ यावरीबोलेसरितानाथ । पश्चिमेसअसेमरुदैत्य । तोमाझींजलचरेंभक्षित । सदांपीडितोगोब्राह्मणा ९९ तरीटाकूनियांबाण ।
मरूचाघ्यावाजीप्राण । तोंशरगेलानलागतांक्षण । कल्पांतचंपळेसारिखा १०० जळींजीववधितांमरुदैत्य । शिरछेदीअकस्मात । जीवनशोषिलेंतेथें
बहुत । मारवाडदेशवसिन्नला १ अद्यापितिकडेअल्पजल । परीवृक्षवल्लीसदांसुफळ । असोसागरेंतमाळनीळ । जामातह्मणोनिपूजिला २ मग
सर्वपूजाआणून । घन:श्यामगात्ररघुनंदन । अपर्णावराचेंमनरंजन । हर्षेंपूजीश्रीरामचंद्रा ३ दिव्यालंकारदिव्यवस्त्र । अमोलिकरत्नेंप्रभाकर । रा
घवापुढेंनदेश्वर । समर्पिततेकाळीं ४ सागरह्मणेअयोध्यानाथा । वस्त्रेंभूषणेंलेईंसमर्था । नृपासवल्कलेंतत्वता । रिपुसन्मुखयोग्यनव्हे ५ सीताना
थनृपवरा । करूनियाच्याअंगिकारा । मगसमरंगणींदशकंधरा । खंडविखंडकरावें६ बैसावयादिव्यरथ । समरींपाठवीलशचीनाथ । वानरसुग्रीवादिस
मस्त । विनवितीरघूत्तमातें ७ स्वामीआज्ञासमस्तांचेमनीं । वस्त्रेंभूषणेंघ्यावींयेक्षणीं । भक्तवचनेंचापपाणी । मानिताझालातेवेळे ८ कल्पांतचपळे
समान । राघवनेसलापीतवसन । उत्तरीयवस्त्रेंदेदीप्यमान । कींचंडकिरणप्रकाशला ९ सारूनियांजटाभार । वरीमुकुटघातलासुंदर । तेजतळपतसे
अपार । दिकूचक्रामाजीनसमाये ११० प्रळयचपळेचेउमाळेउठती । तेवींदिव्यकुंडलेंतळपती । कींकविआणिअंगिरापती । कर्णीशोभतीसाचार ११
मुक्ताफळमाळाबहुत । रघुपतीच्यागळांडोलत । कींमुक्तरूपेंसमस्त । अनंतब्रह्मांडेंगुंफिलीं १२ मुक्ताफळांचेंतेजगहन । परीत्यांचापालटलावर्ण । दिस
तींइंद्रनीळसमान । श्यामलांगीरघुपतीच्या १३ जेवींनिष्कलंकमृगांक । तेवींहृदयींझळकेपदक । कटिमेखलेचेंतेजअधिक । देखतांअर्कभुलेपैं १४
वेदांतींच्याश्रुतीगहन । अर्थबोलतीजेवींशोधून । तैशाक्षुद्रघंटारुणझुण । शब्दकरितीरसाळ १५ तीक्ष्णप्रभेचींचक्रेंतळपती । तैशामुद्रिकाकरींशोभ
ती । पदींनेपुरेंगर्जती । असुरांवरीप्रतापें १६ नीळगगनावरीसुंदर । मंदाकिनीवोघदिसेशुभ्र । तैसाअम्लानसुमनहार । श्यांमलांगींडोलतसे १७
असोदिव्यगंधदिव्यसुमनीं । सागरेंपूजिलाचापपाणी । तैसाचिलक्ष्मणतयेक्षणीं । वस्त्रालंकारेंगौरविला १८ त्रिविष्टपकरितीजयजयकार । विर्षतीदि
व्यपुष्पसंभार । भुभुःकारेंगर्जतीवानर । नादेंअंबरकोंदलें १९ असोजगदात्मारघुवीर । जोकांसर्वानंदमंदिर । सागराप्रतिराजीवनेत्र । कायबोलता
जाहला १२० ह्मणेसुवेळेसीजावयादळभार । उपायसांगेंकांहींसत्वर । सागरह्मणेनळवानर । ऋषीचावरत्यासअसे २१ नळकपीबाळपणीं । शालि

---

१ वीज. २ पार्वतीपती शंकर' ३ अत्यंत देदीप्यमान, ४ समुद्र. ५ युद्धांत. ६ रावण. ७ इंद्र. ८ सूर्य. ९ दहा दिशांमध्यें. १० शुक्र. ११ बृहस्पती.

ग्रामटांकीजळींनेउनी । मगऋषिह्मणेजीवनीं। पाषाणतरोततवहस्तें २२ याउपरीकौसल्यानंदन । नळकपीजवळबोलाउन। ह्मणेधन्यधन्यवरदान।
जळींपाषाणतारींआतां २३ यालागींसुवेळेपर्यंत । नळाचेहातेंबांधवींसेत । ऐसेंसांगोनिसरितानाथ। झालागुप्तस्वस्थानीं २४ ऐंसेऐकोनिरघुनंदन।
सुग्रीवादिवानरजवळबोलावून । ह्मणेनळहस्तेंसेतूबांधोन । कार्यत्वरितसाधावें २५ धन्यधन्यतुझीमाउली । तुजऐसेंरत्नप्रसवली । तरीसखयाआ
तांयेकाळीं । प्रकटकरींसामर्थ्यतुझें २६ ऐसेंबोलतांजनकजावर । भुभुःकारेंगर्जतीवानर । पाषाणपर्वतअपार । समुद्रजळींटांकिती २७ लागतांन
ळाचावरदहस्त। समुद्रींतरतीकाष्ठवत । कींतुंबिनीफळतरत। पाषाणतरतीत्यापरी २८ सद्गुरूचेकृपेकरुनी । भवजळींतरतीबहुतप्राणी । तैसीचनळाची
करणी । पाषाणजळींतरलेहो २९ इकडेअठरापद्मेंवानर । बाहात्तरकोटीऋक्षवीर । पर्वतपाषाणतरुवर । संख्यारहितआणिती ३० असंभाव्यउच
ळितीपर्वत । वरीग्रामगंगातटाकांसहित । ऐशानगांच्याउतरडीबहुत । धांवतीघेऊनत्वरेनें ३१ भारवानराचेशांवती । चालतांनदिसेखालींक्षिती ।
लक्षाचेलक्षपर्वतटांकिती । नव्हेगणितशेषातें ३२ तरितोमहाराजहनुमंत । विशाळरूपधरीअद्भुत । कींमंदराचळचिधांवत । रामकार्याकारणें ३३
त्याहीमाजीहनुमंत । तेणेंकितीवाहिलेपर्वत। मूळकाव्यामाजीगणित। केलेंऐकासज्जनहो ३४ वेदैंसंख्यालक्षपर्वत। पुच्छेंवेष्टितहनुमंत। शास्त्रैंसंख्या
यक्षशिरींठेवित । हातींधरीलक्षद्वय ३५ बहुतनगांच्यापंक्ती । स्कंधींबैसवीहोमारुती । मागेंसांडोनिवानरसंगती । आकाशपंथेंधांवतसे ३६ वान
रश्रमलेअसंख्यात । ठायींठायींपडतीनिद्रिस्थ। परीश्रमरहितहनुमंत । अनंतखेपाकरीतसे ३७ आश्चर्यकरीअयोध्यापाळ। ह्मणेअगाधमारुतीचेंबळ।
संख्यारहितअचळ । रिचवीनेऊनसागरीं ३८ प्रथमादिवसींनळेंअद्भुत। चौदागांवेंबांधिलासेत। परिअभिमानधरिलासेकिंचित। माझेंनितरतीपाषाणहे ।
३९ तंवनिमिषामाजीएकमीनआला । केलासेतुसर्वगिळिला । सर्वेंचदिनमणीउगवला । तोंसेतूनाहींत्यास्थानीं ४० सुग्रीवादिवानरतर्क
करिती । राक्षसेंनेलासेतूह्मणती । मगरघुपतीसजाणविती । सेतूनाहींह्मणोनियां ४१ मगश्रीरामेंशरभासिसांगुनी । तिमिंगिलमत्स्यआणविलात
त्क्षणीं । शरभह्मणेसेतुशोधुनी । वेगेंआणूनदेईजे ४२ नाहींतरींअयोध्यानाथ । तुह्मासशिक्षाकरीलबहुत । यावरीतिमिंगिलबोलत । राघवापुढेंतेवे
ळां ४३ मीदर्शनासयेतेवेळे । मागेंयेतहोतींलघुबाळें । त्याहींगिळिलाशीघ्रकाळें। बाळभावेंअसेल ४४ तयाहातेंबांधवीनक्षणांत । अथवास्वपृष्ठींचाक
रूनसेत । हास्यवदनकरींरघुनाथ । करणींअगाधबाळांची ४५ मगगर्वहतनळहोउन । खालींपाहेअधोवदन । असोमत्स्यशिशूनेंसेतूउचलोन ।

---

१ समुद्र. २ संसाररूप समुद्र. ३ चार लक्ष. ४ सहा लक्ष. ५ नग ह्मणजे गमन न करणारे ह्मणून पर्वतांस नग असें ह्मणतात. ६ सूर्य,

आणूनठेविलापूर्वस्थळीं ४६ मगत्यापुढेंकपीनळ । सेतूबांधीतविशाळ । परीजळींपडतांतेंअचळ । मत्स्यगिलितीसवेगें ४७ मत्स्यगिळितीअ
चल । उगाचतटस्थपाहेनळ । तोंमत्स्यरूपीकेसरीविशाळ । जलचरांप्रतिसांगतसे ४८ ह्मणेमीआणिरघुवीर । दोघेएकरूपसाचार । सेतुबंध
नासीनिर्धार । तुह्मीविघ्नकरूंनका ४९ नळासीसाह्यहोऊन । तळींपृष्ठीद्यावीअवघेजण । असोपर्वतगिळितांराहिलेमीन । नवलझालेंतेवेळे ।
५० परीपर्वतशिळाउसळोन । दूरजातीवाहून । नळाचीविकळगतीहोऊन । तटस्थरूपेंराहिला ।५१ मगनळासीह्मणेहनुमंत । सखयागर्वनध
रींकिंचित । अवघाकर्तारघुनाथ । अभिमानतेथेंकायसा ५२ स्तंभावीणआकाशधरी । उदकावरीतारिलीधरित्री । मित्रशशीउडुगणेंनिर्धारी । वा
युचक्रींचालवीजो ५३ अनंतब्रह्मांडेंमोडोन । सवेंचिरचीनलागतांक्षण । त्याश्रीरामापुढेंअभिमान । कायचालेलजीवाचा ५४ जैसाउगवतांवासरम
णी । मृगांकतेजलोपेक्षणीं । तेथेंखद्योतस्वतेजेंकरूनी । उजळीलकायनभातें ५५ यालागींगर्वसांडोनी । सांगतोंतेंवर्मधरीमनीं । रकारएकेशिळेवरीरे
खुनी । कान्हादेऊनिकरींगुरू ५६ दुजेशिळेवरीरेखींमकार । दोहींसदेईंएकसिर । तूंह्मणसीनामपवित्र । सेतूवरीकेंविलिहूं ५७ कपीदेतीलवरच
रण । हासंशयधरीतुझेंमन । बारेमुख्यभेदासीकारण । तोअभिमानसांडींकां ५८ मुख्यरामनामपाहीं । ह्रदयींअभेदरूळेदेहीं । मगतेपाषाणसह
साही । भेदभावनधरिती ५९ हनुमंतवचनतीक्ष्णकुठार । समूळछेदिलाअभिमानतरुवर । मगनिराभिमानेंनळवीर । तैसेंचकरिताझालापैं ६० क
रितांचश्रीरामाचेंस्मरण । नळकपीजोडीतपाषाण । तोंतेथेंसमविषमथोरलाहान । भेदआननसेची ६१ हनुमंतकाव्यांतीलह्रद्गत । चतुरींजाणावाहा
भावार्थ । सेतुपंथेंनामयथार्थ । नळेंनाहींलिहिलेंतें ६२ दुजयांसीपाषाणजेबुडवित । तेसागरींतरतीतारुवत । हानळाचागुणनव्हेनिश्चित । महिमा
अद्भुतदाशरथीचा ६३ सेतुबांधावयासकायकारण । नळरामेंकेलानिर्माण । भक्तवत्सलरघुनंदन । महिमावाढवितदासांचा ६४ असोबाणसंख्यादिवसां
त । सुवेळापर्यंतबांधिलासेत । शतयोजनेंलांबगणित । दशयोजनेंरुंदपैं ६५ गगनींपाहातीसुरवर । सेतूदिसेजैसाभोगींद्र । रघुपतीतेंसांगतीवान
र । सेतूसंपूर्णकेलानळें ६६ नळासबोलाऊनरघुनंदनें । ह्रदयींधरिलापरमप्रीतीनें । धन्यधन्यतुझेंजिणें । कीर्तीत्रिभुवनींभरियेली ६७ सखया
त्वांअद्भुतकार्यकेलें । अघटिततेंचिघडविलें । असोरघुवीरह्मणेतेवेळे । चलासकळजाऊंआतां ६८ कुंचाफिरविलातेवेळेनळें । तात्काळउठलींकपीद
ळें । भुभुःकारनादेंतेवेळे । डळमळिलाभूगोळपैं ६९ सुमुहूर्तवेळापाहून । उठोनिचालिलेरामलक्ष्मण । दशयोजनेंरुंदप्रमाण । सेनादाटलीचालतां ७०

१ जाग्यापासून हालत नाहींत सबब पर्वतांस अचळ असेंही ह्मणतात. २ मोठा. ३ उदकांतील जीव. ४ मासे. ५ पृथ्वी. ६ सूर्य. ७ चंद्र. ८ नक्षत्रें. ९ काजवा.

कडेचेकोसळतीवानर । सर्वेचिउडीयेतीचक्राकार । वरीयेऊनसत्वर । सेतुपंथेंचालती ७१ रघुवीरचरणचालींजात । धांवतीसुग्रीवहनुमंत । ह्मणती रघूत्तमाविपरीत । होईलऐसेंवाटतें ७२ तुमचेपादलागतांयेवेळा । उद्धरतीलसेतूच्याशिळा । होतीलअहिल्येऐशाअबला । पडतीलगळांकपींचे ७३ कुटिळभावसोडून । विनोदेंहांसेसूर्यनंदन । हनुमंतस्कंधींरघुनंदन । आरूढलातेवेळां ७४ अंगदाच्यास्कंधावरी । सौमित्रबसेतेअवसरीं । बाळसूर्यउदयाद्रीवरी । त्याचपरीशोभतसे ७५ नभरतांअर्धप्रहर । सुवेळेसीआलारघुवीर । सेनाउतरलीअपार । लंकानगरगजबजिलें ७६ शुकासकेलेंहोतेंबंधन । तेंराघवेंकरविलेंमोचन । तेणेंरघुपतीचेवंदोनिचरण । लंकेमाजीप्रवेशला ७७ मगरावणापुढेंअद्भुत । राघवप्रतापशुकसांगत । ह्मणे जयासीसमुद्रसरितांसहित । मूर्तिमंतभेटला ७८ धन्यप्रतापीरघुनंदन । जळींतारिलेपाषाण । परमशक्तिवंतनारायण । कळिकाळासीनगणीतो ७९ तुह्मीजिंजैंसांगीतलें । तितुकेंमित्रपुत्रासीकथिलें । तंवतिहींधांवोनिमजधरिलें । बंधनींपाडिलेंआजिवरी ८० करुणासागररघुनंदन । तेणेंमज आजदिधलेंसोडून । आतांराजाजानकीनेऊन । सत्वररामासीसमर्पी ८१ सखाकरितांरघुनंदन । तेणेंचंद्रार्कवरीकल्याण । ऐकतांक्षोभलारावण । ह्मणेकेलेंताडणतिहींतुज ८२ भयघेतलेंमानसीं । ह्मणोनिभलतेंचावळसी । शत्रुप्रतापमजपुढेंवानिसी । तरीमृत्यूपावसीनिर्धारें ८३ मगशुकआणिसारण । दोघांसांगेदशवदन । ह्मणेसुवेळेसीजाऊन । सैन्यगणोनियावेगीं ८४ मुख्यमुख्यकोणवानर । कोणासवेंकितीभार । ऐसेंपाहुनीसत्वर । परतारक्षूनीआपणा ८५ आज्ञावंदोनिदोघांजणीं । कपिसेनेंतआलेतेक्षणीं । वानरवेषधरुनी । सैरावैराहिंडती ८६ सेनाधुंडोनीसकळ । मग जेथेंअसेअयोध्यापाळ । लक्षीततेंसभामंडळ । उभेदूरराहुनी ८७ तोंबिभीषणाचीदृष्टीतेकाळीं । अकस्मातदोघांवरीपडली । धांवोनिधरिलेतेवेळीं । राघवाजवळीआणिले ८८ ह्मणेहेरावणाचेहेर । याणीसेनागणिलीसमग्र । वेषपालटोनिवानर । होऊनिहिंडतीस्वइच्छा ८९ चुनामाखोनिवायस । झालेजैसेराजहंस । कींधरूनिब्राह्मणाचावेष । भैंदजैसेहिंडती ११० कींखोटेंनाणेंकरून । खऱ्यांतमिळवितीकुजन । परीक्षककाढितीनिवडून । दोघेजणतैसेधरिले ११९१ मगराजाधिराजरघुनंदन । सुहास्यवदनबोलेवचन । ह्मणेयादोघांसकरींधरून । दाखवासैन्यसमस्तही ९२ सकळवृत्तांतआणूनिमना । जाऊनिसांगादशवदना । तंवतेह्मणतीरघुनंदना । मर्खपाळकाविश्वेशा ९३ आह्मीमहिमाऐकलाकर्णीं । तोरामआजिदेखिलानयनीं । असोश्रीरामाचीअज्ञाघेउनी । दोघेपरतलेलंकेसी ९४ आलेदेखोनिदोघेहेर । षोडशखणाचेंदामोदर । त्यावरीचढलादशकंधर । सेवकअपा

१ सुग्रीव. २ लक्ष्मण. ३ सूर्याचा पुत्र सुग्रीव. ४ रावण. ५ बातमीदार. ६ कावळे. ७ वाटपाडे. ८ विश्वामित्राचा यज्ञ रक्षणकरणारा. ९ विश्वाचा स्वामी.

रभोंवते १९ हेरांप्रतिपुसेरावण । सांगायेथूनकोणाचेकोण । मगतेदावितीदोघेजण । संकेतवर्णलक्षूनियां १६ वानरसेनादशयोजन । सभोंवतीउ
तरलीविस्तीर्ण । एकएकवीरदैदीप्यमान । बळवंतआणिप्रतापी १७ वानरसिंधूचेंमध्यमंडळ । जुत्पतीउभेभोंवतेसकळ । त्यामाजीतमाळनीळ । व
स्त्राभरणामंडितदिसे १८ कनकहरिणचर्मेंपूर्ण । पहुडलासेरघुनंदन । सुग्रीवाचेमांडीवरीशिरठेऊन । गोष्टीसांगेकौतुकें १९ जाळूनगेलालंकानगर ।
सवेंचघेऊनआलारघुवीर । तोहनुमंतवायुकुमर । चरणचुरीरामाचे २१० तुमचाबंधूबिभीषण । रघुनाथानिकटबैसोन । जेंजेंझालेंवर्तमान । गोष्टीसां
गेरामकर्णीं १ दैदीप्यमानदिवांकर । तैसारामाचेपाठीसीसौमित्र । पैलअंगदमहावीर । क्रोधेंपाहेआह्मांकडे २ पैलसुषेणवैद्यमहावीर । सूर्य
सुतासीहोयश्वशुर । वीसकोटीवानरभार । त्यासांगातेंपुरुषार्थी ३ पैलजांबुवंतॠक्षवीर । तयाचाबहातरकोटीदळभार । पैलसेनाधिपतीनळवीर ।
सामर्थ्यअपारपैंत्याचें ४ जेणेंशिळींबांधिलासागर । नळनामबळसमुद्र । शरभऋषभपर्वताकार । युद्धसमयवांछिती ५ असोआतांहेवानरग
ण । यांचींनामेंसांगतांपूर्ण । उर्वीनपुरेकरितांलेखन । बळसागरकपीते ६ यालागींदशकंधराअवधारीं । त्यांसींयुद्धकरितांसमरीं । काळाचीहीनउरेउरी
मगइतरांतेथेंकवणपाड ७ ऐसेंबोलतांशुकसारण । अत्यंतक्रोधावलारावण । ह्मणेतुमचाशिरच्छेदकरून । टांकावाऐसेंवाटतसे ८ येरूह्मणतीआ
ह्मींतुमचेहेरें । सत्यसांगावासमाचार । असत्यबोलूंतरीसाचार । दंडकरावाआह्मांतें ९ असोइकडेबिभीषण । समस्तांसीदावीतर्जनीउचलून । ह्मणे
पैलपाहारावण । गोपुरावरीचढलासे २१० दाहाशिरांवरीदाहीछत्रें । दाहाविलसतीमित्रपत्रें । सेवकवरीढाळितीचामरें । एकींपिकपात्रेंधरियेलीं ११
जैसामेघउतरेपर्वतशिखरीं । तैसारावणभासतोगोपुरीं । अलंकारदीप्तीमेंहीवरी । विद्युत्प्रायझळकतसे १२ ऐसीआपुलीसंपदापूर्ण । शत्रुला
गींदाखवीरावण । छत्रछायेखालींरामसैन्य । झांकूनगेलेंतेसमयीं १३ जैसेंउठतांमेघडंबर । खालींआच्छादेजनसमग्र । सेनेसहितरामचंद्र । छ
त्रछायेतळींतैसादिसे १४ ऐसादेखोनिलंकापती । कपिवीरक्षोभलेचित्तीं । सौमित्रेंचापघेतलेंहातीं । क्षणमात्रनलागतां १५ लाविलाअर्धचंद्रबाण ।
ओढीओढिलीआकर्ण । कल्पांतचपळेसमान । चापापासूनिसूटला १६ मुकुटछत्रेंतेअवसरीं । तोडूनिपाडिलींधरणीवरी । रावणघाबरलाअंतरीं ।
खालींझडकरीउतरत १७ ह्मणेकोण्यावीराचेंसंधान । पाडिलींदाहाहीछत्रेंतोडून । अन्नपाणीशयन । गोडनलागेरावणातें १८ कपाळशूळेंआरंबळे
व्याघ्र । कींवणव्यांतआहाळेअजगर । तैसाव्याप्तदशकंधर । चिंताक्रांतसर्वदा १९ रामविजयग्रंथसुंदर । हाचिकेवळक्षीरसमुद्र । साहित्यशेषशयन

१ .वानररूप सागर. २ सुवर्णमृग. ३ सूर्य. ४ लक्ष्मण. ५ सुग्रीव. ६ सासरा. ७ अस्वलांचा राजा. ८ पृथ्वी. ९ बाकी. १० दूत. ११ पृथ्वी. १२ विजेसारखी. १३ धनुष्य.

अरुवार । वरीसर्वेश्वरपहुडला २० तेथेंसप्रेमकळालक्ष्मी । सदांविलसेपादपद्मीं । तरींसद्भाविकश्रोतेतुह्मीं । पार्षदगणहरीचे २१ सुंदरकांड येथोनसंपूर्ण। पुढेंयुद्धकांडसुरससंपूर्ण । तेंरसभरितपंडितजन। करोतश्रवणसर्वदा २२ जोअयोध्यापतीरघुनंदन। तेणेंचटांकूनधनुष्यबाण । दोनीकेंर जयंनीठेऊन । भीमातीरींउभाअसे २३ श्रीधरवरदाब्रह्मानंदा । पांडुरंगापुंडरीकवरदा । भँक्तहृदयारविंदमिलिंदा । अभंगअभेदाजगद्गुरू २४ स्व स्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मिकीनाटकाधार । सदांपरिसोतपंडितचतुर । त्रयोविंशतितमोध्यायगोडहा २२५ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु श्रीमज्जगदीश्वरार्पणमस्तु । अध्याय ॥ २३ ॥ ॥ ओव्या ॥ २२५ ॥ ॥ ६ ॥ ॥ ६ ॥ ॥ ६ ॥ ॥ ६ ॥ ॥ ६ ॥

१ हस्त. २ कंवर. ३ भक्तांच्या हृदयकमलांतील सुगंध घेणारा रामरूपी भ्रमर.

श्रीगणेशायनमः । । श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । कळेउसमुद्राचाअंत । सांपडेलअंबराचेंगणित । याहूनिरामकथाअद्भुत । नलागेअंतकोणातें १
चपळधांवेंप्रभंजन । त्याचीमोटबांधवेलआकर्षून । परीयाराघवाचेगुण । वर्णितांअंतनलागेची २ सहस्त्रवदनेंकरून । वर्णीकाद्रवेयकुळभूषण । नेति
नेतिह्मणोन । आम्नांयजेथेंतटस्थ ३ रघुवीरगुणहेंचिनिराळ । तेथेंव्यासवाल्मिकमराळ । ज्याचेमतिमाजीसकळ । ब्रह्मांडहेंठेंगणें ४ तिहींगुणवर्णि
तांअपार । अंतनलागेचिसाचार । तेथेंमानवशलभपामर । गुणांबरकेवींक्रमी ५ तरींसांडूनिअभिमान । वर्णावेरघुपतीचेगुण । गंगोदकनप्राशवेह्म
णून । तृषाक्रांतनरहावें ६ तैसेसीतावल्लभाचेगुण । वर्णावेयथामतीकरून । असोपूर्वाध्यायींनिरूपण । आलारघुनंदनसुवेळे ७ आतांवाग्देवीपरम
ढोळसे । उघडिलींयुद्धकांडमांदुसें । त्यांतीलरत्नेंविशेषें । ग्राहकपंडिततयांचे ८ रावणाचींदाहींछत्रें । छेदोनपाडिलींसौमित्रें । परमम्लानदाहींवक्त्रें
मयजापतीचींजाहलीं ९ सकळप्रधानासहित । विचारींबैसलालंकानाथ । ह्मणेमाझेअंतरींचेदोनहेत । कधींपुरतीलनेणवे १० रामलक्ष्मणसंहारु
नी । वशव्हावीजनकनंदिनी । यावेगळेंमाझियेमनीं । अन्यकांहींनसेची ११ तोंवज्रदंष्ट्रह्मणेलंकानाथा । सीतेचीकासयाभीडधरितां । बळेंचआ
णोनितत्वता । कामनाआपुलीपुरवावी १२ मगबोलेदशकंधर । मजविरंचीचाशापथोर । परस्त्रीलागींकरितांबलात्कार । शतचूर्णतनुहोय १३ मृ
गपतीचेफुटकेनयन । कींव्याघ्रहस्तटांकिलेछेदून । कींजभुंगाचेदंतपाडून । करितीदीनगारुडी १४ वनींसर्वांतश्रेष्ठवारण । परिसिंहदेखतांपावेमरण
तैसामीशापबंधनेंपूर्ण । बळक्षीणजाहलों १५ तरीतेजनकात्मजामनांतुनी । वशहोईलमजशयनीं । ऐसीकोणीकरावीकरणी । राघवींमनविटेतिचें
१६ मगविद्युज्जिव्हप्रधान । तोकपटविद्येमाजीप्रवीण । तोह्मणेमीनिर्मीन । रघूत्तमाचेंशिरकमळ १७ आणिराघवहस्तींचेंकोदंड । मायामयनिर्मी
नप्रचंड । जेणेंसीतेचेंहोयहृदयदुखंड । असत्यसहसानवाटे १८ ऐसेंऐकतांलंकापती । परमसंतोषपावलाचित्तीं । जैसामद्यपीतृषितपंथीं । तोंसिंदीवनदे
खिलें १९ आधींचजारकर्मीरत । तयासीस्त्रीराज्यजाहलेंप्राप्त । कींश्वानेंवमनअकस्मात । दृष्टींदेखिलेंधांवतां २० किंनिंबोळयादेखतांबहुवस । परमसंतोष
तीवायस । तैसाहर्षलालंकेश । वचनत्याचेंऐकोनी २१ विद्युज्जिव्हातेंबोलेलंकापती । तूंकेवळरेबृहस्पती । तरीधनुशीर्षशीघ्रगती । घेऊनयेईंअशोकवना २२
कापटयवेषीविद्युज्जिव्हा । वस्त्राभरणींगौरविलातेव्हां । कृत्रिमनिर्मिलेंजेंमघवा । तर्ककरितांनेणेची २३ इकडेआधींलंकानाथ । प्रवेशलाअशोकवनांत
तोंअधोवदनतटस्थ । जगन्माताबैसली २४ सीतेजवळीउभारावण । जैसाकमळणीजवळवारण । कींहरिणीजवळयेऊन । व्याघ्रउभाठाकला २५

१ आकाश. २ वायु. ३ शेष. ४ वेद. ५ राजहंस. ६ मनुष्यरूप टोळ. ७ गुणरूप आकाश. ८ मयासुराची कन्या. मंदोदरी तिचा पति रावण. ९ जनकराजाची कन्या सीता.

याउपरीराक्षसपाळ । सीतेसिबोलेअमंगळ । ह्मणेत्वांधैर्यधरिलेंसबळ । परीनिष्फळझालेंतें २६ मजलागींतूंआतांवरी । तुझेसेवेसिलावीनमंदोदरी । तवआज्ञेंतलंकानगरी । वर्तवीनजानकीये २७ तुझियापतीसझालेंमरण । आर्यीऐकतेंवर्तमान । सागरींसेतूबांधोन । सुवेळेसीसर्वआले २८ तों आमुचाप्रधानप्रहस्त । निशींगेलासेनेसहित । रामसौमित्रहोतेनिद्रिस्थ । तोंवरीघालाघातला २९ तुझ्यापतीचेंशिरकमळ । प्रहस्तेंछेदिलेंतत्काळ सांवळेंकबंधविशाळ । सुवेळेसीपडलेंअसे ३० वधावाजोंलक्ष्मण । तंवतोअयोध्येसगेलापळोन । आमचाबंधूबिभीषण । तोहीतेथेंपडलासे ३१ सुग्रीवआणिअंगद । त्यांचाहिकेलाशिरच्छेद । जांबुवंतआणिमैंद । त्यांचेजाणचरणखंडिले ३२ नळनीळअंजनीसुतजाण । निजेलेठायींठायींकेलेचूर्ण । करकडमर्कटसैन्य । राक्षसींजाऊनगिळियेलें ३३ सेतुआह्मीपाडिलासमग्र । मगकोठेंपळतीलवानर । शोणिताचेवाहातीपूर । गेलेभेटोंसागरा ३४ हेंजरीतूंअसत्यमानिसी । तेंआतांयेईलप्रत्ययासी । तोंविद्युज्जिव्हवेगेंसी । शिरघेऊनिपातला ३५ तेणेंधनुष्यआणीशिरतेवेळे । रामवल्लभेपुढेंठेविलें । मुखराजससांवळें । शोणितेंमाखिलेंकंठनाळ ३६ किरीटकुंडलेंमंडितवदन । सरळनासिकझळकतीदशन । कपाळींकेशरआकर्णनयन । आरक्तरेखांकितजे ३७ ऐसेंदेखतांजनकनंदिनी । मूर्च्छायेऊनपडेधरणीं । कींअग्नीनेंआहाळेकमळिणी । जायकरपोनज्यापरी ३८ तंवतेदशकंठरिपूचीजायां । उठेमूर्च्छनासांवरूनियां । शिरकमळहृदयींधरूनियां । शोककरितअपार ३९ त्रिभुवनपतीचीराणी । शोकर्णवींबुडालीतेक्षणीं । तोशोकसांगतांउलेधरणी । कवीचीवाणीकुंठित ४० ह्मणेराजीवाक्षारघुनंदना । स्मरारिमित्राजगन्मोहना । अनंतगुणसंपन्ना । कायअसेंकेलेंहें ४१ चतुर्दशवर्षेंपर्यंत । वनांतश्रमलेतीबहुत । कोमलचरणअत्यंत । कंटकहरळरूपले ४२ मजकारणेंश्रमलेतिकाननीं । आहासीतासीताह्मणोनी । तृणपाषाणहृदयींधरूनी । उद्धरिलेरघुपती ४३ मजकारणेंवालीमारिला । सूर्यसुतमित्रजोडिला । हनुमंतशुद्धीसधाडिला । शिळींबांधिलासागर ४४ सुवेळेसीयेऊनसत्वर । वैरियांयशदिधलेंअपार । कांसंपविलाअवतार । भवपुरींमजलोटिलें ४५ रविकुळवंशींश्रावणारी । त्याचीस्नुषामीजनककुमरी अयोध्याधीशातुझीअंतुरी । सोडवीलआतांमजकोण ४६ मीपरदेशींयेथेंदीन । रघुवीराकोणासीजाऊंशरण । सूर्यवंशींसंपूर्ण । डागलागलायावरी ४७ वाल्मीकानेंभाष्यकेलें । तेंअवघेंचिआजिबुडालें । जंबुकेंजाऊनमारिलें । पंचाननासीलाहेंलाहें ४८ अजापदजीवनीं । कलशोद्भवगेलाबुडोनी । दीपतेजेंवासरमणी । अडखळूनपडियेला ४९ कर्पूराचेपुतळेकेवळ । त्यांणींगिळिलावडवानळ । जगभक्षकजोकाळ । त्यासीभूतेंगिळियेलें ५०

१ रक्त. २ मान. ३ मुख. ४ दांत. ५ सीता. ६ भूमीवर. ७ स्त्री (सीता.) ८ महादेव. ९ सुग्रीव. १० श्रावणऋषीचा अरि ह्मणजे शत्रु दशरथ. ११सू. १२ बायको.

मशकाचीझडपलागतां । कनकाद्रीपडलापालथा । मृगनाळपाशींतत्वतां । बांधलाकेवींऐरावंत ५१ खद्योततेजेंकरूनी । कैसेंब्रह्मांडगेलेंजळोनी कीं पिपीलि .,चेउदरींजाउनी । सिंधूकैसासांठवला ५२ लागतांमक्षिकेचापक्षवात । भयाभीतझालाभोगीनाथ । चित्रींच्यासर्पेंअकस्मात । अरुणानुज गिळियेला ५३ तैसेंअघटितघडलेंतथ । राक्षसींजिंकिलारघुनाथ । कर्माचीगतीगहनबहुत । कैसाअर्थकरूंआतां ५४ भूधरावताररलक्ष्मण । कै साश्रीरामासिगेलाटांकून । तोअयोध्येसिजाऊन । कायसांगेलभरतातें ५५ तत्काळकौसल्यात्यजीलप्राण । होईलकैकेयीचेंसमाधान । लागेलसूर्य वंशादूषण । जाहलेंखंडनवंशासी ५६ ऐसाशोककरीमंगळभगिनी । मुखावरीमुखठेउनी । अश्रुधारास्त्रवतीनयनीं । भिजेअवनींतेकाळीं ५७ अ सोजानकीह्मणेदशमुखा । होणारनचुकेकर्मरेखा । तरींमिथिलानाथजनका । समानमजअससीतूं ५८ आतांमाहेरइतकेंचकरीं । वन्हिशेंजरचोनिझड करी । याशिरासमवेतनिर्धारीं । अग्निगर्भींप्रवेशेन ५९ सत्वनसांडीजनकनंदिनी । हेंरावणासिकळलेंमनीं । परमम्लानमुखहोउनी । गेलानिघोन सभेंत ६० रावणगेलियाजनकनंदिनी । बुडालीशोकार्णवजीवनीं । तंवतेंबिभीषणाचीराणी । सरमाआलीगुप्तरूपें ६१ तेक्षणक्षणायेऊन । घेतजा नकीचेंदर्शन । सांगेसकळवर्तमान । जेंजेंलंकेंतवर्तलेंपैं ६२ रघुपतीचेंजेंकांहित । तेंबिभीषणासिकरणेंअगत्य । तसीचसरमायेऊनितेथ । सां भाळीतजानकीतें ६३ नानासूक्ष्मरूपधरीत । राक्षसकापट्यहीजाणत । तितुकेंजानकीसश्रुतकरित । क्षणक्षणायेऊनियां ६४ असोसरमाह्मणेजा नकीसी । मायेशोककिमर्थकरिसी । रामसुखीआहेसुवेळेसी । सकळसेनेसहितपैं ६५ तुजवशकरावयायेक्षणीं । रावणेंकृत्रिमकेलीकरणी । बरवेंपाहेंवि चारुनी । मूळदृष्टीघालोनियां ६६ जनकात्मजेतवस्वयंवरीं । चापबैसलेंरावणाचेउरीं । तेंतुझ्यापतीनेंझडकरी । द्विखंडकरूनिटाकिलें ६७ त्या हूनिचापजडयेवेळे । प्रहस्तेंजाऊनकैसेंआणिलें । कृत्रिमधनुमुंडआणिलें । निर्मूनत्याचसारिखें ६८ ऐसेंसरमाजोंबोलत । तोंधनुष्यशिरजाहलेंगुप्त । जैसावातलागतांअकस्मात । दीपजायविझोनी ६९ कींजलदजाळाभीतरी । इंद्रधनुष्यउमटेक्षणभरी । तैसेंकोदंडहीझडकरी । गुप्तझालेंतेधवां ७० असोजानकीह्मणेसरमेप्रती । धन्यहोमायेतुझीमती । राक्षसांचीकापट्यगती । तुजसमजतीसर्वही ७१ मगअयोध्यापतीचीराणी । सरमाजवळ बोलाउनी । हृदयींधरिलीप्रीतीकरुनी । ह्मणेस्वामिणीहोसीलंकेची ७२ तोंदेववाणीजाहलीअकस्मात । सुखरूपआहेअयोध्यानाथ । सीतेचाआनंदअ द्भुत । अंबरामाजीनसमाये ७३ असोइकडेलंकापती । परमचिंताक्रांतएकांतीं । बोलतसेमंदोदरीप्रती । तेंचश्रोतींपरिसिजे ७४ मंदोदरीपरमस

१ सुवर्णाचा पर्वत (मेरु.) २ इंद्राचा हत्ती. ३ शेष. ४ गरुड. ५ शेषावतारी. ६ अग्नीची शय्या. ७ मेघजाळ. ८ धनुष्य. ९ आकाशवाणी.

ज्ञान । पतिव्रतागुणसंपन्न । जीचेंसौंदर्यपाहून । मीनकेतनतटस्थ ७५ मयजेचेंइच्छीतमन । घ्यावेंजानकीचेंदर्शन । तोंमंदोदरीसदशवदन । बोलताझा लातेवेळे ७६ रावणह्मणेशुभकल्याणी । तुवांजाउनीअशोकवनीं । बोधोनियांजनकनंदिनी । मजशयनींवशकरीं ७७ तूंपतिव्रतेमाजीमंडण । एवढेंका र्यदेसाधून । तंवतेमंदोदरीहास्यवदन । अवश्यह्मणोनीऊठली ७८ चंद्राचेठायींकलंक । त्याहूनविशेषमयजेचेंमुख । अशोकवनातात्काळिक । येतीझा लीपतिव्रता ७९ त्रिजटाह्मणेभूमिकुमरी । तवदर्शनाआलीमंदोदरी । ऐसेंऐकतांअंतरीं । परमसंतोषलीजगन्माता ८० तेचातुर्यसरोवरमराळिका मयजासुगंधचंपककळिका । जैसीसिंहस्थींजान्हवीदेखा । भेटोंजायगौतमीतें ८१ सीतेचियाचरणावरी । मयजाजोंनमस्कारकरी । तोंसीतेनेंधरू निझडकरी । हृदयींधरिलीप्रीतीनें ८२ कींत्यासिताअसिता । एकेठायींमीनल्यातलता । कींइंदिराआणिशिवकांता । एकीसएकभेटती ८३ एकर्शची एकसरस्वती । एककृष्णाएकगोमती । एकमंदाकिनीएकभोगावती । मूर्तिमंतपातल्या ८४ असोवरदभाकाविसरून । स्वानंदसमुद्रींझाल्यालीन । च तुःषष्टिअंतःकरण । विरूनगेलेंरघुनाथीं ८५ कींविदशास्त्रींच्याश्रुती । ऐक्यलबीऐक्यासयेती । तैशाआलिंगोनिबैसती । ब्रह्मानंदेंकरूनियां ८६ जेकांविषकंठवंद्यप्रिया । तिजप्रतिबोलेदशकंठजाया । आजिसुदीनह्मणोनियां । दर्शनजाहालेंमायेतुझें ८७ क्षणएकनिवांतराहून । मयजाबोलेसुवचन । ह्मणेसर्वांभूतींसमसमान । रघुनंदनएकअसे ८८ अनेकतरंगएकसागर । बहुतघरेंएकअंबर । अनेकमणीएकसूत्र । तैसारघुवीरव्यापकअसे ८९ एकसुवर्णबहुअलंकार । बहुतरंगएकनीर । बहुतमातृकाएकओंकार । तैसारघुवीरव्यापकलें ९० एकशरीरअवयवअपार । बहुतपत्रेंएकतरुवर बहुजलचरेंएकनीर । तैसारघुवीरव्यापकअसे ९१ एकचराचरसर्वांभूतीं । तोचनांदेअयोध्यापती । तरीदशमुखाचीकेलियाप्रीती । कायस्थितीउणें होय ९२ सकळदेहींअयोध्याधीश । तरींवेगळाकांभाविसीलंकेश । सीतेदुराग्रहविशेष । व्यर्थकांकरिशीसांगपां ९३ मयजेचाशब्दऐकुनी । हंसूनबो लेजनकनंदिनी । अभेदएकचापपाणी । सर्वांभूतींभरलासे ९४ सर्वहीघटमठजाण । कायफोडूनघातलेंगगन । अभेदएकरघुनंदन । दुजेपणतेथेंकैचें ९५ मायीकभासेजगडंबर । जैसामृगजलाचामिथ्यापूर । वंध्यावल्लीचेंपक्कफळविचित्र । मिथ्यामयलटिकेंची ९६ स्वप्नींचीसंपदापूर्ण । किंवाआ रशांतीलधन । कींदरिद्रीयाचेमनोरथपूर्ण । मिथ्यामयसर्वची ९७ मिथ्याअलंकारएकसुवर्ण । मिथ्यातरंगएकजीवन । अभेदएकरघुनंदन । तेथेंरावणकोणकैंचा ९८ ब्रह्मानंदस्वरूपावरी । नदिसेदुजेपणाचीकुसरी । तेथेंसीताआणिमंदोदरी । मिथ्याभासलटिकाची ९९ कैंचीपृथ्वीकैंचें

१ गंगा. २ यमुना. ३ लक्ष्मी. ४ इंद्राणी. ५ लहरी. ६ समुद्र.

गगनें। कैंचेंआपंतेजपवन। मिथ्यामायाकैंचेत्रिगुंण। तेथेंरावणकोठेंआहे १०० जितकेंथोरब्रह्मांड । तैसेंचआकाशप्रचंड । तेथेंघटमठहेंबंड। वे
गळेंव्यर्थभावावें १ तैसानिर्विकारजगजेठी। नचलतांद्वैतभावाच्यागोष्टी तेथेंकैंचीरावणाचीभेटी। बाह्यदृष्टीत्यजीकां २ मयजाह्मणेजानकीसी । स
र्वव्यापकअयोध्यावासी। किंवाआहेएकदेशी । सांगमजपासींनिश्चयें ३ यावरीत्रिभुवनपतीचीराणी। बोलेविदेहराजनंदिनी। ह्मणेत्रिपुटीगेल्याजे
थेंविरूनी। तटस्थवाणीनिगमाची ४ ध्येयेंध्याताध्यान। ज्ञेयंज्ञाताज्ञान। नुरेभजकभज्यभजन। सांगरावणतेथेंकैंचा ५ जेंजेंदिसेतेंतेंनाशिवं
त ॥ वस्तुएकअभेदशाश्वत। मंदोदरीआणिसीतातेथ। कोणीकडेपाहाव्या ६ दोरावरींदिसेविखार। शुक्तिकेचेठायींरजंतसाचार। तैसाचमायेचाप्र
कार। मिथ्याविकारजाणपां ७ मयकन्यासावधहोय। दृष्टीनेंसर्वपाहेअद्वय। निर्विकारवस्तुनिरामय। हाहीनसाहेशब्दजेथें ८ वस्तुअव्यक्तअनाम।
तेथेंरामहेंहीनसाहेनाम। ऐसेंजयासीकळेवर्म। आत्मारामतोचिपैं ९ ऐसाजोजाहालापरिपूर्ण। त्याससमाधीआणिविधान। बोलणेंआणिमौन। दोनी
त्याचींविरालीं १० ऐसेंजगन्मातबोलत। मयजाब्रह्मानंदेंडुल्लत। समाधीग्रासोनितटस्थ। विरालाहेतसर्वही ११ बोलणेंआणिसंवाद। खुंटोनिझा
लाअभेद। वोतलाएकब्रह्मानंद। आनंदकंदजगद्गुरू १२ आनंदजिरऊनअंतरीं। सावधझालीमंदोदरी। जगन्मातेचेचरणधरी। सद्गदअंतरींहोऊनि
यां १३ ह्मणेसंशयनिरसलापूर्ण। धन्यधन्यआजिचादिन। विदेहकन्येचेचरण। वारंवारधरीमग १४ ब्रह्मानंदेंह्मणेश्रीधर। धन्यतोदिवससाचार।
सत्संगेंआत्मविचार। सारासारहोयपैं १५ भागीरथीसर्वत्रपवित्र। परिप्रयागमहिमाअपार। तैसारामविजयपरिकर। मंदोदरीसंवादहा १६
सर्वत्रांसुलभतेभीमा। परीपंढरीसआगाधमहिमा। स्नानकरितांकर्माअकर्मा। पासूनिमुक्तहोइजे १७ असोसीतेचीआज्ञाघेउनी। स्वधामागेली
मयनंदिनी। रावणाप्रतिजाउनी। वर्तमानसांगतसे १८ तप्तलोहावरीउदकपडलें। तेंमाघारेंनियेएकवेळे। परीजानकीकदाकाळें। वशनव्हेतुह्मा
सी १९ मृगजळींबुडतांअगस्ती। तमकूपींपडेलगभस्ती। हेंहीघडेपरीसीतासती। वशनोव्हेतुह्मातें १२० जेगोष्टीनेंहोयअनर्थ। आपुल्याकुळा
चाहोयघात। ऐशियाबुद्धीतेंपंडित। काळत्रयींनवर्तती २१ हातीचेंटांकूनिसुवर्ण। कांबळेंचघ्यावेंशेण। गोडशर्करावोसंडून। राखकांमुखींघालावी।
२२ मुक्तेंसांडोनिपरिकरें। कांपदरींबांधावींखापरें। वोसंडोनिरायकेळेंआदरें। अर्कीफळेंकांभक्षावीं २३ याकरितांद्विपंचवदना। सोडावीरामाची
अंगना। कायावाचामनेंजाणा। रघुनंदनाशरणरिघावें २४ परसतीचाअभिलाष। महापुरुषासठेवणेंदोष। बळवंतावरीबांधणेंकांस। मगअनर्थासकायउणें

१ आकाश. २ पाणी, अग्नि व वायु. ३ सत्व, रज व तम. ४ जनककन्या. ५ ध्यान करण्यास योग्य व ध्यान करणारा. ६जाणण्यास योग्य. ७ रुपें. ८ मयासुराची कन्या मंदोदरी.

२५ विवसींहेपरमसीता । अनर्थकारकघोरवनिता । हेनेऊनद्यावीरघुनाथा । तरीचतुह्मांकल्याण २६ महासर्पउसांघेउनी । कैसानिजेलसुखशयनीं । बळेंचगृहालाविलाअग्नी । मगअनर्थासीकायउणें २७ परद्रव्याचाअभिलाष । जाणोनिप्राशनकरणेंविष । करितांपरनिंदाद्वेष । मगअनर्थासीकायउणें २८ परमसाधुबिभीषण । तुमचाअविवेकदेखोन । अयोध्यापतीसगेलाशरण । जन्ममरणचुकविलें २९ परमप्रतापीरघुनंदन । उदधीवरीतारिलेपाषाण । हाप्रतापतुह्मीजाणून । द्वेषबुद्धीकांधरितां ३० ऐशियाशब्दसुमनेंकरून । मयजेनेंपूजिलारावण । मगप्रत्युत्तरहांसोन । देताझालातेकाळीं ३१ प्रियेतूंबोलसीवचनें । तींमजमानलींबहुतगुणें । परीआपुलापुरुषार्थटाकणें । तरीजिणेंव्यर्थलोकीं ३२ चिरंजीवजाहलाबिभीषण । प्रळयींतरीं पावेलमरण । तोंवरीदेहलोभधरून । बैसतांकायसार्थक ३३ कल्पपर्यंतजीउनी । पडिलेंशरीरबंदिखानीं । यापुरुषार्थासीशुभकल्याणी । मानी कोणसांगपां ३४ आदिपुरुषरघुनंदन । हेंमीजाणेंसर्ववर्तमान । तोमजसींयुद्धकामनाधरून । सागरउतरूनिआलाआहे ३५ त्याचीवासनानपुरवितां । कदामाघारींनेदीसीता । तरीमीआपल्यापुरुषार्था । दावोनिरायवाजिंकीन ३६ ऐसेंऐकोनितेअवसरीं । चिंताक्रांतहोऊनिमंदोदरी । प्रवेशलीनिजमंदिरीं । क्लेशचक्रींपडीयेली ३७ असोआतांयावरी । रावणचढलागोपुरीं । जैसाबलाहकपर्वतशिखरीं । कृष्णवर्णउतरला ३८ चपळेहूनतेज आंगळें । आंगींअळंकारमिरवले । दाहीछत्रेंतेवेळे । मस्तकावरीविराजती ३९ भोंवतेसेवकजनबहुत । उपभोगदेतीसमस्त । इकडेबिभीषणरामासी दावित । रावणगोपुरींचढलातो ४० श्रीरामह्मणेतेअवसरीं । हापरमउंचसुवेळगिरी । अवघेमिळोनियांवरी । लंकापुरीपाहूंचला ४१ ऐसेंबोलतांअयोध्याधीश । उठलेतत्काळकपीपुरुष । सुवेळाचळींआसमास । चढलतेव्हांवायुवेगें ४२ जैशाकनकाचळावरी । चढल्यानिर्जरांच्याहारी । तैसा वानरांसहतेअवसरीं । अयोध्याविहारीचढतसे ४३ रघुपतीचेचदोनीकर । धरितीबिभीषणसूर्यकुंमर । सुवेळाचळींरघुवीर । कैसाशोभलातेकाळीं ४४ उदयाचळावरीबाळामित्र । ऐरावतावरीसहस्रनेत्र । कैलासावरीकर्पूरगोर । त्रिभुवनेश्वरदिसेतेवीं ४५ जोलावण्यामृतसागर । स्मरारीमित्रमनोहर । झळकतीसमुद्रदत्तअलंकार । चपळेहूनितेजागळे ४६ तेणेंशोभलाअयोध्यानाथ । दिव्यपीतवसनविराजित । असोगोपुरावरीलंकानाथ । विलोकित रामाकडे ४७ वानरांसहितरावणारी । शोभतसेसुवेळाद्रीवरी । जैसाइंद्रसकळसुरवरीं । वैकुंठपतीवेष्टिला १४८ कींअनंतश्रुत्यर्थसमवेत । तो वेदोरायणविराजित । कींबहुतवृक्षांसहित । कल्पद्रुमविराजे ४९ तैसामहावीरींवेष्टित । शोभतसेसीताकांत । परीतेसमर्यासूर्यसुत । कर्मअद्भुत

१ दुःखरुपीभोंवरा. २ नगरचा दरवाजा. ३ मेघ. ४ वीज. ५अधिक. ६ शोभती. ७ मेरुपर्वत. ८ देव. ९ हात. १० सुग्रीव. ११ इंद्र. १२ शंकराचा मित्र राम.

करिताझाला ५० कुंजरदृष्टींदेखोन। उगानराहेपंचाननें। कोणासनपुसतांमित्रनंदन । अकस्मातउडाला ५१ वज्रपडेपर्वतशिखरीं । तैंसासु
ग्रीवतेअवसरीं। येऊनआदळलारावणावरी। परमआवेशेंकरूनियां ५२ सव्यहस्तचपेटेंतळीं । दाहीछत्रेंखालींपाडिलीं। वामहस्तघायेंतळीं। मुगु
टसर्वपाडिले ५३ जैसीविंध्याद्रीवरीअकस्मात । विद्युल्लतायेऊनपडत । तैसेंअर्कजेंकेलेंविपरीत । लंकानाथघाबरला ५४ मगलत्ताप्राहरतेवेळां।
सुग्रीवानेंसमर्पिला। सर्वेंचहृदयींदीधला। मुष्टिघाततेवेळीं ५५ मल्लयुद्धपरमअद्भुत। झालेंएकघटिकापर्यंत । रावणह्मणेवालीऐसेंत्वरित । धरू
निनेईलसुग्रीवहा ५६ रामापासींनेऊनत्वरित । विटंबीलसूर्यसुत । पळावयासीनिश्चित । मार्गकोठेंदिसेना ५७ षोडशखणांचेंगोपुर। तयावरू
निमहावीर। कोसळलेंतेव्हांलंकानगर । गजबजिलेंएकदांची ५८ एकह्मणतीआलाहनुमंत। नगरजाळावयासमस्त । एकह्मणतीसमुद्रांत। लंका
घालीलपालथी ५९ असोतेव्हांदशकंधर। चुकवोनियांपैंसत्वर। पळालावेगेंतस्कर । जागाहोतांगृहस्वामी ६० मृगेंद्राचेकवेंतूनदेख । पूर्वभाग्यें
सुटलाजंबुकं। कींभुजंगकवेंतूनमूंषक। पळोनिजायस्वस्थळा ६१ असोसुग्रीवतेथोनीउडला। सुवेळागिरींपावला। एकचजयजयकारझाला। हृदयीं
धरिलारघुनाथें ६२ वृंदारकगगनींहुनी। पुष्पेंवर्षतीक्षणक्षणीं । धन्यसुग्रीवह्मणोनी । तर्जनीमस्तकडोलविती ६३ श्रीरामह्मणेसूर्यकुमरा । आ
जिबृहस्पतीचेवलाविचारा तैसातूंमहावीरा। केलेंहोतेंसविपरीत ६४ समीपअसतांसर्वदळें। पुढेंउडीनघालावभूपाळें। असोजयपावलाशीघ्रकाळें।
हाचलाभथोरआह्मां ६५ तेव्हांआणोनिपुष्पजाती । वानरींपूजिलाकिष्किंधापती । दळभारेंसीसीतापती। पूर्वस्थळासउतरला ६६ सकळजु
त्पतीसहरघुनंदन । बैसलातेव्हांसभाकरून। सुग्रीवआणिबिभीषण। निकटजवळींबैसला ६७ राजाधिराजरामचंद्र। जोचातुर्यगुणसमुद्र। राजनी
तिबहुतविचार । करिताझलातेसमयीं ६८ ह्मणेआतांद्विपंचवदन। सीतानेदींयुद्धाविण । यावरीमगबिभीषण । बोलताझालातेधवां ६९ ह्मणेसाम
दंडभेदकरून । शत्रुकीजेआपणाधीन। वोळखूनिसमयाचेंचिन्ह। तैसेंचतुरींवर्तावें १७० मंत्रेंआकर्षिजेविखार। उदकेंशांतविजेवैश्वानर। वेदांतज्ञानें
भवसमुद्र। उतरूनजावेंपैलतीरा ७१ कामक्रोधदिशत्रुथोर। विवेकेंजिंकावेसाचार । भक्तिबळेंसर्वेश्वर। आपणाधीनकरावा ७२ शमदमबळेंक
रून। मनोजयकरितीसज्ञान। व्युपत्तीच्याबळेंकरून। अर्थकाढितीपंडित ७३ पाषाणाखालींसांपडेहात। तोयुक्तीनेंकाढावाअकस्मात। बळेंकरू
नओढितांप्राप्त। व्यथामात्रहोयपैं। ७४ तैसेंआधींसामकरून। वशकरावाद्विपंचवदन। समयोचितजाणेज्ञान। ऐसाशिष्टायीसपाठवावा ७५

---

१ हत्ति २ सिंह. ३ पर्वत. ४ वीज. ५ रावण. ६ सुग्रीव. ७ कोल्हा. ८ सर्प. ९ उंदीर. १० देव. ११ आकाश. १२ सत्वर. १३ रावण.

सभेसींबैसतांजाऊन । दिसेजैसाबृहस्पतीप्रवीण । सरस्वतीतयासीप्रसन्न । समयोचितशब्ददेत ७६ वेदशास्त्रपुराण । हींजयासीकरतलामळपूर्ण । तेजस्वीजैसाचंडकिरण । सभास्थानींतेविदिसे ७७ जरीवरीलोटलेशत्रुसमस्त । तेसमयींजैसावैवस्वत । जैसाकलशोद्भवनिश्चित । शत्रुसागरप्राशावया ७८ हृदयनिर्मळकपटरहित । भोळाजैसाउमाकांत । श्रेष्ठलेंसभेंतविराजत । शचीनाथजापरी ७९ ईश्वरींजयाचेंप्रेम । संतासींमित्रभावपरम । आचरेसदांसत्कर्म । क्रोधकामदवडोनियां १८० यालागींजगद्वंद्याराघवा । याचिन्हींमंडितबरवा । ऐसाशिष्टायीसपाठवावा । मयजाधवाजवळिकें ८१ तरीनरवानररीस । कोणासपाठवूंशिष्टायीस । तुह्मीआह्मीकिष्किंधाधीश । विचारूनएककाढावा ८२ वारेंगचक्रांतरिघोन । स्वकार्यसाधीपंचानन । कींएकलाचिजाऊनसुपर्ण । अमृतकुंभघेऊनआला ८३ एकलाचजाऊनगुरुपुत्र । साधूनसंजीवनीमंत्र । कींसागरउडोनिरुद्रावतार । शुद्धीकरूनिपातला ८४ तैसेंचिकार्यसाधून । सत्वरयेईपरतोन । ऐसापाठवावानिवडोन । शीघ्रकाळींतत्वतां ८५ ऐसेंबोलतांबिभीषण । परमसंतोषलारघुनंदन । ह्मणेधन्यतुझेंज्ञान । सकळकळाप्रवीणहोसी ८६ रत्नराशीपडल्याअपार । त्यांतअनर्घरत्नप्रभाकर । परीक्षकनिवडितांतैसावीर । वालिपुत्रकाढिला ८७ बिभीषणह्मणेराजीवनेत्रा । जलदवर्णाचारुगात्रा । पद्मोद्भवजनकास्मरारिमित्रा । अंगदासीपाठवावें ८८ हासर्वलक्षणींआहेचतुर । जैसानवग्रहांतदिनकर । कींविखारांतधरणीधर । तैसावानरांतअंगदहा ८९ कींशास्त्रांमाजीवेदांत । कींशस्त्रांतसुदर्शनलखलखित । कींपक्ष्यांमाजीविनतासुत । बळअद्भुततैसाहा १९० ऐकतांतोषलारघुनंदन । ह्मणेहेंतुह्मीउत्तमनिवडिलेंरत्न । तंवतोअंगदकरजोडुन । रघुपतीप्रतिबोलत९१ ह्मणेपुराणपुरुषापरमानंदा । भक्तहृत्पद्मकोशमिलिंदा । जगदंकुरमूळकंदा । आज्ञाकायतेमजद्यावी ९२ राजीवाक्षारणरंगधीरा । असुरकाननवैश्वानरा । जनकजामाताअतिउदारा । आज्ञाकायतेमजसांग ९३ चराचरफलांकितद्रुमा । विशाळभाळपूर्णकामा । अजेंअजितआत्मारामा । आज्ञाकायतीमजसांग ९४ रावणआणिकुंभकर्ण । येक्षणींयेथेंआणूंबांधोन । कींहेलंकाउचलोन । घालूंपालथीसागरीं ९५ ऐकोनअंगदाचेबोल । संतोषलातमाळनील । ह्मणेधन्यतोवालीपुण्यशील । अद्भुतबळजयाचें ९६ कक्षेसीदाटोनिरावण । चतुःसमुद्रींकेलेंस्नान । त्यापोटींपुत्रनिधान । बळगहनतैसेंचतुझें ९७ तरींलंकेसींजाऊनयेसमयीं । ह्मणावेंजानकीसदेईं । रावणासीकरीशिष्टाई । सामोपचारेंकरूनियां ९८ तुवांमजनकळतांयेवून । चोरिलेंजानकीचिद्रत्न । तरीतेक्षमाकेलीपूर्ण । देयींआणोनिझडकरी ९९ सीतादेतांचतत्काळ । तूंलंकेसीनांदसीअचळ । नाहींतरीनिर्मूळ । तुझेंक

---

१ हत्तींचा समुदाय. २ सिंह. ३ गरुड. ४ मारुति. ५ सत्वर. ६ अमूल्य रत्न. ७ मेघवर्ण. ८ ब्रह्मदेवाचा पिता. ९ महादेव. १० सूर्य. ११ शेष. १२ जन्मरहित.

रीननिर्धारें २०० ऐसेंऐकतांवालीसुत । नमस्कारिलाजनकजामात । आज्ञाघेऊनत्वरित । गगनपंथेंउडालाहो १ दशमुखाचेसभेआंत । उतर
ताझालाअकस्मात । कींवानररूपेंजैसाआदित्य । एकाएकींप्रगटला २ कींवैकुंठावरूनिसर्पारी । अवचितांयेतउर्वीवरी । कींकर्मभूमीसनिर्धारी । यो
गभ्रष्टउतरला ३ दृष्टींदेखतांअंगदवीर । चमकलेसभेचेअसुर । शस्त्रेंउभारूनिसमग्र । सरसावलेठायींठायीं ४ ह्मणतीएकविआलावानर । तेणें
पूर्वींजाळिलेंलंकानगर । सुग्रीवेंगोपुरींयेऊनिसमग्र । छत्रेंपाडिलींरावणाचीं ५ हानिर्भयनिःशंकबहुत । एकलाचिआलासभेआंत । असोचहूंकडे
तारासुत । पाहेन्याहाळूंनिसभेतें ६ मगबोलेवालिनंदन । सभेसआलाजोपरस्थळींहून । त्यासिनपुसतीसभाजन । तरीतेशतमूर्खजाणावे ७ सृ
गालसभेंतपंचानन । येतांदचकतीअवघेजन । कींदेखतांविनतानंदन । बिखारजैसेदचकती ८ कींउदयायेतांदिनकर । दिवाभीतेंविटतीसमग्र । कीं
इंदुविलोकितांतस्कर । कंटाळतीजैसेकां ९ कींपंडितयेतांसभेप्रती । मनींविटतीअल्पमती । कींतेकोकिळागर्जतीवसंतीं । वायसमानितीसंताप ।
२१० दृष्टींदेखतांसंतभक्त । निंदकविटतीसमस्त । तैसेतुह्मीराक्षसउन्मत्त । मजदेखतांत्रासलेती ११ मगसभास्तंभपृष्ठींघालून । पुच्छासनींबैसे
वालीनंदन । उंचदिसेरावणाहून । तेजेंकरूनिविशेष १२ ह्मणेगर्विष्ठादशवदना । मीआलोंअसेंकवणयाकारणा । तेंकांनपुससीमलिना । कोणेविचा
रेंसांगपां १३ मीआहेंशक्रात्मजसुत । अयोध्यापतीचाअसेंदूत । तरीमीशिष्टायीसआलोंयेथ । अंतरतुझेंपाहावया १४ याउपरीवीरअंगद । रा
वणासीकरीलबोध । तेंसंतींपरिसावेंविशद । ब्रह्मानंदेंकरूनियां १५ रविकुळभूषणरघुवीर । जोसाधुहृदयपंजरकीर । तोब्रह्मानंदश्रीधर । अभंग
साचारनविटेकदां १६ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मिकिनाटकाधार । सदांपरिसोतभक्तचतुर । चतुर्विंशतितमोध्यायगोडहा २१७
शुभंभवतु । अध्याय २४ ओव्या २१७ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

१ सूर्य. २ गरुड. ३ पृथ्वीवर. ४ राक्षस. ५ कोल्हा. ६ सिंह. ७ इंद्राचा. पुत्र वाली त्याचापुत्र मी अंगद. ८ रामाचा. ९ मन.

श्रीगणेशायनमः । । श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । पूर्वींक्षीरसिंधुमंथुनी । चतुर्दशरत्नेंकाढिलींनिवडूनी । तेवींरामकथार्णवशोधुनी । रामविजयका
ढिला १ दह्यांपासूनिनिघेनवनीत । कींस्वातीतोयापासावमुक्त । कींदशरथापासावरघुनाथ । महिमाअद्भुततयाचा २ कींज्ञानापासोनिशांती ।
शांतीपासूनिविरक्ती । कींविरक्तीपासोनिनिवृत्ती । पदविशेषपाविजे ३ तैसावाल्मीकमतीचाविस्तार । तोहारामकथाब्धिसाचार । याचापावावयापैल
पार । वक्ताशक्तनव्हेची ४ जोपीडिलादरिद्रेंकरून । त्यासमार्गींसांपडेबहुतधन । परीतोयथाशक्तीकरून । मोटबांधीजैसीकां ५ तैसायथामतीक
रून । रामविजयनिवडिलासंपूर्ण । असोपूर्वाध्यायींवालीसुत । रावणासन्मुखबैसला ६ मुकुटावरीशोभेदिव्यमणी । तैसाअंगदविराजेपुच्छासनीं । ह्म
णेदशमुखाऐकेंश्रवणीं । शब्दरत्नेंअतिसुरस ७ नरदेहासीयेऊनपाहीं । कीर्तिउरवावीभुवनत्रयीं । जनधन्यह्मणतीसर्वही । मागुतीपाहींबहुकाळ ।
८ विवेकसद्बुद्धीच्याबळें । दुर्बुद्धीत्यजावीकुशळें । संतसंगतींरसाळें । वचनेंहृदयींधरावीं ९ कोणाचेंहेळणनकरावें । दुष्टवचननबोलावें । पराचे
गुणजाणोनवरवे । परोपकारकरावा १० यापरीवर्त्तणुकदेखोन । संतुष्टहोतीब्राह्मण । तेसदांचिंतितीकल्याण । तरीचधन्यसंसारीं ११ सर्वांभूतीं
जगन्निवास । यास्तवनकीजेकवणाचाद्वेष । वर्मशब्दानेंमनविरस । कोणाचेंहीनकरावें १२ कामक्रोधमदमत्सर । हेशत्रुघालावेबाहेर । नाशवंतजा
णोनिशरीर । सारासारजाणिजे १३ सकळसत्कर्माचरण । करावेंवेदाधारेंकरून । मीकर्त्ताहाअभिमान । सहसाहीनधरावा १४ जैसेंजलावरीज
लजपत्र । परीनभिजेअणुमात्र । तैसींसत्कर्मैंकरूनपवित्र । नलिंपावेंकोठेंही १५ मनोजयातेंकरुनी । मतियोजावीभगवद्भजनीं । जगदाभास
मिथ्यामानोनी । आत्मस्वरूपींरमावें १६ परधनआणिपरदारा । येथेंचित्तनघालींराजेंद्रा । सद्भावधारिजेबरा । सद्गुरुवचनींसर्वदां १७ सत्समा
गमींचित्तठेऊन । त्यागावेदूरदुर्जन । क्लेशकाळआलियापूर्ण । स्वधर्माचरणनसांडावें १८ यथान्यायराज्यकरीं । दुष्टतितुकेआधींसंहारीं । भगवद्भजनीं
अहोरात्रीं । आपलीतनुझिजवावी १९ शमदमादीउपरती । दयाक्षमातितिक्षाशांती । याजवळरक्षाव्यानृपती । अहोरात्रप्रीतीनें २० भक्तिवैरा
ग्यज्ञान । आनंदसद्विद्यासमाधान । जवळीरक्षावींअनुदिन । आत्मप्राप्तीकारणें २१ दैवेंभाग्यविद्याहोयअपार । त्याचागर्वनधरावाअणुमात्र ।
अथवाकाळांतरींआलियादरिद्र । परीधीरनसांडावा २२ यालागींदशमुखाअवधारीं । माझींशब्दरत्नेंश्रवणकरीं । तरीलांअयोध्यापतीचीमैत्री । स
र्वभावेंकरावी २३ श्रीरामकेवळगुणनिधान । दुजयाचेअपराधदोषगुण । तात्काळजायविसरून । अंतःकरणशुद्धीसदा २४ पराचेऐकोनिसद्गुण
स्वयेंवाखाणीरघुनंदन । एकबाणएकवचन । एकपत्नीव्रतीजो २५ त्यारघुपतीससखाकरुनी । अर्पिजेआतांजनकनंदिनी । मगतूंअक्षयीलंकाभुव

नीं । चंद्रार्कवरीनांदें कां २६ तूंजयाचाह्मणविसीभक्त । तोशिवरघुपतीसध्यात । त्यासीवैरकरितांव्यर्थ । स्वामिद्रोहीहोसीतूं २७ सनकसनंदन
सनत्कुमार । मुख्यविरंचीआणिपुरंदर । हेरघुपतीचेआज्ञाधार । तरितोमित्रनकरीकांरे २८ जोवेदउदयाचळदिनकर । जोमहामायेचानिजवर ।
तोहाअयोध्यानाथउदार । तरीतोमित्रकरीतूं २९ जोसुनीळचिद्घनगर्भ । जोअनंतब्रह्मांडांचाआरंभ । गुणसागरसीतावल्लभ । तरीतोमित्रनकरीकां
रे ३० कमलोद्भवकमलावर । कपालधरतिघेज्याचेमित्र । तोहाजगद्वंद्यरघुवीर । तरितोमित्रलांकरावा ३१ वेदशास्त्रपुराणेंजाण । नारदादिगातीज
याचेगुण । तोहादशशतमुखांगशयन । तरितोमित्रनकरीकांरे ३२ शतकोटीअपराधकरून । तोजरीपरतोनआलाशरण । तरीतयावरीरघुनंदन ।
सर्वांहूनप्रीतिकरी ३३ भक्तिभावेंअर्पितांतीळ । राममानीजैसाकनकाचळ । जोभक्ताचाहोऊनद्वारपाळ । अंतरबाह्यरक्षीतपैं ३४ तरीत्याद्विपंचरथ
नंदना । शरणरिघेद्विपंचवदना । जनकजाहेममकन्या । भावेंअर्पीरघूतमा ३५ दशकंठातूंपरमसज्ञान । टांकिलींवेदांचींखंडेंकरून । तरीपद्मिणीकुळ
भूषण । सखाकरींसर्वस्वें ३६ ऐसींअंगदाचींवचनें । जींविवेकभूमीचींनिधानें । कींभक्तिसागरींचींरत्नें । दशकंठासीसमर्पिलीं ३७ यावरीतोदशकं
ठधर । परमदुर्बुद्धीअविचार । घृतेंशिंपिजेबैश्वानर । तैसाक्षोभलातेकाळीं ३८ साधूचेंवर्मलक्षून । छळितीजेकांदुर्जन । तैसाअंगदाप्रतिरावण । बोल
ताझालातेकाळीं ३९ ह्मणेरेमर्कटाअविचारा । कोणाचातूंपालेखाइरा । मजरावणासीपामरा । शिष्टाईकरूंआलासी ४० जैसेंअग्नीपुढेंतृण । कींशिवा
पुढेंपंचबाण । कींमृगेंद्रासीगुण । शिकवूंजंबुकपातला ४१ मर्कटातुझापिताकोण । तेंतूंसांगमजलगुन । यावरीताराहृदयरत्न । प्रतिवचनदेतसे ४२
माझापितापुससीकोण । तेंतूंनेणसीदुर्जनाअज्ञान । जेणेंतुजकक्षेंतदाटून । चतुःसमुद्रींस्नानकेलें ४३ मगमाझेपालखावरीदेख । तुजबांधिलाजैसामशक
तुझ्यादाढ्यामिशासकळिक । म्यांचउपडिल्याबाळपणीं ४४ माझ्यामूत्रोदकेंकरून । मशकातुझेंदाटलेंवदन । मगतुझापितायेऊन । भिक्षामागेवा
लीतें ४५ तैंतुझेमुखासीमसीलाऊन । शिरींपांचपाटकाढून । लंकेंतदिधलातुजभिरकाऊन । पायींधरूनतेकाळीं ४६ ऐसाशक्रसुतमहाबळी । तूंगुं
तलासीज्याचेकक्षेतळीं । तयाचासुतयेकाळीं । शिक्षातुजकरूंआलों ४७ तूंपुसिलेंकवणाचादूत । तरीअयोध्यापतीरघुनाथ । तुझेउरावरीचापअद्भुत
जेणेंउचलोनिमोडिलें ४८ तेणेंताटिकामर्दून । वीसकोटीपिशिताशन । सेनेसहितसुबाहूमारून । मारीचउडविलाबाणघातें ४९ तुझीभगिनीशूर्प
नखा । जेणेंकेलीनिर्नासिका । तोसुमित्रात्मजस्मरारिसखा । त्याचादूतमीअसें ५० वधोनियांखरदूषण । निष्कंटककेलेंजनस्थान । त्यारामपंचान
नाचीवस्तूचोरून । घेऊनआलासीजंबुका ५१ होमशाळेंतरिघोनश्वान । पळेपुरोडाशघेऊन । कींदेवगृहांतमलिन । हिंसकजैसासंचरे ५२ कींघरां

तनसतांघरधनी । तस्करसंचरेकोशसदनीं । तैसीजानकीउचलोनी । आलासिघेऊनपतिता ५३ त्यातुजचोराचाकाढीतमाग । सुवेळेसीआलासीतारं
ग । तुझेआयुष्याचीभरलीसीग । तेंतूंनेणसीशतमूर्खा ५४ पुच्छींपददेतांदेख । खवळेजैसादंदशूक । तैसाप्रतिउत्तरदेख । अंगदासीदेतसे ५५ ह्मणेरे
मर्कटासहसैन्य । वानरांसहरामलक्ष्मण । क्षणेंटांकवीनगिळोन । कुंभकर्णासमांगोनियां ५६ सुरांसहसहस्त्रनयन । बंदींघातलाआकर्षून । तेथेंमा
नवरामलक्ष्मण । जीतचिआणीनधरुनी ५७ गरुडेंसर्पमस्तकींचामणी । नेलातोजरीदेईलआणोनी । तरीतुह्मासजनकनंदिनी । प्राप्तहोईलमाघा
रीं ५८ गजमस्तकविदारून । मुक्तेंघेऊनगेलापंचानन । तोभिऊनदेईलपरतोन । तरीजानकीनेदींमी ५९ अरविंदमाळागुंफोन । इंद्रदेईमजला
गून । छत्रधरीरोहिणीरमण । सहस्त्रकिरणदीपिकाधरी ६० रसनायकवाहेपाणी । वस्त्रेंधूतसदांअग्नी । गृहींचाकेरकाढुनी । लोकप्राणेशटाकीतसे
६१ ऐसामीसमर्थदशवक्र । तेथेंकायसेनरवानर । मागेंएकपालेखाइर । चोरूनलंकेंतआलाहोता ६२ तेणेंउपाडितांअशोकवन । आह्मीसभेसआ
णिलाधरून । पुच्छासलावितांअग्न । नगरजाळूनिपळाला ६३ तोपुढेंभेटलाजरीवानर । तरीतत्काळआधींकरीनचूर । मगह्मणेवालिपुत्र । ऐक
मशकाराक्षसा ६४ तुझेंअसंख्यदळसंहारून । टांकिलेसातपुत्रमारून । इंद्रजितविवरींकोंडून । अशोकवनविध्वंसिलें ६५ तैंतुझेंबळरावणा । को
ठेंगेलेंहोतेंखळामलिना । तुजशिक्षाकरावयादुर्जना । पुनःआलासेमागुती ६६ त्रिभुवनपतीसीतावल्लभ । जोत्रैलोक्यारंभस्तंभ । त्यासमानवमानि
तोसीतूंरासभ । दशमुखाहोययथार्थतूं ६७ इतरवोहळआणिभागीरथी । वरकडगजआणिऐरावती । चिंतामणीसूर्यरथीं । इतरअश्वांसमाननोहे ६८
खद्योतआणिचंडकिरण । कींवायसआणिसुपर्ण । तैसेवानरआणिवायुनंदन । समाननहोयसर्वथा ६९ परिसआणिइतरपाषाण । वरकडपशूआणि
शिववहन । भगणेंआणिरोहिणीरमण । नव्हेसमानराक्षसा ७० इतरपर्वतआणिकनकाचळ । इतरकिरडेंआणिफणिपाळ । तैसामनुष्यासमानतमा
ळनीळ । अपवित्रातूंकेंविह्मणसी ७१ दशमुखातूंबस्तहोसी । शिववरदेंमातलासी । सीतादेवीनिश्चयेसी । आदिमायाभवानी ७२ रणमंडळहेंहो
मकुंड । राक्षसआहुतीपडतीलउदंड । शेवटींपूर्णाहुतीप्रचंड । तुझीपडेलदशमुखा ७३ तुवांकेलेंवेदाध्ययन । जैसारासभपृष्ठींचंदन । कींषड्रसां
माजीनेऊन । दर्वीपाकींफिरवीजे ७४ दशमुखातूंवनचर । तुजवधावयापारधीरघुवीर । सुवेळाचळींप्रतापशूर । येऊनउभाठाकला ७५ अंगदश
ब्दपरमतीक्ष्ण । खोंचतहृदयींजैसेबाण । परमक्रोधेंरावण । वालिनंदनाप्रतिबोले ७६ ह्मणेरेमर्कटावनचरा । भूभारअससीतूंखरा । तुझेपित्यास
मारूनितारा । रामेंसुग्रीवासीदीधली ७७ पितृसूडनघेववेतुझेनी । तरीप्राणदेसमुद्रजीवनीं । अथवामाझेपाठीसीयेउनी । रिघेवेगींमशकारे ७८

वधोनीसूर्यनंदन । तुजकिष्किंधेचेंराज्यदेईन । तुझीमाताव्यभिचारिण । सुग्रीवासीतिणेंवरिलें ७९ सुग्रीवआणिरघुवीर । तुझेमुख्यशत्रुसाचार । अंगदह्मणेशक्रकुमर । रामबाणेंमुक्तजाहला ८० राघवप्रसादेंकरुनी । वालीअक्षयसायुज्यसदनीं । दशमुखातुजयेक्षणीं । शिक्षालावीनजाणपां ८१ माझियापाणिप्रहारेंकरुनी । दाहीमुखेंटांकीनछेदुनी । तुझापुरुषार्थत्रिभुवनीं । जाणअसेअपवित्रा ८२ सहस्रार्जुनाचेबंदींजाऊन । पडिलासितूंकि तेकदिन । आतांदावावयावदन । लाजकैसीनवाटे ८३ मगबळीग्रहासजाऊनदेखा । बंदींपडलासितूंमशका । तुजदासीझेलितीकीटका । कक्षेसदा टितीघडिघडी ८४ ऐसापुरुषार्थीतूंदेख । नलाजसीदावितांमुख । तुझेछेदावयादाहीमस्तक । रघुवीरसिद्धजाहलासे ८५ ऐसेंऐकोनिदशकंधर । द्विजपंक्तीनेंचाविलेअधर । सवेगवोढिलेंशस्त्र । विद्युत्प्रायतेकाळीं ८६ सेवकांसिह्मणेदशकंठ । धराधरारेमर्कट । तोंचौघेराक्षसबळकट । धांवोनि यांधरितेजाहले ८७ अंगदजाऊनदृढधरिला । वालिपुत्रेंदेखोनितेवेळां । अद्भुतपराक्रमप्रकटकेला । क्षणमात्रनलागतां ८८ कृतांतकिंकाळीसमान । हांकेसरसेंगाजवीगगन । रावणाचेहृदयींपूर्ण । पुच्छघायदीधला ८९ रावणमस्तकींचामुगुटतेजाळ । पदांगुष्ठेंउडविलातात्काळ । उर्ध्वपंथेंउतावेळ । मंडपमस्तकींबैसला ९० चौदागांवेंजोविस्तीर्ण । प्रभेसउणाचंडकिरण । तोघेऊनवालिनंदन । गेलाक्षणनलागतां ९१ भुजींचढलेचौघेजण । त्यां चेअंतरिक्षगेलेप्राण । लोंबतीप्रेतेंहोऊन । वालीनंदनपुढेंजाय ९२ आलादेखोनिवालिसुत । आश्चर्यकरीजनकजामात । अंगदउतरलाअकस्मात । कपिनाथहर्षला ९३ दंडींचींप्रेतेंसोडवुनी । मंपडतेव्हांठेविलाधरणीं । त्रिभुवनपतीचेचरणीं । मस्तकअंगदेंठेविला ९४ प्रीतीनेंयेऊनिमिलिंद । सेवीपद्मकोशींचासुगंध । तैसाचवीरअंगद । रघुवीरपदाब्जींमीनला ९५ मगतोजगदानंदकंद । हृदयींआलिंगीअंगद । सकळकपींसीआनंद । अंगदासीभेटतां ९६ रावणाचामुकुटतेवेळां । अंगदेंरामापुढेंठेविला । तोबिभीषणाचेमस्तकींघातला । रघुनाथेंतेसमयीं ९७ अंगदासह्मणेरघुनं दन । मंडपयेथेंआणिलासउचलान । पुढेंकोठेंबैसेलबिभीषण । सिंहासनघालूनियां ९८ ऐसेंवालिसुतेंऐकोनी । मंडपउचलिलातेक्षणीं । शेष मस्तकींधरीअवनी । तैसाघेउनजातसे ९९ जेथिंचातेथेंमंडपठेविला । सुवेळेसीपरतोनआला । राक्षससमुदायतेवेळां । परमाश्चर्यमानित । १०० ह्मणतीयेवढापुरुषार्थकरूनी । राक्षसेंद्रासीगांजोनी । मंडपगेलाघेउनी । सेवेंचआणूनठेविला १ असोराघवापुढेंवालिनंदन । सांगेलं केचेंवर्तमान । नानापरीबोधिलारावण । परितोनमानीचदुष्टात्मा २ गिरीवरीवर्षेजलधर । परितेथेंनराहेनीर । तैसाबोधिलादशकंधर । परिकाहीं चनुपतिष्ठे ३ दुग्धेंन्हाणिलावायस । परितोनहोयराजहंस । दह्यांमाजीकोळसाबहुवस । घालितांउजळनव्हेची ४ सिकतासिजविलीबहुसाल । प

रितेनव्हेचमवाळ । कींपरिसनेऊनतात्काळ । खापराव्यर्थलाविला ५ जन्मांधापुढेंदर्पणा । कींबधिरापुढेंरुद्रवीणा । परीसारासारसमजेना । शतमूर्खांसी जैसेंकां ६ कींशर्करेमाजीनेऊन । वृंदावनठेविलेंबहुदिन । परीत्याचेंअंतरपूर्ण । गोडनव्हेअणुमात्र ७ षोडशोपचारेंपूजिलेंप्रेत । तेंसर्वगेलेंजैसेंव्य र्थ । तैसाबोधिलालंकानाथ । परितोनायकेसर्वथा ८ जोंवरीशशीचंडकिरण । तोंवरीकेलाराजाबिभीषण । एकवचनजेंसीतारमण । बोलिलातेंव्यर्थनव्हे ९ युद्धकेलियावांचोनी । कदांनेदींमीजनकनंदिनी । राघवेंद्रेंऐसेंऐकोनी । चंडदोर्दंडपीटिले १० जैसानिशांतींवासरमणी । अकस्मातपूर्वेसदेखिजे नयनीं । तैसीकोदंडाचीगवसणी । नरवीरोत्तमेंकाढिली ११ कींतेमेघांतूनिवेगळी । प्रळयचपळानिघाली । तैसीगवसणीकाढितांप्रभापडली । कोदंडा चीअकस्मात १२ क्षणनलागतांचढविलागुण । उभाठाकलासीतारमण । वोढीवोढोनिआकर्ण । झणत्कारिलींसप्तद्वीपें १३ काळाचेमनींबैसेदचक ऐसीसुग्रीवेंदिधलीहांक । अठरापद्मेंवानरदेख । गर्जनाकरीतउठलेपैं १४ बाहात्तरकोटीरीस । हांकेसरिसेंभरितीआकाश । पृथ्वीडळमळितांनागेश । ग्रीवा खालींसरसावी १५ दिग्गजांचींबैसलींटाळीं । कूर्मपृष्ठीतेव्हांथरारिली । आदिवराहतळीं । सरसाऊनिदेदाढा १६ एकदांचिकपींचेभुभुःकार । ऐ कतांदचकलेनिर्जर । धुळीनेंदाटलेंअंबर । मेरुमंदारकांपती १७ वीसकोटीवानरघेऊन । लंकेवरीधांवलासुषेण । जेवींवारणचक्रावरीपंचानन । ग र्जतधांवेनिःशंक १८ सकळपापासीएकनाम । जैसेंजाळूनिकरीभस्म । तैसातोवानरोत्तम । अंजनीतनयधांविन्नला १९ सकळवानरांसीसेनापती । नीळधांविन्नलासमीरगती । धुळीनेंलोपलागभस्ती । वाटेकल्पांतमांडला २० झालाएकचिहाहाःकार । गजबजिलेंलंकानगर । मर्यादासांडोनिनदेश्वर बुडवूंपाहेपृथ्वीतें २१ उदकावरीतुंबिनीफळ । तैसेंउन्मळेभूमंडळ । वरीआसुडतनिराळ । भगणेंभडभडांरिचवती २२ मेरूऐसेलंकेचेहुडे । वरीरचिले शस्त्रांचेजुंबाडे । प्रळयविजूचेनिपाडें । नग्नशस्त्रेंझळकती २३ लंकादुर्गावरीसत्वर । बळेंचढतीप्रतापशूर । केशींधरूनिरजनीचर । आसुडोनिखा लींपाडिती २४ उल्लाटयंत्रांचेभडमार । कोट्यानकोटीकरितीअसुर । भिंडिमाळाशस्त्रेंअपार । दुर्गावरूनभिरकाविती २५ कोटयानकोटीपर्वतथोर । ए कदांचटांकितीवानर । बरीलयंत्रेंहोतीचूर । रजनीचरांसहितपैं २६ दुर्गावरूनराक्षसपाहीं । वानरझोडितीशस्त्रघाईं । दुर्गपरिघतेसमयीं । राक्षसप्रेता नींबुजियेले १२७ पुच्छदुर्गावरीटांकोनी । असुरांचेग्रीवेसओढुनी । एकदांचपाडितीआसुडोनी । खंदकामाजीप्रेतवत १२८ एकअकस्मातउडो नी । राक्षसांसपायींधरुनी । गरगरांभिरकावितीगगनीं । आपटोनिधरणींमारिती १२९ एकराक्षसांचींपोटेंफोडिती । एकचरणकरनासिकतोडिती एकप्रेतउचलोनिमागुती । भिरकावितीलंकेंत १३० आटलेबहुतरजनीचर । गोपुरावरूनिदशकंधर । विलोकितदिशाअंबर । तोंवानरमयदिसत

से ३१ स्वसैन्यासीदशकंधर । ह्मणेकायपाहातांनिघाबाहेर । कोट्यानकोटीअसुर । पाईंचेपुढेंतळपती ३२ चतुरंगदळसागर । निघालालंकेबाहेर । आटोनिसमस्तवानर । माजवासमरभूमीवेगें ३३ पर्वतासमानरजनीचर । विक्राळभाळतोंडींसेंदूर । बाबरझोटीदाढीशुभ्र । जिंव्हाअपारलळल ळित ३४ खदिरांगारधगधगित । तैसेंनेत्रत्यांचेआरक्त । मद्यपीमहाउन्मत्त । शस्त्रेंघेऊनउसळती ३५ सुरांचींशिरेंरेखुनी । त्रिदेंबांधिलींचरणीं । यमदंष्ट्राझळकतीजघनीं । आवेशेंकरूनधांवती ३६ वोडणअसिलतांशक्ती । एकशूळतोमरघेऊनिहातीं । गदापरिघचक्रेंझळकती । दाढींपिंजारि तींचांमरें ३७ वानरांचेकरूनपुतळे । रुळतचरणींघातले । हांकादेतपरमबळें । एकदांचिसर्वेही ३८ दणाणतउर्वीमंडळ । ह्मणतीदेवहोधांवासकळ तुमच्यारामासहितसकळदळ । रणांगणींग्रासिलें ३९ त्याचेपाठींअश्वभार । नानाजातीचेमनोहर । वरीबैसेराऊतअसुर । असिलताघेऊनियां ४० तयापाठींगजभार । ऐरावतीसमानथोर । वरीशूळघेऊनिबैसलेअसुर । ध्वनीनेंअंबरगाजविती ४१ तयापाठीसींचालिलेरथ । रत्नजडितचाकेंझळकत तुरंगजुंफिलेचपळबहुत । गगनचुंबितध्वजबहु ४२ संग्रामभेरीगजभारीं । असुरींठोकिल्यातेअवसरीं । रणतुरेंएकसरी । नानापरीगर्जती ४३ वै रियांचींआणिस्वदळें । एकवटलींसर्वदळें । एकचिघनचक्रमांडिलें । नादेंकोंदलेंअंबर ४४ जययशस्वीअयोध्यानृपवर । ह्मणोनिधांवतीवानरवीर । वृक्ष घायेंरजनीचर । झोडूनिसमरीं पाडिती ४५ कृतांतधांवतीवानर । टांकितीपर्वतपाषाणअपार । असुरांचेअस्थिपंजर । चूर्णहोतीलागतां ४६ उठावलेराक्ष सबळें । तोडितीकपींचींशिरकमळें । किंवाउसळतीनारिकेळें । कोट्यानकोटीआकाशीं ४७ जैसींइक्षुदंडाचींखंडें । तैसींपाणिचरणाचींदुखंडें । एकदां चपडतीप्रचंडें । असुरहस्तेंकरूनियां ४८ खेटकाआडअसुरदडती । कुंतशक्तीनेंबळेंखोंचिती । वानरांविंधोनपाडिती । ठायींठायींअसंख्य ४९ अ संख्यातकपीधांवती । कालिजेंराक्षसांचींकाढिती । प्रेतेंतेथेंपडलींकिती । नव्हेगणितशेषातें १५० आवेशेंकपीशिळाटांकिती । असुरांचेमुखावरीआद ळती । रक्तेंभडभडांउसळती । मस्तकेंउडतीतडतडां ५१ उर्ध्वपंथेंशिरेंगदगदांहांसती । स्वर्गपंथभेदीतजाती । नाशवंतह्मणोनियेती । सीतापतीसपहावया ५२ रणींभ्याडजेतयांप्रती । तुटलींशिरेंगदगदांहांसती । आह्मीपावलोंमोक्षगती । तुह्मांसनाहींहोसर्वथा ५३ समरभूमीसधडेंनाचती । दोनीहस्तेंटा ळियापिटिती । आह्मासयेथेंआहेगती । नृत्यकरितीह्मणोनियां ५४ असोवानरवीरप्रचंड । तोंगजभारलोटलेवितंड । कपीओढोनिशुंडादंड । आकाश पंथेंभोंवंडिती ५५ गजदंतमोडोनिलवलाहें । वरिल्याताडितीत्याचियाघायें । शुंडापिळोनियांपाहें । कुंभस्थळेंफोडिती ५६ गजपुच्छधरून । गगनीं

१ हत्ती. रथ. पायदळ. घोडेस्वार. २ तलवारी ३ एक प्रकारचें आयुध ४ चवऱ्या. ५ पायांमध्यें. ६ पृथ्वी. ७ नगारे. ८ आकाश. ९ काळरूप.

देतीभिरकाऊन । दुजावरुताझुगारून । तयावरुताटाकिती ५७ वृक्षमंडितपर्वत । रथावरीटांकितीअकस्मात । रथसारथियासमवेत । पिष्टहोतीतयाघा
तें ५८ ऐसेलक्षांचेलक्षवारण । गगनीकरितातिभ्रमण । एकतुरंगपायींधरून । स्वारांसहितआपटिती ५९ अहोरात्रतीनदिवस । युद्धझालेंआ
समास । सुरअवतारकपीपुरुष । लोटिलेराक्षसमाघारे १६० ऐसेंदेखोनिवीरधूम्राक्ष । रथारूढधांवलादक्ष । तेणेंनिजबाणींलक्षानुलक्ष । वानरवीरपा
डिले १६१ शिळापर्वतएकसरीं । कपीटांकितीधूम्राक्षावरी । परितोचपळबाणधारी । पिष्टकरूनिटांकित १६२ असंख्यातवानरगण । धूम्राक्षें
मारिलेनलागतांक्षण । कपींचेभारपळोन । पराजयपावले १६३ उणेंदेखतांचिसत्वर । वेगेंधांवलरुद्रावतार । उचलोनियांगिरिवर । धूम्राक्षाव
रीटांकिला ६४ अश्वसारथीरथपूर्ण । पर्वताखालींझालेचूर्ण । धूम्राक्षाचेंचपलउड्डाण । तेथोनिगेलाएकीकडे ६५ शूलघेऊनतेअवसरीं । धूम्राक्षधांवि
न्नलामारुतीवरी । मारावयासर्पारी । अळींजैसाचपेटे ६६ वारणावरीधांवेमृगेंद्र । तैसाधांवलावायुपुत्र । मुष्टिघातेंत्याचेंशिर । मृत्तिकाघटवतचूर्णकेलें ६७
गजासिपर्वतपातजाहला । कींमहावृक्षउन्मळिला । तैसाधूम्राक्षपडिला । गतप्राणहोऊनियां ६८ धूम्राक्षपडतांचितत्काळ । पळोंलागलेघायाळ । जै
सेंमनआकळितांबळ । इंद्रियांचेंनचलेकांहीं ६९ जेथोनिमनउठेनिश्चिती । तेथेंकैंचीराहिलीप्रीती । कींदेखणियाचीगती । नेत्रगेलियामावळे १७०
तैसाधूम्राक्षपडतांतेवेळीं । घायाळेंलंकेंतप्रवेशलीं । रावणेंवार्ताऐकिली । हृदयींवाटेपरमचिंता ७१ मगदळभारेंसीवज्रदंष्ट्री । दशमुखतयासीआज्ञाकरी
तोसमरभूमीसिझडकरी । वातवेगेंपातला ७२ वानरराक्षसतेसमयीं । मिसळलेएकेठायीं । एकमेकांतेंहाणितीघाईं । प्रेतेंठायींपडियेलीं ७३ रथारूढव
ज्रदंष्ट्री । हरिदळींमिळालाझडकरी । दोनलक्षकपीभूमीवरी । प्रेतेंहोउनिपडियेले ७४ ऐसेंदेखोनिवालीसुत । वगेंधांवलाकृतांतवत । शतांचेशतपर्वत । अ
रिवरीटांकीतसे ७५ पर्वतासारिखेतेक्षणीं । राक्षसपडलेएकअक्षौहिणी । अशुद्धेंकरूनिधरणी । पूरवाहातभडभडां ७६ मगतारातनयेंतेअवसरीं । उचलि
लाबहुशृंगाचागिरी । भिरकाविलावज्रदंष्ट्रावरी । परमावेशेंतेधवां ७७ तोंराक्षसेंसोडोनियांबाण । क्षणनलागतांकेलाचूर्ण । तेंअंगदेंदेखोन । महावृक्षउ
न्मळिला ७८ परमप्रतापीवालिनंदन । भुभुःकारेंगर्जतगगन । वृक्षघायासरसाप्राण । वज्रदंष्ट्रीचाघेतला ७९ शरीरजाहलेंशतचूर्ण । महीभिजलीअ
शुद्धेंकरून । जैसारगडितांमत्कुण । नउरेचकांहींउरी ८० तोंअकंपनदळभारघेऊन । रणासिआलानलागतांक्षण । तेणेंसोडिलेअसंख्यबाण । कपिचक्रा
वरीपैं ८१ सिंहचपेटेदेखोनिवारण । तेवींधांवलासीताशोकहरण । वृक्षघातेंकरून । रणींअकंपनविदारिला ८२ राक्षसदळींहाहाःकार । शोकार्णवींदश
कंधर । मगतयासशांतवीज्येष्ठकुमर । शक्रजितनामतयाचें ८३ ह्मणेरायातूंचिंतानकरीं । तुझेशत्रुसमरभूमीवरी । आजिपहुडवीननिर्धारीं । शक्रजितना

मतरीचसाचें ८४ नाहींतरीमींजैसाजंत । तवपोटींआलोंमीव्यर्थ । मगअसंख्यदळासहइंद्रजित । जनकासनमोनीनिघाला ८५ असंभाव्यसेनासाग
र । रणमंडळासिआलासत्वर । तंवतेअपारवानरवीर । रणपंडितप्रतापी ८६ घेऊनिशिलातरुवर । असुरांतमिसळलेवानर । जैसेवायसांमाजीसुंदर ।
राजहंसमिळाले ८७ किंवागारांमध्येंहिरा । मिसळेजैसाएकसरां । तैसावानरप्रतापेंथोरा । असुरदळींचौताळला ८८ देखोनिकपिप्रतापआगळा ।
इंद्रजितेंरथलोटिला । तंवतोवालीपुत्रधांवला । महापर्वतघेउनी ८९ जंबुमाळीप्रतापीवीर । त्यावरीधांवलावायुकुमर । जोविद्युन्माळीत्यावरीश्वशुर ।
सुग्रीवाचाउठावला ९० जंघनामाअसुरप्रबळ । त्यावरीधांवलावीरनळ । परममांडलेंरणमंडळ । हाकेंनिराळगाजविती ९१ वानरराक्षसांचींप्रेतें । ठायीं
ठायींपडलींअसंख्यातें । जैसेखडेआणिमुक्तें । एकेठायींविखुरलीं ९२ हनुमंतेंपांयांतळीं । घालोनीचिरिलाजंबुमाळी । विद्युन्माळीतेकाळीं । सुषेणेंआपटो
निमारिला ९३ नीळेंजंघमारिलातेक्षणीं । तोंअस्तागेलावासरमणी । अंधकारेंदाटलीधरणी । कोणीकोणासीनदेखे ९४ कोणरेकोणअसुरपुसत । क
पिह्मणतीआह्मीरामदूत । असुरवीरअकस्मात । घावहाणितीसरसाची १९५ कोणरेकोणह्मणतीकपिवीर । तेह्मणतीआह्मीअसुर । घायहाणोनीकपि
वीर । करितीचूरराक्षसांचा ९६ सवेंचउदयपावेमित्र । आनंदलेसकळांचेनेत्र । परीवानरवीरअनिवार । आटिलेअसुरपराक्रमें ९७ मगशक्राजितते
वेळां । रथासहसेनेंतूनउडाला । जलदजाळाआडलपाला । वर्षोंलागलासर्पबाण ९८ राक्षसांचेंकापटयअद्भुत । बाणतेचसर्पहोत । कपिआंगींसंचरत । वि
कळपडतीवीरतेणें ९९ मगरामलक्ष्मणावरी । सर्पबाणसोडीशक्रारी । अयोध्यापतीतेअवसरीं । पाहेतटस्थचहूंकडे २०० ह्मणेहेबाणयेतातकोठुनी । सं
धानकर्तानदिसेकोणी । जरीदिसतासमरंगणीं । तरीबाणींफोडितों १ वोढवलेंदुःखपरमदुस्तर । कितेकउडालेऊर्ध्ववानर । शोधिलेंबहुतअंबर । परितोवीर
दिसेना २ वानरआलेपरतोन । अवघेपाह्यातीम्लानवदन । रामलक्ष्मणासीबाण । बहुसालखडतरले ३ तेसमयींमूर्च्छायेऊन । भूमींपडलेदोघेजण ।
तोंइंद्रजितबोलेवरून । कांहोनिवांतराहिलां ४ मारूनियांदूषणखर । शिळींबांधिलासागर । ह्मणविताक्षत्रीराजकुमर । कांरेशरसोडाना ५ वरक
डकपींवरबाण । इंद्रजितेंटांकिलेवरून । तरूउन्मळितींमूळींहून । तैसेहरिगणपडियेले ६ किंशुकफुलतांबहुत । सिंदूरवर्णदिसेपर्वत । तैसींकपींचीं
शरीरेंआरक्त । असंख्यातपडियेलीं ७ शक्रजितखालींउतरून । मुख्यजेपडलेराक्षसगण । त्यांचींकुणपेंउचलून । लंकेंतनेताजाहला ८ जयवाद्यांचा
होतघोष । परमआनंदलालंकेश । हृदयींआलिंगोनिपुत्रास । ह्मणेधन्यमीतुझेनी ९ त्रिजटेसह्मणेरावण । पुष्पकींसीतेसबैसऊन । दृष्टीसदावीसक
ळरण । रामसौमित्रांसमवेत २१० त्यांचींविलोकितांप्रेतें । मगतीवशहोईलआह्मातें । अवश्यह्मणोनिसीतेतें । विमानींबैसवीत्रिजटा ११ सकळमंडळ

विलोकित। तोंअनुजासहितरघुनाथ। दृष्टींदेखतांमूर्च्छित। जनकात्मजापडियेली १२ मगत्रिजेटेनेंसीताधरूनी। उठवोनिबैसविलीआसनीं। ह्मणेमायेध
र्यधरींमनीं। चापपाणीउठेलआतां १३ तंवतेबिभीषणाचीराणी। सरमागुप्तरूपेंयेउनी। विदेहतनयेचेकर्णीं। निजगुजबोलतसे १४ ह्मणेजगन्मा
तेधरींधीर। आतांउठतीलरामसौमित्र। असुरांचाकरितीलसंहार। आनविचारतेथेंनाहीं १५ मीअनृतबोलेनसाचार। तरीमाझेंखालींपडेलशिर। मा
झेपूर्वजअपार। नरकभोगितीकल्पांतवरी १६ त्रिजटाह्मणेजाणकीसी। मातेचिंतानकरींमानसीं। पुष्पकअशोकवनासीं। वेगेंकरूनपातलें १७
सीतेसबैसऊनस्वस्थानीं। त्रिजटासांगेरावणालागुनी। ह्मणेसीतेचेसत्वाचीहानी। कल्पांतींहीनव्हेची १८ त्रिजटामगपरतोनी। सीतेपासींबैसलीये
उनी। जैसीचित्तवृत्तिमुरडोनी। साधकरमतीस्वरूपीं १९ सरमाह्मणेजनकनंदिनी। तूंचिंताकांहींनकरींमनीं। पुराणपुरुषचापपाणी। त्याचीकरणीजाण
सीतूं २० आपलाप्रतापविशेष। वाढवावयाअयोध्याधीश। आधींशत्रूसदिधलेंयश। कांहींएकआरंभीं २१ हेंब्रह्मांडसकळिक। बाणींजाळीलरघुनायक।
तेथेंइंद्रजितकायरंक। उशीरकायवधावया २२ रावणकुंभकर्णइंद्रजित। हींबाहुलींतोचिनिर्मित। खेळमांडलाजोअद्भुत। जाणसीकींतुझातूं २३
निशासंपतांचंडकिरण। उगवेनुगवेह्मणोन। याचिंतेचेंकारण। कांहींचनसेजाणपां २४ करितांरघुनाथस्मरण। पापेंजातीनजातीजळोन। यासंदेहाचेंकार
ण। कांहींचनसेजाणपां २५ हृदयींप्रगटतांशुद्धज्ञान। चुकेकींनचुकेजन्ममरण। याचिंतेचेंकारण। कांहींचनसेजाणपां २६ क्षमशांतिधारितांजाण।
कलहहोयनहोयह्मणोन। याचिंतेचेंकारण। कांहींचनसेजाणपां २७ अयोध्यानाथरघुनंदन। यासिजयकींअपजयह्मणोन। याचिंतेचेंकारण। कां
हींचनसेजाणपां २८ ज्यारामाचेंकरितांस्मरण। भक्तपावतीजयकल्याण। जोजगदानंदपूर्ण। विजयीअसेजानकी २९ असोइकडेबिभीषण। सूर्य
सुतासीबोलेवचन। ह्मणेराक्षसपर्वतआणून। रामावरीटांकितील ३० उदयपावेजंवगभस्ती। तंवजतनकराव्यादोनीमूर्ती। अश्रुआलेबोलतांनेत्रीं। रा
वणानुजाचेतेधवां ३१ मगजीवंतहोतेजेवानर। तिहींपुच्छमंडपकरूनिसत्वर। दोनीस्वरूपेंसकुमार। रक्षितीतेव्हांअंतरिक्ष ३२ कींपुच्छपेटीकरून।
ब्रह्मादिकांचेंदेवतार्चन। वानरबैसलेसांठऊन। सभोंवतेसद्गद ३३ सूर्यवंशमंडणरघुनाथ। त्याचेमहत्पुण्याचापर्वत। तोवानरींवेष्टुनीबहुत। सावधपणें
रक्षिती ३४ मारुतीबिभीषणरणशोधित। तोंमहावीरपडलेबहुत। सावधहोऊनतेपुसत। बिभीषणासतेकाळीं ३५ ह्मणतीचराचराचेंजीवन। सुखी
असेकींरघुनंदन। सद्गदबोलेबिभीषण। ह्मणेचिंतानकाकरूं ३६ तोंघायेंजांबुवंतविव्हळत। बिभीषणासीजवळीबोलावित। ह्मणेक्षेमआहेकींरघुनाथ।
पुराणपुरुषजगदात्मा ३७ स्फुंदस्फुंदोनिसांगेबिभीषण। नागपाशींबांधिलेदोघेजण। तोंमूर्च्छनासांवरूनिसुषेण। उघडोनिनेत्रबोलत ३८ ह्मणेद्रोणा

चळीऔषधीबहुत । जरींकोणीआणीलबळवंत । तरीरामलक्ष्मणदळासहित । आतांउठवीनसर्वही ३९ मगबोलेबिभीषण । ऐसाबळवंतआहेकोण रात्रीमाजीजाऊन । औषधीयेथेंआणिल २४० जांबुवंतबोलेवचन । एकसीताशोकहरण । त्यावांचोनिगिरीद्रोण । कोणीआणूंशकेना ४१ मगसुषेणआणिजांबुवंत। बिभीषणतयांसिहातींधरित। श्रीरामापासींबोलतबोलत। येतेझालेतेधवां ४२ तंवरणशोधूनिहनुमंत। तोहीआलाअकस्मात । याउपरीकिष्किंधानाथ । बोलताझालातेधवां २४३ ह्मणेरामसौमित्रांउचलून । तुह्मीजाकिष्किंधेसघेऊन । मीरावणकुळसकळमारून । घेऊनयेईनजानकी ४४ राजास्थापीनबिभीषण । बंदीचेसोडवीनसुरगण । सर्वांजावेंपरतोन । किष्किंधेसीआतांची ४५ तेव्हांआकाशींवदलीवाणी आतांचिउठेलचापपाणी। नेत्रउघडिलेतयेक्षणीं। अयोध्याधीशेंरावबें ४६ भोंवतेंपाहेराघवेश । तोंनिकटबैसलेनिजदास । मानसवेष्टोनिराजहंस। बैसलेजैसेप्रीतीनें ४७ कींकमलवेष्टितभ्रमर । कींअहिवेष्टितमलयागर । कींदिव्यमुक्ताभोंवतेचतुर । परीक्षकजेविमिळती ४८ असोसुग्रीवासह्मणेरघुनंदन । बारेतूंआपलादळभारघेऊन । किष्किंधेसिजायपरतोन । येथेंदोघेराहुंआह्मी ४९ ऐसेंउदासबोलेरघुनाथ । सर्वांसीआलेअश्रुपात। सुग्रीवसद्गदबोलत । ह्मणेविपरीतकेवींघडे २५० सांडोनियांदिनपती । किरणेंकोणीकडेजाती । कनकावेगळीकांती । भिन्नन्व्हेकल्पांतीं ५१ घटासमृत्तिकासांडोन । कोणीकडेराहीलभिन्न । पटासतंतूत्यागोन । वेगळानोहेचसर्वथा ५२ लहरीसागरासीसांडुनी । कायबैसतीलकाननीं । तुजसांडूनचापपाणी । आह्मींकेवीराहावें ५३ बिभीषणबोलेअयोध्यापती । जरींतमकूपींपडेलगभस्ती । शेषहीसांडेलजगती । परीसामर्थ्यतुझेंउणेंनोहे ५४ रसहीनबोलसीमात । जेनमानितीरणपंडित । तोंनवलवर्तलेंअद्भुत। वायुगुप्तरूपेंपैंआला ५५ सीतावल्लभाचेकर्णीं । गरुडमंत्रगेलासांगोनी । रघुवीरेंजपतांतेक्षणीं । सुपर्णवेगेंधांविन्नला ५६ जैसेआंगींक्लेशअमुप । तैसेरामासीजडलेसर्प । तोंविष्णुवाहनदर्प । देखतांसर्पपळाले ५७ तत्काळउठलेरामसौमित्र । अष्टादशपद्मेंवानर । उठोनिकरितीभुभुःकार । तेणेंलंकानगरदणाणिलें ५८ निरभ्रनभींदिवाकर । तैसेदैदीप्यमानरामसौमित्र । देवकरितीजयजयकार । सुमनसंभारवर्षती ५९ सुग्रीवादिकपीबोलती। लंकाआजिघालूंपालथी । कोदंडउचलोनिसीतापती । अरिपंथलक्षीतसे ६० युद्धकांडरसभरित । तेथेंवीररसअद्भुत । तेकथाऐकतांसमस्त । शत्रुक्षयहोयपैं ६१ ब्रह्मानंदाश्रीरघुवीरा । दशमुखांतकासमरधीरा । भक्तपालकाश्रीधरवरा । निर्विकाराअभंगा ६२ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मिकीनाटकाधार । सदांपरिसोतभक्तचतुर । पंचविंशतितमोध्याय गोडहा २६३ श्रीराधाकृष्णार्पणमस्तु । । श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु । अध्याय २५ । । ओव्या २६३ । ७ । । ७ ।

श्रीगणेशायनमः। ।श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः।जयजयसौभद्रकारकेभवानी।मूळपीठअयोध्यावासिनी। आदिमायेचीकुळस्वामिणी।प्रणवरूपि
णीरघुनाथे १ नारदव्यासवाल्मिक। विरंचीअमरेंद्रसनकादिक। वेदशास्त्रेंसहस्रमुख।कीर्त्तिगातीअंबेतुझी २ सुग्रीवनळनीळजांबुवंत । बिभीषण
अंगदहनुमंत। तेहींदिवटेनाचतीसमस्त। प्रतापदीपिकाघेउनी ३ अठरापद्मेंवानरगण ।भूतावळियासंगेंघेऊन।सुवेळाचळींयेऊन ।गोंधळमां
डिलास्वानंदें ४ रणमंडळहेंहोमकुंड। द्वेषाग्नीप्रज्वललाप्रचंड। राक्षसबस्तउदंड। आहुतीमाजीपडताती ५ देवांतकनरांतकमहोदर। प्रहस्तअति
कायघटश्रोत्रें। इंद्रजितआणिदशवक्र। आहुतीसमग्रदेतीत्या ६ निजदासदिवटाबिभीषण। अक्षयीलंकेसीस्थापून। निजभक्तीजानकीघेऊन।मूळ
पीठअयोध्येसीजासील ७ हनुमंतदिवटातुझाबळी ।बळेंपुच्छपोतपाजळी। क्षणांतलंकाजाळिली। केलीहोळीबहुसाल ८ ऐसेतुझेदिवटेअपार ।
त्यामाजीदासानुदासश्रीधर। तेणेंरामविजयदीपिकापरिकर। पाजळिलीयथामती ९ बाळभोळेभक्तअज्ञान। प्रपंचरजनींतपडलेजाण ।त्यांसहेग्रंथ
दीपिकापाजळून। मार्गसुगमदाविला १० असोपूर्वाध्यायींरामलक्ष्मण। इंद्रजितेंनागपाशघालून। आकळिलेमगवायुयेऊन। सावधकेलेंसवेंची ११
यावरीतोरणरंगधीर । प्रतापार्कश्रीरघुवीर। धनुष्यसज्जोनिसत्वर ।वाटपाहेशत्रूची १२ कोट्यानकोटीवानरगण । सिंहनादेंगर्जतीपूर्ण ।
तेणेंलंकेचेपिशिताशन। भयेंकरूनगजबजिले १३ निर्मळदेखोनिश्रीरामचंद्र। उचंबळतवानरसमुद्र । भरतेंदाटलेंअपार । लंकापरिघपर्यंत
१४ उचलोनिपाषाणपर्वत। कपीभिरकावितीलंकेंत। राक्षसांचींमंदिरेंमोडत ।प्रळयबहुतवर्षला १५ रावणाससांगतीसमाचार । दुर्गासझगटले
वानर।रणींउभेरामसौमित्र। शशीमित्रज्यापरी १६ प्रहस्तासिह्मणेलंकानाथ। पुत्रेंशत्रुवनजाळिलेंसमस्त। पुनरपीपूर्ववत। अंकुरतेथेंफुटलेपैं ।
१७ बीजभाजूनदग्धकेलें। तेंपुनरपीअंकुरलें। मृत्यूनेंगिळूनउगळिलें। अघटितघडलेंप्रहस्ता १८ मगतोप्रधानप्रहस्त। सेनापतीप्रतापवंत ।
रावणासिआज्ञामागत। शत्रुसमस्तआटीनमी १९ कायसेतेनरवानर। माझेकेवीसाहातीशर। ऐसेंऐकतांविंशतिनेत्र। परमसंतोषपावला २०
उत्तमवस्त्रेंभूषणें। प्रहस्तासीदीधलींआभरणें। तयासिगौरऊनह्मणे। विजयीहोईरणांगणीं २१ स्वामीगौरवीस्वमुखेंकरून। धन्यधन्यतोचिदिन
वीसअक्षौहिणीदळघेऊन। प्रहस्तप्रधाननिघाला २२ चतुरंगसेनासमुद्र। उत्तरद्वारेंलोटलासमग्र। तंवअद्भुतसुटलासमीर । धुळीनेंअंबरदाट
लें २३ रथींचाध्वजउन्मळला । शोणितचर्चितभुजखंडला । प्रहस्तापुढेंआणूनिटाकिला । निराळपंथेंपक्ष्यानी २४ मनांतदचकलाप्रहस्त। प

---

१ देवांचा राजा इंद्र. २ शेष. ३ बोकड. ४ कुंभकर्ण. ५ मांसभक्षक राक्षस, ६ रामरूप चंद्र. ७ तट. ८ चंद्र. ९ सूर्य. १० बाण. ११ रावण.

रीवरिश्रीनेंवेष्टित । अपशकुनाचीखंत । टांकूनियांचालिला २५ दृष्टींदेखोनिराक्षसभार । सिंहनादेंगर्जतीवानर । तेणेंदुर्गीचेहुडेसमग्र । येऊंपाहतीध
रणीये २६ दोनीदळेंएकवटलीं । संग्रामाचीझडलागली । शस्त्रास्त्रेंतयेकाळीं । यामिनीचरवर्षती २७ तीक्ष्णप्रभानभमंडळीं । तैसींशस्त्रास्त्रेंझळक
तीतेकाळीं । गदापाशशक्तिशूळीं । खोंचितीबळेंकपीतें २८ पिशिताशनअनिवार । साह्नूनवानरांचामार । कपिसेनेवरीअपार । येऊनियांकोसळती
२९ तंवतेप्रतापमित्रहरिगण । पर्वतआणिवृक्षपाषाण । बळेंदेतीभिरकाऊन । होतीचूर्णरजनीचर ३० जैसाअग्नीलागेपर्वतीं । त्यावरीपतंगअसं
ख्यझेंपावती । तैसेराक्षसमिसळती । वानरचमूंतयेउनी ३१ वानरचतुररणपंडित । निशाचरआटिलेबहुत । मगतोसेनापतीप्रहस्त । रथलोटितवायु
वेगें ३२ जैसीपर्वतींवीजपडत । तैसाकपींतआलाअकस्मात । बाणसोडिलेबहुत । नाहींगणिततयांसी ३३ तंवतोनूतनलंकापती । बोलताझालारामा
प्रती । ह्मणेप्रहस्तसेनापती । मुख्यपट्टप्रधानरावणाचा ३४ तरीयासीसेनापतीनीळ । प्रतियोद्धाधाडावासबळ । तोंप्रहस्तेंवानरदळ । बहुतआटिलेंतेका
ळीं ३५ अनिवारप्रहस्ताचामार । साहोंनशकतीवानर । महायोद्धेसमरधीर । माघारलेतेकाळीं ३६ दृष्टींदेखोनिरघुनंदन । प्रहस्तेंलोटिलास्यंदेन
तेंदेखोनिराजीवनयन । लाविलाबाणचापासीं ३७ क्षणांतचढविलागुणं । तोंरामापुढेंनीळयेऊन । विनवीतसेकरजोडुन । वानरगणऐकती ३८
ह्मणेजगद्वंद्यादुःखहरणा । जनकजापतीजगन्मोहना । मायाचक्रचाळकानिरंजना । मजआज्ञादेईजे ३९ नलागतांएकक्षण । प्रहस्ताचाघेईनप्राण ।
अवश्यह्मणेसीतारमण । विजयीहोऊनयेईंपां ४० घेऊनमहापर्वत । नीळधांवेअकस्मात । जैसेपाखंडियांसीपंडित । सरसावलेबोलावया ४१ प्र
हस्तासीबोलेनळवीर । तुह्मीह्मणवितांझुंजणार । शस्त्रेंजवळीरक्षितांअपार । मिथ्याभारकासया ४२ बाह्यवृत्तीव्याघ्रअसे । अंतरींजंबुकाभीतसे ।
जेवीनटविरक्तसोंगघेतसे । परीअंतरींत्यागनोहे ४३ वरीवैराग्यमिथ्यादावित । परीमनींतृष्णावाढवित । जैसेंवृंदावनदिसत । रेखांकितउत्तमवरी ४४ तै
सातूंसेनापतीप्रहस्त । मृत्यूनेंतुजआणिलेंयेथ । तुझेपितृगणसमस्त । कायकरितीयमपुरीं ४५ त्यांवासमाचारघ्यावयासी । तुजपाठवितोंयमपुरी
सी । आतांपरतोनलंकेसी । कैसाजासीपाहेंपां ४६ शतमूर्खदशमुखतत्वतां । पद्मजातजनकाचीकांता । तीआणूनियांवृथा । कुळक्षयकेलारे ४७
प्रहस्तह्मणेमर्कटानीळा । तुजमृत्युकाळींफांटाफुटला । ऐसेंबोलोनलाविला । बाणचापासीप्रहस्तें ४८ नीळहस्तींचापर्वत । प्रहस्तावरीटांकीअक
स्मात । तेणेंबाणसोडूनिक्षणांत । पर्वतफोडिलातेसमयीं ४९ सवेंचदुसराशैलसबळ । प्रहस्तावरीटांकीनीळ । तेणेंफोडूनितात्काळ । पर्वतकेलापिष्टव

---

१ बिभीषण. २ रथ. ३ कमलनेत्र रामचंद्र. ४ दोरी. ५ कोल्हा. ६ वृंदावनफल (कंवडल.) ७ ब्रह्मदेवाचा पिता.

त ५० मगनीळेंएकशत । टांकिलेंप्रहस्तावरीपर्वत । येरूतितुकेहीछेदीत । सीतानाथपहातसे ५१ प्रहस्ताचेंसबळबळ । सर्वांगींखिळीवीरनीळ
परीतोवैश्वानराचाबाळ । भिडतांमागेंसरेना ५२ याउपरीनीळदक्ष । शतयोजनेंताडवृक्ष । मोडूनिधांवेजेवीविरूपाक्ष । कल्पांतकाळींभोक्षला ५३
भुजाबळेंभोवंडून । वृक्षघातलाउचलोन । रथासहितप्रहस्तचूर्ण । रणमंडळींजाहला ५४ जाहलाएकचिजयजयकार । सुमनवृष्टीकरितीसुरवर । राव
णापासींसत्वर । घायाळजाऊनसांगती ५५ पडलाएकलाप्रहस्त । शोककरीलंकानाथ । ह्मणेव्याघ्रप्रतापवंत । गोवत्सांनीमारिला ५६ कमळ
गर्भींचायेऊनतंत । मशकेंबांधिलाऐरावत । खद्योततेजेंआदित्य । आहाळलाकैसाआजितो ५७ सैन्यकासीह्मणेलंकानाथ । सेनासिद्धकरावीत्वरित
आजयुद्धकरीनअद्भुत । जिंकीनरघुनाथकपीसी ५८ घावनिशाणींदिधलासत्वर । दणाणिलेंलंकानगर । कोट्यानकोटीमहावीर । सिद्धजाहले
शस्त्रास्त्रीं ५९ तोंलंकापतीचीराणी । मंदोदरीविवेकखाणी । तियेचेदूतसभास्थानीं । परमधूर्तबैसलेहोते ६० समयदेखोनिविपरीत । मंदोदरी
पासींगेलेत्वरित । वर्षावकाळींधांवत । सरितांसपूरजैसेकां ६१ कींशरांसनापासोन । सार्थकधांवतीत्वरेंकरून । अस्ताजातांउष्णकिरण । पक्षीआश्र
माधांवती ६२ तैसेस्वामिणीपासींयेऊन । हस्तजोडूनकरितीनमन । मगअधोदृष्टींवर्तमान । सांगतीसकळसभेचे ६३ रणींपडलाप्रहस्तप्रधान ।
ह्मणोनियांदशानन । सकळसेनासिद्धकरून । आतांचिजातोसंग्रामा ६४ ऐसासमाचारऐकोनी । मंदोदरीलावण्यखाणी । जीच्यास्वरूपावरूनी
रतिवरओंवाळिजे ६५ जिचीमुखशोभादेखोनी । विधुबिंबगेलेंविरूनी । चंपककळिकागौरवर्णी । सुकुमारत्याहूनिबहुतअसे ६६ आंगींचीप्रभा
अत्यंत । तेणेंअलंकारशोभत । त्रिभुवनहिंडोनिरतिकांत । श्रमोनियेथेंविसांवला ६७ हास्यकरितांकौतुकें । दंततेजमंदिरींझळके । बोलतांरत्नेंअनेकें ।
भूमीवरीविखुरती ६८ अंगींचेसुवासेंकरून । कोंदलेंअसेअवघेंसदन । तडिदंबरेंवेष्टिलेंपूर्ण । सुवासमृदूनिर्मळ ६९ चपळेचाप्रकाशपडे । तैसेझळ
कतीहातींचेचुडे । वीसनेत्रहोऊनिवेडे । रावणाचेपाहती ७० लावण्यसागराचीलहरी । वार्त्ताऐकोनिमंदोदरी । सुखासनींबैसोनझडकरी । सभेस
तेव्हांचालिली ७१ समागमेंदासीचेंचक्र । जाणवितीनानाउपचार । सर्वेंमाल्यवंतप्रधानचतुर । बहुतवृद्धजाणता ७२ आणिअतिकायापुत्रसुंदर ।
जैसापार्वतीसीस्कंदकुमर । कींशचीजवळीजयंतपुत्र । अतिकायाशोभेतैसा ७३ सहस्रांचेसहस्रदूत । वेत्रपाणीपुढेंधांवत । जनवारूनिसमस्त ।
वावकरितीचालावया ७४ अंगींच्याप्रभाफांकती । तेणेंगोपुरचर्याउजळती । असोतेमंदोदरीसती । सभाद्वारींप्रवेशे ७५ अधोवदनेंजन ।

---

१ अग्नि. २ महारुद्र, शंकर. ३ पुष्पवृष्टि. ४ देव. ५ धनुष्य. ६ बाण. ७ सूर्य. ८ मदन. ९ चंद्रबिंब. १० गृह. ११ समूह. १२ इंद्राणी.

सकळपरतेगेलेउठोन । तेव्हांमंदोदरीयेऊन । पतीचेंपदनमियेलें ७६ दशमुखबोलेहांसोन । आपलेंकांझालेंआगमन । मगक्षणएकनिवांतबैसोन । मयजावचनबोलत ७७ टांकोनियांशुद्धपंथ । आडमार्गेंजोगमनकरीत । तयाअपाययेतीबहुत । याससंदेहअसेना ७८ सर्वांसीविरोधकरून । आपुलेंव्हावेंकल्याण । तोअनर्थींपडेआपण । यासीसंदेहअसेना ७९ वेदशास्त्रींजेंअनुचित । तेथेंबळेंघालीचित्त । तेणेंआपुलाकेलाघात । यासीसंदेह असेना ८० विवेकसद्बुद्धीचेबळें । अनर्थटाळावाकुशळें । वचनेंसंतांचींनिर्मळें । हृदयींसदांधरावीं ८१ रायापुरुषार्थहाचिपूर्ण । परदाराआणिपरधन । येथेंजोनघालीमन । तोचधन्यशास्त्रह्मणे ८२ नंदनवनींचामिलिंद । दिव्यसुमनाचासुगंध । त्यांपलांडुपुष्पींलागलावेध । नवलथोरवाटतेंहें ८३ सुरतरूच्यासुमनोंवरी । जोनिद्राकरीमंदिरीं । तोनिद्राकरीलखदिरांगारीं । नवलपरमवाटतें ८४ ज्याचीललनासुंदरबहुत । जीतेंअष्टनायकालाजत । तोपुरुषआलिंगीप्रेत । नवलपरमवाटतें ८५ सुरभीसुरतरुचिंतामणी । इच्छिलेंतेंपुरवीसदनीं । तोकोरान्नइच्छीतमनीं । नवलपरमवाटतें ८६ अंतरींजाणूनियथार्थ । अन्यथाबळेंप्रतिपादित । नकरावेंतेंबळेंचिकरीत । तरीअनर्थजवळीआला ८७ मीजाणतासर्वज्ञ । ऐसापोटींवाहेजोअभिमान । शतमूर्खांहूनिनीचपूर्ण । कर्मआचरेबळेंची ८८ यालागींलंकेश्वरा । कामासीकदांनेदीथारा । कामसंगेंथोरथोरां । अनर्थींपूर्वींपाडिलें ८९ तुमचास्वामीत्रिनेत्र । त्याचाशत्रुकामअपवित्र । तोतुह्मींकेलामित्र । तरीउमावरक्षोभला ९० स्मरारिमित्ररामचंद्र । त्यासिसख्यकरासाचार । मगतोसंतोषोनिकर्पूरगौर । अक्षयीपददेयील ९१ सीतापरमपतिव्रता । हेरामापासींचगुणभरिता । कलहकल्लोळसरिता । आणिकाचेगृहींहे ९२ हेकाळनळाचीतीव्रज्वाळा । क्षणेंरचीलब्रह्मांडमाळा । लंकेसीआणितांक्षयकुळा । करीलआमुच्यानिर्धारें ९३ सहस्रार्जुनेंनेऊनबळें । रायातुह्मांबंदींरक्षिलें त्यासभृगुपतीनेंमारिलें । त्यासहीजिंकिलेंराघवें ९४ ऐसाबळियारघुनंदन । जेणेंजळींतारिलेपाषाण । तरीत्यासीसख्यकरून । आपणाधीनकरावा ९५ हिरण्यकश्यपानाटोपेहरी । प्रल्हादजन्मलात्याचेउदरीं । तेणेंसख्यकरूनमुरारी । आपणाधीनपैंकेला ९६ चिरंजीवकरूनिकुलवल्ली । जगींकीर्तीवाढविली । तैसारामसखायेकाळीं । करूनवाढवासत्कीर्ती ९७ तुह्मासधरिलेंवालीनें । तोजेणेंनिवटिलाएकाबाणें । त्यासीआतांसख्यकरणें । मनींधरूनिहीगोष्टी ९८ भक्तीविणेंरघुनाथ । तुह्मासवशनव्हेयथार्थ । सीतादेऊनसीताकांत । आपणाधीनकरावा ९९ जीहींपुरुषार्थकरूनी । सुरांचेमुगुटपाडिलेधरणीं । तेराक्षसपाडिलेरणीं । कोट्यानकोटीपाहेंपां १०० महाबळीभक्तराजपरम । तेणेंवशकेलापुरुषोत्तम । तैसाचतुह्मीश्रीराम । आ

१ मयासुराची कन्या मंदोदरी. २ भ्रमर. ३ उत्तम फुलांचा. ४ कांदा. ५ कल्पवृक्ष. ६ पुष्पशेज. ७ स्त्री. ८ कामधेनु. ९ शंकर. १० परशुराम. ११ देव. १२ पृथ्वी.

पणाधीनकरावा १ यावरीह्मणेदशकंधर । प्रियेबोलसीसारांशोत्तर । परीमीपुरुषार्थीअसुर । राममित्रकदांनकरीं २ आतांजाऊनसमरंगणीं । नरवानरआटीनरणीं । तेव्हांतूंऐकसीकर्णीं । पुरुषार्थमाझाकैसातो ३ कैलासहालविलाबळें । बंदींसकळदेवघातले । आतांपाहेशिरकमळें । शत्रूचीं आणितोंसत्वर ४ मयजाह्मणेजीउदारा । बळेंचअनर्थआणितांघरा ।हिरासांडोनियांगारा । संग्रहितांकासया ५ कल्पवृक्षउपडून । कांवाढवितांकंटक वन । राजहंसदवडून । दिवाभीतेंकांपाळितां ६ सुधारससांडोनिदेख । कांजीपितांकायसार्थक । सुरभीदवडूनिसुरेख । अजांकासयापाळावी ७ वृंदावनदिसेसुंदरवाहिलें । परीकाळकूटआंतभरलें । तेंनसेविजेकदाकाळें । विवेकीयानेंसहसाही ८ फणसफळासमान । कनककफळदिसेपूर्ण । परीतेंभुलीसकारण । विवेकीयाणेंवोळखावें ९ सर्पमस्तकींचामणी । घेऊंजातांप्राणहानी । तैसीश्रीरामाचीराणी । समूळकुलनिर्दाळील ११० मगबोलेलंकापती । तमकूपींपडेलगभस्ती । मृग जळींबुडेलअगस्ती । कल्पांतींहीघडेना ११ क्रोधेंखवळलामृंगनायक । त्यासीकेवींमारीलजंबुक । वडवानळासीमशक । विझवीघृतघेऊनियां १२ तरीआतांवल्लभेआपण । गृहाप्रतिजावेंउठोन । स्वस्थअसोंद्यावेंमन । चिंताकांहींनकरावी १३ मंदोदरीसारवचनें । जींविवेकनभींचींभगणें । सद्बुद्धीसागरींचींरत्नें । परीतींरावणेंउपेक्षिलीं १४ कमळसुवासपरमसुंदर । परीतोकायजाणेंदर्दुर । मुक्ताफळांचाआहार । बककायघेऊंजाणें १५ कस्तूरीचाअत्यंतसुवास । कायजाणेवायसें । तत्वविचारमद्यपीयास । कायसांगूनव्यर्थसा १६ जन्मां धापुढेंनेऊन । व्यर्थकायरत्नेंठेऊन । कींउत्तमसुस्वरगायन । बधिरापुढेंव्यर्थजैसें १७ पतिव्रतेचेधर्मसकळ । जारिणीसकायसांगोनियांफळ । धर्मशास्त्रश्र वणरसाळ । वाटपाड्यासकायसें १८ तैसींमयजेचींउत्तरें । उपेक्षिलींपौलस्तीपुत्रें । मगतेपतिव्रताअतिसत्वरें । निजगृहासीचालिली १९ चित्तींझों बलाचिंताग्र । गोडनवाटेभोजनशयन । भूषणेंभोगविलाससंपूर्ण । वोसंडूनटाकित १२० असोसंग्रामसंकेतभेरी । धडकल्यातेअवसरीं । अवघ्यापरि वारासहबाहेरी । निघालातेव्हांरावण २१ सवेंप्रधानआणिकुमर । अवघालंकेतीलदळभार । निघताझालाअपार । सेनासमुद्रतेकाळीं २२ लंकेचीं महाद्वारें । तींउघडिलींएकसरें । दळेंनिघालीअपारें । प्रळयींसमुद्रफुटेजेवी २३ पायदळनिघालेंअपार । प्रचंडपर्वतासमानवीर । शृंगारिलेचित्र विचित्र । आंगींकवचेंवाहिलीं २४ आपादमस्तकपर्यंत । खेटकेंविशाळझळकत । असिलताशक्तिकुंतबहुत । शूलतोमरआयुधें २५ लोहार्गळाखड्ग मुद्गल । कायतेगदाविशाळ । फरशयमदंष्ट्राभिंडिमाळ । घेऊनिचपळधांवती २६ तयापाठींविचित्र । लोटलेतुरंगांचेभार । कींतेअश्वरत्नांचेंभांडार ।

१ मयासुराची कन्या मंदोदरी. २ कामधेनु. ३ बकरी. ४ कंवडल. ५ धोत्र्याचें फळ. ६ सूर्य. ७ सिंह. ८ कोल्हा. ९ नक्षत्रें. १० बेडूक. ११ कावळा. १२ ढाला.

एकसरेंउघडिलें २७ असंख्यश्यामसुंदर । पुच्छपिवळेंआरक्तखूर । डोळेताम्रवर्णसुंदर । तिहींलोकींगातीजया २८ सूर्यरथींचिंतामणी । त्याचि वेगेंक्रमितीअवनीं । एकनीळपिवळेहिंसतीगगनीं । प्रतिशब्दऊठती २९ एकपारवेपरमचपळ । एकमाणिकाऐसेतेजाळ । सांवळेनीळेचपळ । चांदणेंअंगकांतीऐसें १३० एकसिंहमुखसुंदर । चकोरेंचंद्रवर्णसुकुमार । क्षीरकेशरकुंकुमसेंदुर । वर्णांचेएकधांवती ३१ शशिवर्णाहिंसतीक्रूर । शाल्मलीद्वीपींचेसुकुमार । शाकद्वीपींचेचित्रविचित्र । कुशद्वीपींचेसबळपै ३२ पुष्करींचेश्यामकर्ण । उदकावरीजातीजैसेपवन । जबडारुंदआखूडमान । तेबदकश्यामनिघाले ३३ रणांगणींपरमधीर । तेआरबीवारूसुंदर । कपीचंचळसुकुमार । समरींधीरधरितीजे ३४ खगेश्वरासमानगती । पक्ष्याऐसेअंतरिक्षउडती । खुणावितांप्रवेशती । पेरदळींपवनासारिखे ३५ जैसींकांअलातचक्रें । तैसेराउतफिरतीत्वरें । अंसिलताझळकतीएकसरें । चपळेऐशातळपती ३६ अश्वखड्गक्षेत्रीपूर्ण । तिहींचेंहोयएकमन । रावणाचेतैसेचपूर्ण । असंख्यवारूचालिले ३७ पंजरींपाखरिलेबहुत । अलंकाररत्नखचित । मुक्तघोषझळकत । जातीनाचतरणभूमीं ३८ नेपुरेंगर्जतीचरणीं । पुढीलखुरनलागतीअवनीं । रत्नखचितमोंहाळीवदनीं । झळकतीचपळेसमान ३९ वज्रकवचेंसीबळिवंत । वरीआरूढलेराउत । त्यांचपाठीसीउन्मत्त । गजभारकिंकाटती १४० जैसेऐरावतीचेसुत । चपळश्वेतआणिचौदंत । झुलीघातल्यारत्नजडित । पृष्ठउदरींआंवळिले ४१ वरीरत्नजडितचवरडोल । ध्वजभेदितीनिराळ । घंटावाजतीसबळ । चामरेंथोररुळती ४२ वरीगजआकर्षकबैसले । तिहींअंकुशकरींघेतले । संकेतदावीचपळबळें । परचमूंतामिसळती ४३ त्यांचेपाठींदिव्यरथ । चपळेऐसींचक्रेंझळकत । वरीध्वजगगनचुंबित । नानावर्णीतळपती ४४ धनुष्येंशक्तीनानाशस्त्रें । रथावरीरचिलींअपारें । कुशलदूतबैसलेधुरे । वाग्दोरेहातींधरूनी ४५ असोसूवेळपंथेंअपार । चालिलेतुरंगदळभार । रणवाद्येंपरमघोर । एकदांचिखोंकाती ४६ शशिवदनाभेरीधडकती । वाटेनादेंबुडेलजगती । शंखवाजतांदुमदुमिती । दिशांचींउदरेंतेधवां ४७ ढोलगिडबिडीकैताळ । त्यांतसनयागर्जतीरसाळ । शृंगेंबुरंगेंकाव्हाळ । चौंडकींदुटाळवाजती । ४८ रामासदावीबिभीषण । आजिसकळसेनाघेऊन । युद्धासिआलारावण । पुत्रपौत्रांसहित ४९ एकलक्षपुत्रसंतती । सवालक्षपौत्रगणती । धन्यरावणाचीसंपत्ती । कपीपाहतीआदरें १५० पुत्रप्रधानांचींनांवें । बिभीषणसांगेअनुक्रमें । दृष्टींदेखोनरघूत्तमें । आश्चर्यमानिलेंतेसमयीं ५१ मध्येंरावणाचारथ । प्रभेसन्यूनसहस्रआदित्य । विरंचीहस्तेंनिर्मित । दिव्यअनुपम्यजो ५२ त्यारथासमदुजारथ । नसेत्रिभुवनींयथार्थ । त्या

१ शत्रु. २ चुडी, कोलतें. ३ तलवारी. ४ लगाम. ५ हत्तींवें आकर्षण करणारे (महात.) ६ आकाशास स्पर्श करणारे. ७ अग्रभागीं. ८ चंद्रासारख्या वाटोळ्या. ९ पृथ्वी.

वरीमंदोदरीकांत । आरोहणकरीतेसमयीं ५३ वरीत्राहाटिलींदाहीछत्रें । झळकतीचामरेंमित्रपत्रें । ऐसेंदेखोनिमित्रपुत्रें । द्विजेंअधरेंरगडिले ५४
शत्रूचेंवैभवअगाध । देखोनिसुग्रीवानावरेक्रोध । ऐकोनिवारणाचाशब्द । जैसामृगेंद्रहुंकारे ५५ तृणसंचटतांजवळी । कैसाउगाराहेज्वाळमाळी ।
सिंहदृष्टींन्याहाळी । मगगजकेवीस्थिरावे ५६ असोतैसाकिष्किंधानाथ । धांवेघेऊनपर्वत । रावणावरीअकस्मात । परमआवेशेंटांकिला ५७
तोंदशमुखेंसोडोनिबाण । पिष्टकेलापर्वतजाण । सर्वेंचसोडिलेदशबाण । सुग्रीवहृदयींखिळियेला ५८ क्रोधावलासूर्यसुत । उपडोनविशाळपर्वत ।
रावणावरीअकस्मात । गगनेंपंथेंटाकिला ५९ तोहिरावणेंफोडिला । शतबाणींसुग्रीवखिळिला । रक्तधारातयेवेळां । भडभडांसूटल्या १६० मूर्च्छा
येऊनतयेक्षणीं । सुग्रीवस्वीकारीधरणी मगवानरअठराअक्षौहिणी । एकदांचउठावले ६१ शिळावृक्षपाषाण । कपीनींयांचापाडिलापर्जन्य । परीति
तुक्यांसीरावण । एकलाचपुरलाअसे ६२ जैसापाखंडीकुतर्कघेतां । नावरेचबहुपंडितां । तेवीसकळकपीभिडतां । लंकानाथनगणीच ६३ असंख्या
तसोडूनिशर । जर्जरकेलेसर्ववानर । थोरथोरकपीश्वर । उभेहोतेरामापासीं ६४ त्यामाजींसातजण । धांवतीजैसेपंचानन । शरभगवयगंधमादन ।
मैंदकुमुदद्विविद ६५ गवाक्षसातवावीर । पर्वतघेऊनिसत्वर । हांकेंगर्जतीअंबर । रावणावरीटांकिती ६६ रावणेंपर्वतफोडोनिसमस्त । शरींखि
ळिलेवानरसप्त । भूमीसपडलेआक्रंदत । परमअनर्थवोढवला ६७ अनिवारदशमुखाचामार । देखोनिपळतीकपिभार । पाहूनरामरणरंगधीर । स
त्वरचापेंवोढिलें ६८ तंवविनवीउर्म्मिळापती । माझेबाहूबहुस्फुरती । आज्ञाद्यावीमजप्रती । समरंगणींजावया ६९ अवश्यह्मणेरघुनंदन । सौमि
त्रेंसज्जोनियांबाण । जैसाउठेपंचानन । रावणासन्मुखलोटला १७० ह्मणेरेतस्करादशमुखा । बुद्धिहीनाशतमूर्खा । आणूनियांजनककन्यका । कु
ळक्षयकेलारे ७१ कृतांताचेदाढेसी । सांपडलासीनिश्चयेंसी । आतांकोणीकडेपळसी । जीवघेऊनमावारा ७२ ऐसेंबोलेलक्ष्मण । तोंविशाळपर्वत
घेऊन । धांवेनिरोंळोद्भवनंदन । द्विदशनेत्रावरीतेधवां ७३ जैसीकडकडोनिपडेचपळा । तैसापर्वतरावणावरीटांकिला । रावणेंफोडोनितेवेळां । पिष्टकेला
अंतरिक्ष ७४ रथावरीचढलाहनुमंत । रावणेंमारिलीलाथ । मूर्च्छनासांवरूनवायुसुत । उसणेंरावणादिधलें ७५ रावणहृदयींतेकाळीं । कपीनें
वज्रमुष्टिदीधली । रावणतेणेंतळमळी । मूर्च्छनासांवरीसवेंची ७६ मगसबळमुष्टिघात । मारुतीसीमारीलंकानाथ । तोंविशाळघेऊनपर्वत । नळवानर
धांविन्नला ७७ पर्वतटांकीरावणावरी । तेणेंपिष्टकेलाअंतरीं । नीळखिळिलापंचशरीं । हृदयावरीतेधवां ७८ तोंनळेंकेलेंअद्भुत । मंत्रजपेब्रह्मद

१ सुग्रीव. २ दांतांनीं. ३ ओंठ. ४ हत्तीचा. ५ सिंह. ६ आकाशमार्गानें ७ भूमि. ८ बाण. ९ धनुष्य. १० लक्ष्मण. ११ वायु पुत्र मारुति

त्त । कोटयानकोटीनळतेथ । प्रकटझालेतेधवां ७९ घेऊनपाषाणपर्वत । रावणावरीटांकितीसमस्त । दोन्हीदळेंझालींविस्मित । सीतानाथनवलकरी १८० ऐसेंझालेंएकमुहूर्त । ब्रह्मास्त्रप्रेरीलंकानाथ । नळमावळलेसमस्त । जेवींनक्षत्रेंसूर्योदयीं ८१ कींपारजाचीखोटीफुटली । तीमिळूनएकजाहली । मुख्यनळतेवेळीं । रणांगणींउरला ८२ असोसिंहनादेंगर्जोन । पुढेंधांवेलक्ष्मण । त्याप्रतिरावण । बोलताझालाअतिगर्वें ८३ ह्मणेतूंमनुष्याचाकुमार । अजूनमस्तकींचावाळलानाहींजार । तुवांसंग्रामतरीनिर्धार । केलाकोठेंसांगपां ८४ सौमित्रह्मणेरेमशका । माझासंग्रामपाहेनिका । तुझेंआयुष्यसरलेंमूर्खा । आह्मींलंकादिधलीबिभीषणा ८५ सिंहदरींआलकुंजर । तोकेवीजीवंतजाईलबाहेर । सुपर्णेंधरिलाफणिवर । तोकेवींप्रवेशेवारुळीं ८६ भुजंगेंधरिलामूषकदंतीं । तोकैसासुटेलपुढती । समुद्रतीरींअगस्ती । उगाकैसाबैसेल ८७ तृतीयनेत्रींचादावाग्न । चालिलारतिपतीलक्षून । मगराहिलाविझोन । हेंकालत्रयींघडेना ८८ तैसाश्रीरामलावण्यराशी । चालोनिआलालंकेसी । तूंपुत्रपौत्रेंनांदसी । हेंकालत्रयींघडेना ८९ ऐसेंबोलोनिलक्ष्मण । सोडीबाणापाठींबाण । शब्दामागेंशब्दपूर्ण । वदनींहूनजेवींनिघतीपैं ११० लेखकापासावएकसरें । निघतीअक्षरापासावअक्षरें । तैसेबाणसुमित्राकुमरें । रावणावरीसोडिले ९१ रावणाचेआंगींतेवेळे । सपक्षबाणरूतले । पांचबाणरावणेंसोडिले । सौमित्रावरीतेधवां ९२ जैशापंचविद्युल्लता । तैसेसौमित्रेंदेखिलेशरयेतां । मगतेवरचावरीचतत्वता । निजशरेंमोडिले ९३ परमक्रोधेंदशमौळी । ब्रह्मशक्तीबाहेरकाढिली । अभिमंत्रोनसोडिली । राघवानुजलक्षूनी ९४ तेअनिवारशक्तीपूर्ण । सुमित्रासुतेंसोडिलाबाण । अर्धटांकिलीखंडोन । अर्धहृदयींबैसली ९५ तेणेंसौमित्रनिचेष्टितपडिला । श्वासोच्छ्वासबंदजाहला । ऐसेंदेखोनिरावणधांविन्नला । रथाखालींउतरूनी ९६ निचेष्टितअसतांसौमित्र । वरीहाणीमुष्टिप्रहार । जैसेनिजल्यावरीतस्कर । बहुतघायघालिती ९७ तेमारुतीनेंदेखोनिडोळां । कृतांतापरीधांविन्नला । लत्ताप्रहारतेवेळां । सबळदिधलारावणा ९८ पादरक्षेनेजैसेंदेख । लोकताडितीवृश्चिक । कींदंदशूकाचेंमुख । पाषाणेंचूर्णकरितीपैं ९९ तैसेंलत्ताप्रहारेंकरून । असुरहृदयकेलेंचूर्ण । रक्तवोकीतरावण । रथावरगेलाआपुल्या २०० तोंसावधझालालक्ष्मण । वेगेंसोडीनिर्वाणबाण । रावणाचेंहृदयफोडून । पलीकडेशरगेला १ त्याथासौमित्राचीदेखोन । क्षोभेरामजैसाप्रळयाग्न । अनुजपाठीसीघालून । आपणपुढेंजाहला २ रावणआरूढलारथावरी । जैसाजेंलदनेंगशिखरीं । ऐसेंदेखतांरावणारी । कायकरिताजाहला ३ हनुमंतस्कंधावरीरघुवीर । उभाठाकेरावणासमोर । जैसाउदयाचळींदिनकर । किंवाश्रीधरगरुडावरी ४ ऐरा

१ दोन घटिका. २ हत्ती. ३ गरुड. ४ सर्प. ५ उंदीर. ६ मदन. ७ मुखांतून. ८ काळ. ९ पायांतील जोड्यानें, वाहाणेनें. १० विंचू. ११ सर्प. १२ मेघ. १३ पर्व .

वतारूढशचीनायक । कींनंदीवरीमदनांतक । तयापरीअयोध्यानायक । हनुमंतस्कंधींबैसला ५ क्रोधायमानरघुनंदन । प्रथमसोडीएकबाण । राव
णाचींदाहीछत्रेंछेदुन । अकस्मातपाडिलीं ६ मित्रपत्रेंआणिचामरें । सवेंचछेदिलींदुसऱ्याशरें । मुकुटभूमीसएकसरें । चूरकरूननपाडिले ७ स
वेंचभ्रातेदाहाहीधनुष्यें । छेदोनिपाडिलींअयोध्याधींशें । विचित्रकेलेंपरमपुरुषें । प्रथमारंभीतेकाळीं ८राघवबोलेगर्जोनी । दशमुखातुजसोडिलेंरणीं ।
आजश्रमलासिरणांगणीं । जायसत्वरमाघारा ९ आपलीसंपदाभोगून । सकळस्त्रियांसयेईंपुसोन । पुत्रपौत्रंआप्तजन । निरोपघेऊनयेईंत्यांचा
२१० मगतुजसमरंगणीं । देहखंडविखंडकरुनी । तत्काळपाडीनधरणीं । निश्चयमनींजाणहा ११ इतकीजवळअसतांसेना । तूंकांअलासिसम
रंगणा । दुर्जनाबुद्धिहीनामलिना । मुखयेथेंनदाखवी १२ ऐसेंबोलतांजानकीजीवन । दशमुखझालादर्पभग्न । अजासर्पन्यायेंकरून । उगाचितटस्थपा
हातसे १३ जोपीडेदरिद्रेंकरून । तोदेशत्यागीजायउठोन । तैसारावणरणसांडून । लंकेंमाजीप्रवेशला १४ जोजातींतूनभ्रष्टझाला । तोतेवींद्विजीं
दवडिला । कींदिव्यदेतांखोटाझाला । तोलाजलानिघेजैसा १५ असोऐसाप्रळयकरून । कुंभकर्णासउठवीलरावण । तीकौतुककथागहन । श्रवणक
रोतपंडित १६ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथअंबर । नानादृष्टांतभर्गणेंसाचार । तेथेंउदयपावलारामचंद्र । निष्कलंकअक्षयी १७ ब्रह्मानंदश्रीरामचंद्र ।
जोनिर्मळशीतळउदार । तेथेंअनन्यश्रीधरचकोर । स्वानंदामृतसेवीतसे १८ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मिकीनाटकाधार । सदांप
रीसोतभक्तचतुर । षड्विंशतितमोध्यायगोडहा २१९ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ अध्याय ॥ २६ ॥ ॥ ओव्या २१९ ॥ ७ ॥ ॥ ७

१ इंद्र. २ शंकर. ३ रामचंद्र. ४ नातू. ५ ब्राह्मणानीं. ६ सत्य. ७ आकाश. ८ नक्षत्रें. ९ पक्षी.

श्रीगणेशायनमः । श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । आळसीकदांउदीमनकरी । नवजायमंदिराबाहेरी । तोंजगन्निवाससाहाकारी । घरींचनिर्धारींभाग्यें
आला १ मृत्तिकाखणावयाजात । तोंमांदुससांपडेअकस्मात । तैसेंआह्मासिझालेंयथार्थ । सद्गुरुनाथप्रसादें २ अभ्यासनकरितांबहुवस । सांपडली
रामविजयमांदुस । मगगगनींमाइनाहर्ष । उपरतीजाहली ३ मांदुसउघडोनिजोंन्याहाळी । तोंआंतहोतींसातकोहळीं । तींहींसप्तकांडरसाळीं । एकाहू
निएकविशेषें ४ कोहळींजोंन्याहाळूनपाहत । तंवदिव्यआंतदीप्तिमंत । भक्तिज्ञानवैराग्ययुक्त । घवघवीतविराजती ५ चतुरश्रोतेज्ञानसंपन्न । ते
बंधुआलेधांवोन । ह्मणतीआह्मांसवांटादेसमान । मांडलेंभांडणप्रेमभरें ६ ह्मणतीहींवाल्मिकाचींकोहळीं । तुजपूर्वभाग्येंलाभलीं । तरींवांटाआह्मा
सयेवेळीं । देईंसर्वांससारिखा ७ मगचतुरसंतजन । श्रवणासबैसलेघालोनिआसन । कोहळींत्यांपुढेंनेऊन । एकसरेंरचियेलीं ८ मगतिहींकर्णद्वारें
उघडोन । हृदंयभांडरींसांठविलेंधन । श्रोतेवक्तेसावधान । निजखूणपूर्णपावले ९ पांचकोहळींदाविलींफोडून । साहावेंयुद्धकांडगहन । असोगता
ध्यायींकथानिरूपण । राघवेंरावणनिर्भर्त्सिला १० छत्रमुकुटटांकिलेछेदून । अपमानपावलारावण । मगलंकेंतगेलापरतोन । चिंतार्णवींबुडाला ११
जैसाराहुग्रस्तनिशाकर । कींकाळवंडेदग्धकांतार । कपाळशूळेंमहाव्याघ्र । तैसादशकंठउतरला १२ नावडेछत्रसिंहासन । जेंजेंपाहूंजायरावण । तें
तेंरामरूपदिसेपूर्ण । नाठवेआनपदार्थ १३ सभेसबैसलारावण । अत्यंतदिसेकळाहीन । महोदराप्रतिवचन । बोलताझालातेवेळां १४ ह्मणेकैसा
विपरीतकाळ । मक्षिकेनेंहालविलाभूगोल । चित्रींच्यासर्पेंखगपाळ । गिळिलानवलवाटतें १५ खद्योततेजेंकरून । आहाळोनिगेलाचंडकिरण । तैसा
मीआजिरावण । युद्धींपावलोंपराजय १६ मगबोलतीप्रधान । आतांउठविजेकुंभकर्ण । तोरामसौमित्रांसहितसैन्य । गिळीलक्षणनलागतां १७ ती
रावणासिमानलीमात । ह्मणेघटश्रोत्रासउठवात्वरित । मगविरूपाक्षमहोदरनिघत । दहालक्षराक्षससंगेंघेउनी १८ मद्यपखालाचारसहस्त्र । कुंजरीं
घातल्यासत्वर । देखोनिभयानकशरीर । कंपसुटलाराक्षसां १९ शूळघेतलेअपार । वाद्येंवाजवितीभयासुर । गजरेंसीपावलेसत्वर । अन्नाचेपर्वतघेउनी
२०वनगजह्मैसेतरस । नासिकांतगुंतलेबहुवस । टांकितांश्वासउश्वास । निर्गमनन्व्हेतयांसी २१ सवालक्षगांवेंखोल । सरितापतीचेंतुंबळजळ । तेंनाभी
प्रमाणेंकेवळ । कुंभकर्णासिहोयपैं २२ असोराक्षससर्वमिळती । द्वारींएकचिहाकाफोडिती । सकळवापीकूपआटती । महागजरेंकरूनी २३ स्वर्गापर्यंत
ऐकोंजाती । ऐशाभेरीत्राहाटिती । उरावरीगजचालविती । परिजागानोहेसर्वथा २४ गगनचुंबितवृक्षघेऊन । नासिकींचढवितीपूर्ण । एकनाकपु

---

१ हृदयरूप जामदारखान्यांत. २ चिंतासागर. ३ चंद्र. ४ अरण्य. ५ रावण. ६ गरुड. ७ काजवा. ८ सूर्य.

डीअवरोधून । श्वासोश्वासकोंडिती २५ एकवृक्षपाषाणघेती । वर्मस्थळींबळेंटांकिती । कडूतीक्ष्णऔषधेंओतिती । नासिकपुटींतेकाळीं २६ उपाय केलेबहुतपूर्ण । जागानोहेचकुंभकर्ण । विरूपाक्षेंकिन्नरीआणून । कर्णामाजींबैसविल्या २७ त्यांचेंपरमसुस्वरगायन । ऐकतांशशीयेईलधांवोन । जागाहोऊनकुंभकर्ण । सावधानबैसला २८ जांभईदीधलीभयानक । मद्यप्राशिलेंसकळिक । दाढेखालींपशूदेख । अपारघालूनरगडिले २९ अन्नमांसाचेपर्वत । गिळिलेराक्षसबहुत । मगनेत्रपुसोनपाहात । प्रधानाकडेतेकाळीं ३० तंवतिहींप्रणिपातकरून । सांगतेझालेसर्ववर्तमान । सीताआणिलीहिरून । तेथूनसर्वकथियेलें ३१ हनुमंतलंकाजाळुन । रामसौमित्राआलाघेऊन । कालचेयुद्धींरावण । पराजयपावला ३२ रावणपरमचिंताक्रांत । यालागींतुह्मांउठविलेंत्वरित । मांडलाबहुतकल्पांत । आटलेसमस्तराक्षस ३३ उभाठाकलाकुंभकर्ण । ह्मणेऐसाचरणाजाईन । मगत्रिनवितीप्रधान । राजदर्शनघेईजे ३४ सभेसिचाललाकुंभकर्ण । लंकादुर्गगुल्फप्रमाण । आश्चर्यकरीरघुनंदन । विमानेंसुरगणपळविती ३५ लंकावेष्टितजेवानर । तेथूनपळालेसमग्र । देखोनकुंभकर्णाचेंशरीर । कपिमूर्च्छितपडियेले ३६ रामासिबोलेबिभीषण । हाउठलाकुंभकर्ण । त्रासतीशशीआणिचंडकिरण । शरीरदेखोनतयाचें ३७ बिभीषणह्मणेतेकाळीं । रामाचियाजन्मकाळीं । प्रळयवर्तलाभूमंडळीं । हांकझालीचहूंकडे ३८ मातेचेउदरांतून । भूमीसीपडलाकुंभकर्ण । तीससहस्रस्त्रियाजाण । वदनपसरूनगिळियेल्या ३९ इंद्राचाऐरावतधरूनी । येणेंआपटिलाधरणीं । ऐरावतीचेदांतमोडूनी । इंद्रासियेणेंताडिलें ४० शक्रेंवज्रउचलोनिघातलें । याचेंरोमनाहींवक्रजाहलें । यासिनिद्रावरणपडलें । ह्मणोनिवांचलेंहेंजग ४१ असोकुंभकर्ण दृष्टींदेखोन । हिमज्वरेंव्यापलेवानरगण । एकमुरकुंडीवळून । दांतखिळियाबैसविती ४२ भोंवतेंपाहेचापपाणी । तोंभयाभीतवानरवाहिनी । सर्वांचेंअंतरजाणोनी । मारुतीकडेपाहिलें ४३ तोंनिमिषांतहनुमंत । अकस्मातगेलालंकेंत । कुंभकर्णसभेसीजात । केलेंअद्भुतवायुसुतें ४४ कुंभकर्ण तीनवेळा । कटीपर्यंतउचलिला । रामआणिकपीडोळां । तटस्थहोऊनपाहती ४५ मद्यपानेंकुंभकर्ण । अत्यंतगेलासेभुलून । आपणासउचलितोकोण । हेंहीत्यासीनेणवे ४६ मगतोसीतांशोकहरण । पुढतीउचलूनकुंभकर्ण । भुजाबळेंभोवंडून टांकीतहोतासुवेळेसी ४७ मागुतीकेलेंअनुमान । ह्मणेगगनींदेऊंभिरकाऊन । कींलंकेवरीआपटून । चूर्णकरूंसकळही ४८ मगह्मणेंनव्हेविचार । लंकाचूर्णहोईलसमग्र । मगतोबिभीषणनृपवर । नांदेलकैसायेस्थळीं ४९ सुवेळेसीद्यावाटांकून । तरींवानरहोतीचूर्ण । भूमंडळींआपटूंधरून । तरीधराजाईलपाताळा ५० ऊर्ध्वपंथें

१ चंद्र. २ सूर्य. ३ भूमीवर: ४ शीतज्वर, हिंवताप. ५ वानरसेना. ६ सीतेचा शोक दूर करणारा मारुति. ७ आकाशांत.

चिठेवीन । भुजाबळेंभोवंडून । वृक्षावरीघातलानेऊन । राघवापासींपरतला ५१ भयआणिशाहारेंपूर्ण । गेलेंकपींचेंनिघोन । जैसाउगवतांसहस्त्रं
किरण । तमंजायनिरसोनी ५२ हनुमंतेंबळदाऊन । वानरांदीधलेंरसायण । हिमैंज्वरदारुण । निघोनगेलेसर्वही ५३ असोश्रीरामचरणींभाळ ।
ठेवीअंजनीचाबाळ । मगसुग्रीवादिकपिसकळ । धांवोनभेटतीहनुमंता ५४ शब्दसुँमनेंस्तुँतिमाळा । घालितीमारुतीचेगळां । ह्मणतीकुंभकर्णसांप
डला । तरीकांसोडिलाकळेना ५५ मारुतीचेअंतरार्थ । कपीतेंसांगेरघुनाथ । त्यासमाझेहातींमृत्य । हेंहनुमंतजाणतसे ५६ सिंहावलोकनेंनि
श्चिती । मागीलकथाऐकावीश्रोतीं । कुंभकर्णजातसभेप्रती । रावणासीभेटावया ५७ बंधूसन्मुखदेखोन । हरुषेंकोंदलादशानन । कुंभकर्णेंप्रणिंपा
तकरून । निजस्थानासीबैसला ५८ जेवींमेघकरीगर्जन । तेवींबोलेकुंभकर्ण । कायसंकटपाडिलेंयेऊन । ह्मणोनिमजजागविलें ५९ महाप्रळयमां
डला । कींउंर्वीजातहोतीरसातळा । कींकृतांतचालूनआला । ह्मणोनिमजजागविलें ६० सांगेरावणवर्त्तमान । जानकीआणिलीहिरून । यालागीं
वानरदळघेऊन । सुवेळेसीरामआला ६१ धूम्राक्षआणिवज्रदंष्ट्री । प्रहस्तप्रधानपडलासमरीं । मगमीयुद्धागेलोंझडकरी । परिपावलोंपराजय ६२ प
रमसंकटपडलें । ह्मणोनिबंधूतुजजागविलें । मजचिंताव्याधीनेंपाडिलें । त्यासिओषधदेईंतूं ६३ संकटींबंधूपावेसाचार । दरिद्रकाळींजाणिजेमित्र । सं
शयनिरसावयासमग्र । सद्गुरुचरणधरावे ६४ तमदाटलेंजरीघोर । दीपिकापाजळाव्यासत्वर । येतांवैरियाचेंशस्त्र । वोडंणपुढेंकरावें ६५ दुष्काळप
डतांअत्यंत । दात्यापासींजावेंत्वरित । संकटआह्मांपडलेंबहुत । ह्मणोनितुजजागविलें ६६ यावरीबोलेकुंभकर्ण । बुद्धीकर्मांनुंसारिणीपूर्ण । जान
कीव्यर्थआणून । कुळक्षयमांडिला ६७ रामहावैकुंठवासीनारायण । सुरांचेअवतारवानरपूर्ण । हेंनारदेंवर्तमान । पूर्वींचमजसांगीतलें ६८ असोजें
शुभाशुभकर्महोत । तेंभोगल्यावीणनचुकत । पुढीलहोणारभविष्यार्थ । तोनचुकेकदांही ६९ करूंनयेतेंरायाकेलें । शेवटींसीतेसतरींभोगिलें । येरू
ह्मणेबहुतयत्नकेले । परितेवशनहोय ७० तीरामावेगळीतत्वता । आणिकावशनव्हेसर्वथा । कुंभकर्णह्मणेलंकानाथा । राघवरूपधरींतूं ७१ जपोनि
यांकापटच्यमंत्र । होईंसुंदररघुवीर । सीताहोईलवशसाचार । क्षणमात्रनलागतां ७२ मगबोलेलंकेश्वर । मीनिजांगेंहोतांरघुवीर । तेव्हांदुर्वासनासमग्र ।
मावळेलमाझीसमूळीं ७३ घरायेतांवांसरमणी । तमनउरेतेक्षणीं । कींगरुडयेतांसर्पश्रेणी । पळतीउठोनिनिजभयें ७४ तैसामीरामहोतांजाण ।
वाटेलपरनारीमातेसमान । एकवचनएकबाण । एकपत्नीव्रतीजो ७५ याचलागींबंधुवाजाण । रामसौमित्रवानरगण ॥ यांसीसंहारिल्याविण । व

१ सूर्य. २ अंधकार. ३ शीतज्वर. ४ शब्दरूप फुलें. ५ स्तुतिरूप माळा. ६ नमस्कार. ७ पृथ्वी. ८ काळ. ९ ढाल. १० कर्मासारखी. ११ सूर्य. १२ सर्पसमुदाय.

शनोहेसर्वथा ७६ यावरीबोलेकुंभकर्ण । आतांगिळीनसकळसैन्य । क्षणांतरामलक्ष्मण । धरूनआणीनपुरुषार्थें ७७ अपारसैन्यसमुद्र । सर्वेंदे
तदशकंधर । रावणासनमूनसत्वर । कुंभकर्णनिघाला ७८ रणायेतांकुंभकर्ण । तेथेंहोतेवानरगण । तेअवघेगेलेपळोन । रामचंद्रासीसांगावया ७९
कुंभकर्णविचारीअंतरीं । मीकायलोटूंवानरांवरी । जंबुंकावरीजैसाकेंसरी । धांवतांपुरुषार्थदिसेना ८० पिपीलिकांवरीधांवेगज । अलिकेवरीधांवेद्वि
जराज । मूढसभेंततेजःपुंज । पंडितशोभानपावे ८१ आरंभींराक्षसदळतुंबळ । वानरांवरीउठावलेचपळ । कपीधांवलेसकळ । शिळावृक्षघेउनी
८२ युद्धझालेंअपार । लोटलेशोणितांचेपूर । परीतेंनमानीघटश्रोत्र । ह्मणेहेंयुद्धकायसें ८३ मूढअपारबोलती । तेंनभेदेपंडितचित्तीं । जैसेवृषभ
परस्परेंभांडती । नमानेतेंमहाव्याघ्रा ८४ असोतेव्हांमुद्गलघेऊन । रामावरीलोटलाकुंभकर्ण । अठरापद्मेंवानरगण । पर्वतपाषाणभिरकाविती ८५
पर्वतावरीपर्जन्यपडत । तथापिनमानीतोकिंचित । कींकूर्मपृष्ठीवरीबहुत । सुमनेंवर्षतांनढळेची ८६ तोंशतशृंगांचामंडितपर्वत । घेऊनभिरकावीहनुमं
त । तोमुष्टीघातेंत्वरित । फोडूनटांकीकुंभकर्ण ८७ ह्मणेरेमर्कटाधरींधीर । तुवांजाळिलेंमाझेंनगर । ह्मणोनियांधांवेघटश्रोत्र । हनुमंतावरीतेधवां ८८
बळेंशूळभोवंडोनी । मारुतीवरीघालीउचलोनी । तेवेळवायुसुतधरणीं । मूर्च्छायेऊनपडियेला ८९ तेंदेखोनिवाहिनीपती । नीळधांवेसमीरगती । कुंभ
कर्णाचीयुद्धगती । देवपाहतीविमानीं ९० नीळेंपर्वतटांकिला । तोमुष्टिघातेंचूर्णकेला । नीळासिमुष्टिघातदीधला । मूर्च्छितपडलाधरेवरी ९१ तों
धांवलेचौघेवानर । जेकाळासिशिक्षाकरणार । ऋषभशरभगवाक्षवीर । गंधमादनचवथातो ९२ चौघांजणींचारपर्वत । टांकिलेतेव्हांअकस्मात ।
तेमुष्टिघातेंपिष्टवत । करूनियांटांकिले ९३ शरभगवाक्षधरणीवरी । कुंभकर्णेंआपटिलेस्वकरीं । दोघेभिरकाविलेअंबरीं । जगतीवरीपडियेले ९४
मगरणींगर्जेकुंभकर्ण । वाटेब्रह्मांडजायढळोन । मगवानरांतेंदेखोन । ग्रासावयाधांवला ९५ कवघालोनिअकस्मात । एकदांचवानरांसधरित । मुखीं
घालूनिचावित । गिळिलेगणितऐकातें ९६ ऐशींसहस्रद्रुमपाणी । असुरेंगिळिलेमुखपसरुनी । कितेककर्णरंध्रीनिघोनी । पळतेझालेएकसरें ९७
उरलेवानरतेवेळे । रणसांडोनिपळाले । गिरिकंदरींदडाले । कुंभकर्णभयेंकरूनी ९८ कितेकतेव्हांवानरगण । सूर्यसुतासिगेलेशरण । तेवेळींपर्व
तघेऊन । सुग्रीववीरधांविन्नला ९९ विशाळपर्वतटांकिला । येरेंमुद्गलेंचूर्णकेला । सुग्रीवह्मणेअमंगळा । वृथापुष्टराक्षसा १०० तुझेंनासिकआ
णिकर्ण । क्षणनलागतांछेदीन । विमानींवृंदारकगण । जेणेंकरूनतोषती १ तुझाअग्रजदशकंधर । पंचवटीसयेऊनतस्कर । जानकीरत्नसुंदर । घे

१ असंख्य. २ रावण. ३ कोल्हा. ४ सिंह. ५ गरुडः ६ रक्ताचे. ७ कुंभकर्ण. ८ बैल. ९ फुलें. १० भूमि. ११ सेनापती. १२ वायुवेगानें. १३ देवांचासमुदाय.

ऊनिआलाचोरूनी २ तरीतस्करातेंदंडपूर्ण । छेदावेनासिककर्ण। तूंरावणाचाअनुजपूर्ण । शिक्षालावीनतुजआतां ३ कुंभकर्णह्मणेसुग्रीवासी।मश
काआगळेंबहुतबोलसी । जैसापतंगवडवानळासी। विझवावयाधांवत ४ मूषकझालाक्रोधायमान ।ह्मणेसगळापर्वतगिळीन। वृंश्चिकस्वपुच्छेंकरून।
ताडीनह्मणेखदिरांगारा ५ ऊर्णनाभीचाउदरतंतू । तेणेंबांधिलाऐरावतू । सूर्यमंडळधगधगितू । खद्योतंकेवीगिळीलपां ६ तैसातूंबळहीनवानर।रा
गेंआलासिमजसमोर । मत्कुणप्रायशरीर। चूर्णकरीनतुझेंमी ७ ऐसेंबोलतांरावणानुज ।पर्वतघेऊनअर्कज । कुंभकर्णाचेह्रदयींसहज । येऊनियांआ
दळला ८ पर्वतगेलाचूर्णहोऊन । क्रोधेंधांवेकुंभकर्ण । सुग्रीवासिचरणींधरून । भोवंडिलागरगरां ९ पृथ्वीवरीआपटूंपाहत । तोप्रतापीसूर्यसुत ।
पिळिलाकुंभकर्णाचाहात । ऊर्ध्वपंथेंउडाला ११० ग्रहमंडळपर्यंत। उडोनिगेलाकपिनाथ । त्याहूनकुंभकर्णाचाहात । उंचावलातेकाळीं ११ मागुती
वानरेश्वरधरिला । बळेंचकक्षेंतदाटिला।कक्षावळींतगुंडाळला । कंटाळलादुर्गंधीनें १२ ह्मणेवालीनेंरावण । कक्षेंतघालूनकेलेंस्नान । तोसूडआजिवे
तलाजाण । टांकीनरगडोनिमर्कटासी १३ जयवाद्यांचागजर । होताझालापैंअपार । रणींसाधिलावानरेश्वर । घंटश्रोत्रपरतला १४ संसारजाळें
परमथोर । त्यांतगुतलासाधकनर । तोपळावयापाहेरंध्र । तेवीवानरनिघोंइच्छि १५ दुर्गंधींतपडेमुक्ताफळ । कींपंकगर्तेंतमरांळ । कींब्राह्मणश्रोत्री
निर्मळ । हिंसकगृहींकोंडिला १६ असोमस्तझालाकुंभकर्ण । नसेतयादेहस्मरण । तोंकक्षेंतूनसूर्यनंदन । नलागतांक्षणनिष्ठला १७ जंवहालेने
त्रपात । इतुक्यांतसाधिलेंकृत्य । कुंभकर्णस्कंधींउभाठाकत । तारानाथतेधवा १८ दोनीकर्णविशाळ।दोनींकरींधरिलेसबळ । दंतसंधींतअढळ । ना
सिककुंभकर्णाचें १९ कर्णनासिकउपडोनी । सुग्रीवउडालागगनीं । रामचरणावरीयेउनीं ।मस्तकठेवीसप्रेमें २० एकचिझालाजयजयकार ।देवव
र्षतींसुंमनसंभार । यशस्वीझालासूर्यकुमर।आलिंगीरघुवीरतयातें २१ घ्राणकर्णनेलेसूर्यसुतें । शुद्धीनाहींकुंभकर्णातें । वर्तमानकळलेंरावणातें । घ
टश्रोत्रातेंविटंबिलें २२ परमचिंताक्रांतरावण । नापीकदीधलापाठवून । गगनचुंबितवंशघेऊन । तयासिदर्पणबांधिलें २३ सप्तखणीमहद्वारदे
ख।त्यावरीउभाठाकेनापिक । कुंभकर्णाचेसन्मुख । आदर्शतेव्हांदाविला २४ छेदोनिनेलेंनासिककर्ण ।दर्पणींदेखेकुंभकर्ण। सुग्रीवगेलाकक्षेंतून ।
झालेंस्मरणतेकाळीं २५ जैसाकिंशुकींफुललापर्वत । तैसादिसेपैंआरक्त । परमविटलामनांत । स्वरूपआपलेंदेखतां २६ मनांतह्मणेकुंभकर्ण ।
आतांकायव्यर्थवांचून ।दशग्रीवासपरतोन।कायहेंवदनदाखवूं २७ कपींसहरामलक्ष्मण । गिळीनमीनलागताएकक्षण ।पृथ्वीपालथीघालीन।नि

१ लाहानभाऊ. २ उंदीर. ३ विंचू. ४ काजवा. ५ कुंभकर्ण. ६ राजहंस. ७ पुष्पांचा वर्षाव. ८ आरसा. ९ पळसाचे वृक्ष. १० तोंड.

दांळीनसर्वांसी २८ कुंभकर्णपरतळादळीं । दांतेंरगडीअधरंपाळी । कृतांतवतहांकदीधली । डळमळीतउर्वीतेव्हां २९ परतलादेखोनिकुंभकर्ण । पळोंलागलेवानरगण । आलेरघुपतीसशरण । आह्मांरक्षीह्मणोनियां ३० दृष्टींदेखोनिराघव । कुंभकर्णेंघेतलीधांव । तंवतोसौमित्रबलार्णव । पाचारी ततयातें ३१ ह्मणेउभाराहेंएकक्षण । पाहेमाझेंशरसंधान । परीतोनमानूनिकुंभकर्ण । रामाकडेधांविन्नला ३२ परमकोपेंसुमित्राकुमर । कुंभकर्णा वरीटांकीतशर । तोसपँक्षबुडालासमग्र । देहामध्येंगुप्तझाला ३३ सौमित्रिटांकिलेबहुतबाण । परीतेनमानीकुंभकर्ण । पर्वतावरीपुष्पयेऊन । पड तांअचळनढळेची ३४ पंडितवचनेंरसागळीं । पाखंडीनमानीकदाकाळीं । तैसाकुंभकर्णतेवेळीं । नगणीशरसौमित्राचे ३५ तोंगदाघेऊनिविभीष ण । बंधूवरीआलाधांवोन । ह्मणेनिर्नासिकाएकक्षण । मजसीआतांयुद्धकरीं ३६ म्यांपूर्वींबोधिलादशवक्र । त्यासिझोंबलाकामविखार । तेणेंभुल लातोसमग्र । शुद्धीअणुमात्रनसेची ३७ गोडवचनेंकडूवाटती । कडूतींगोडअतिप्रीतीं । ऐश्वर्यमदनिश्चिती । कंठींदाटलाजयाचे ३८ रावणदुष्कृत वल्लीचींफळें । तींतुजप्राप्तझालींशीघ्रकाळें । त्याचेंप्रत्युत्तरतेवेळे । कुंभकर्णदेतसे ३९ ह्मणेविभीषणाशतमूर्खा । हांससीमाझ्याकर्णनासिका । मीकोण हेंतुजदेखा । नाहींकळलेंअद्यापी १४० कुळक्षयासकारण । तूंमिळालासइकडेयेऊन । मजपुढेंदाऊंनकोवदन । क्षणेंप्राणघेईनतुझा ४१ राक्ष ससिंहकुळामाजीदेख । तूंजन्मलासिजंबुक । कपटियानदाखवींमुख । कुळवनछेदककुठारा ४२ तुझींशतखंडेंकरितोंयेवेळीं । परीद्यावयातिळांजुळी तुजराक्षिलेंयेकाळीं । कुळउत्पत्तीसकारण ४३ होईंमाघारावेगेंसीं । निघेरामाचेपाठीसीं । कपिसेनानिश्चयेंसी । मीग्रासीनक्षणार्धें ४४ ऐकूनि बंधूचेंवचन । माघारलाविभीषण । पुढेंरामावरीकुंभकर्ण । क्रोधेंकरूनपातला ४५ तयासिबोलेरामराणा । तुह्मींपीडिलेंत्रिभुवना । ह्मणोनिअवतर लोंजाणा । वधावयाकारणें ४६ तुवांजेगिळिलेवानरगण । तेपोटफोडोनिबाहेरकाढीन । तुझेंजवळीआलेंमरण । पाहेंसावधानमजकडे ४७ ऐसेंबो लोनिरामचंद्र । चापशरघेऊनसत्वर । आकर्णपर्यंतवोढोनिशर । क्रोधेंकरूनपुनःबोले ४८ तूंआहेसशतमूर्ख । तुजऐसादुजानसेपापिष्ठ । तरीतुज करितोंआतांपिष्ट । मृत्युपुरीसधाडितों ४९ मृत्युपुरीसराहेंजाऊन । सर्वेंचपाठवितोंरावण । लंकेसस्थापिलाविभीषण । चंद्रार्कवरीशाश्वत १५० यावरीबोलेकुंभकर्ण । तूंजन्मांतरींचाशत्रुपूर्ण । हेंआह्मासिआहेज्ञान । मूळचीखुणासर्वही ५१ आपुलेंसामर्थ्यवर्णिलें । परीमजपुढेंकदांनचाले । कपि दळगिळीनसगळें । दंतांदंतनलावितां ५२ तुवांवधिलेखरदूषण । वालीमारिलाकपटेंकरून । परीमजपुढेंतोअभिमान । नचालेकदांमानवीया ५३

१ ओंठ. २ काळ. ३ पृथ्वी. ४ पिसाऱ्यासहित बाण. ५ कोल्हा. ६ कुऱ्हाड. ७ स्वर्ग. मृत्यु व पाताळ ८ धनुष्य बाण. ९ यमलोकास. १० स्थिर.

निद्रार्णवींजाहलोंनिमग्न । नातरींनुरतेंत्रिभुवन । तुजवीरह्मणतांजाण । हांसेंपूर्णयेतसे ५४ वनचरांसीपीडीकुंजर । परीमृगेंद्रापुढेंमार्जार। मेघापु
ढेंवणवाअपार । विझोनिजायक्षणार्धें ५५ तैसेंतुजयेथेंकरीन । सोडीतुझेनिर्वाणेंबाण । हेंऐकोनिरघुनंदन । वोढीआकर्णशरतेव्हां ५६ जैशाप्रळ
यविजाअनिवार । तैसेराघवाचेयेतीशर । असुरेंमुखपसरिलेंथोर । गिळीअपारबाणातें ५७ भयाभीतवानरतथें। विलोकितीकुंभकर्णातें । बाणगिळि
लेअसंख्यातें । नव्हेगणितत्यांचें ५८ सागरींमिळतीगंगापूर । तैसामुखींसांठवीशर । हातींघेऊनमुद्गलतोमर । रामावरीधांविन्नला ५९ हांकफो
डिलीप्रचंड । तेणेंडळमळिलेंब्रह्मांड । जंलचरेंवनचरेंउदंड । गतप्राणजाहली १६० मुद्गलभोंवंडीचक्राकार। रामावरीघालूंपाहेअसुर । मगतोरणरंग
धीर । दिव्यशरकाढित ६१ मंत्राच्याअवृत्तीकरुनी । बाणींस्थापीप्रळयाग्नी । आकर्णवोढीवोढुनीं । बाणसोडीराघव ६२ मुद्गलासहितहस्त । बा
णेंतोडिलाअकस्मात । गगनपंथेंभेदीतजात । सपक्षउरगजयापरी ६३ रामबाणहाचिसुपर्ण । गेलाहस्तसर्पघेऊन । सवेंचसूर्यबीजजपोन । रघुनं
दनशरसोडी ६४ तेणेंखंडिलादुजाहस्त । गेलागगनींअकस्मात । दुसरीभुजापडत । विंध्याचळाचियापरी ६५ परिभुजाहोऊनिजित । जातक
पीभाररगडीत । वानरउचलोनीपर्वत । हस्तठेंचितीअसुराचे ६६ सांडूनिसंग्रामाचीभुमीं । कपीजातीगिरिगुल्मी । परीअचळठाणसंग्रामीं । रघूत
माचेंचळेना ६७ मगकाढिलेदोनशर । गुणींयोजोनियांसत्वर । तेदोनीचरणसमग्र । कटीपासूनखंडिले ६८ चरणगडबडाटथोर । खालींपाषा
णहोतीचूर । महावृक्षघेऊनिवानर। ताडितीबळेंठायींठायीं ६९ असोमुखपसरूनतेकाळी । राक्षसधांवेपोटचाली । विमानींसुरंबरतेवेळीं । आश्चर्यक
रितीतयाचें १७० नासिकींलोचनीवदनीं । ज्वाळासोडीक्रोधेंकरुनी । इकडेभीमकाळशस्त्रबाणी । अयोध्यानाथेंस्थापिलें ७१ करीवायूचेंखंड
ण । ऐसाराघवाचादिव्यबाण । आकर्णवोढीवोढून । नलागतांक्षणसोडिला ७२ वज्रेंतुटेशैलशिखर। तैसेंबाणेंउडविलेंशिर । भेदीतगेलेंअंबर । क
रीतप्रळयगर्जना ७३ विमानेंपळवितीसुरवर । भयाभीतशशिमित्र । तोंशिरउतरोनीसत्वर । लंकेवरीपडियेलें ७४ बहुतसदनेंमोडुन । किल्ये
कअसुरपावलेमरण । तेवेळींवृंदारकगण । पुष्पेंवर्षतीश्रीरामावरी ७५ झालाएकचिजयजयकार । विजयीझालारघुवीर । दुंदुभीवाजवीसुरेश्वर। आ
नंदअंबरींनसमाये ७६ धांवतीसकळवानरगण । वंदितीरघुपतीचेचरण । कुंभकर्णाचेंउरलेंसैन्य । लंकेमाजीप्रवेशल ७७ सभेसयेऊनिघायाळ ।
वर्तमानसांगतीसकळ । ऐकतांरावणपडिलाविकळ । सिंहासनावरूनी ७८ ह्मणेगेलेंकुंभकर्णाऐसेंनिधान । बंधूविणेंदिसेंशून्य। शोकसमुद्रींपडतांराव

१ निद्रा रूपी समुद्रांत. २ हत्ती. ३ सिंह. ४ अमोघ बाण. ५ पाण्यांतील प्राणी. ६ वनांत राहणारे प्राणी. ७ आकशपंथ. ८ सर्प. ९ धनुष्याची दोरी. १० देव ११ नेत्र.

ण । आलाधावूनिइंद्रजित ७९ रावणासीसांवरून । ह्मणेरायापाहेंविचारून । यामृत्युलोकासियेऊन । चिरंजीवकोणराहिला ८० यावरीविपरीतकाळवेळा । वानरमारितीराक्षसदळा । खद्योतगिळीसूर्यमंडळा । मशकभूगोळहालवी ८१ पतंगपक्षवातेंकरुनी । कैसाविझालाप्रळयाग्नी । भूतानीकाळनेउनी । कुटकेकरूनभक्षिला ८२ कुंभकर्णवीरकेसरी । रणींमारिलानरवानरीं । विपरीतकाळाचीपरी । ऐसीचअसेविचारा ८३ रावणाचेविंशतिनेत्र । पाझरतीदु:खनीर । त्याकाळींसाहाजणवीर । उभेठाकलेसंग्रामा ८४ रामविजयग्रंथविशेष । युद्धकांडमाजलारस । तोश्रवणकरावासावकाश । ब्राह्मानंदेंकरूनियां ८५ रणरंगधीररघुवीर । भक्तवत्सलपरमउदार । अभंगअक्षयश्रीधर । विजयसाचारसर्वदां ८६ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मिकीनाटकाधार । सदांपरिसोतभक्तचतुर । सप्तविंशतितमोध्यायगोडहा १८७ । । श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु । श्रीराधाकृष्णार्पणमस्तु । शुभंभवतु । । ओव्या १८७ । । ५ । । ५ । । ५ । । ५ ।

श्रीगणेशायनमः । । श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । श्रीरामचरित्रअतिसुरस । परिसतांअंतःकरणींउल्हास । सोडोनिआठवविसरास । राममयजा
हलें १ रघुवीरमहिमाविशेष । शोधावयाधाविन्नलेंमानस । तंवतेंउन्मनहोऊनिनिःशेष । राममयजाहलें २ बुद्धीधांवलीवेगेंकरून । गणावयाज
गद्वंद्याचेगुण । तंवतेबौद्धरूपहोऊन । राममयजाहली ३ तोंचित्तासआलाआवेश । वर्णावयाअयोध्याधीश । तेंचैतन्यरूपहोऊनिविशेष । राममयजा
हलें ४ कांसघालीअहंकार । पावेनरामकथाब्धीचापार । तोब्रह्मानंदींबुडेसाचार । निरहंकारहोऊनी ५ ऐकतांरघुनाथचरित्र । होऊनिठेलेंश्रवणीं
चित्त । त्वचाआनंदमयहोत । इतररुपर्शटांकूनियां ६ रामपहावयावेळोवेळीं । चक्षुनींघेतलीआळी । रसनाआनंदेंनाचोंलागली । रामचरित्रव
र्णावया ७ रामचरणकमळींचाआमोद । सेवावयाघ्राणझालेंमिलिंद । एवंसर्वइंद्रियवृंद । रघुनाथींलीनजाहलें ८ वक्ताह्मणेंदशइंद्रियांतें । जिव्हेसि
भाग्यआलेंअद्भुतें । रघुपतीचेगुणवर्णिते । ब्रह्मानंदेंकरूनियां ९ श्रोतेह्मणतीआमुचेश्रवण । दशइंद्रियांमाजीधन्य । पुढेंबोलेकथानुसंधान । युद्धकां
डजेंसुरसअसे १० सत्ताविसावेअध्यायींकथन । रामेंवधिलाकुंभकर्ण । उद्विग्नझालारावण । तोंवीरसाहाजणउठिले ११ महापार्श्वमहोदर । देवां
तकनरांतकत्रिशिर । अतिकायाराजपुत्र । शक्रजिताचाकनिष्ठबंधू १२ घेऊनचतुरंगसेना । साहीचालिलेरणांगणा । रणवाद्येंवाजतीनाना । ऐकतां
मनाभयउपजे १३ महाद्वारउल्लंघून । बाहेरनिघालेसाहीजण । तोंसाहीरथावरीआणून । शिरेंटांकिलींगृध्रांनीं १४ ऐसाहोतांअपशकुन । म
नींविरालेसाहीजण । परिवीरश्रीनावरेपूर्ण । वेगींरणांगणींपावले १५ देखतांअमित्रांचेभार । स्मरारिमित्राचेउठिलेवीर । घेऊनपर्वततरुवर । स
मरंगणींमिसळले १६ अनिवारकपींचामार । क्षणेंमाघारलेअसुर । तंवतोनरांतकपुत्र । तुरंगारूढधांविन्नला १७ राक्षसांचेअस्थिपंजर । बळें
विदारितीवानर । मृत्तिकाघटवतफोडितीशिर । कींपूगीफळचूर्णकेलें १८ तोतुरंगश्यामकर्ण । क्षीरार्णवाचेंहृदयरत्न । कींमुसेंतआटोनिचंद्रकिरण ।
तुरंगोत्तमनिर्मिला १९ कींजान्हवीचेतोयेंघडिला । सुपर्णाहूनवेगआगळा । कींउच्चैःश्रव्याचाबंधूआला । प्रवेशलापरदळीं २० जैसीप्रळयवि
द्युल्लता । तैसीझळकेअसिलता । अलातचक्रवतफिरतां । दृष्टींनदिसेकवणातें २१ अश्वखर्गक्षत्रीपाहीं । तीनीमिळालींएकेठायीं । नरांतकेंतेसमयीं ।
ख्यातीकेलीअद्भुत २२ अठरालक्षतेक्षणीं । वानरमारिलेरणांगणीं । किंचित्‌माघारलेद्रुमपाणी । तेंअंगदेंदुरोनीलक्षिलें २३ अनिवारनरांतका
चामार । वानरवीरहोतांसमोर । सहस्त्रांचेसहस्त्र । घायासरिसेपाडीतसे २४ धांवेजैसाकृतांत । तैसापेटलावालीसुत । कींवृक्षावरीअकस्मात ।

---

१ श्रवणाविषयीं. २ नेत्र. ३ जिव्हा. ४ भ्रमर. ५ इंद्रियसमुदाय. ६ इंद्रजित. ७ गिधाड. ८ युद्धाचे ठायीं. ९ मित्र नव्हे तो अमित्र ह्मणजे शत्रु.

सौदामिनीपडियेली २५ तैसाअंगदसन्मुखआला । कठोरपाणिप्रहारदिधला । नरांतकाचाअंतझाला । अश्वासहिततेकाळीं २६ नरांतकपडतां चौघेजण । अंगदावरीधांवलेचहूंकडून । महापार्श्वमहोदरजाण । देवांतकआणित्रिशिर २७ दोनपर्वतकरींघेऊन। उभाठाकलावालिनंदन । चौघां सीयुद्धकरितांपूर्ण । अंगदसंकटींपडियेला २८ तंवतेधांवतीतिघेजण । ऋषभनळवायुनंदन । नळेंपर्वतघायेंकरून । महोदररणींमारिला २९ दे वांतकासमीपहनुमंत । येऊनतयासीबोलत । तुजदेवांतकनामसत्य । कोण्यामूढेंठेविलें ३० निर्नासिकानांवरतिकांत । जारासनामब्रह्मचारीसत्य कींज्याचेंनांवआदित्य । तोअंधारींपडियेला ३१ जंबुकदेखतांजोपळे । त्यासीकेसरीनामठेविलें । दोनीनेत्रसंकोचझाले । कमलनेत्रनामतया ३२ अमंगळेनामभागीरथी । अनुसूयानामजारिणीप्रती । कींबाळविधवेनिश्चितीं । जन्मसावित्रीहेंनाम ३३ कोरान्नमागतांनमिळेकण । तयासीइं द्रनामठेविलेंपूर्ण । जयाक्षीरसिंधूनामाभिधान । परीतक्रनमिळेतृषार्थ ३४ अजारक्षकानामपंडित । काष्ठवाहकानामनृपनाथ । कींदरिद्रीयासीनामदे व । कुबेरऐसेंप्राप्तझालें ३५ जैसेअजांगळींचेस्तन । कींबधिराचेथोरकर्ण । गर्भांधाचेविशाळनयन । तैसेंनामजाणतुझें ३६ वृषभासीसिंहास न । श्वानासिअग्रपूजापूर्ण । कींदिव्यांबरपरिधान । जैसेंउष्ट्राकरविलें ३७ कनकवृक्षघोण्यासीह्मणती । कींचर्माचाकेलाहस्ती । पक्ष्यासीभारद्वाज ह्मणती । देवांतकतवनामतैसें ३८ ऐसेंबोलोनिवायुकुमर । हृदयींदिधलालत्ताप्रहार । संपलादेवांतकाचासंसार । तोंत्रिशिराधांविन्नला ३९ हनुमंतें वृक्षघेऊन । त्रिशिरामारिलानलागतांक्षण । ऋषभेंपर्वतघेऊन । महापार्श्वमारिला ४० ऐसेंअतिकायादेखोन । सारथीयासीह्मणेप्रेरीस्यंदन । सर्वां सीअलक्षकरून । रामावरीचालिला ४१ सहस्रघोडेज्याचेरथीं । अरुणासहीनव्हेगती । एकेसूत्रेंआवरीसारथी । नवलकपिकरितीपैं ४२ अति कायाचेंस्थूळशरीर । इंद्रजिताऐसाप्रचंडवीर । तयासमोरजाहलेपांचवानर । पर्वतहातींघेऊनियां ४३ गवयगवाक्षकुमुद । शरभआणिपांचवामैंद । पर्वतटांकितीसुबद्ध । एकदांचतेकाळीं ४४ अतिकायेंसोडूनबाण । पर्वतटांकिलेफोडून । शरींखिळिलेपांचहीजण । आरंबळतपडियेले ४५ बिभीषणासीपुसेरघुनंदन । अहोहाकोणाचाकोण । तोह्मणेरावणाचानंदन । नामयाचेंअतिकाय ४६ हादिव्यरथतेजागळा । ब्रह्मदेवेंयासीदीध ला । हाअनिवारअसेयाला । पुरुषार्थयाचाअद्भुत ४७ हाकोणासनाटोपेपूर्ण । तुह्मीउठावेंघेऊनबाण । कींपाठवावाउर्मिळाजीवन । याचाप्राणघ्यावया ४८ काढिलीचापाचीगवसणी । जेवींनिशांतींप्रगटेतरणी । कींकुंडांतीलमहाअग्नी । याह्मिकेंफुंकोनिचेतविला ४९ तोंविनवीसुमित्रानंदन । मीयासीयुद्ध

१ वीज. २ मदन. ३ अदितीचा पुत्र ह्मणून सूर्यास आदित्य असें ह्मणतात. ४ कोल्हा. ५ सिंह. ६ बकरी. ७ उत्तम. ८ उंट. ९ रथ. १० पुत्र. ११ तेजानें मोठा.

करीन । अवश्यह्मणोनसीताजीवन । आज्ञादेतसेतेधवां ५० चापचढवूनसत्वर । पुढेंधांवेसुमित्रकुमर । ह्मणेरेतुझेंस्थूळशरीर । विटंबीनशरपंथीं
५१ तुझेंशरीरआजिबाणीं । मीफोडीनसमरंगणीं । आतांलंकेंतपरतोनी । कैसाजासीलमाघारा ५२ कृतांताचियामुखांत । सांपडलासीराक्षसबें
स्त । कुंजरजाऊनसिंहदरींत । तोंकैसायेईलमाघारा ५३ काळेंपाशघालूनी । ओढूनआणिलेंरणीं । भुजंगाचेकवेंतुनी । मूषककैसाजाईल ५४
अतिकायाह्मणेतेसमयीं । तूंवीरह्मणसीपाहीं । महाव्याघ्राचेंसोंगकांहीं । जंबुकासशोभेना ५५ नटआलानृपवेषधरून । परीत्यानभितीकोणीजन ।
वरीवैराग्यदावीपूर्ण । अंतरींमनतळमळी ५६ आयुष्यसांडोनिलवलाहीं । प्रारब्धेंआणिलेंयेथेंपाहीं । आतांकोणतेपार्थीं । जाशीलरेमाघारा ।
५७ स्वर्गींतुमचेपितृगण । कायकरितीबैसोन । त्यांचेसमाचारापाठवीन । तुह्मांसआतांयेकाळीं ५८ ऐकोनिअतिकायाचेंवचन । सौमित्रह्मणेसा
वधान । आतांसांभाळीमाझेबाण । तुझेप्राणहरतेजे ५९ तोंअतिकायालोटीस्यंदन । जोशतखणीमंडितपूर्ण । मित्रकरसंख्याजाण । घोडेश्वेतवर्ण
योजिले ६० सौमित्रेंसोडीपांचबाण । पंचचपळामेघांतून । लंकेशपुत्रेंदेखोन । योजिलाबाणतेकाळीं ६१ चापांपासूनसुटतांबाण । पांचशरटां
किलेखंडून । मगसोडीतसहस्त्रबाण । सुमित्रानंदनतेकाळीं ६२ परमचपळअतिकाया । तितुकेशरतोडीलवलाह्या । प्रळयमेघगर्जोनियां । सहस्त्र
बाणसोडिले ६३ मगलक्षाचेलक्षबाण । सोडीसुमित्रानंदन । बाणाचाचपर्जन्य । वर्षतसेतयेवेळीं ६४ गजमस्तकेंविदारित । मुक्तेंत्याचिगा
राउसळत । शक्तीविद्युल्लताअद्भुत । पूरवाहतअशुंद्वाचे ६५ तेथेंशस्त्रेंजातीवाहोन । प्रेतेंवृक्षआदिकरून । वीरांचेहस्तविरोळेपूर्ण । तळपतातीठायीं
ठायीं ६६ वीरांचेदंतविखुरलेबहुत । तेचिवाळूअसंख्यात । खेटकेंजींतेथेंतरत । तेचिकूर्मजाणावे ६७ गजशुंडादंडवाहती । तेचिनाडेसावजेंतळ
पती । ऐशीसौमित्रेंकेलीख्याती । मानतुकावितीवानर ६८ असोअनेकशस्त्रास्त्रें । सौमित्रावरीलंकेशपुत्रें । टाकिलींपरीसौमित्रें । छेदोनियांपाडिलीं
६९ सौमित्रेंकाढिलादिव्यबाण । मुखींब्रह्मास्त्रस्थापून । कल्पांतविजेसमान । चापापासूनसुटलाअसे ७० निमिषनलागतांसत्वर । छेदिलेंअतिकाया
चेंशिर । झालाएकचिजयजयकार । सुमनेंसुरवरवर्षती ७१ बहुसालआटलेंदळ । लंकेंतप्रवेशलेघायाळ । रावणापुढेंसकळ । समाचारसांगती ७२
सिंहासनावरूनरावण । खालींपडेमूर्च्छायेउन । मगइंद्रजितेंधांवोन । सांवरूनबैसविला ७३ ह्मणेमाझींसाहीनिधानेंगेलीं । पुनःपरतोनिनाहीं
देखिलीं । अतिकायासारिखाबळी । पाठिराखातुझागेला ७४ इंद्रजितह्मणेरायाप्रती । होणारनचुकेकल्पांतीं । आतांयुद्धासिजातोंमीनिश्चिती । शत्रु

---

१ काळ. २ राक्षसरूप बोकड. ३ उंदीर. ४ एक हजार. ५ लक्ष्मण. ६ विजा. ७ धनुष्य. ८ बाण. ९ मोत्यें. १० रक्ताचे.

क्षयकरावया ७५ चतुरंगदळेंसत्वरीं । रणमंडळींआलाशक्रारी । सेनादुर्गंतेअवसरीं । आपणाभोंवतेरक्षियेले ७६ रक्तेंकरूनियांस्नान । रक्त
वर्णवस्त्रेंनेसुन । भल्लातकसमिधाआणून । सँर्षपधान्यसंयुक्त ७७ रणमंडळींकेलेंहवन । आंतूननिघालास्यंदन । धनुष्यतूणीरशस्त्रेंपूर्ण । सारथीअ
श्वसमवेत ७८ त्यारथींबेसोनझडकरीं । मेघाआडगेलाशक्रारी । दुर्धरशरतेअवसरीं । वर्षताझालाआपार ७९ तेबाणनव्हतीसंपूर्ण । वर्षतविजापर्जन्य ।
शिरेंआणिकरचरण । कपीर्घीतुटतीतटतटां ८० कोट्यानकोटीपडिलेवानर । झालाएकाचिहाहाःकार । एकाआडएकदडतीवीर । परमदुस्तरवोढव
लें ८१ एकपळावयायोजिती । तत्काळकरचरणखंडिती । रामसौमित्रतटस्थपाहती । आंगींआदळतीसायक ८२ धनुष्येंहातींचींगळालीं । रा
मसौमित्रपडिलेधरणीं । लीलावतारीचापपाणी । दाखवीकरणीशत्रूची ८३ शतबाणेंइंद्रजितें । खिळिलेंरामसौमित्रातें । पुराणख्यासंअर्कंजातें । विं
धोनभूमीपाडिलें ८४ शास्त्रसंख्याबाणी । गंधमादनपाडिलाधरणी । रविसंख्येनेंधरणी । ऋषभमैंदपडिले ८५ चंद्रसख्याबाणींनीळ । सागर
संख्येनेंऋक्षपाळ । सकंदमुखसंख्येनेंनळ । प्रेतवतपाडिला ८६ ऋतुअर्धदिवससंख्याबाणी । अंगदपाडिलासमरंगणीं । गवयगवाक्षशरभतीनी ।
संवत्सरसंख्यानीखिळिलेपैं ८७ कळासंख्यामार्गण । दधिमुखपावकलोचन । विद्यासंख्यासायकपूर्ण । सुषेणावरीटांकिले ८८ रुद्रनेत्रसंख्याटा
कूनशर । खिळिलेगजकेसरीवानर । हेमकूटगोरमुखवीर । युगसंख्यानीखिळिले ८९ सुमुखदुर्मुखज्योतिर्मुख । यांवरीअवतारसंख्यासायक । वरकड
वानरजेअसंख्य । तेबाणसंख्यानींखिळिले ९० ऐसाकरूनियांअर्थ । खालींउतरेइंद्रजित । जयवाद्येंवाजवित । लंकेमाजीप्रवेशला ९१ परम
हर्षयुक्तरावण । पुत्रासिदेतआलिंगन । ह्मगेमाझाप्रतापपूर्ण । तुजकरितांपुत्ररराया ९२ असोवानरपडिलेसर्व । परिदोघेउरलेचिरंजीव । बिभीषगहनु
मंतबळार्णव । प्रियप्राणराघवाचे ९३ दोघेअत्यंतम्लानवदन । स्फुंदस्फुदोनिकरितीरुदन । ह्मणतीकाळकैसाकठिण । विचारकायकरावा ९४ अ
स्तागेलावासरमणी । प्रवर्तलीघोररजनी । मगचुडियापाजळोनी । रणशोधूंनिघाले ९५ महावृक्षउन्मळिले । तैसेठायींठायींवीरपडिले । रणबहु
तअसेतेवेळे । दोघेजणदेखती ९६ तंवतोवीरजांबुवंत । पडलासेआरंबळत । तयासांवरूनिहनुमंत । बैसविताजाहला ९७ जांबुवंतबोलेवचन ।
याचराचराचेंजीवन । सुखीअसेकींरघुनंदन । अनुजासहितसांगपां ९८ सद्गदसांगेबिभीषण । निचेष्टितरामलक्ष्मण । त्याचपरीसकलसैन्य ।
प्राणहीनपडिलेंअसे ९९ मगबोलेऋक्षपाळ । कोणीआणीलद्रोणाचळ । तरीत्यावल्लीसुवासेंसकळ । वीरआतांउठतील १०० उगवलानसतांवास

१ इंद्रजित, २ भिलाव्याचा वृक्ष. ३ शिरस. ४ रथ. ५ भाते. ६ रथ ह्मणजे गाडी ती हांकणारास सारथी ह्मणतात. ७ सुग्रीव.

रमणी। औषधीआणाव्यात्वरेंकरूनी । ऐसेंऐकतांतयेक्षणीं। मारुतात्मजआवेशला १ क्षीराब्धीचेपैलतीरीं। चारिकोटीयोजनेंदूरी । मारुतिह्मणेतृती
यप्रहरीं। औषधीवेगींआणितों २ विभिषणासींहनुमंत। बोलेहोऊनसद्गदित। जतनकरावारघुनाथ। सौमित्रासहितजीवांसी ३ ऐसेंबोलोनिहनुमंत।
वेगेंउडालाआकाशपंथ । ह्मणेयशस्वीअयोध्यानाथ । शक्तिदाताहोईंतूं ४ चपळपाणिद्वयचरण । घेतउड्डाणावरीउड्डाण । कींक्षिराब्धीप्रतिसुप
र्ण। वैकुंठींहूनजातसे ५ लक्षूनमानससरोवर। मराळझेंपावेसत्वर। त्याचपरीअंजनीकुमर। सप्तद्वीपेंवोलांडी ६ सप्तसमुद्रओलांडून । द्रोणा
चळाजवळीयेऊन। जानकीशोकहरण। उभाठाकलातेवेळीं ७ अगस्तीसागराचेतीरीं। कींत्रिविक्रमबळीचेद्वारीं। कींनृपाचियाभांडारीं। तस्करंजै
सासंचरे ८ कींतरूंजवळींयेउनी । उभाठाकलाकुठारपाणी। कींनिधानापासींजाऊनी। परीक्षकउभाठाके ९ असोकरजोडूनिहनुमंत । द्रोणाच
ळातेंस्तवित। ह्मणेतूंपरोपकारीपर्वत। पुंण्यरूपनांदसी १० तुझेंकरितांस्मरण। सकळरोगजातीपळोन। शरजाळींरामलक्ष्मण। इंद्रजितेंपाडियेले
११ तूंजीवदानदेतांसत्य । त्रिभुवनामाजीयथार्थ। कीर्तिऐकोनियांयेथ । मीयाचकआलोंअसें १२ औषधीदेंऊनियांनिर्मळ । मजबोळवावेंता
त्काळ। तोंप्रत्यक्षमूर्तिमंतशैल। बोलतसेकपीसीं १३ ह्मणेमर्कटाआलासिकोठून। कैंचारामकैंचालक्ष्मण। देवांसदुर्लभऔषधीपूर्ण। तुजकोठून
प्राप्तहोती १४ धरूनमाझाआश्रय। मर्कटातूंयेथेंचिराहें । त्यावरीतोराघवप्रिय । कायबोलताजाहला १५ ह्मणेपाषाणहृदयतूंद्रोण । मंदबुद्धी
मूढमलिन। कार्याकार्यतुजलागोन। निर्दयाकेंसेंसमजेना १६ वायंसाकायमुंक्ताहार। मद्यपीयासकायतत्वविचार। निर्दयासीधर्मशास्त्र । सारासार
समजेना १७ मांसभक्षकानुपजेदया। हिंसकासकैंचीमाया। उपरतीपैशून्यवादिया। कदाकाळेंनसेची १८ कृपणासीनावडेधर्म। जारासीनावडे
सत्कर्म । निंदकासीनावडेप्रेम । भजनमार्गकदांही १९ कीर्तननावडेभूतप्रेता। दुग्धनावडेनवज्वरिता। टवाळासीपैंतत्वतां। तपानुष्ठाननावडे १२०
ऐसातूंअत्यंतनिष्ठुर । रामभजननेणसीपामर। तुजनलागतांक्षणमात्र। उचलोनिनेतोंलंकेसी २१ शेषाकारपुच्छपसरोन। द्रोणाचळबांधिलाआंवळून।
तत्काळचिउपडोन । करावरीघेतला २२ जैशाअसंख्यातसौदामिनी। तैसापर्वतदिसेदुरुनी । कींयेऊनियांतरणी । हनुमंतवीरजातसे २३ कींसुधा
रसनेतांसुपर्ण ।लीलाकमलउचलीपूर्ण। कींसहस्त्रवदनेंउर्वीउचलोन। सर्षपप्रायधरियेली २४ कींकनकताटद्रोणाचळ। वह्नीतेचिदीपतेजाळ । पाजळ
नियांअंजनीबाळ। आवाळूंयेतरामातें २५ चतुर्थप्रहरींसुमुहूर्तीं । सुवेळेसीआलामारुती। तंवतोनूतनलंकापती । सामोराधांवेआनंदें २६ तों

१ गरुड. २ राजहंस पक्षि. ३ वामन. ४ चोर. ५ वृक्ष. ६ कुऱ्हाड हातामध्यें घेणारा. ७ रत्नें. ८ पर्वत. ९ कावळ्यास. १० मोत्यें.

सुटलाशीतप्रभंजन । चालिलावल्लीचासुवासघेऊन । त्यावातेंरामलक्ष्मण । सेनेसहउठले २७ रजनीसंपतांतत्काळ । पूर्वेंसउगवेरविमंडळ । तैसारा
मतमाळनीळ । वानरांसमवेतऊठला २८ कोणाचेंतनुवरीसाचार । घायनदिसेअणुमात्र । असोद्रोणाचळासिवायुपुत्र । घेऊनिमागुतीउडाला २९
लीलाकंदुकखेळेबाळ । तैसापर्वतझेलीविशाळ । पूर्वस्थळींठेऊनतत्काळ । सुवेळेसीपातला ३० शक्रबैसेदेवांसहित । तैसाकपिवेष्टितरघुनाथ । सद्गद
होऊनिहनुमंत । रामचरणींलागला ३१ जाहलाएकचिजयजयकार । प्रेमेंदाटलारघुवीर । हृदयींधरिलावायुकुमर । तोनसोडीचसर्वथा ३२
स्कंदासिभेटेउमावर । कींइंद्रासीआलिंगीजयंतपुत्र । कींसंजीवनीसाधितांपवित्र । गुरुकचासीआलिंगी ३३ हनुमंताचेंवदन । कुरवाळीतरघुनंदन ।
सकळकपीह्मणतीधन्य । स्वामीगौरवपावला ३४ श्रीरामह्मणेमारुतीसी । सर्वांचाप्राणदातातूंहोसी । सरलीनाहींजोंनिशी । तंवतूंपर्वतआणिला ३५
बाळकहोतांव्यथाभूत । जननीऔषधेंपाजित । बारेतैसेंकेलेंनिश्चित । प्रतापअद्भुतनवर्णवे ३६ ऐसेंबोलतांरघुनंदन । सकळकपीह्मणतीधन्य । स्वा
मीगौरवापुढेंपूर्ण । सुधारसपानतुच्छपैं ३७ सुग्रीवादिककपीधांवती । हनुमंतासिदृढहृदयींधरिती । वानरांसीह्मणेकिष्किंधापती । यावरीकायपाहातां
३८ आतांलंकेवरीजाऊन । सकळसदनंजाळवाअन्न । अष्टादशपद्मेंहरिगण । नळनीळमारुतीधांविन्नले ३९ गगनचुंबिततैलकाष्ठें । चुडीपाजळिल्या
नेटें । कींतेरामभवानीचेदिवटे । गोंधळघालितीरणांगणीं १४० चुडीघेऊनसमग्र । भुभुःकारेंगर्जेअंबर । जययशस्वीरघुवीर । ह्मणोनिधांवतीसर्व
ही ४१ लंकादुर्गवोलांडून । आंतप्रवेशलेवानरगण । तोंअद्भुतसुटलाप्रभंजनं । चुडियालावितीएकसरें ४२ वायूचेअद्भुतकल्होळ । आकाशपंथें
चालिलीज्वाळ । लंकेमाजीहलकल्लोळ । पळतीलोकसर्वपैं ४३ धूरअद्भुतदाटलासे । तेथेंकोणाकोणीनदिसे । ज्वाळाधांवतीआवेशें । लंकासर्वग्रासा
वया ४४ कोटद्यावधीघरेंजळती । राक्षसस्त्रियाआहाळती । आळोआळीउभेअसती । चुडीघेऊनवानर ४५ दृष्टींदेखतांरजनीचर । चुडीनेंभाजि
तीवानर । तोंदशमुखासिसमाचार । दूतसत्वरसांगती ४६ हनुमंतेंआणूनिद्रोणाचळ । सजीवकेलेवैरीसकळ । लंकेंतप्रवेशलेंकपीदळ । जाळिलींस
कळमंदिरें ४७ मगजंघप्रजंघक्रोधन । विरूपाक्षशोणिताक्षराजनंदन । कुंभनिकुंभाप्रतिरावण । ह्मणेधांवासत्वर ४८ सिद्धकरूनियांदळभार ।
कुंभनिकुंभधांवतीसत्वर । घालोनियांपर्जन्यास्त्र । अग्निसमग्रविझविला ४९ सांडोनियांलंकाभुवन । वेगींपरतलेवानरगण । रणभूमीसीसर्वमि
ळोन । युद्धालागींसरसावले १५० आलेदेखोनिअसुरभार । सेनामुखींहोतावालिपुत्र । पर्वतघेऊनसत्वर । क्रोधनावरीधांविन्नला ५१ पर्वतदीधलाटाको

१ गार वायु. २ रात्र. ३ शरीर. ४ चेंडू. ५ आई. ६ घरांस. ७ वानर. ८ आकाशास स्पर्श करणारीं. ९ आकाश. १० वायु. ११ राक्षस.

न । रथासहितझालाचूर्ण । तोंजंघप्रजघविरूपाक्षधांवोन । आलेसत्वरअंगदावरी ५२ अंगदेंविशाळवृक्षउपडोनी । दोघेझोडूनपडिलेधरणीं । मगवि
रूपाक्षेंनिजबाणीं । वानरबहुतखिळिले ५३ तोंमैंदसत्वरधांविन्नला । पर्वतअसुरावरीटांकिला । विरूपाक्षप्राणासमुकला । शरभेंवधिलाशोणिताक्ष ५४
मगतोकुंभकर्णाचानंदन । कुंभआलाधांवोन । धनुष्यवोढूनआकर्ण । नवबाणसोडिले५५त्यानवशरेंकरुनीं । मैंदकपीखिळिलारणीं । शरभविंधिलादोन
बाणी । मूर्छितधरणींपडियेला ५६ तोंधांवेवालिसुत । घेऊनिविशाळपर्वत । त्याचेकुंभेंखिळिलेहस्त । अचळासहितरणभूमी ५७ संकटपडिलेंबहुत । अंग
दराहिलातटस्थ । वानरांनीहांककेलीत्वरित । राघवापासींतेकाळीं ५८ ऐकोनिकुंजरांचीमात । आवेशेंचपेटेमृगनाथ । तयापरीकिष्किंधानाथ । कुं
भहृदयीं आदळला ५९ चापघेतलेंहिरून । मोडूनकुटकेकेलेपूर्ण । मल्लयुद्धासीदोघेजण । प्रवर्तलेतेकाळीं ६० एकमुहूर्तपर्यंत । मल्लयुद्धझालेंअद्भु
त । अर्कजेंहृदयींमुष्टिघात । कुंभासिबळेंदीधला ६१ तेणेंहृदयझालेंचूर्ण । कुंभाचातेथेंचगेलाप्राण । तंवतोनिकुंभआवेशोन । सुग्रीवावरीधांविन्नला
६२ तोंपर्वतउचलून । वेगेंधांवेसीताशोकहरण । अचळदिधलाभिरकाऊन । निकुंभेंतोचूर्णकेला ६३ हनुमंतपरमक्षोभला । विशाळतरूउपडो
नीटांकिला । तोंहीनिकुंभेंमोडिला । क्षणमात्रनलागतां ६४ निकुंभेंपरिघलवलाही । घेऊनिताडिलामारुतीहृदयीं । पळमात्रमूर्छनातेसमयीं । आलीहनु
मंतासतेकाळीं ६५ सवेंचिधांवेअंजनीबाळ । शतशृंगांचामहाअचळ । वरीटांकिलातत्काळ । चूर्णझालानिकुंभ ६६ घायाळपळतीलंकेंत । रावणासी
करितीश्रुत । ऐकतांचितोचिंताक्रांत । दशवक्त्रझालातेधवां ६७ मगतेणेंतिघेवीर । परमप्रतापीसमरधीर । खराक्षविशालाक्षअसुर । मकराक्षतोतीसरा
६८ तिघांसिह्मणेदशवदन । तुह्मींमाजवावेंरण । तेतत्काळरथारूढहोऊन । सेनेसहितनिघाले ६९ रणतुरेंगर्जतीअपार । रणमंडळींपावलेसत्वर ।
तोंशिळाद्रुमघेऊनिवानर । एकदाचिपुढावले १७० येरयेरांपाचारिती । उसणेघायसवेंचदेतीं । असुरांचीपोटेंफाडिती । वानरनखांनींतेधवां ७१
कुंतअसिलतापरिघ । असुरटाकितीसवेग । तेणेंविदारूनअंग । कपीपडतीसमरंगणीं ७२ कपिवीरींकेलेंआगळें । असुरभारमागेंलोटले । हें
देखोनिमकराक्षतेवेळे । बाणवर्षतधांवला ७३ जैशापर्जन्यधाराअपार । तैसामकराक्षवर्षेशर । अपारभंगलेवानर । पाहेरघुवीरदुरूनी ७४ मानतु
कावीसीतारमण । ह्मणेहावीरप्रवीण । कोदंडचढवोनीआपण । जगद्वंद्यऊठिला ७५ कोदंडवोढितांतयेक्षणीं । झणत्कारिल्यालघुकिंकिणी । एकचबा
णतेक्षणी । दशकंठरिपूनेंसोडिला ७६ मकराक्षाचेंबाणजाळ । एकेंचिशरेंछेदीतत्काळ । जेवींउगवतसूर्यमंडळ । भगणेंसकळलोपती ७७ एक

१ पृथ्वीवर. २ कानापर्यंत धनुष्याची दोरी ओढून. ३ बाणांनी. ४ अंगद. ५ हत्ती ६ सिंह. ७ धनुष्य. ८ रावण ९ रणवाद्यें १० भाला. ११ तलवारी.

उठतांविनायकें । अपारसंहारीदंदंशूक । कींसुटतांचंडवातदेख । जलदजाँळवितळेपैं ७८ एकविष्णुनामेंकरून । असंख्यदुँरितेंजातीपळोन । कीं चेततांकृशान । असंख्यवनेंदग्धहोतीं ७९ कींमूर्खांचेशब्दबहुत । एकाचशब्देंखंडीपंडित । कींसिंहनादेंगजसमस्त । गतप्राणहोतीपैं १८० हृदयींप्रग टतांबोध । सहजपळेकामक्रोध । कींप्रत्ययायेतांब्रह्मानंद । क्षुद्रानंदसर्वविरती ८१ तेवींरामबाणेंएकेचिसबळ । तोडिलेंमकराक्षाचेंशरजाळ । मगत्यास मुक्तीद्यावयातत्काळ । दिव्यशरकाढिला ८२ मकराक्षाचाकंठलक्षून । शरचालिलाजैसासुपर्ण । क्षणमात्रेंकंठछेदून । आकाशपंथेंउडविला १८३ तोंविशाळाक्षआणिखराक्ष । त्यांहींपाचारिलाकमलाक्ष । जोसर्वात्मासर्वसाक्ष । विरूँपाक्षध्यायजया ८४ असुरधांवतीलवलाहें । ह्मणतीसर्वदातु जकैंचाजय । अकस्मातकाँकतालीयन्याय । मकराक्षतुवांमारिला ८५ ऐसेंबोलोनिदोघेजण । सोडितीरामावरीबाण । जैसेंमृगेंद्रापुढेंयेऊन । मांडिलेंठा णमार्जारें ८६ कींसज्ञानपंडितापुढें । बोलावयाआलीमूढें । कींजंबुकआपलेपवाडे । व्याघ्रापुढेंदावीतसे ८७ कींउष्ट्रींब्रीदबांधोन । तुंबरापुढेंमांडिलें गायन । तैसेंराक्षसींसंधान । रामापुढेंआरंभिलें ८८ दोघांहींशरसोडिलेअपार । तितुकेनिवारीश्रीरघुवीर । प्रळयचपळेऐसेंथोर । दोनशरकाढिले ८९ तेधनुष्यावरीयोजून । अकस्मातसोडीरघुनंदन । दोघांचींकंठनाळेंछेदून । निराळमार्गीनेलींपैं १९० कळलारावणासीसमाचार । परत्रपा वलेत्रयअसुर । तत्काळशक्रारीमहावीर । सनेसहितधांविन्नला ९१ होमकरूनरणमंडळीं । त्यांतूनएककृत्यानिघाली । रथींबैसोनतेवेळीं । अकस्मातउ डाला ९२ त्याकृत्येआडबैसोन । शक्रारीसोडीतेव्हांबाण । ह्मणेसर्वांसीखिळीन । वानरगणभयाभीत ९३ मगलोकप्राणेशयेउनी । सांगेजगद्वंद्याचे कर्णीं । ह्मणेअंगिरास्त्रेंकरुनी । कृत्याछेदोनीटांकिजे ९४ कृत्येआडबैसोन । इंद्रजितकरीसंधान । रामेंतत्काळमंत्रजपोन । अंगिरास्त्रसोडिलें ९५ तेणें कृत्याभस्मझालीझडकरी । जैसाबोधप्रवेशतांअंतरीं । दुर्वासनापळेबाहेरी । तृष्णाकल्पनाघेउनी ९६ कींप्रगटतांवासरमणी । तमनिरसेमुळींहुनी । तैसीकृत्याछेदितांधरणीं । इंद्रजितउतरला ९७ रणींप्रगटउभाराहुनीं । अपारशरसोडीरावणी । तोदुरात्मापापखाणी । देखतांवानरक्षोभले ९८घे ऊनियांमहापर्वत । रागेंधांवेअंजनीसुत । गदाघेऊनियांत्वरित । बिभीषणचौताळला ९९ परिघहातींघेउनी । मैंदधांवेक्रोधेंकरुनी । कौमोदकीआ कळोनी । धन्वंतरीपुढेंजाहला २०० शतघ्नीघेऊनसत्वर । धांवेतोऋषभवानर । शरभघेऊनिधांवेचक्र । गंधमादनशक्तीपैं १ जांबुवंतघेगिरीथोर । अंगदेंउपडिलातरुवर । नीळेंघेऊनियांतोमर । शत्रूवरीधाविन्नला २ नळउचलीतमहाशिला । सुग्रीवेंपर्वतघेतला । कुमुदघेऊनिपुढेंझाला । लोहप

१ गरुड. २ सर्प. ३ मेघजाळ. ४ पातकें. ५ अग्नि. ६ शंकर. ७ काकताळीय यानामें न्याय. ८ सिंह. ९ मांजर. १० कोल्हा.

द्विशतेवेळीं ३ सौमित्रेंचापेंवोढून । टांकिलेतेव्हांतीनबाण । शेंतशरदारुण । रघूत्तमेंटाकिले ४ इतकीशस्त्रवृष्टीहोत। परीतेनगणीचइंद्रजित । शस्त्रेंतो डूनसमस्त । बाणअनेकसोडिले ५ अष्टादशपद्मेंवानर । निजबाणींकेलेजर्जर । लक्षोनियांरामसौमित्र । दारुणशरसोडिले ६ रामसौमित्रसकळ । कंपिदळकेलेंविकळ । पुरुषार्थकरूनतत्काळ । इंद्रजितपरतला ७ जयवाद्येंवाजवित । लंकाप्रवेशेशक्रजित । पित्यासकरूनप्रणिपात । वार्तासकळसां गीतली ८ रावणह्मणेशक्रजितासी । तूंक्षणक्षणाशत्रुमारिसी । निशीअंतींसूर्यप्रकाशी । मागुतीतैसेऊठती ९ वरिवरीजळेजैसेंतृण । मागुतीअंकुर फुटतीजाण । त्यावरीशक्राजितवचन । कायबोलताजाहला २१० अतांरामलक्ष्मण । सेनेसहितवधीन । तरीचतुह्मादावीनवदन । प्रतिज्ञापूर्णमाझी हे ११ हेनघडेजरीगोष्टी । तरीतुमचीआमुचीहेचभेटी । पित्यासीनमूनउठाउठी । इंद्रजितचालिला १२ मगसिद्धकरूनिचतुरंगदळ । युद्धासिचा लिलाउतावेळ । जैसेसरितापूरतुंबळ । वर्षावकाळींधांवती १३ तीनवेळसंग्रामकरुनी । इंद्रजितगेलाजयघेउनी । मागुतीआलाचौताळोनी । रणमे दिनीमाजवावया १४ युद्धकांडपरमसुरस । जेथेंमाजेवीररस । तेंचतुरश्रोतेसावकाश । अत्यंतप्रेमेंपरिसापुढें १५ रणरंगधीरारामचंद्रा । सुवेळाच ळवासींप्रतापरुद्रा । श्रीधरवरदाआनंदसमुद्रा । ब्रह्मानंदाजगद्गुरू १६ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मिकीनाटकाधार । सदांपरिसो तपंडितचतुर । अष्टाविंशतितमोध्यायगोडहा २१७ श्रीकृष्णार्पणमस्तु । श्रीभूमिजारमणार्पणमस्तु ॥ ॥ अध्याय ॥ २८ ॥ ॥ ओंव्या । २१७

१ धनुष्य. २ शंभर. ३ इंद्रजित. ४ नमस्कार. ५ रात्र. ६ गवत. ७ मुख. ८ हत्ती. घोडे. रथ. पायदळ. ९ युद्ध.

श्रीगणेशायनमः ॥ ॥ श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । रामकथापरमपावन । सुधारसाहूनिगोडगहन । देवकरितीसुधारसपान । परीकल्पांतींमरणनचुके
ची १ अमृतगोडळागेरसनेसी । तेंतृप्तनकरीश्रोत्रनेत्रांसी । रामकथानव्हेतैसी । सर्वइंद्रियांसितृप्तकरी २ सुधारससेवितांमदचढे । कथामृतेंम
दमत्सरझडे । त्रिविधतापदुःखसांकडें । सहसानपडेसद्भक्तां ३ कथामृतकरितांश्रवण । जोकरणारसुधारसपान । त्याचेमस्तकींठेऊनिचरण । कथानंत
पलीकडे ४ अमृतसदांइंद्रलोकींवसत । सर्वलोकींरामकथामृत । स्वर्गींराहाणारसमस्त । सदांइच्छितीरामकथा ५ तेकथासुधारसपान । श्रवणकरो
तभक्तजन । गतकथाध्यायींरावणींयेऊन । रणींउभाठाकला ६ परमदुरात्मातोरावणी । अंतरींकापट्यविद्यास्मरूनी । कृत्रिमजानकीनिर्मूनी । रथा
वरीबैसविली ७ घेऊनिशिळातरुवर । वर्षोलागलेरीसवानर । सेनामुखींरुद्रावतार । उभादेखिलाइंद्रजितें ८ तप्तकांचनवर्णीतेवेल्हाळ । वस्त्रा
भरणींमंडितसकळ । मुखशशांकअतिनिर्मळ । सर्वलक्षणींविराजे ९ हेंकृत्रिमरूपनिर्मिलें । ऐसेंकदांकवणानकळे । बहुविचक्षणजरीआले । तेहीसत्यमानि
ती १० असोकृत्रिमरूपनिर्मोनी । इंद्रजितह्मणेमारुतीलागुनी । अरेपाहाहेजनकनंदिनी । तुझीस्वामिणीवानरा ११ हेरामाचीअंगनाहोय ।
इणेआमुचाकेलाकुळक्षय । त्रेतायुगामाजीपाहें । कृत्याकेवळजन्मली १२ पंचवटीपासूनसाचार । इजकरितांसंहारिलेअसुर । प्रहस्तअतिकायमहो
दर । देवांतकनरांतक १३ कुंभकर्णादियामिनीचर । इणेंघ्यासिलेसमग्र । हेअत्यंतसुंदर । ह्मणोनिरायेंआणिली १४ वृंदावनवरीदिसेसुढाळ ।
फणसाऐसेंकनकफळ । मुक्ताहारह्मणोनिबरळ । सर्पहातींधरियेला १५ कींरत्नेंसुंदरह्मणोन । खदिरांगारघेतलेभरून । शशिबिंबजळींदेखोन । व्य
र्थजाळेंपसरिलें १६ हेपापिणीकलहकारण । ईतेंलंकेशेंआणून । व्यर्थकष्टलादशानन । राक्षसवनजाळिलें १७ ऐसीहीपरमचांडाळीन । इसीका
यव्यर्थठेऊन । तत्काळशस्त्रघातेंकरून । कृत्रिमसीतावधियेली १८ सीतेचेंशिरखंडून । दाखवीमारुतीलागुन । ह्मणेरामासिसांगजाऊन । जाईउठोन
अयोध्ये १९ ऐसेंबोलोनिइंद्रजित । निकुंबळेसिगेलात्वरित । हवनआरंभिलेंअद्भुत । अक्षयरथकाढावया २० असोइकडेअंजनीनंदन । हीजान
कीबबधिलीजाणोन । वक्षस्थळबडऊन । मूर्च्छितपडेधरणीसी २१ एकघटिकापर्यंत । निचेष्टितपडलाहनुमंत । सावधहोऊनिकिंचित । शोकक
रीआक्रोशें २२ स्फुंदस्फुंदोनिरडेमारुती । आतांकायसांगोंरघुपती । सीतेकारणेंअहोराती । स्वामीमाझाकष्टतसे २३ सीतेचेंस्वरूपह्मणोन । हृ
दयींधरीवृक्षपाषाण । मित्रसुतमित्रकरून । शक्रसुतवधियेला २४ प्रयत्नकरूनबहुत । ग्यांसीताशोधिलीव्यर्थ । वार्तासांगोनियथार्थ । सुखीके

१ जिव्हा. २ रावणाचा पुत्र इंद्रजित. ३ मारुति. ४ मुख चंद्र. ५ स्त्री. ६ यामिनी ह्मणजे रात्र तिच्या ठायीं संचार करितात सबब राक्षसांस. यामिनीचर ह्मणतात.

लातेकाळीं २५ तैंपासोनिसीताशोकहरण । मजनांवठेवीरघुनंदन । तोहामीसमाचारघेऊन । कोण्यामुखेंतेथेंजाऊं २६ शरजाळींपाडिलेंशक्रजि
तें । तैंघेऊनआलोंद्रोणपर्वतातें । संतोषोनिरघुनाथें । मजबहुतगौरविलें २७ तेकष्टसर्वगेलेव्यर्थ । मीअभागीहोययथार्थ । वार्ताऐकतांरघुनाथ । का
यकरीलकळेना २८ पूर्वींसांगीतलेंरघुनाथा । सुखीआहेजनकदुहिता । आतांजानकीवधियेलीहीवार्ता । रामचंद्रासीकेवीसांगूं २९ जेणेंपूर्वींदीधलें
धन । तेणेंपुनःघेतलेंहिरून । जेणेंकेलेंबहुतपाळण । तेणेंचिमरणयोजिलें ३० तृषाक्रांतवनींपडियेला । तयाजीवनदेऊनवांचविला । सवेंचत्याचावध
केला । शस्त्रघेऊनस्वहस्तें ३१ सुखदिधलेंजन्मवरी । तेणेंचिलोटिलेंदुःखसमुद्रीं । जळतघरांतूनकाढिलेंबाहेरी । तेणेंचिशिरछेदिलें ३२ तैसामीरामाप्रति
जाऊन । कायसांगूंवर्तमान । मध्येंचगोष्टीझांकीन । तरींदूषणलागतसे ३३ ऐसेंविचारीहनुमंत । सत्वरआलाजेथेंरघुनाथ । अधोवदनीस्फुंदत । भया
भीतकपीझाले ३४ गजबजिलेरामलक्ष्मण । तेपुसतीवर्तमान । हनुमंतवक्षस्थळबडऊन । आक्रंदोनीसांगत ३५ जानकीआणूनिरणांगणीं । इंद्रजितेंटां
किलीवधोनी । ऐसेंऐकतांचापपाणी । दुःखेंकरूनिउचंबळे ३६ आकर्णनयनचांगले । तेअश्रुस्त्रवोंलागले । हाहाःकारतेवेळे । रामसेनेंतजाहला ३७ मंग
ळरूपरघुनंदन । मंगळभगिनीचेआठवीगुण । विलापकरितांलक्ष्मण । येऊनिचरणींलागला ३८ ह्मणेब्रह्मांडनायकारघुपती । मिथ्यामयकायसीखंती ।
आकाराआलेंतेंपुढती । नाशपावेनिर्धारें ३९ विवेकवज्रघेऊन । मोहपर्वतकरावाचूर्ण । सद्गुरूवसिष्ठेंपूर्ण । हेंचपूर्वींशिकविलें ४० तूंदेवाधिदेवप
रब्रह्म । अजअजितआत्माराम । तवमायेचाहासंभ्रम । मिथ्यामयलटिकाची ४१ जानकीपावलीमरण । तुजकोठेंजाईलटाकोन । दीपासीप्रभावो
संडोन । जाईलऐसेंनघडेची ४२ कनकासटाकूनिकांती । राहीलजाऊनकेउती । रत्नाससांडूनिदीप्ती । केवींपरतीजाईल ४३ तूंअनादितिचानाथ ।
तुजचितेपावेलयथार्थ । जैसापार्वतीनेंकैलासनाथ । पुनःउपजोनिवरियेला ४४ आतांयावरीऐसेंकरीन । सहपरिवारेंवधीनरावण । बंदीचेदेवसोड
वीन । स्थापीनलंकेसीविभीषण ४५ ऐसेंबोलतांलक्ष्मण । रामपाहेअधोवदन । चिंताक्रांतवानरगण । तटस्थरूपपाहती ४६ तोंविभीषणाचेप्रधा
न । आलेजानकीचीशुद्धीघेऊन । हांसतचिविभीषण । आलारामातेंसांगावया ४७ ह्मणेजगद्वंद्याचापपाणी । सुखीआहेजनकनंदिनी । म्यां
लंकेसदूतपाठवूनी । समाचारआतांआणविला ४८ इंद्रजितपरमकपटी । लटिकीचवधिलीगोरटी । हनुमंतनिष्कपटी । त्यासतेंसत्यवाटलें ४९
ऐकतांविभीषणाचेंवचन । जयजयकारकरितीकपिगण । वेदनेंटवटविलीपूर्ण । आनंदगगनींनसमाये ५० उदयाचळींउगवेगभस्ती । तेव्हांनिवारेतमा

१ मंगळाची बहीण सीता. २ विचाररूप वज्र. ३ अज्ञानरूप पर्वत. ४ जन्मरहित. ५ सुवर्ण. ६ सर्वांच्या पूर्वीं असणारा. ७ खालीं तोंड करून. ८ समुदाय. ९ सुख.

चीबुंथी । तैसीविरालीदु:खवृत्ती । विभीषणवाणीऐकतां ५१ हृदयींप्रगटतांज्ञान । सहपरिवारेंजायअज्ञान । कींगृहस्वामीउठतांदेखोन । तस्करप
ळतीअवघेही ५२ क्षुधितपीडिलाअन्नाविण । त्यापुढेंक्षीराब्धियेईधांवोन । कींगजेंगांजितांपंचानन । हांकदेऊनधांविन्नला ५३ रोगेंव्यापिलेंबहुत्र
स । त्यासअकस्मातमिळेसुधारॅस। तैसेंबिभीषणबोलतांरामास। मिथ्यादु:खवितळलें ५४ बिभीषणवचनपौर्णिमाथोर । कळायुक्तदिसेरामचंद्र। उ
चंबळलाआनंदसमुद्र । सखभरतेंदाटलें ५५ बिभीषणासह्मणेरघुनंदन। तुझेउपकारामीनव्हेउत्तीर्ण। क्षणक्षणाआह्मांलागुन।सांभाळिसीप्राणसख
या ५६ असोश्रीरामाचेकानीं । बिभीषणसांगेतेक्षणीं । इंद्रजितेंनिकुंबळभुवनीं । कपटहोमआरंभिला ५७ होमधूम्रेंनिराळ । आहुतींचादाटला
परिमळ । अग्नींतूनरथसबळ । अर्धाबाहेरनिघाला ५८ अश्वसारथीधनुष्यबाण । यांसहनिघेस्यंदंन । कार्यसिद्धीझालियापूर्ण । मगरॉवणीनाटोपे
५९ तोचारवेळ्ळायेऊन । रणींगेलाजयघेऊन । आतांहोमविध्वंसून । आर्धीसत्वरटांकावा ६० विलंबकारितांयेथ । तिकडेनिघेलअवघारथ । रथनि
घाल्याइंद्रजित । कालत्रयींनाटोपे ६१ द्वादशवर्षेनिराहारी । असेलजोब्रह्मचारी । तयाचेहातेंशक्रारी । मरेलअसेंभाष्यआहे ६२ ऐसेंऐकतांर
घुनंदन । सौमित्राकडेपाहेविलोकून । धनुष्यासचढऊनगुण । वेगेंलक्ष्मणऊठिला ६३ बंधूचीबाल्यदशादेखोनी । स्नेहभरितहोयचापपाणी । अ
नुजासहृदयींधरुनी । मंत्रकर्णींसांगतसे ६४ कोण्यामंत्रेंकाणतेंअस्त्र । समयींप्रेरावेंकोणतेंशस्त्र । तेंसर्वराजीवनेत्र। सौमित्रासिदेताजाहला ६५
मस्तकींठेविलाकृपाहस्त । ह्मणेसत्वरवधोनिइंद्रजित । विजयश्रीघेऊनअद्भुत । कल्याणरूपयेईजे ६६ सवेंमारुतीविभीषण । बुद्धिमंतकळाप्रवीण ।
रामेंधरूनिलक्ष्मण । तयांचेहातींदीघला ६७ नळनीळजांबुवंतअंगद । गवयगवाक्षऋषभमैंद । पनसकेसरीद्विविद । वीरआगाधनिघाले ६८
आणिअसंख्यवानरगण। पुढेंमार्गदावीविभीषण। निकुंबळागडपरमकठिण। मगबिभीषणबोलत ६९ अंगदस्कंधींलक्ष्मण । जैसागजेंद्रावरीसहस्त्रंन
यन । पुढेंकडेलगलेकठिण । लंकेहूनिअगाध ७० ह्मणेअवघेघ्याउड्डाण। निकुंबळावोलांडून । शक्रजितकरीहवन । आधींविध्वंसोनिटाकावें ७१
मगनिराळपंथेंतेचालले। निकुंबळेंतप्रवेशले। तोसैन्यदुर्गसबळें। सातभोंवतेरक्षिती ७२ ऋषभगवयहनुमंत। घेऊनियांविशाळपर्वत। जेथेंहवनकरी
इंद्रजित । त्याविवरांतप्रवेशले ७३ तोंसभोंवतींभूतेंरक्षिती । तयांसपळवीमारुती । तंवइंद्रजितपापमूर्ती । वज्रासनींबैसला ७४ रक्तोदकेंस्नान
करुनी । रक्तवस्त्रनेसलारावणी । सप्तप्रेतेंपसरुनी । त्यावरीआसनघातलें ७५ पिंगटजटामोकळयादिसती । रक्तेंथपथपांगळती । नेत्रलाऊनिआ

---

१ चोर २ हाति. ३ सिंह. ४ अमृत. ५ रामरूप चंद्र. ६ रथ. ७ रावणाचा पुत्र इंद्रजित. ८ अन्नोदकावांचून. ९ दोरी. १० इंद्र. ११ रावणाचा पुत्र इंद्रजित.

हुती । टांकीतसेअवदानें ७६ ब्राह्मणांचींशरीरेंबहुत । त्यांचाजवळीकेलापर्वत । आस्थिमाळागळांडोलत । मृतउरगशिरींवेष्टिले ७७ द्विजदंतांच्या
लाह्याकरुनी । साजुकमासघालीहवनीं । रथनिघालाअग्नीतुनी । तरणीहूनितेजाळ ७८ प्राप्तहोतांदिव्यनिधान । अभाग्यावरीपडेविघ्न । तैसेंहनु
मंतेंपर्वतटाकून । होमकुंडविध्वंसिलें । ७९ अग्नीचहूंकडेविखुरत । कोपलेंआराध्यदैवत । अग्नीनेंगिळिलारथ । परमअनर्थझालाअसे ८० इंद्रजि
ताच्याष्टष्ठीवरी । ऋषभदेहधर्मातेंकरी । यज्ञपात्रेंफोडीझडकरी । होमद्रव्यउलंडी ८१ गजरकानींपडतांबहुत । सावधजाहलाशक्रजित । देखोनियातें
विपरीत । परमदुःखीतेवेळे ८२ ह्मणेदैवतक्षोभलेंसबळ । कैसीवैरियानींसाधलीवेळ । माझेंआयुष्यसिंधुजल । आजपासूनिआटलें ८३ वानर
तेथेंगेलेसमस्त । परमकोपलाइंद्रजित । वेगेंआणूनिदिव्यरथ । वरीआरूढेतेकाळीं ८४ अद्भुतघेऊनियांदळा । निकुंबळेबाहेरआला । तोंकपिभारें
सीउभाठाकला । सौमित्रदेखिलातेवेळे ८५ भंगणामाजीरोहिणीवरं । कींकिरणचक्रींदिवाकर । तैसावानरांतसौमित्र । सिद्धउभायुद्धासी ८६ जै
सामेरूकुळाचळांत । तैसारथींइंद्रजित । तोंराक्षसलोटलेसमस्त । वानरांवरीतेकाळीं ८७ शिळाद्रुमपर्वतघेउनी । कपिधांवलेतेक्षणीं । राक्षसदळा
होयआटणी । प्रेतेंरणींपाडिती ८८ शूळअँसिलताशक्ती । हींआयुधेंघेऊनिहातीं । वानरांअसुरखोंचिती । कपिपळतीविकळपैं ८९ तोंनळनीळजां
बुवंत । प्रतापरुद्रअंजनीसुत । यांचामारअतिअद्भुत । आटलेबहुतनिशाचर ९० अरिप्रतापदेखोनिअत्यद्भुत । परमक्रोधावलाइंद्रजित । विषादवाढला
असेबहुत । दांतखातकरकरां ९१ लाथेनेंताडितांउरगें । कींशुंडापिळितांमातंगें । नासिकींताडितांसवेग । महाव्याघ्रजेविखवळे ९२ कींतपस्वी
अपमानिला । हुताशनघृतेंशिंपिला । तैसाइंद्रजितक्षोभला । वेगेंलोटिलारथपुढें ९३ दृष्टींदेखतांवारणं । खवळेजैसापंचानन । तैसाक्षोभलालक्ष्म
ण । जोभोगींद्रअवतार ९४ विद्युत्प्रायचापचढवून । वरीयोजिलादिव्यबाण । सिंहनादेंगर्जोन । रामानुजसरसावला ९५ मांडिलेंतेव्हांवज्रठाण ।
कौतुकपाहबीसुरगण । सौमित्रासहोऊकल्याण । हेंचदेवचिंतिती ९६ इंद्रजितह्मणेसौमित्रासी । मजसींयुद्धकरूंपाहसी । जैसाहरिणशार्दूलासी ।
झोंबीघ्यावयापातला ९७ सुपर्णावरीधांवेअळिका । कींमातंगावरीगोवत्सदेखा । कींबळेंधांवेपिपीलिका । कनकाचळउचलावया ९८ ऊर्णनाभी
इच्छीमनीं । स्वतंतूनेंझांकीनमेदिनी । वृश्चिकपृच्छउभारुनीं । ताडीनह्मणेखदिरांगारा ९९ सूर्यजिंकीनह्मणेखद्योत । मक्षिकाभूगोलहालवूंपाहत ।
वडवानळधगधगित । पतंगधांवेग्रासावया १०० मजसींतैसायुद्धासी । मानववंशींतूंआलासी । माझेबाणकेवींसाहसी । समरंगणींनकळेतें १ या

१ नक्षत्रें. २ चंद्र. ३ सूर्य. ४ तलवारी. ५ सर्प. ६ हत्ति. ७ अग्नि. ८ सिंह. ९ भोगी ह्मणजे सर्प त्यांचा इंद्र ह्मणजे स्वामी शेष. १० रामाचा लहान भाऊ लक्ष्मण.

वरीबोलेलक्ष्मण । तुझेदृष्टींदिसतोलहान । भस्मेंआच्छादिलाअग्न । क्षणेंकाननेंजाळीत २ दृष्टीसनभरेकेंसरी । परीक्षणेंगजविदारी । वज्रधाकुटेंप
रिकरी । चूर्णसकळनगांचें ३ खुजटदिसेवामन । परीढेंगेंतआटीत्रिभुवन । घटोद्भवाचीतनूसान । परीसागरप्राशिला ४ चिमणाचदिसेचंडांश । प
रीसकळसृष्टींकरीप्रकाश । तेवीनरवीरराघवेश । त्याचादासमीअसें ५ तुजआजीसमरंगणीं । खंडविखंडकरीनबाणीं । इंद्रादिदेवपाहतीगगनीं ।
मनोरथत्यांचापुरवीन ६ ऐकतांक्षोभलाशक्रारी । दिव्यबाणतेअवसरीं । सोडीरामानुजावरी । प्रळयचपळेसारिखा ७ जैसेंविवेकेंकरून । ज्ञानी
क्रोधटांकीखंडून । तैसातोडिलातोबाण । निजशरेंसौमित्रें ८ परमक्षोभलाइंद्रजित । पर्जन्यबाणाचापाडित । एकेबाणेंचसुमित्रासुत । पीठकरूनटां
कितसे ९ उगवतांवासरमणी । भगणेंलोपतीजेवींगगनीं । कींजळदजाळतत्क्षणीं । प्रभंजनेंविध्वंसी ११० बोधेंप्रकटतांअंतरीं । सर्वपातकेंसंहा
री । कींआत्मज्ञानीजेवीहरी । संसारदुःखेंअनेक ११ तैसेशत्रूचेशरपाहीं । जनकाचाकनिष्ठजांवाई । समस्तछेदूनिलवलाहीं । पाडीतसेएकीकडे १२
सौमित्रसोडीएकशर । त्यापासूनबाणनिघतीअपार । जैसाएकुलताएकपुत्र । संततीवाढेबहुत्याची १३ कींतैलबिंदुजळींपडतां । पसरेचहूंकडेतत्वतां ।
कींसत्पात्रींदानदेतां । कीर्तिप्रगटेसर्वत्र १४ कुलवंतावरीउपकारकरितां । यशप्रगटेनसांगतां । तैसाएकबाणसोडितां । अनेकहोऊनपसरती १५
लक्षांचेलक्षबाण । सोडीसुमित्रानंदन । इंद्रजितातिुकेछेदून । एकींकडेपाडित १६ इंद्रजितातुकावीमान । ह्मणेधन्यवीरलक्ष्मण । रणधीरनचळेठाण
योद्धानिपुणहोयहा १७ असोइंद्रजितजपोनीमंत्र । सोडीतेव्हांपर्जन्यास्त्र । हस्तीशुंडेऐसीधार । मेघअपारवर्षत १८ ऐसेंदेखोनिलक्ष्मण । वा
तास्त्रजपोनिउडवीपर्जन्य । जैसेंवैराग्यप्रगटतांपूर्ण । संसारदुःखवितुळेपैं १९ वातसुटलाअद्भुत । इंद्रजिताचेंकटकंउडत । रावणीजपेपर्वतास्त्र ।
आडघातलावायूसी १२० जैसेंमायाजाळअद्भुत । तैसेआडदिसतीपर्वत । मगसौमित्रेंप्रेरूनिवज्रास्त्र । नेंगसमस्तफोडिले २१ करितांसारासार
श्रवण । कामक्रोधजातीपळोन । तैसेसौमित्रेंपर्वतफोडून । पिष्टवत्चूर्णकेलेपैं २२ मगतोसुलोचनावर । सोडीवडवानळास्त्र । त्यावरीदाशरथीवीर ।
सागरास्त्रसोडीतसे २३ अगस्तीमंत्रजपेरावणी । सागरशोषिलामुळींहुनी । निःशेषजलआटोनी । क्षणमात्रेंटांकिलें २४ पापास्त्रसोडीइंद्रजित ।
नाममंत्रजपेसुमित्रासुत । माहेश्वरीरावणीप्रेरित । सौमित्रजपेब्रह्मास्त्र २५ ब्रह्मास्त्रश्रेष्ठसर्वांत । तेणेंमाहेश्वरीग्रासिलीसमस्त । जांबुवंतआणिहनु
मंत । तटस्थकौतुकपाहाती २६ परमक्रोधावलारावणी । पांचबाणकाढीनिवडुनी । किंवापांचसौदामिनी । मेघाबाहेरनिघाल्या २७ तेअनिवा

१ अरण्य. २ सिंह. ३ पर्वत. ४ अगस्तिऋषि. ५ नक्षत्रें. ६ वायु. ७ ज्ञान. ८ मन. ९ सैन्य १० पर्वत

रपांचबाण ।सोडिलेआकर्णवोढून । तेअकस्मातयेऊन । सौमित्रहृदयींसंचरले २८ मेरुमांदारहोतीचूर्ण । तैसेकठोरपांचबाण । भोगींद्रावतारल
क्ष्मण । तेणंचतेसाहिले २९ सर्वेचितोलक्ष्मण । सोडिताजाहलानवबाण । इंद्रजिताचेंकपाळफोडून । आंतसंपूर्णरूतले १३० इंद्रजितयोद्धादारु
ण । बाल्यदशालक्ष्मण । स्नेहदाटोनिबिभीषण । गदाझेलीतपुढेंआला ३१ गदाफिरऊनतेवेळीं । इंद्रजितावरीटांकिली । येरेंशरसोडोनिपाडिली ।
एकीकडेआडवीते ३२ मेघनादेंसोडूनिपांचबाण । हृदयींखिळिलाबिभीषण । जांबुवंतेंतेंदेखोन । पुढेंधांवेकाळजैसा ३३ पर्वतींवज्रपडेअ
कस्मात । तैसाधांवेजांबुवंत । हस्तचपेटेंत्याचारथ । अश्वांसहितचूर्णकेला ३४ विरथहोऊनइंद्रजित । भूमींसउभायुद्धकरित । तोंहनुमंतेंविशाळ
पर्वत । रावणिवरटांकिला ३५ नळनीळऋषभअंगद । शरभगवयगवाक्षकुमुद । केसरीपात्रकलोचनभेंद । एकदांचउठावले ३६ शिळापर्वततें
अवसरीं । टांकितीबळेंचिशक्रारीवरी । देवपाहतीअंबरीं । कौतुकपरमयुद्धाचें ३७ इंद्रजितचतुरबहुत । पराक्रमीरणपंडित । तितुक्यांचेफोडीपर्वत ।
बाणजाळंघालूनियां ३८ तंवइंद्रजितउडाला । मेघाआडजाऊनिलपाला । तेथोनियांबर्षोलागला । बाणजाळफारकंपीवरी ३९ सौमित्राचेंउड्डाण
गोजिर । मगकायकरीवायुकुमर । तळहातींसुमित्राकुमर । उभाकरूनिउडाला १४० द्वादशगावेंइंद्रजित । शतयोजनेंउंचहनुमंत । संग्रामकेलाअ
द्भुत । उतरेइंद्रजितपृथ्वीवरी ४१ खालींउतरलालक्ष्मण । तोंसमस्तदेवऋषिगण । सौमित्रासिंचितितीकल्याण । विजयीपूर्णहोआजी ४२ पा
ठीसीवानरांचेभार । आवेशेंगर्जतीवारंवार । मांडलेंपरमघनचक्र । अनिवारवीरदोवेही ४३ सिंहनादेंकरून । दोघेहीगाजवितीगगन । माहाशब्दें
संपूर्ण । ब्रह्मांडयासूंधांवती ४४ दोघांआंगींरुपलेशर । जैसींपिच्छेंरसरीमयूर । कींपर्वतावरीतृणांकुर । तैसेवीरदिसतीदोघे ४५ याउपरीसौमि
त्रवीर । तूणीरांतूनकाढीतदिव्यशर । जैसातृतीयनेत्रींचावैश्वानर । अकस्मातप्रगटला ४६ जैसामध्यान्हींचागभस्ती । तैसीबाणमुखींदीप्ती । तयाचे
किरणनिश्चिती । नलक्षवेतकोणातें ४७ रामनाममुद्रांकित । दैदीप्यमानसमर्थ । सुमित्रासुताचेमनोरथ । पूर्णकर्तानिर्धारें ४८ तोबाणधनुष्यावरी ।
सौमित्रेंयोजिलाझडकरी । आकर्णवोढोनिसत्वरीं । कायचिंतिताजाहला ४९ ह्मणेपूर्णब्रह्मसनातन । मायातीतशुद्धचैतन्य । तोसूर्यवंशीरघुनंदन । ज
रीहेंसाचअसेल १५० मीस्त्रीअसोनिब्रह्मचारी । चतुर्दशवर्षेनिराहारी । कायावाचामनेंअंतरीं । रामउपासकजरीअसे १५१ मंगळभगिनीजगन्मा
ता । सत्यअसेलपतिव्रता । रामदास्यत्वहनुमंता । जरीघडलेंअसेल ५२ शिवकंठींचेंहाळाहळ । नामेंशमलेंअसेलसकळ । तरीयाबाणेंशिरकमळ ।

१ आकाश. २ समूह. ३ वानर. ४ मारुति. ५ चार कोसांचें एक योजन अशीं शंभर योजनें ह्मणजे चारशें कोश. ६ बाण. ७ भाता. ८ सीता

इंद्रजिताचेंखंडेल ५३ ऐसेंचिंतोनिनिजमनीं । बाणसोडिलातत्क्षणीं । शक्रारीचाकंठलक्षूनी । गगनमार्गेंजातसे ५४ यावरीविंशतिनेत्रपुत्र । बाण देखोनिपरमतीव्र । धनुष्यावरीघालीशर । आकर्णवोढोनिसोडिला ५५ तंवइतक्यांतअकस्मात । बाणपावलाकृतांतवत । तेणेंकंठआणिभुजात्वरित छेदोनिगेलेगगनातें ५६ वक्रसुरीनेंत्वरित । कृषीवलकणसेंछेदीत । तैसेंशिरंभुजेसहित । बाणेंनेलेंतेकाळीं ५७ भुजेंउसळूनअद्भुत । लंकेवरजा ऊनपडत । शिरभूमंडळींउतरत । कंदुकंवततेकाळीं ५८ तोंऋषभेंधांवोनिसत्वर । वरिचावरीझेलिलेंशिर । झालाएकचिजयजयकार । सुमनेंसुर वरवर्षती ५९ इंद्रसंतोषलाबहुत । ह्मणेआजिभाग्यउदित । दशापावलोंयथार्थ । सुमित्रासुतप्रसादें १६० शक्राचाहर्षतेकाळीं । नमायेचनभ मंडळीं । दुंदुभीचीघाईलागली । ऋषिमंडलीआनंदत ६१ पुष्पवृष्टीवारंवार । सौमित्रावरीकरीदेवेंद्र । इंद्राचाआनंदलामुखचंद्र । निष्कलंकभयरहि त ६२ इंद्रजितपडिलामेदिनीं । दीनवदनपळेवाहिनी । प्राणजातांतेक्षणीं । अवयवजैसेनिस्तेज ६३ दीपगेलियाप्रभाहारपे । शेशीमावळतांचां दिणेंलोपे । कींगायनराहतांसंपे । स्वराकारसर्वही ६४ कींवृक्षउन्मळतांक्षितीं । अंडजस्थानसोडूनिपळती । शक्रारीपडतांतेरीतीं । सेनासमुदाय फुटलाअसे ६५ जयपावोनसंपूर्ण । परतलावीरलक्ष्मण । वारंवारविभीषण । स्तुतिकरीसौमित्राची ६६ मगहनुमंताचेस्कंधावरी । सौमित्रबैसलाते अवसरीं । तनुजर्जरशरप्रहारीं । झालीअसेतेधवां ६७ सुवेळागिरीलक्षून । चालिलेतेव्हांवानरगण । समस्तांसांगेविभीषण । आल्यापंथेंचलावें ६८ इंद्रजिताचेंविशाळशिर । झेलीतनेतऋषभवानर । दृष्टीनेंपाहीलरघुवीर । ह्मणोनसंगेंघेतलें ६९ असोइकडेश्रीराम । स्कंदतातमनविश्राम । सौमित्राकारणेंपरम । चिंताक्रांतजाहला ७० सुग्रीवाप्रतिरघुनंदन । ह्मणेनिकुंबळेंसिलक्ष्मण । तेथेंकैसेंवर्तमान । झालेंअसेकळेना ७१ इंद्रजिताचें युद्धकठीण । आह्मांसमवेतपैंजाण । शरजाळींसेनासंपूर्ण । खिळोनियांपाडिली ७२ योद्धाइंद्रजितविशेष । बाळदशासौमित्रास । ऐसेंबोलोनिअयो ध्याधीश । अश्रुनयनींआणिले ७३ सुग्रीवह्मणेरघुपती । खेदनकरावाचित्तीं । शत्रूसवधोनित्वरितगती । आतांयेईलसौमित्र ७४ ऐसीचिंताकरि तांअकस्मात । वानरआलेपुढेंधांवत । सांगतीआलासौमित्र । इंद्रजितवधोनियां ७५ परमआनंदलारघुवीर । सामोराधांवेसूर्यकुमर । तोंसमीपदे खिलासौमित्र । बाळसूर्यजयापरी ७६ हनुमंताचेस्कंधावरून । खालींउतरलालक्ष्मण । सुग्रीवआणिविभीषण । हस्तधरूनिचालत ७७ हळूहळू चालेलक्ष्मण । शरआंगींरुतलेतीक्ष्ण । दृष्टींदेखोनिरघुनंदन । केलेंनमनसाष्टांगीं ७८ मगउठोनिराजीवनेत्र । प्रीतीनेंहृदयींधरीसौमित्र । वृत्रवधि

---

१ रावणाचा पुत्र इंद्रजित. २ काळ. ३ शेतकरी. ४ मस्तक व बाहु. ५ हात. ६ चेंडु. ७ पुष्पें. ८ देव. ९ भूमि. १० सेना. ११ चंद्र. १२ पक्षी.

तांसहस्त्रनेत्र । गुरुजैसाआलिंगी ७९ श्रीरामह्मणेसौमित्रातें । तुवांवधोनिइंद्रजितातें । ब्रह्मांडभरिलेंपुरुषार्थे । पराक्रमकरूनियां ८० कोणासनाटो पेरावणी । तोत्वांवधिलासमरंगणीं । देवांसहितवज्रपाणी । आनंदमयझालातेवेळीं८१ऐसेंबोलोनिरघुनाथ । सौमित्रमस्तकींठेविहस्त । तेणेंश्रमहार पलासमस्त । आनंदभरितलक्ष्मण ८२ विभीषणजांबुवंत । समस्तांसिभेटेरघुनाथ । शब्दवचनेंगौरवित । धन्यपुरुषार्थतुमचापैं ८३ पुढेंठेऊ निशत्रूचेंशिर । ऋषभेंकेलानमस्कार । मगह्मणेसीतामनोहर । धन्यधन्यऋषभातूं ७४ आरक्तपुष्पेंपूजाकरून ।हेंशिरठेवावेंजतन । मागोंयेईलति येलागुन । ह्यावेंलागेलशिरहें ८५ सुषेणासिह्मणेरघुवीर । तूंवैद्यआणिप्रतापशूर । करींसौमित्रासिउपचार । देहजर्जरबाणेंजाहला १८६ मगसु षेणेंऔषधीआणून । दिव्यदेहधारीकेलालक्ष्मण । असोयावरीविभीषण । वर्तमानसर्वसांगे १८७ कैसाझालासंग्राम । कोणीकायकेलापराक्रम । तेंऐकोनमेघश्याम । आश्चर्यपरमकरीतसे ८८ ह्मणेधन्यइंद्रजितवीर । पुरुषार्थासिनाहींपार । दीनकरूनिदेवसमग्र । बंदींजेणेंघातले ८९ या उपरीसुलोचना । शिरमागेलराजीवनयना । तेसुरसकथाऐकतांश्रवणा । सौख्यहोईलसमस्तां १९० रामविजयग्रंथप्रचंड । त्यांतरसभरितयुद्धकां ड । श्रवणेंपुरेसर्वकोडें । नाहींचाडआणिकांची ९१ ब्रह्मानंदाश्रीरामा । जरंद्वंद्वापूर्णब्रह्मा । श्रीधरवरदाअनामा । पूर्णकामासर्वेशां ९२ स्वस्तिश्री रामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मिकीनाटकाधार । सदांपरिसोतभक्तचतुर । एकोनत्रिंशतितमोध्यायगोडहा १९३ । श्रीसीतारामचंद्रार्पणम स्तु । । शुभंभवतु ॥ ॥ ७ ॥ ॥ अध्याय ॥ २९ ॥ ॥ ७ ॥ ॥ ओव्या ॥ १९३ ॥ ॥ ७ ॥ । ७ ।

---

१ इच्छा. २ निराकाररूपीं आनंद मानणारा. ३ विश्वामध्यें पूज्य. ४ नामरहित. ५ सर्वलोकांचा स्वामी.

श्रीगणेशायनमः॥ ॥श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः। जोपद्मिणीवल्लभकुळभूषण। पद्मजातजनकपद्मलोचन। विषकंठहृदयदशकंठदळण। सच्चिदानंदत
नूजो १ जोरविकुळकमलदिवाकर। जोदशमुखकुळविपिनवैश्वानर। जोभक्तहृदयाब्जभ्रमर। लीलावतारधरीजो २ जोषड्गुणैश्वर्यसंपन्न। यशश्रीकी
र्तिविज्ञान। जोऔदार्यवैराग्यपूर्ण। सत्यज्ञानशाश्वतजो ३ जोनिर्विकल्पअनंत। हेतवद्दृष्टांतविवर्जित। तोसुवेळाचळींरघुनाथ। राक्षसवधार्थपातला
४ भवगजविदारकमृगनायक। मोक्षफळाचापरिपाक। तोरामताटिकांतक। सुरपाळजगद्गुरू ५ गतकथाध्यायींनिरूपण। गुणसिंधूचाबंधुलक्ष्मण
इंद्रजिताचावधकरून। शिरघेऊनपैंआला ६ शक्रारीचेंप्राक्तनविचित्र। ऋषभानेंसुवेळेसनेलेंशिर। धडधरणींभुजसत्वर। लंकेवरीपडियेला ७
भुजआपटोनिमागुतीउडत। जैसाकंदुकआदळत। तैसाभुजदंडअकस्मात। निकुंबळेंतपडियेला ८ सुलोचनेचेअंगणीं। भुजदंडपडिलातेक्षणीं। तों
रावणस्नुषाअंतरसदनीं। सुखरूपबैसलीअसे ९ तेदशशतवदनाचीकुमरी। कींलावण्यसागरींचीलहरी। ज्येष्ठस्नुषानिर्धारी। राघवारीचीतीहोय १०
जेनगारिशत्रूचीराणी। निशाचरांचीस्वामिणी। जीचेंस्वरूपलावण्यदेखोनी। सुरांगनालज्जित ११ देवगणगंधर्वराजकुमरी। सेवाकरितीअहोरात्री
सहस्रनेत्राचीअंतुरी। नपवेसरीइयेची १२ अंगींचासुवासअद्भुत। धांवेएककोशपर्यंत। विषकंठरिपूचीकांतायथार्थ। तुळतांनपुरेइयेसी १३ नैषधजाया
परमसुंदर। वर्णितीकाव्यकर्तेंचतुर। परीशेषकन्येसिसाचार। उपमाद्यावयापुरेना १४ अंगींच्याप्रभेनेंभूषणें। झळकतीअत्यंतदिव्यरत्नें। किन्नरक
न्यागायनें। मधुरस्वरेंजवळकरिती १५ एकशृंगारसांवरिती। एकचामरेंवारिती। एकउपभोगआणोनिदेती। संतोषवितीनानाशब्दें १६ सुलोच
नेंगृहाआनंदू। तोंअमृतींपडेविषबिंदू। तैसातोभुजसुबुद्धू। अंगणींयेऊनपडियेला १७ ठणत्करहोतांतेक्षणीं। दूतीआल्याधांवोनी। येऊनिपाहा
तींतंवअंगणीं। भुजअद्भुतदेखिला १८ तेकांचबंदअंगणांत। वीरपाणीपाडिलाअद्भुत। देखोनिदासीभयाभीत। आल्यासत्वरसांगावया १९ ह्मणती
नवलबर्तलेंहोसाजणी। महावीराचातुटोनिपाणी। येऊनपडिलासेअंगणीं। निराळमार्गेंअकस्मात २० ऐकोनिदासीचेंवचन। दचकलेंसुलोचनेचेंमन। र
त्नपादुकात्वरेंकरून। अंघ्रियुगुळींलेइली २१ तडित्प्रायझळकेअंबर। अंगणांतआलीसत्वर। उतरलाअसेमुखचंद्र। विव्हळनेत्रजाहले २२ अंगझालेंसे
विकळ। पुढेंनघालवेचिपाउल। वदनीचेंकाढोनितांबूल। एकीकडेभिरकाविलें २३ सखियांसिह्मणेसुलोचना। प्राणपतीआजगेलेरणा। सीतेलागींअयो
ध्याराणा। सुवेळाचळींबैसला २४ ऐसेंबोलतांशेषनंदिनी। भुजेसमीपयेतांक्षणीं। तंवतोशक्रजिताचापाणी। पतिव्रतेनेंओळखिला २५ पंचांगुळींमुद्रिकामं
डित। वरीकंकणेंविराजत। दंडकीर्तींमुखझळकत। चपळेहूनिविशेष २६ ह्मणेआजिजहाजबुडालें। ह्मणोनिवदनहातींपीटिलें। परमआकांततेवेळे।

वाटेबुडालेंब्रह्मांड २७ सुमनकळिकेवरीसौदामिनी। पडतांउरीनउरेतेक्षणी। तैसीनिस्तेजहोउनी। भोगींद्रनंदिनीपडियेली २८ लोभियाचेंगेलेंधन। कींजलचरेंजीवनाविण। तैसीपतिवियोगेंकरून। सुलोचनातळमळी २९ ह्मणेविपरीतकाळाचीगती। मृगजळींबुडालाअगस्ती। दीपतेजेंरोहिणीपती। आहाळोनिपडियेला ३० तमकूपींबुडालातरणी। पाडसेंसिंहधरिलावनीं। पिपीलिकेंमुखेंधरूनी। मेरूकैसारगाडिला ३१ अळिकेनेंगिळिलासुपर्ण। मशकींग्रासिलामहाअन्न। भूतांनींकाळधरून। समरंगणींमारिला ३२ मगसुलोचनेनेंसउचलोनी। बैसवितीसांवरुनी। पतीचाभुजह्रदयींधरूनी। आक्रंदेसुलोचना ३३ भुजेप्रतिबोलेवचन। कैसेंप्राणपतीसआलेंमरण। तरितेंसर्ववर्तमान। लिहूनमजविदितकरी ३४ पतिचरणींमाझेंमन। जरीअसेलरात्रंदिन। तरींचपत्रींलिहून। वर्तमानश्रुतकरीं ३५ मषीपात्रपुढेंठेविलें। भूर्जपत्रसरसावलें। लेखणीहातींदेतांशीघ्रकाळें। भुजेनेंलिहिलेंतेसमयीं ३६ नवलअद्भुतवर्तलें। सर्ववर्तमानपत्रींलिहिलें। सुलोचनेनेंपत्रघेतलें। मस्तकींवंदिलेंतेवेळे ३७ नयनींलोटलेअश्रुपात। शेषकन्यापत्रवाचित। भोंवत्याललनासमस्त। ऐकतीनिवांततेकाळीं ३८ ऐकेंदशशतमुखकन्यके। सुकुमारचंपककळिके। ममानससरोवरमराळिके। प्राणवल्लभेसुलोचने। ३९ जयआशाअंतरींधरून। गूढस्थळींकरितांहवन। अग्नींतूनदिव्यस्यंदन। अर्धाबाहेरनिघाला ४० फळप्राप्तीचासमयलक्षून। शत्रुआलाधांवून। चंडशिळावरीघालोन। आराध्यदैवतक्षोभविलें ४१ पर्वतचढलासंपूर्ण। शिखराहूनदिधलाढकलून। कींनदीअवघीउतरून। तीरासमीपबुडाला ४२ प्रगटतांवैराग्यज्ञान। वरीविषयघालापडेयेऊन। प्राप्तहोतांनिधान। विवसीयेऊनिवरीपडे ४३ कष्टेंकेलेंवेदाध्ययन। वरीधाडघालीअभिमान। सूर्यसर्वअंबरक्रमून। पडलाराहुमुखासी ४४ वल्लभेतैसेंयेथेंजाहलें। शत्रूनींशेवटींवैरसाधिलें। प्रारब्धबळउणेंपडलें। होणारनटळेकल्पांतीं ४५ पुढेंदारुणसंग्राममांडला। परीजयआह्मांसपारखाझाला। जाऊनिसौमित्रासिमिळाला। शत्रूचावाढलापराक्रम ४६ सौमित्रपरमनिधडावीर। धनुर्विद्यात्याचीअपार। देखोनिउचितदिधलेंशिर। राममित्रजोडला ४७ देहआशाधरून। भयेंगेलाबिभीषण। म्यांदेहत्रयनिरसून। विदेहजामातामित्रकेला ४८ मगमीकृपणताटांकून। निजशरीराचेंकेलेंदान। तेणेंरामचरणीनेऊन। शिरमाझेंसमर्पिलें ४९ सौमित्रतपस्वीपूर्णविप्र। बहुतदिवसनिराहार। उतरूनियांसिंधुसमग्र। मागोंशिरपातला ५० शरीरउभेंआहेरणीं। शिरपांहूंगेलेचापपाणी। तुजमूळधाडिलापाणी। विवेकेंकरूनयेईकां ५१ मायानदीउल्लंघूनिदुर्घट। पाहेंपैलतीरींतुझीवाट। प्राणवल्लभेयेऊनिभेट। सत्वरआतांमजलागीं ५२ दुःखरूपपरमसंसार। रामचरणींसुखअपार। हेंजाणोनिधाडिलाकर। येईसत्वरप्राणप्रिये ५३ असोतेधराधरकुमरी। पत्रवाचूनतेअवसरीं। शरीरटांकूनिधरित्रीवरी। शोककरीअपार ५४ आजिबळाचासमुद्र

आटला । कींधैर्याचामेरूखचला। प्रतापवृक्षउन्मळला। समरभूमीसिअकस्मात ५५ इंद्रजितसूर्याचेकिरणें। मावळतीशत्रूचींतारागणें। तोआजिसौमि
त्राराहूनें। खग्रासकेलासमूळीं ५६ रणसरोवरींशिरकमळें। तूंवारणेंछेदिलींनिजबळें। सौमित्रसिंहेंस्वबळें। विदारूनगेलेंशिरमुक्त ५७ ऐरावतीस
हपाकशासन। समरींपाडिलाउलथोन। तयाआजिमानवलक्ष्मण। येऊनमारीसमरभूमीं ५८ माझेंसौभाग्यभांडार। वरीसौमित्रपडिलातस्कर। मा
झेभाग्याचासमुद्र। सौमित्रअगस्तीनेंप्राशिला ५९ इंद्रजितमाझारोहिणीवर। सौमित्रप्रतापराहूथोर। कळांसहितलोपलाचंद्र। नदिसेपुनःमागुती
६० वृत्रारिशत्रूचीअंतुरी। ऐसानानाविलापकरी। पशुपक्षीतेअवसरीं। रडतीकरुणाऐकोनी ६१ सख्याह्मणतीसुलोचने। आद्वांव्यर्थशोककांकरणें। आ
पुलेंपरत्रसाधनदेखणें। संसारमायात्यजूनी ६२ जेंदिसेतेंनाशिवंत। मिथ्याअहिकुंडलवत। पर्दीनेंपुरेंबांधोनिनाचत। मीनभूमीसींमिथ्यापैं ६३ उदि
मासगेलावंध्यासुत। मृगजळींमत्स्यधरीत। गधर्वनगरवाटत। मिथ्यासमस्ततैसेंहें ६४ असोनगारिशत्रूचीगृहिणी। प्रवेशोनिआत्मसदनीं। नानासंप
त्तीदेखोनी। मनविटेतत्काळ ६५ परापवादेंविटतीसज्जन। कींचिळसयेदेखोनिवमन। कींसुंदरललनादेखोन। विटेजैसाविरक्त ६६ तैसीनानावस्तुदे
खतां। विटलीशक्रारिचीकांता। शुकपक्ष्यादिसमस्तां। मुक्तकेलेंस्वहस्तें ६७ सदनासिनमनकरूनी। शिबिकेभ्रतारहस्तघालोनी। चपळअश्विनीवरी
बैसोनी। लंकेसतेव्हांचालिली ६८ तोंपुढेंदूतयेऊन। सांगतीसर्ववर्तमान। मगलघुकपाटेंउघडून। सुलोचनाप्रवेशली ६९ अस्तागेलावासरमणी। प्र
वर्तलीघोररजनी। रजनीचरतेक्षणीं। नगरदुर्गींचेगजबजिले ७० सभेसबैसलालंकानाथ। तोंस्नुषादेखेअकस्मात। गजबजिलामयजानाथ। चिन्ह
विपरीतदेखोनी ७१ सुलोचनासद्गददहोउनी। मस्तकठेवीश्वशुरचरणीं। रावणह्मणेवोसाजणी। मायेकिमर्थआलीस ७२ तोंभुजेसहितपत्र। श्वशुरा
पुढेंठेविलेंसत्वर। ह्मणेस्वर्गागेलेभ्रतार। त्यांसमागमेंजाईनमी ७३ ऐसेंऐकतांचिरावण। घेतवक्षस्थळबडवून। खालतापडेसिंहासनावरून। महाद्रुम
उन्मळेजेवी ७४ मृत्तिकाघेऊनिलंकानाथ। दाहाहिमुखींतेव्हांघालित। वर्तलाएकचिआकांत। नाहींअंतमहाशब्दा ७५ गजरऐकोनितयेवेळीं। मयक
न्यातेथेंपावली। वार्तापुत्राचीऐकिली। मूर्च्छितपडलीधरणीये ७६ ऐशींसहस्त्रराजअंगना। आल्यामहामंडपस्थाना। शोककरीमयकन्या। सर्वहितये
ससांवरिती ७७ मंदोदरीह्मणेस्नेहाळा। मेघनादामाझियाबाळा। मजनपुसतांरणमंडळा। सख्याकैसागेलासी ७८ त्रिभुवनशोधितांसमग्र। नदेखों
तुजऐसाधनुर्धर। बंदींघातलेसमस्तसुरवर। शत्रूसमग्रत्रासिले ७९ पूर्वींतीव्रतपेंआचरलीं। पूर्णनहोतांमध्येंसोडिलीं। ह्मणूनिऐसीहानीझाली। आ
डठाकलेंपर्वकर्म ८० कींम्यांकेलापंक्तिभेद। संतांसबोलिल्येंदोषशब्द। कींअपर्णावरआणिमुकुंद। वेगळेदोघेभाविले ८१ हरिकीर्तनरंगमोडिला। क्षु

धार्थीपात्रींचाउठविला। कींपरद्रव्याचाअभिलाषकेला। किंवायडलागुरुद्रोह ८२ परलाभाचीकेलीहानी । कींदूषणदिल्हेंगंगेलागुनी। कींकुरंगिणीपाड
सावनीं। विघडपूर्वींम्यांकेला ८३ भिक्षानघालितांसाचार। दारींचादवडिलायतीश्वर। ह्मणोनिइंद्रजिताऐसापुत्र। गेलानिश्चितत्यादोषें ८४ असोदशश
तमुखकुमारी । दशकंठजायाहृदयींधरी । शोककेलातेणेंधरित्री । कंपितझालीतेधवां ८५ मगशेषकन्याह्मणेतयालागुन । मजद्यावेंजीशिरआणून । प
तीचीवाटपाहतांनयन । शिणलेजाईनसांगातीं ८६ ऐसेंबोलतांसुलोचना । क्रोधआलादशवदना । घावघातलानिशाणा । ह्मणेसेनासिद्धकरा ८७
आजसंग्रामकरूननिर्वाण । रामसौमित्रांचींशिरेंआणीन। अथवापुत्रपंथलक्षून। मीजाईनआतांची ८८ दशमुखकोपलादेखोनी । मयजासांगेसुनेच्या
कर्णीं । ह्मणेतूंचतेथेंजाऊनी । शिरमागोनघेईंकां ८९ मंगळजननीकुमरीवर। तयापासींतूंमागेंशिर। तोभक्तवत्सलपरमउदार।दयासिंधूदीनबंधू ९०
जोचराचराचेंजीवन । जनकजावेगळीकरून । सकळस्त्रियामातेसमान । एकबाणीएकवचनी ९१ दुःखामाजींसुखथोर । दृष्टींपाहेंवैदेहीवर । इतुकेन
सार्थकसंसार। इहपरत्रसर्वही ९२ पुंण्यपरायणश्रीरामभक्त।सुग्रीवजांबुवंतहनुमंत। न्यायसिंधूविभीषणतेथ । पाठिराखेसर्वस्वें ९३ ऐसेंबोलतांम
यकन्या। आलेंसुलोचनेच्यामना ।मगश्वशुरासिमागेआज्ञा ।सुवेळाचळाजावया ९४ दशद्वयनेत्रबोले।तुजजरीत्यांहींठेऊनघेतलें। कैसेंकरावेंतयेवे
ळे।सांगवहिलेंआह्मांतें ९५ उरगबैसलाधुसधुसीत । तयामुखींकेवींघालवेहात ।यावरीशेषकन्याबोलत ।दशकंठासीतेंऐका ९६ परसतीचाअभि
लाषसमूळ । करीऐसाकोणचांडाळ ।त्याचावंशभस्महोईल । विपरीतकर्मआचरितां ९७ परस्त्रीचाअभिलाषधरून । कोणपावलाजयकल्याण।राव
णबोलेअधोवदन । तरीअवश्यजाईजे ९८ तुजसींविपरीतकरितांजाण । शत्रूअवघेभस्मकरीन। शेषतनयानिकेंह्मणून। तत्काळतेनिघाली ९९ बृह
स्पतीऐसेविचक्षण। घेतलेशिष्टबंदिजन। सहस्त्रार्धदासींघेऊन। अश्विनीवरीआरूढली १०० संसारमायाटाकून। संतस्वरूपींहोतीलीन । तैसीलंका
उपेक्षून। चालिलीशरणश्रीरामचंद्रा १ परमवेगेंतेवेळीं। आलीरामसभेजवळी। कृपाब्धीसमिळोंआली। पुंण्यगंगासुलोचना २ कींसंताचेगृहाप्रती।
विश्रांतीसयेईशांती ।तैसीशेषकन्याझालीयेती । सीतापतीलक्षूनियां ३ कनकाद्रिभोंवतेतरुवर । तैसेराघवावेष्टितवानर । कोटिकंदर्पलावण्यसुंदर।
अवनिजावरदेखिला ४ भोंवतेकपियंत्राकार । उभेअसतीजोडूनिकर । मध्येंरघुनाथपाठपवित्र । घवघवितविराजमान ५ अश्विनीखालींउतरूनि
जाणा। मनींआठवीकैलासराणा । हंसगतीसुसोचना । शेषकन्याचालत ६ एकधांवोनिवानरयेती। हर्षेंश्रीरामासीसांगती । रावणेंपाठविलीसी
तासती । भयाभीतहोऊनियां ७ मगबोलेचापपाणी । रावणपडिलानाहींजोंरणीं । तोंवरीजनकनंदिनी । दृष्टीनपडेतुमच्यापैं ८ शेषकुमरीजवळ

खोन । बिभीषणाकडेपाहेरघुनंदन । तेणेंआसुवेंभरलेनयन । सद्गदकंठजाहला ९ ह्मणेजगद्वंद्याराजीवनेत्रा । हीशक्रजितललनासत्पात्रा । इचेंनाम
घेतांविषकंठमित्रा । सर्वदोषहरतील ११० कर्मगतीपरमगहन । जीचेअंगुष्ठींनपडेसूर्यकिरण । शेषकन्यासुकुमारपूर्ण । आलीधांवूनशिरालागीं ११
तोंसुलोचनाजवळयेऊन । विलोकूनश्रीरामध्यान । जग्नजयकारेंलोटांगण । राघवचरणींघातलें १२ रामचरणकमळावरी । शेषकन्याझालीभ्रमरी । ज्या
चेचरणरजेंनिर्धारी । पद्मजाततनयाउद्धरली १३ दरिद्रीयाससांपडेधन । कींजन्मांधासिआलेनयन । कींमेघवळलादेखोन । मयूरजैसाआनंदे १४ कीं
प्रवाहींबुडोनजातसे । त्यासप्राणसखालावींकांसे । कींयोगीपावेवृत्तिदशे । निजमनजिंकोनी १५ तैसादेखोनिश्रीरामचंद्र । उल्हासेसुलोचनाचकोर ।
कींरघुनाथहोयदिनकर । कमळिणीतेसुलोचना १६ संसारतापेंतापोनी । दृढजडलीश्रीरामचरणीं । तेथोनिउठावयामनीं । आळसयेतसुलोचने ।
१७ आतांहेंसुखसांडोनी । पुढतीकायपाहूंनयनीं । सुलोचनारामपदावरूनी । भाळसहसानुचलीच १८ जैसाअमृताचाबिंदू । तेविद्रवलाकृपासिंधू ।
जोजगदीशदीनबंधू । लाविलावेधूत्रिनेत्रा १९ ह्मणेमातेउठींझडकरी । परमश्रमलीससंसारीं । आतांसुखरूपराहेंपरत्रीं । अक्षयसुखभोगींतूं २० ऐ
सेंऐकोनिझडकरी । उभीठाकलीशेषकुमरी । पाणिद्वयजोडूनितेअवसरीं । स्तवनकरीसद्भावें २१ ह्मणेजयजयरामाविषकंठमित्रा । रघूतमाराजीवनेत्रा ।
जलदवर्णाचारुगात्रा । मित्रकुळमुकुटमणी २२ जगद्वंद्याजगन्नायका । जनकजापतिजगरक्षका । जन्ममरणभयमोचका । जनकजामाताजगद्गुरू २३
भार्गवजिताजलजनयना । जगव्यापकादुःखहरणा । जगदीश्वराजलजलोचना । जन्मजरारहिततूं २४ पुराणपुरुषारघुनंदना । भक्तवत्सलाजगन्मो
हना । मायाचक्रचाळकानिरंजना । निष्कलंकानिर्गुणातूं २५ अयोध्यापुरविहारा । वेदवंद्यावेदसारा । परमउदाराघुवीरा । अहिल्योद्धारामख
पाळका २६ जयजयरामाविश्वपाळणा । विश्वव्यापकाविश्वकारणा । विश्वचाळकाजगज्जीवना । विश्वरक्षणाविश्वशा २७ विबुधलल्लाटपटलेखना ।
सनकसनंदनमनरंजना । हेरघुवीरादानवदळणा । भवभंजनाभवहृदया २८ मंगळरूपामंगळकारका । जयमंगळजननीउद्धारका । मंगळभगिनी
प्राणनायका । मंगळरहितामंगळधामा २९ कमलोद्भवजनकाकमलनयना । कमलनायकाकमलशयना । कमलनाभाकमलवदना । कमलसदनाक
मलप्रिया १३० नमोभवावारणविदारकपंचानना । नमोपापारण्यकुठारतीक्ष्णा । हेश्रीरामात्रिविधतापशमना । अनंतशयनाअनंता ३१ तुजस्तवि
तांचापपाणी । शिणलीसहस्त्रवदनाचीवाणी । नेतिनेतिह्मणोनी । चारीवेदतटस्थ ३२ तेथेंएकजिव्हेचेंस्तवन । मांडेलमाझेंकोठून । जेसेंभागीरथी
ससंमार्जन । थिल्लरोदकेंमांडिलें ३३ पितळेचेंपुष्पनेऊन । केलेंकनकाद्रीचेंपूजन । कींजलार्णवासिअर्घ्यदान । कपोदकेंपैंकेलें ३४ अर्कासवाहि

लेंअर्कींसुमन । मलयानिलासिअंचलपवन । किंवाक्षीराब्धीपुढेंनेऊन । तक्रजैसेंसमर्पिलें ३५ केवीहोयधरेचेंवजन । स्तंभकैंचाटेंकावयागगन । सप्तस मुद्रींचेंजीवन । टिटवीसकेवीमोजवे ३६ सकळप्रकाशकरोहिणीवर । त्यासदर्शीवाहिलीअणुमात्र । कींधुत्तूरपुष्पींउमावर । द्ररिद्रीयानेंपूजिला १३७ तुझेंदखतांचिचरण । माझादेहजाहालापावन । होऊनठेलेंमनउन्मन । जन्ममरणचुकलेंअसे ३८ घागरीआणिरांझणीं । एकचिंबिंबलावास रमणी । तैसास्त्रीपुरुषअभिधानीं । चापपाणीव्यापकतूं ३९ तरीयास्त्रीदेहाकृती । शक्रजिताचीअंगनाह्मणती । पतिशिरासवेंरघुपती । अग्नीमाजीघालिजे ४० हेअयोध्याधीशाउदारा । अनाथयाचकमीमागेंशिरा । मीचातकतूंजलधरा । कृपानिधीवर्षैंकां ४१ जेव्हांउदयपावे गभस्ती । तेव्हांचक्रवाकांहोयतृप्ती । तैसेंचआतांकरीरघुपती । मित्रकुळप्रकाशका ४२ क्षीरआणिजळ । वेगळेंकाढितीमराळ । तैसाश्रीरामतमा ळनीळ । भवपुरीहूनिमजकाढींकां ४३ पतीचेंऐकिलेंबर्तमान । तेव्हांचगेलेमाझेपंचप्राण । परिशिराचेंनिमित्तकरून । तुझेचरणपाहूंआल्यें ४४ तूंचित्तपरिक्षकरघुनाथ । जाणसीसर्वांचेमनोरथ । ऐसेंसुलोचनाह्मणत । जगन्नायकतटस्थजाहला ४५ ह्मणेंधन्यधन्यसहस्त्रवदन । ऐसेंहृदयींजन्म लेंरत्न । कींभोगेंद्राचेंतपपूर्ण । कन्यारत्नप्रकटलें ४६ सुलोचनेचेंचातुर्यदेखोन । सर्वकपीतुकावितीमान । श्रीरामासिह्मणेमित्रनंदन । ईतेंशिरदे ऊनिबोळवा ४७ जांबुवंतह्मणेहेपुंण्यसरिता । अंगदह्मणेधन्यपतिव्रता । मारुतिह्मणेइचेंनावघेतां । पापनुरेसहसाही ४८ सायुज्यमुक्तीसमवेत । इसींशि रद्यावेंत्वरित । असोयावरीजनकजामात । पुसेदशकंठस्नुषेतें ४९ आह्मीयेथेंआणिलेंशिर । तुजकळलाकेवीसमाचार । येरीह्मणेपतिकरेंसाचार । पत्रलिहू नदीधलें ५० भुजपत्रदाखविलेंत्वरित । आश्चर्यंकरीकौसल्यासुत । तोंवानरह्मणतीसमस्त । आह्मासिसत्यनवाटे ५१ निर्जीवहस्तेंलिहिलेंपत्र । तरीचआह्मी मानूंसाचार । जरीहेहांसवीलशिर । प्राणपतीचेंयेकाळीं ५२ रामह्मणेइचामहिमाथोर । कायएकनकरीनिर्धार । ऋषभाहस्तेंआणविलेंशिर । अर्कपुत्रेंतेका ळीं ५३ महाविशाळभयंकर । जिव्हालोळेमुखाबाहेर । झांकिलाअसेसव्यनेत्र । भाळींसेंदुरचर्चिला ५४ बाबरझोटीधरून । ऋषभेंठेविलेंआणोन । तेंसुलो चनेनेंधरून । हृदयींतेव्हांआलिंगिलें ५५ स्फुंदस्फुंदोनिसतीरडत । त्रिभुवनींबळियाइंद्रजित । त्याचेंशिरपडिलेंयेथ । कर्मविचित्रपूर्वींचें ५६ खालींपस रीउत्तरीयवस्त्र । त्यावरीबैसविलेंतेव्हांशिर । सतीनेंकरूनिनमस्कार । विनवीकरजोडूनियां ५७ अयोध्यानाथश्रीरामचंद्र । पाहतीस्वर्गींचेसुरवर । तरी तुह्मींहास्यकरावेंसत्वर । जेणेंश्रीरामधन्यह्मणे ५८ मजसींविनोदनानारीतीं । करीतसाप्राणपती । तरीआजिक्रोधचित्तीं । कायह्मणोनिधरियेला ५९ आजिअपराधसमस्त । समर्थेंघालावेपोटांत । माझापतिव्रताधर्मबहुत । रघुपतीसीदाविजे ६० होमविध्वंसिलाह्मणोन । तेणेंक्रोधेंधरिलेंमौन । समरीं

जयनदेखोन । ह्मणोनिखेदमनींवाटला ६१ कींरामदर्शनाशिरआणिलें । सायुज्यपदप्राप्तझालें । ह्मणोनिबोलणेंखुंटलें । जन्ममरणचुकलेंपैं ६२ इत्या
दिभावतेअवसरीं । बोलिलीफणिपाळकुमरी । किंचित्विनोदहीकरी । सुलोचनाहंसवावया ६३ शूर्पनखातुमचीआत । जनस्थानींगौरविलीबहुत । क
र्णनासिकसुमित्रासुत । घेऊनिगेलाआरंभीं ६४ भगिनीचेंदेखोनिभूषण । आनंदलापितृव्यकुंभकर्ण । तेणेंनासिकआणिकर्ण । सुग्रीवासिसमर्पिलें ६५
ऐसाविनोदकरितां । परिशिरनहांसेसर्वथा । मगसहस्रवदनदुहिता । खेदपरमकरितसे ६६ ह्मणेमीपूर्वींचुकल्येंयथार्थ । जरीपितासाह्यआणित्येंयेथ ।
तरीतुमचेशत्रुसमस्त । पराभविताक्षणार्धें ६७ ऐसीऐकतांचमात । गदगदांतेव्हांशिरहांसत । सव्यनेत्रउघडोनिपाहत । जेवींविकासेकमळणी ६८ श्री
रामासपुसतीवानर । कायगोष्टीसहांसलेंशिर । याउपरीराजीवनेत्र । कायबोलताजाहला ६९ ह्मणेइचापितासहस्रवदन । तोचिअवतरलालक्ष्मण । त्या
श्वशुरेंमजमारिलेंपूर्ण । शिरहांसलेंगदगदां १७० अज्ञानरूपवामनयन । मीत्यासनदिसेंसगुण । ज्ञानमयसव्यनयन । उघडोनिमजविलोकी ७१ वान
रडोलवितीमान । सुलोचनादेवीधन्य । हीसतियांमाजीनिधान । शिरअचेतनहांसविलें ७२ तंवतोवीरलक्ष्मण । व्यापिलामायामोहेंकरून । सुलोचनेक
डेपाहोन । अश्रुनयनींभरियेले ७३ रघूत्तमाप्रतिबोलत । अन्यायकेलाम्यांयथार्थ । प्रत्यक्षमारूनजामात । कन्यासुलोचनाश्रमविली ७४ ऐसाशोकागर्वी
लक्ष्मण । पडतांदेखोनिरघुनंदन । ह्मणेबारेक्षत्रियधर्मदारुण । देवेंपूर्वींचनिर्मिला १७५ बंधुअथवापितापुत्र । समरींआलियासमोर । त्यासिवधितां
अणुमात्र । दोषनसेसहसाही ७६ सौमित्रह्मणेश्रीरामा । विश्वफळांकितद्रुमा । अजअजितपूर्णब्रह्मा । तुह्मीबोलिलांतेंसत्य ७७ मा
याचक्रमोहदुर्गम । प्रियावियोगेंवाटेश्रम । सीतेलागींतुह्मींपरम । वृक्षपाषाणआलिंगिले ७८ ऐसीऐकतांचिमात । कृपेनेंद्रवलार
घुनाथ । ह्मणेमीउठवीनइंद्रजित । करीनऐक्यउभयतांसी ७९ इंद्रकरींआणूनअमृत । आतांचिउठवूंशेषजामात । ऐकतांमहावीरतेथ ।
गजबजिलेतेकाळीं १८० खूणदावीसूर्यनंदन । हेंमनींनधरावेंआपण । विमानींदेवसंपूर्ण । भयाभीतजाहाले ८१ अंगददावीकरपल्लवीं । विभी
षणमानहालवी । जांबुवंतनेत्रसंकेतदावी । नकाहेंकरूंअघटित ८२ निर्भींडउत्तरदेतवायुतनय । बोलिलाजेंसर्वांसिप्रिय । ह्मणेतुमचेंठेवाऔदार्य । एकी
कडेनेउनी ८३ अजाह्मणोनिपाळिजेवृक । मित्रह्मणोनयेदंदशूक । विषतरूचेंकायसार्थक । दुग्धघालोनिवाढवितां ८४ इंद्रजिताचेबळेंदेव । राव
णेंयातलेबंदींसर्व । याचींकापटयेंवासव । तोहीनेणेसर्वथा ८५ सौमित्रबोलिलावचन । जेणेंहोयसर्वांचेंसमाधान । तैसेंकरावेंआपण । रघुनंदनअवश्यह्मणे
८६सुलोचनेसिह्मणेमित्रपुत्र । पतीचेंशिरनेईंसत्वर । निराशादेखानिउत्तर । सतीसुलोचनाबोलतसे ८७दृष्टींदेखिलारघुनाथ । इतुकेनसर्वकृतकृत्य ।

णघायेंकरून । जरीदुखवेलप्रभंजन । गरुडसर्पासियेईलशरण । पतंगअग्नीसगिळीलजरी ५१ हेंहीएकवेळघडे । परीतुजजानकीदृष्टीनपडे । रा
वणबोलेंध्वनीगडाडे । मेघगर्जतीजैसेकां ५२ रघूतमह्मणेदशकंठा । तुजमृत्युसमयींफुटलाफांटा । माझेबाणांचासपाटा । साहेंआजिसमरंगणीं ।
५३ रामेंचापटणत्कारूनप्रचंड । शरसोडीजैसाकाळदंड । दोघेवीरपरमप्रचंड । रणवितंडमाजविलें ५४ मांडलेंएकचिघनचक्र । रणतुरेंवाजती
अपार । सीताजनेनीथरथर । कंपीतहोयक्षणक्षणां ५५ अलातचक्रेंजेंविफिरती । तेवींउभयचापेंझळकती । चपळेऐशातळपती । मुद्रिकाहातींदोघांचे
५६ भुजंगअस्त्राचाप्रयोग । रावणकरीतेव्हांसवेग । दशदिशांनींपन्नग । कपिकटकावरीआले ५७ जैसेंनिबिडजलदजाळ । तैसेंसर्पेंव्यापिलेंसकळ
ऐसेंदेखोनितमाळनीळ । गरुडास्त्रसत्वरजपे ५८ सोडितांसुपर्णास्त्रबाण । पृथ्वीआणिआकाशफोडून । असंख्यातधांवतीविनतानंदन । सर्पसंपूर्णभक्षि
ले ५९ सर्पसंहारूनिसमस्त । गरुडसवेंचिझालेगुप्त । जातवेदास्त्रदीप्तिमंत । विंशतिनेत्रेंसोडिलें ६० पाखांडउच्छेदीपंडित । तेवींजलदास्त्रसोडीरघुनाथ ।
रावणेंवातास्त्रअद्भुत । तयावरीप्रेरिलें ६१ रामेंआडघालोनिपर्वत । प्रभंजनकोंडिलासमस्त । वज्रास्त्रप्रेरीलंकानाथ । फोडिलेपर्वततेकाळीं ६२ मग
असंभाव्यशस्त्रजाळ । रावणेंप्रेरिलेंतत्काळ । एकाचिबाणेंअयोध्यापाळ । छेदोनियांटांकितसे ६३ रावणेंयोजिलाएकशर । दिनकरमुखतेजअपा
र । चापींलावूनसत्वर । रामावरीसोडिला ६४ रघूतमेंकेलेंसंधान । परितोअनिवारशरपूर्ण । श्रीरामचरणासिलागलायेऊन । भेदोनगेलापलीक
डे ६५ राघवचरणसुकुमार । वामेंपादफोडोनिगेलाशर । ऐसेंदेखोनिवानर । उठिलेसर्वएकदांची ६६ रणींपडिलींहोतींशस्त्रें । तींवानरीं
घेतलींअपारें । मारितउठिलेएकसरें । अनिवारकाळासिजे ६७ परमार्थबळेंकरूनसबळ । ज्ञानीविध्वंसीप्रपंचदळ । तैसेरामउपासकनिर्मळ ।
असुरसकळरगडिती ६८ अभिमानाचेमुकुटथोर । परमार्थबाणेंकेलेचूर । त्रयावस्थांचींकवचेंअपार । सूर्यखड्गेंतोडिलीं ६९ समवृत्तीचींशस्त्रेंघे
ऊन । द्वेषधनुष्येंछेदिलींपूर्ण । नैराश्यचक्रेंकरून । लोभभातेउडविले ७० स्वरूपसाक्षात्कारबाणीं । सिद्धपातकांसांडीखंडुनी । बोधपरशेंकरुनी
मोहध्वजछेदिले ७१ अनुसंधानपरिघघेऊन । अविद्यारथकेलाचूर्ण । विरक्तिगदाघेऊन । कामकुंजरविदारिले ७२ क्रोधमदमत्सरअहंकार । हे
पुढंहोतेपायभार । शमदमअस्त्रेंअनिवार । तेगेंचूर्णकेलेते ७३ संकल्पविकल्पद्वेषकुटिळ । हेअसुरांचेतुरंगसबळ । समाधानशक्तीनेंसकळ । विदा
रूनपाडिले ७४ आशामनशाकामनापूर्ण । याभिंडिमालायेतीदारुण । मनोजयाचेंपुढेंवोडण । रामभक्तकरितीहो ७५ आतांअसोहापाल्हाळ ।

१ वायु. २ रणवाद्यें. ३ पृथ्वी. ४ विजेप्रमाणें. ५ सर्प. ६ दाट. ७ मेघ. ८ राम. ९ गरुडास्त्र. १० अग्नि. ११ डावा. १२ राक्षस. १३ जागृति. स्वप्न. सुषुप्ति.

वानरींरगडिलेंअसुरदळ । रावणघालीबाणजाळ । मायापडळज्यापरी ७६ रथारूढलंकानायक । जैसागजमस्तकींबलाहक । पृथ्वीवरीअयोध्यापा
लक । ठाणमांडोनिउभाअसे ७७ वाचस्पतीसिह्मणेइंद्र । राजाधिराजश्रीरामचंद्र । त्रिभुवनेश्वरगुणसमुद्र । उदारधीरपरमात्मा ७८ सीतेचेंक
रूनिनिमित्त । करावबाआह्मांबंधमुक्त । युद्धकरीतरघुनाथ । धाडावारथयेसमयीं ७९ मातलीसारथीसुजाण । तयासिसांगेसहस्रनयन । शस्त्रांस्त्रींभरू
नस्यंदन । अश्वरत्नेंदिव्यज्योती ८० तोमाझारथतेजागळा । सत्वरनेईंसुवेळाचळा । आज्ञावंदोनितेवेळां । निघेमातलीवेगेंसी ८१ त्रुटीनवाजतांतात्का
ळीं । रथआणिलाश्रीरामाजवळी । खालींउतरूनितेवेळीं । वंदीमातलीरामातें ८२ ह्मणेरामातमाळनीळा । सहस्राक्षेंरथपाठविला । यावरुतेंआरूढोनिदया
ळा । युद्धालागींप्रवर्तावें ८३ माझेंनाममातली । रथफेरीनरणमंडळीं । ऐसेंऐकतांतेवेळीं । जगदात्मासंतोषला ८४ ह्मणेधन्यधन्यशचीनाथ । समय
पाहूनिकेलेंउचित । जैसादेखोनिक्षुधित । भोजनत्यासिदेईजे ८५ तृषाक्रांतासितोयशीतळ । कींरोगियासिरसायणनिर्मळ । कींमरतयासितत्काळ ।
सुधारसपाठविला ८६ दुर्बळासिदीजेधन । कींरणींपाठिराखायेधांवोन । तैसापुरंदरेंस्यंदन । समयोचितपाठविला ८७ मगप्रदक्षिणाकरून । रथीं
चढलारघुनंदन । उदयाचळींसहस्रकिरण । कींनारायणसुपर्णीं ८८ जगद्वंद्यतोदाशरथी । पुढेंमातलीचपळसारथी । रणमंडळींझालामहारथी । धुरे
सीतवरेंबैसला ८९ रघुनाथरथींदेखोन । आनंदलेवानरगण । ह्मणतीधन्यशचीरमण । पाठिराखापूर्णहोय ९० रामासिदेवेंद्रेंधाडिलारथ । दृष्टींदेखोनि
लंकानाथ । दुःखेंदाटलाअत्यंत । दांतखायकरकरां ९१ दृष्टींदेखोनिराजहंस । परमसंतापेवायस । कींसभाग्यदेखोनिदुर्जनास । महाद्वेषउपजेपैं
९२ कींदेखोनिसंतलीला । निंदकासिउपजेकंटाळा । शिवप्रतिमादेखोनिडोळां । म्लेंच्छजैसेसंतापती ९३ कींहरिकीर्तनऐकून । विटेभूतप्रेतांचेंमन ।
तैसाक्षोभलारावण । रथदेखोनितेकाळीं ९४ इंद्रजितपाडिलारणीं । त्याहूनिदुःखवाटलेंमनीं । प्रियाबिटंबलीवानरगणीं । त्याहूनिदुःखवाटलें ९५
ऐसापरमक्रोधेंरावण । सोडीबाणापाठीबाण । अचुकरामाचेंसंधान । करीचूर्णसवेंची ९६ सिंहासारिखेदोघेजण । घेघेशब्दकरितीगर्जून ।
असंख्यातटांकूनिबाण । मंडपवरीघातला ९७ भयाभीतत्रिभुवन । आकाशनदिसेबाणेंकरून । विमानेंसोडोनिसुरगण । पळोंलागलेतेधवां ९८
बाणदाटलेअद्भुत । नचालतीशशीमित्ररथ । वायूसफिरावयातेथ । रीघनव्हेसर्वथा ९९ रुधिरंधारामेघवर्षती । नक्षत्रेंखळखळांरिचवती । विद्युल्लताव
हुतहोती । कांपेजगंतीचळचळां १०० सप्तपाताळेंआंदोळती । शेषकूर्मदचकेचित्तीं । राक्षसवानरकांपती । युद्धपाहातीदोघांचें १ एककाळएक



१ इंद्र. २ थंड पाणी. ३ अमृत. ४ सूर्य. ५ गरुडावर. ६ कावळा. ७ देव. ८ चंद्र व सूर्य. ९ रक्त. १० पृथ्वी.

महाकाळ। एकदावाग्नीएकवडवानळ। क्रोधेंकरूनभूमंडळ। दोघेहीगिळूंपाविती २ पदक्रमवर्णक्रमेंकरून । पंडितकरितीवेदाध्ययन। तैसेरघुनाथा
चेबाण। परमवेगेंसुटती ३ दोनीरथघडधडिले। समरींएकेठायींमिळाले । अश्वअश्वांसिसंघटले । उभेराहिलेदोनचरणीं ४ सारथियाससारथी
ह्मणत। रणधुमाळीमांडलीअद्भुत।दोहींदळींआकांत ।थोरझालातेधवां ५ सारथीपरमचतुर। माघारिलेरहंवर। जैसेपंडितवादंकर। क्षणएक
स्थिरावती ६ तैंसेरथमाघारेंकरून। सवेंचकरितीसंधान। पर्जन्यजैसावोसरोन। सवेंचिमागुतीवृष्टीकरी ७ कींसागराचेंभरतेंवोहटत। सवेंचिमागुती
दाटत। तैसेंबाणजाळवर्षत। एकएकावरीपैं ८ सप्तदिवसअहोरात्र। होतयुद्धाचेंघनचक्र। परीरामरावणेंक्षणमात्र । विसांवाघेतलाचनाहीं ९ रा
मेंकाढिलेचारबाण। सोडिलेचापासिलावून। रावणरथींचेवारूछेदोन।अकस्मातटांकिले १० तंवरावणेंनलागतांक्षण। नूतनतुरंगेंजुंपिलेपूर्ण। म
गवीरश्रेष्ठरघुनंदन। कायकरिताजाहला ११ काढिलाअर्धचंद्रबाण । जैसानवग्राहांतचंडकिरण। तोशरासनावरीयोजून। मनोवेगेंसोडिला १२
सवेंचरावणेंनलागतांक्षण। अर्धचंद्रबाणटांकावाताडून। ह्मणोनितीक्ष्णशक्तीयोजिलीपूर्ण। तोंबाणह्रदयींआदळला १३ त्याबाणेंएकसरें। पाडिलींराव
णाचींदाहीशिरें। परिसवेंचिनिघालींसत्वरें। पहिल्याऐसींतेधवां १४ रविचक्रवदनशर।रामेंसोडिलाअनिवार। शिरेंछेदिलींसमग्र। मागुतींतैसींच
उद्भवलीं १५ देवआणिवानर। अवघेझालेचिंतातुर। कैसामरेलदशकंधर। वारंवारशिरेंनिघती १६ राजाधिराजरघुनाथ। क्षणेकझालाचिंताक्रां
त। तंवसारथिमातलीबोलत। राघवाप्रतितेकाळीं १७ ह्मणेअनंतब्रह्मांडनायका। सकळचित्तपरीक्षका। त्याच्याह्रदयींअमृतकूपिका। असेतीबाणें
फोडिजे १८ ऐसेंमातलीबोलत। तयागौरवीरघुनाथ। मगबाणकाढिलात्वरित। अगस्तीदत्तमुख्यजो १९ जैसादेवांमाजीसहस्रनयन। अंडज्यां
माजीविष्णुवहन। कींद्रवेयांतसहस्रवदन। तैसाबाणसमर्थतो २० कींवानरांमाजीहनुमंत। कींशास्त्रांमाजीवेदांत। कींनक्षत्रांसिझांकीआदित्य । तै
साबाणसमर्थतो २१ शस्त्रांमाजीसुदर्शन। कींतीर्थांमाजीप्रयागपूर्ण। क्षेत्रांमाजीनंदनवन । तैसाबाणसमर्थतो २२ शेषकूर्मवराहधरणी। सप्तस
मुद्रशशीतरणी। इतुक्यांचींसत्वेंकाढोनी। बाणाठायींठेविलीं २३ अग्निवायुशचीरमण। चंडांशुकुबेरयमवरुण। त्रिदशांचींसामर्थ्यैंपूर्ण। त्याबाणा
ग्रींवसिन्नलीं २४ तोकाढितांचिबाण। झांकलेसमस्तांचेनयन। सहस्रसूर्यांचाप्रकाशजाण। भूमंडळींदाटला २५ त्याबाणामुखींब्रह्मास्त्र । स्थापि
ताझालाराजीवनेत्र। तोचापासियोजिलाशर। विषकंठवंद्येंतेसमयीं २६ सीताधवेंतेवेळां। बाणआकर्णवोढिला। तेवेळींभासलेंसकळां। कायमांडि

---

१ रथ. २ वाद करणारे. ३ घोडे. ४ सूर्य. ५ धनुष्यावर. ६ रावण. ७ शिशी, कुपी. ८ इंद्र. ९ गरुड. १० सर्प. ११ शेष. १२ देव.

लामहाकल्पांत २७ ऐसाबाणतोसबळ । अत्यंततेजाचाकल्लोळ । शशीसूर्यलोपलेसकळ । सुरवरविमानेंपळविती २८ जळींरिताघटडळमळी । तैसीधराडोलोंलागली । प्रचंडवीरतेकाळीं । मूर्च्छितपडिलेधरणींये २९ जगद्वंद्याचेकर्णीयेऊन । तेव्हांसांगतसेबाण । कुपीसहितप्राण । दशानना चामीनेतों ३० असोरावणाचेंवक्षस्थळ । लक्षूनियांतमाळनीळ । बाणसोडीतत्काळ । ब्रह्मांडगोळउचंबळला ३१ मिळोनियांअसंख्यचपळा । कडकडोनिएकदांचपडिल्या । तैसाबाणतेवेळां । हृदयींसंचरेरिपूच्या ३२ कुपीसहितवक्षस्थळ । बाणेंफोडिलेंतत्काळ । हृदयींछिद्रपाडिलेंविशाळ । ग वाक्षद्वारासारिखें ३३ सवेंचिपरतलाबाण । रावणाचींतीनशिरेंछेदोन । रघुपतीचेभातांयेऊन ॥ आपुलेआपणसंचरला ३४ उरलींशिरेंछेदावयातें । शरकाढिलारघुनाथें । तेव्हांप्रार्थिलेंऊर्मिळाकांतें । युद्धआतांपुरेजी ३५ रावणेंसोडिलाप्राण । त्यासिनशिवतीतुझेबाण । आतांजाऊनअवघेजण । प्रे तपाहूंतयाचें ३६ धनुष्यतूणीरांसहित । सौमित्राजवळीरामदेत । आमुचेअवताराचेंकृत्य । आजपासूनिसंपलें ३७ झालाएकचिंजयजयकार । वा द्येंबाजवितीसुरेश्वर । दुंदुभीच्यानादेंसमग्र । ब्रह्मांडसर्वदणाणिलें ३८ देवींपुष्पांचावर्षावतेवेळां । अयोध्यानाथावरीकेला । गणगंधर्वकिन्नरमेळा । सुवेळाचळींधांवती ३९ संतोषलेसकळऋषीश्वर । आनंदेंनाचतीवानर । त्रिभुवनआनंदलेंथोर । रामेंरावणवधियेला १४० रघुनाथाचेवीरसकळ । दशमुखाभोंवतेमिळालेतत्काळ । जैसावृक्षउन्मळेसमूळ । तैसाविशाळपडिलाअसे ४१ मुखांवरीगृध्रंबैसोन । रावणाचेंफोडितीनयन । रक्तजातसे वाहून । सैरावैराचहूंकडे ४२ मुखींशिरींपडलीधुळी । मुकुटलोळतीभूतळीं । असोबिभीषणेंपाहूनितेवेळीं । दुःखार्णवींपडियेला ४३ शरीरटांकिलें धरणीवरी । हृदयपिटीदोहींकरीं । ह्मणेदिशाशून्ययाउपरी । बंधूवीणजाहल्या ४४ अगाधजयाचेंप्रतापबळ । क्रोधींजैसावडवानळ । चातुर्याचासाग रकेवळ । खंडेंकेलींवेदांचीं ४५ परमजयाचेंतपदारुण । संपत्तीसंततीयुक्तपूर्ण । जेणेंदेवांचेगर्वहरून । बंदींसर्वघातले ४६ जयाकारणेंआदिपुरुषें । अवतारधरिलाराघवेशें । अद्भुतकर्तव्यकेलेंलंकेशें । निर्गुणआणिलेंगुणत्वा ४७ जोपरमपुरुषनिर्विकार । तोप्रत्यक्षदाखविलासाकार । जानकीआ णूनिउपकार । केलाआह्मांवरीरावणें ४८ जोवेदवंद्यराजीवनेत्र । तोआमुचाझालाप्राणमित्र । हारावणाचाकृतोपकार । सुग्रीवासहितआह्मांवरी ४९ श्रीरामपरब्रह्मअरूप । त्याच्यास्वरूपाचेंकेलेंरूप । आपुलावाढविलाप्रताप । चंद्रार्कवरीरावणें १५० श्रीरामह्मणेबिभीषणाप्रती । तूंकेवळविवे कमूर्ती । नाशिवंताचाशोकचित्तीं । कायनिमित्तधरियेला ५१ हाजगडंबरपसारासकळ । मायिकजैसेंमृगजल । कींवंध्यावल्लीचेंफळ । मूळापासोनिल

१ लक्ष्मणानें. २ भात्यासह. ३ गिधड. ४ वडवाग्नि. ५ मूर्तिमंत ६ चंद्र सूर्य आहेत तों पर्यंत.

टिकेंची ५२ पिंडब्रह्मांडनाशिवंत । आकारतेथेंविकारसत्य । जेंमुळींचेंअशाश्वत । त्यचाशोककासया ५३ ऐसेंबोलतांरघुनंदन । उगाचिराहेवि
भीषण । तोंसकळस्त्रियाआल्याधांवून । मंदोदरीहीपातली ५४ कवळोनियांपतीचेंप्रेत । मंदोदरीशोककरित । ऐशींसहस्त्रस्त्रियाआल्यापिटित । व
क्षस्थळधबधबां ५५ स्त्रियाह्मणतीप्राणनाथा । जयदेऊनिश्रीरघुनाथा । आह्मांसिटांकूनितत्वता । कैसाक्रमिलापरलोक ५६ लंकागजमस्तकावरीअ
द्भुत । चढलाकेसरीश्रीरघुनाथ । काढोनियांदिव्यमुक्त । रणमंडळींटांकिलें ५७ मंदोदरीह्मणेलंकानाथा । तुजवीणआह्मीसर्वअनाथा । जयश्रीदेऊ
नरघुनाथा । रामजामातपैंकेला ५८ सौभाग्यतारूलंकानाथ । आजिबुडालेंअकस्मात । कींवेदांचेंसांठवणसमस्त । फुटलेंआजिरणांगणीं ५९ सी
तेचेंमिषंकरून । जवळीआणिलारघुनंदन । बाह्यविरोधंअंतरींभजन । दशकंधरेंपैंकेलें १६० फणसासिकांटेदिसतीवरी । परीअत्यंतगोडअंतरीं ।
तैसीरावणेंकेलीपरी । विरोधबाहेरदाखवूनी ६१ ऐसीमंदोदरीशोककरीत । भोंवत्याविलोकितीस्त्रियासमस्त । मगविभीषणासिरघुनाथ । कायबोल
ताजाहला ६२ ज्येष्ठबंधूचीराणी । मंदोदरीहेज्ञानखाणी । पतिव्रताशिरोमणी । जीचेस्मरणींदोषनुरे ६३ इचेंप्रातःकाळींस्मरण । करितांउद्धरती
पापीजन । विभीषणातूंकरींधरून । निजमंदिराप्रतिनेईंजे ६४ ऐसेंबोलतांरघुनंदन । उठोनियांविभीषण । मयंजेसिकरींधरून । ह्मणेमाये
चालसदनासी ६५ मयजेसह्मणेचापपाणी । मायेतूंज्ञानविचारखाणी । मूळींदृष्टीघालोनी । अद्वयंज्ञानेंपाहेंपां १६६ अहंकारतितुकानाशिवंत ।
आत्मस्वरूपपूर्णशाश्वत । ऐसेंजाणोनिकिमर्थ ! शोकव्यर्थकरावा १६७ ऐसेंबोलतांसच्चिदानंद । मयकंन्याराहिलीउगीचस्तब्ध । नमो
निश्रीरामचरणारविंद । निजधामाचालिली ६८ मयकन्येसहसर्वअंगनां । विभीषणेंपाठविल्यासदना । मगपुसोनिरघुनंदना । रावणदेहउच
लिला ६९ सर्वांतसरितांपावन । सिंधुसंगमींप्रेतनेऊन । प्रळयवन्हीचेतवून । आंतघातलेंकलेवर १७० तेथेंचउत्तरक्रियासमस्त । ब्रह्मदेवस्वयें
सांगत । विभीषणआचरेयथार्थ । शास्त्ररीतीप्रमाणें ७१ असोत्यावरीविभीषण । सुवेळेसिआलापरतोन । तोंलंकेचेसर्वप्रजाजन । विभीषणाभेटों
पातले ७२ विद्युज्जिव्हप्रधान । उरलेंसकळराक्षससैन्य । श्रीरामापुढेंयेऊन । लोटांगणेंघालिती ७३ काष्ठभस्महोतांसमग्र । विझोनजायवैश्वा
नर । तैसेंसमस्तविरालेंवैर । रावणरणींपडतांची ७४ सूर्योदयींनिरसेतम । ज्ञानोदयींनिरसेअज्ञान । तैसापडतांचिरावण । वैरनसेअणुमात्र ७५
सुवेळेसिआलेरजनीचर । ह्मणतीआह्मीविभीषणाचेकिंकर । लंकेंतजाऊनवानर । पाहतीनगरचहूंकडे ७६ असोयावरीविभीषण । श्रीरामापुढें

---

१ सिंहरूपीराम. २ मोत्यें. ३ निमित्त. ४ द्वेष. ५ मंदोदरीस. ६ राम. ७ एक शुद्ध. ८ स्वकीय घरास. ९ स्त्रिया. १० नदी. ११ अग्नि. १२ प्रेत.

करजोडून । मृदुमंजूळवचन । प्रेमयुक्तबोलतसे ७७ ह्मणेराजीवदलनयना । पुराणपुरुषासीतारमणा । ब्रह्मांडनायकागुणसंपन्ना । लंकेसिआतां चलावें ७८ विरिंचीहस्तनिर्मितनगर । दृष्टींपाहावेंसमग्र । मगघेऊनिसीतासुंदर । अयोध्येसजाईंजे ७९ ऐसेंबोलतांविभीषण । श्रीरामबोलेहर्षव दन । ह्मणेतुजलंकादिधलीदान । तेथेंआगमनआमचेंनव्हे ८० जैसेंकेलियाकन्यादान । तियेचेगृहींनघेतीअन्न । कींविप्रसीदिधलेंसदन । तेथेंआपणनजा वें ८१ कींसत्पात्रींदिधलियागोदान । तिचेंदुग्धनघ्यावेंकाढून । तैसेंलंकेंतआगमन । आह्मींसर्वथाकरूंनये ८२ त्यावरीभरतभेटीवीण । मीनकरींच मंगळस्नान । नानाभोगतांबूलभोजन । व्रतसंपूर्णधरिलेंअसे ८३ मगसौमित्रआणिमित्रपुत्र । तयांसह्मणेशतपत्रनेत्र । तुह्मीवानरघेऊनसर्वत्र । लंकेप्रतिजाईंजे ८४ सुमुहूर्तपाहूंनिसत्वर । धरावेंविभीषणावरीछत्र । देवआणिराजेबंदींचेसमग्र । सन्मानेंमुक्तकरावे ८५ बहुतांचियावस्तुहिरुनीं । रावणेंठेविल्यालंकाभुवनीं । ज्यांचीवस्तूत्यांलागुनी । देऊनिसुखीकरावें ८६ ऐसीआज्ञाहोतांसत्वर । चालिलेसुग्रीवसौमित्र । विभीषणनमस्कार । घालीसाष्टांगरामातें ८७ श्रीरामदेतआशीर्वचन । जैसाबळीध्रुवउपमन्य । त्यांचेपंक्तींतूंविभीषण । चिरंजीवसुखीराहें ८८ आज्ञाघेऊनितेअवसरीं प्रवेशलेलंकेभीतरीं । मुहूर्तपाहूनझडकरीं । सर्वसामग्रीसिद्धकेली ८९ वेदघोषमंत्रेंकरून । राज्यींबैसविलाविभीषण । दिव्यछत्रेंवरीधरून । सोहळाबहुतकेलाहो ९० वस्त्रेंभूषणेंदेऊन । गौरविलेसुग्रीवलक्ष्मण । यावरीसकळवानरसैन्य । वस्त्राभरणेंगौरविलें ९१ मगलंकेचीरचना दाविलीसुग्रीवलक्ष्मणा । पाहतांधणीनपुरेमना । आनंदफारजाहला ९२ आज्ञामागोनिविभीषणासी । परतोनिआलेसुवेळेसी । झालेंवर्तमानरामा सी । सुग्रीवसांगेतेधवां ९३ तोंइंद्रआणिब्रह्मारुद्र । तेहतीसकोटीदेवसमग्र । दृष्टींपाहावयारघुवीर । सुवेळाचळींउतरले ९४ अष्टवसुएकादशरुद्र । मरुद्गणादिद्वादशमित्र । गणगंधर्वयक्षकिन्नर । सिद्धचारणउतरले ९५ अष्टनायिकाअष्टदिग्पाळ । अठ्यायशींसहस्त्रऋषिमंडळ । छपन्नदेशींचेभू पाळ । रामदर्शनापातले ९६ सप्तद्वीपनवखंडींचेजन । पाताळवासीकाद्रवेयगण । उपदेवादिसंपूर्ण । सुवेळेसीपातले ९७ असंख्यवाद्यांचाग जर । दिशादणाणितीसमग्र । असोसुवेळेसीसुरेश्वर । चहूंकडूनमिळाले ९८ देवभारींमुख्यतिघेजण । ब्रह्माआणिइंद्रईशान । परीकोणींकैंसार घुनंदन । देखिलातेंसांगतों १९९ दृष्टींदेखतांरघुवीर । मनांतभावीअपर्णावर । माझेंहृदयींहासीतावर । नामेंशीतळझालोंमी २०० त्यावरी सत्यलोकनाथ । तेणेंदेखूनिरावणांतक । त्यासभासलाजनक । क्षीराब्धिवासीजगदात्मा १ इंद्रासिवाटलेंतेअवसरीं । पाठिराखाआमचाकैवारी ।

१ कमलनेत्र रामचंद्र. २ लक्ष्मण. ३ तृप्तता. ४ शंकर. ५ द्रोण, प्राण. ध्रुव. अर्क. अग्नि. दोष. वसु. विभावसु. ६ बारा सूर्य. ७ सर्प. ८ भावना करी.

ऋषिभावितीअंतरीं । आराध्यदैवतआमचें २ कोटीकंदर्पांचाजनिता । ऐशासुरांगनाभावितीसमस्ता । पूर्णब्रह्मसनातनभक्तां । भासलेंसेतेकाळीं ३ असोसदाशिवदेखोनी । श्रीरामआनंदलामनीं । आसनसोडूनिचापपाणी । सामोरापुढेंधांवत ४ त्रिपुरारीच्याचरणावरी । नमनकरीरावणारी शिवेंधरूनिवरच्यावरी । दढहृदयीं आलिंगिला ५ श्रीरामजीमूतनीळवर्ण । कर्पूरगौरत्रिलोचन । इंदुमंडळींमृगाचिन्ह । तैसेशोभलेतेकाळीं ६ क्षी राब्धिमाजीनीळवर्ण । शोभेजेवीआदिनारायण । जान्हवींजळींयमुनाजीवन । कृष्णवर्णमिसळलें ७ कींभक्तांचेसंपुष्टांत । शालिग्राममूर्त्तिशोभत । तै सेशिवआणिसीताकांत । शोभतेझालेतेसमयीं ८ सेवावयामकरंद । प्रीतीनेंसंघटेमिलिंद । तैसाशिवआनंदकंद । सीताजीवनेंआलिंगिला ९ तेएक असतीदोघेजण । शिवविष्णुनामेंचिभिन्न । अभेदनामनिर्गुण । तेथिंचेकोंभदिसतीहे १० असोतयावरीकमर्लासन । देताझालाआलिंगन । मा झापिताहानारायण । ह्मणूनिहृदयींधरियेला ११ याउपरीदशशतनेत्र । घालीसाष्टांगनमस्कार । तप्तकांचनवर्णसुंदर । रघुवीरउठवीतया १२ सहस्रनेत्रासिचापपाणी । हृदयींधरीप्रीतीकरूनी । मगसुरांसकैवल्यदानी । भेटताझालाआनंदें १३ असंख्यस्वरूपेंदेखोन । देवऋषिथोरलहान । स मस्तांसींसीताजीवन । समसमानभेटत १४ असोसकळदेवांसमवेत । सभेसिबैसलारघुनाथ । एकाचिवाद्यांचागजरहोत । अष्टनायकानाचती १५ वीणाघेऊनसुंदर । गातीनारदतुंबर । सामगायनपरिकर । ऐकेरघुवीरनिवांत १६ रामविजयग्रंथपावन । युद्धकांडसंपलेंयेथून । उत्तरकांडरस गहन । आतांयेथूनिअवधारा १७ मुकुटावरीमणीशोभत । तेवींउत्तरकांडबहुतरसयुक्त । कींशिखरावरीझळकत । कळसजैसासतेज १८ भोजनां तींदध्योदन । कींश्रवणांतींमनन । तपाचेअंतींफळपूर्ण । उत्तरकांडरसिकतैसें १९ आरंभींकथासुरसतेथ । भेटतीलजानकीरघुनाथ । मूळजाईल हनुमंत । राघवआज्ञाघेऊनियां २० तीकथागोडबहुत । श्रवणकरोतश्रीरामभक्त । जेब्रह्मानंदेंडोलत । प्रेमळचित्तजयाचें २१ श्रीमद्भीमातटवि लासिया । श्रीब्रह्मानंदागुरुवर्या । श्रीधरशरणअनन्यपायां । कायावाचामनेसी २२ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मिकीनाटकाधार । सदापरिसोतपंडितचतुर । त्रयस्त्रिंशततमोऽध्यायगोडहा ॥ २२३ ॥ ॥ ७ ॥ ॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ अ० ३३ ॥ ओं० ॥ २२३ ॥

१ मदन. २ देवस्त्रिया. ३ मेघ. ४ शंकर. ५ भागीरथी. ६ पुष्परस. ७ भ्रमर. ८ ब्रह्मदेव. ९ बोलावणें.

श्रीगणेशायनमः । ।श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । जयजयजगद्वंद्यावेदसारा । प्रणवरूपाविश्वंभरा । करुणार्णवापरमउदारा। राघवेंद्राश्रीरामा १
मन्मथदहनहृदयरत्ना । चतुरास्यजनकामनरंजना । मंगळभगिनीमनमोहना । जगज्जीवनाभक्तवरदा २ लागतांप्रळयरूपआघात।शरीरप्रारब्धें
येतीअनर्थ । तेथेंखेदनमानीचित्त । सीतानाथाकरीऐसें ३ बोधबैसोहृदयींअनुदिनीं । शांतिक्षमादयाउन्मनी । याविलसोतमानससदनीं।ऐसेंकरीं
श्रीरामा ४ विविधआकृतिचराचररचना । तुझींस्वरूपेंभासोतनयना । वमनदेखोनिवीटयेमना । विषयींवासनानरमोतैसी ५ श्रवणकीर्तनादिनव
विधाभक्ती । सत्समागमघडोअहोरात्रीं।तुझींचरित्रेंलीलाऐकतांसीतापती। चित्तवृत्तिआनंदो ६ माझेंमनआणिबुद्धिपाहीं।वांकीनेपुरेंहोवोततवपायीं।
प्रेमपीतांबरसर्वदाही । जघनींविलसोतुझिया ७ माझेंस्थूळदेहलिंगदेखा । तुझेपायींविलसोतपादुका । ताटिकांतकाअयोध्यानायका । सर्वदाकरीं
ऐसेंपैं ८ माझियापंचप्राणांचामेळा । मुकुटकुंडलेंपदकमाळा । ब्रह्मानंदाभक्तवत्सला । सर्वकाळकरींऐसेंची ९ उत्तरकांडहेंचिभागीरथी । प्रवाहरू
पेंचालेसरस्वती । तरीदृष्टांतक्षेत्रींविराजती । एकाहूनिएकविशेष १० असोगतकथाध्यायींदशकंधर । वधोनिविजयीजाहलारघुवीर । याउपरीस
कळसुरवर । श्रीरामदर्शनापातले ११ सुरांचीदाटीजाहलीबहुत । मुकुटांसींमुकुटआदळत । रत्नेंझळकतीअमित। भगणाहूनितेजागळीं १२ गणगं
धर्वयक्षकिन्नर । सुरासुरनरवानर । सुवेळाचळींजाहलेएकत्र । गजरथोरहोतसे १३ तोंमारुतीचेमनांत । केव्हांआज्ञादेईलरघुनाथ । कींजानकी
आणावीत्वरित । रावणांतकवदेलकेव्हां १४ क्षणक्षणांवायुकुमर। विलोकीश्रीरामवदनचंद्र। तोंमारुतीसीअयोध्याविहार।आज्ञापिताजाहला १५ ह्म
णेप्राणसखयाहनुमंता । सत्वरजाऊनिगुणभरिता । जनकतनयासौभाग्यसरिता । भेटवींआतांमजलागीं १६ बिभीषणातेंसांगून । सीतेसिघाला
वेंमंगळस्नान । वस्त्रेंअलंकारदेऊन । सुखासनारूढआणिजे १७ ऐसेंऐकतांहनुमंत । निराळपंथेंचालिलात्वरित । जैसेंतान्हेंवत्सवनांत । शोधीत
जायधेनूसी १८ मानसाप्रतिमराळजात । कींजीवनशोधीतृषाक्रांत । कींझेंपावेविनतासुत । दर्शनाजातांइंदिरेच्या १९ तैसाचअशोकवनांत । प्रवे
शलातेव्हांहनुमंत । साष्टांगेंशीघ्रप्रणिपात । जानकीसघातला २० तान्हेंबाळचुकोनिगेलें । तेंजननीतेंअकस्मातभेटलें । कींहरपलेंरत्नसांपडलें।तै
सेंवाटलेंजानकीतें २१ कींप्राणजातांनिःशेष । वदनींघालिजेसुधारस । तेवींदेखतांमारुतीस । सीतापरमसंतोषली २२ करजोडोनिहनुमंत । सी
तेपुढेंउभाराहत । ह्मणेसुखीआहेरघुनाथ । सेनेसहीतसुवेळे २३ कंटकदशकंठवधून । राज्यींस्थापिलाबिभीषण । बंदीचेदेवसोडवून । भेटोंआले
रघूत्तमा २४ ऐसेंसांगतांहनुमंत । जगन्माताकायबोलत । बारेवचनेंतुझींगोडबहुत । अमृताहूनलागती २५ प्राणसखयातूंयथार्थ । मजलागींश्र

मलासिबहुत । तुझेउपकारअमित। अयोध्यानाथजाणतसे २६ षण्मासमीकंठिलेअद्भुत । आतांभेटवींश्रीरघुनाथ । ऐसेंऐकतांहनुमंत । विभीषण
सदनींप्रवेशला २७ सांगेसकळवर्तमान । सीतेसिकरवूनिमंगळस्नान । वस्त्रेंभूषणेंदेऊन । चालवेऊनिसुवेळे २८ ऐकोनिआनंदेविभीषण । मारुती
सीकरींधरून । प्रवेशलाअशोकवन । सीतादर्शनघ्यावया २९ चिरंजीवदोघेजण । रघुपतीचेप्रियप्राण ।जानकीजवळयेऊन । विभीषणेंलोटांगण
घातलें ३० जगन्माताबोलेवचन । जोंवरीशशीचंडकिरण। तोंवरीचिरंजीवहोऊन। राज्यकरींलंकेचें ३१ विभीषणजोडोनिकर। उभाराहेसीतेसमोर ।
जैसाअपर्णेजवळीकुमार । कींपरशधररेणुकेपुढें ३२ विभीषणह्मणेजगन्माते । प्रणवरूपिणीसद्गुणसरिते । अनादिसिद्धेअपरिमिते ।आदिमायेइंदिरे
३३ तुवांआदिपुरुषजागाकरून। अनंतब्रह्मांडेंरचिलींपूर्ण। ब्रह्माविष्णुउमारमण। तुझींबाळेंतिन्हीं ३४ उत्पत्तिस्थितिपालन। करविसीतिघांसिसांगू
न। इच्छापरततांपूर्ण। सवेंचगोळाकरिसीतूं ३५ तुझेंतुजचिसर्वठाउकें । नेणतपणधरिलेंकौतुकें । रावणेंतुजआणिलेंलंके । हेहीइच्छातुझीच ३६
बंदींचेसुटलेसुरवर । मारुतीसुग्रीवादिवानर । सर्वांसिझालाराममित्र । हाउपकारतुझाचीं ३७ आतांकरूनमंगळस्नान । वस्त्रेंभूषणेंलेवून । पाहाव
यारघुनंदन । सुवेळास्थळींचलावें ३८ जगन्माताबोलेवचन । श्रीरामेंनकरितांमंगळस्नान । म्यांआधींकरितांपूर्ण । वाटेदूषणपरमहें ३९ मारुतिह्मणे
जगन्माते । आज्ञादिधलीश्रीरघुनाथें । दुजेंविभीषणवचनातें । मानदिधलापाहिजे ४० अवश्यह्मणेजनकनंदिनी । तंवतेविभीषणाचीराणी । सक
ळउपचारघेउनी। अशोकवनापातली ४१ सरमात्रिजटादोघीजणी । सीतेच्याप्राणसांगातिणी । दोघींनींजानकीचीवेणी । उकलिलीतेधवां ४२
हनुमंतआणिविभीषण। बैसलेएकीकडेजाऊन। सरमेनेंजानकीचेंपूजन । आरंभिलेंस्वहस्तें ४३ उत्तमपट्टदुकूलआणुनी। सीतेसिदिधलीपडदणी ।
मणिमयचौकीघालुनी । पायधूतलेसरमेनें ४४ सुगंधतैलतेवेळीं । त्रिजटासीतेचेमस्तकींघाली । आशीर्वादवचनेंबोलिली । स्नेहआदरेंकरूनी
४५ अनंतकल्पपर्यंत । दोघेंनांदाआनंदभरित । मृगमदाचीउटीलावित । सरमाआपणस्वहस्तें ४६ मळीकाढितांह्मणेमाये । कृशझालीसजनक
तनये । असोउष्णोदकलवलाहें । सुगंधयुक्तआणिलें ४७ त्रिजटाउदकघालीसवेग । सरमाघांसीतिचेंअंग । चीरअलंकारसांग । विभीषणेंपाठ
विले ४८ प्रळयविजेहूनितेजागळी । चीरनेसलीजनकबाळी । दिव्यअलंकारलेइली । जेत्रिभुवनींदुर्लभ ४९ सूर्यमंडळतुल्यसुरेखें । कर्णींझळ
कतीताटंकें । सर्वअलंकारांचेंतेजफांके । दशदिशांतेकाळीं ५० कुंकुममळवटलाविलाभाळीं । मध्येंसुवासकस्तुरीरेखिली । दिव्यसुंगंधतेकाळीं ।
सर्वांगींचर्चीत्रिजटा ५१ दिव्यफळांनींतेकाळीं । जानकीचीवोंटीभरिली । सरमाह्मणेमुखींघाली । मायेफळएकआतां ५२ मगतेंअमृतफळ

फळसुस्वाद । सुंदरआणिबहुसुगंध । विभीषणमारुतीसीप्रसाद । जानकीनेंदिधला ५३ सरमाआणित्रिजटेप्रती । फळेंदिधलींपरमप्रीतीं । मगए
कफळघेऊनिहातीं । वदनींघालीजानकी ५४ सर्वेचिप्रक्षाळिलेंवदन । तोंजवळीआलाविभीषण । दिव्यमणिमाळाआणून । जानकीपुढेंठेविली ५५
त्रिभुवनमोलएकएकमणी । रावणेंठेविलेहोतेकोशसदनीं । तेदेतांप्रीतीकरूनी । गळांघालीजानकी ५६ तोंलंकेचेंसकळदळ । सिद्धझालेंतत्काळ । अ
ठराअक्षौहिणीवाद्येंप्रबळ । वाजोंलागलींतेधवां ५७ रत्नजडितशिबिकाआणूनी । सीतेपुढेंठेविलीतेक्षणीं । विभीषणमारुतिलागेचरणीं । सुखासनींबैसावें
५८ सरमात्रिजटायाचेकंठीं । जानकीयालीदृढमिठी । ह्मणेंप्राणसख्यानोदृष्टीं । तुह्मांसिकधींमीदेखेन ५९ सरमात्रिजटेचेनयनीं । अश्रुआलेतयेक्ष
णीं । रुदनकरितीस्फुंदस्फुंदोनी । चरणींमिठीघालिती ६० मगकुरळकेशेंकरून । झाडिलेजानकीचेचरण । सीतापालखींतबैसतांजाण । सद्गदहोऊ
निबोलतीत्या ६१ प्राणसखेजनकनंदिनी । आह्मांसिनविसरावेंमनीं । जानकीह्मणेमायबहिणी । तुमचेउपकारनविसरेंमी ६२ तोंशिबिकेवरी
आवरण । विभीषणेंघातलेंपूर्ण । जैसापरीक्षकादिव्यरत्न । पेटीमाजीरक्षीतसे ६३ कींहृदयींचेंज्ञानसत । बाहेरनदावितीलोकांत । कींधना
ढ्यआच्छादित । निजधनआपुलें ६४ अतिउल्हासेंवायुसुत । सव्यभागेंजवळीचालत । वामभागींलंकानाथ । विभीषणजायत्वरेनें ६५
वहनवाहकबहुतवेगें । चालिलेसुवेळेचेमार्गे । विभीषणहनुमंतदोघे । हातलावितीवहनासी ६६ सेनाचालिलीअद्भुत । पुढेंवेत्रपाणीधांवत । वाद्यां
चागजरहोत । दाटीबहुतजाहली ६७ स्कंदआणिगजवदन । अपर्णेजवळीदोघेजण । तैसेमारुतिआणिविभीषण । प्रेमरंगेंधांवती ६८ प्रवेशले
रामसेनेंतसत्वर । तोंझालाएकचिगजर । पाहावयाधांवतीवानर । त्यांतेंवेत्रधारमारिती ६९ लंकापतीसीअयोध्याविहारी । सांगूनिपाठवीतेअवस
रीं । आपुलेवेत्रधारआवरीं । वानरांतेंमारितीजे ७० यासीतेकारणेकष्ट । वानरेंकेलेउत्कृष्ट । वहनउघडोनिस्पष्ट । सीताकपीतेंपाहूंद्या ७१ जवळीअ
सतांप्राणनाथ । स्त्रीउघडीसर्वजनांत । वागतांदोषयथार्थ । सर्वथानाहींतियेसीं ७२ ऐसीआज्ञाहोतांतेकाळीं । शिबिकाउतरिलीभूमंडळीं । आवरणका
ढितांजनकबाळी । सर्वांनींदेखिलीएकदां ७३ वहनाबाहेरनिघोनी । त्रिभुवनपतीचीराणी । उघडलीजैसीरत्नखाणी । वैदेहीउभीराहेतैसी ७४ पा
हतांजियेचेमुखकमळा । लोपतीकोटीमृगांककळा । कींलावण्यसागरींचाउमाळा । रूपाआलातेठायीं ७५ यापरीतेजनकनंदिनी । आदिमायाविश्व
खाणीं । पाहतेझालेभक्तशिरोमणी । जेकांअवतारदेवांचे ७६ जानकीदेखतांसाचार । देवगणगंधर्वअसुर । मानसींविकल्पसाचार । करितेझालेतेध
वां ७७ हीस्वरूपेंअतिसुंदर । असतांदुरात्मादशकंधर । षण्मासपर्यंतदुराचार । उगाकैसाअसेल ७८ तोजगदात्मारघुवीर । जाणेंसर्वांचेंअंतर ।

जानकीप्रतिउत्तर । कायबोलताजाहला ७९ वाद्येंवाजतांराहिलीं । तटस्थसुरासुरमंडळी । रीसवानरसकळी । निवांतरूपऐकती ८० व्यंकटा
भ्रुकुटीकरूनिक्रूर । सीतेसिविलोकीरघुवीर । ह्मणेआपलाविचार । पाहेंसत्वरयेथोनी ८१ तुजघेऊनिगेलाअसुर । हाअपवादवाढलाथोर । तोनिरसाव
यासमग्र । सोडवूनतुजआणिलें ८२ उतरलाउरावरीलपाषाण । औषधेंगुल्मरोगजायदारुण । कींजन्मांधासियेतीनयन । तेवीआतांसुखवाटे ८३
तुजआह्मींसोडवून । साचकेलेंआपुलेंवचन । आतांकरींवेगेंगमन । मनाआवडेतिकडेपैं ८४ मीसर्वसंगसोडुनी । उदासविचरेनकाननीं । कामकामना
कांहींमनीं । उरलीनाहींआमुच्या ८५ माझीवार्तासोडूनिसमस्त । मनाआवडेतोधरींपंथ । अथवाभलतानृपनाथ । वरींतुजआवडेतो ८६ उभें
राहूनव्यर्थकायी । विचरेंतूंभलतेठायीं । मोकळयातुजदिशादाही । केल्याआह्मीयेकाळीं ८७ मजकैकेयीनेंघातलेंबाहेर । नाहींसिंहासनआतपत्र । से
उंनियांघोरकांतार । वचनसाचारसत्यकेलें ८८ भक्षावयानमिळेअन्न । राहेंकंदमुळेंसेऊन । वल्कलेंपरिधानकरून । तृणासनींनिजलोंअसें ८९
याकरितांसीतेपाहीं । आमुचेसंगतींसुखनाहीं । तरीतूंभलत्यापंथेंजाईं । व्यर्थकायराहुनीं ९० सकळउपाधीटांकून । राहिलोंनीरंजनींयेऊन । आह्मां
नावडेदुजेपण । प्रपंचवासनानसेची ९१ ऐसेंबोलतांरघुनाथ । सीतेसिवाटलाकल्पांत । कींशब्दरूपेंशस्त्रघात । अकस्मातजेवीखोंचे ९२ शब्द
नव्हेतसौदामिनी । आंगावरीपडेतेक्षणीं । कींशब्दशस्त्रेंकरुनी । तोडिलेंवाटेशरीर ९३ परमगहिवरेंदाटोनी । बोलेतेव्हांमंगळभगिनी । अग्नींतकर
पेकमळणी । तैसेंतेजउतरलें ९४ नयनींलोटल्याअश्रुधारा । ह्मणेजगद्वंद्याश्रीरामचंद्रा । आनंदकंदागुणसमुद्रा । करामाझावधआतां ९५ षणमा
सकष्टीहोऊन । आजिदृष्टींदेखिलेचरण । तोंपूर्वकर्ममाझेंगहन । आडवेंविघ्नहेंआलें ९६ आनंदाचाउगवलादिन । ह्मणोनिवाटलेंसमाधान । परि
कर्मांचेंघोरविंदाण । पुढेंठाकेयेउनी ९७ कामधेनूचीकाढितांधार । तोंरूचिकेंभरलेंपात्र । अमृततार्टीघातलाकर । तोंविषदुर्धरभरलेंअसे ९८ प
रिसाच्यादेवासीयेऊन । लोहोभक्तभेटलापूर्ण । परीतोनव्हेकदासुवर्ण । कर्मगहनपूर्वीचें ९९ मृगेंद्रेंज्यासिकरींधरिलें । त्यासिजंबुकेंयेऊनफाडिलें
सुपर्णाश्रमींप्राणीराहिले । त्यांसिडंखिलेंविखारीं १०० याचकलवलाहेंधांवला । कल्पतरूखालींआला । त्यासितेणेंमारकेला । शुष्ककाष्ठघेउनी
१ व्याघ्रामारूनलवलाहीं । धन्यानेंसोडविलीगायी । मगकाष्ठप्रहारेंतीसपाहीं । कायव्यर्थमारावें २ गंगापुरींबुडतांप्राणी । कडेसिकाढिलाधांवो
नी । मगत्यासिशस्त्रेंकरुनी । कांहोव्यर्थवधावें ३ भागीरथीभरूनिलवलाहीं । सागराशरणगेलीपाहीं । तोजरीह्मणेपोटीनराहीं । तरीकायगतीति
येसी ४ जलचरांठावनेदीनीर । तरीकायत्याणींकरावाविचार । पक्षियांवरीकोपेअंबर । त्यांचीगतीकायसी ५ जळत्यागृहांतूनिकाढिलें । सर्वेंच

वणव्यांतटांकिलें । करुणेचेसागरासआलें । क्रूरत्वभरतेंनवलहें ६ मातेनेंबाळकासदिधलेंविष । पित्यानेंमारिलेंपुत्रास । धन्यानेंदंडिलेंदासीस । ते
थेंयत्नकायसा ७ कांसेसिलाविलेंकृपाकरून । मध्येंचदिधलेंसोडून । तेणेंकोणासिजावेंशरण । तयावेगळेंसांगपां ८ अन्नार्थीपात्रींबैसले । तेदात
यानेंदवडिले । त्यांचेंबळकांहींचनचाले । तैसेंझालेंयेथेंहें ९ सूर्यकोपलाकिरणावरी । समुद्रलहरीवरीदावाकरी । अमृतमधुरताबाहेरी । आपली
घालूंइच्छीतसे ११० आपुल्याशाखेसींअबोला । कल्पद्रुमेंजैसाधरिला । चंद्रेंकळात्यागमांडिला । मेरुकोपलाशिखरावरी ११ जैसीगंगापवन ।
कींसर्वदाशुचीजैसाअन्न । यांसनठेवावेंदूषण । हेतोंशुचिष्मंतनिजांगें १२ मजदशकंधरगेलाघेऊन । मोहरीहूनअन्यायसान । मेरूइतकादंडपूर्ण ।
समर्थेंहाआरंभिला १३ वातेंकांपेकमळणी । तीवरीवज्रटांकीउचलोनी । कींअन्यायनसतांकुरंगिणी । वनींव्यर्थमारिजेकां १४ जैसेंशुद्धसुवर्ण । अ
ग्निसंगेंकळेपूर्ण । तैसेंआतांदिव्यघेईन । सर्वांदेखतांयेथेंची १५ नयनींवाहतीअश्रुपात । सीतावानरांसिआज्ञापित । ह्मणेकुंडकरूनअद्भुत । अ
ग्निसत्वरचेतवा १६ तंवकेलेंअद्भुतकुंड । काष्ठेंयातलींउदंड । अग्निज्वाळामाजल्याप्रचंड । निराळग्रासूंधांवती १७ जगन्माताबोलेवचन । जरीमीशु
द्धअसेन । तरीयेईनपरतोन । चरणपाहावयास्वामीचे १८ जरीमीदोषीअसेन । तरीभस्मकरीलअग्न । ऐसेंतेंव्हांबोलून । सरसावलीजगन्माता ।
१९ देववानरसुरेश्वर । अवघेझालेचिंतातुर । ह्मणतीहाअनर्थथोर । एकाएकींमांडला १२० असोरणमाजलेंदेखोनी । वीरनिर्भयअंतःकरणीं । तै
सीनिर्भयविदेहनंदिनी । अग्नीसनमीतेधवां २१ कुंडासिकरूनिप्रदक्षिणा । दृष्टीभरीपाहिलेंरघुनंदना । कंठींचासुमनहारकाढोनिजाणा ।अग्नीवरीटांकि
ला २२ सत्यजयसत्यह्मणोनी । त्रिवारगर्जेजगज्जननी । अग्निकुंडींतयेक्षणीं । उडीघालीअकस्मात २३ मंगळजननीहृदयरत्न । अग्निकुंडामाजीपड
तांजाण । कन्यागांजिलीह्मणून । पृथ्वीकांपेथरथरां २४ झालीएकचिआरोळी । शोकार्णवींपडिलीमंडळी । सकळसुरेश्वरतेकाळीं । प्रळयकाळभा
विती २५ दशदिशांदाटलाधूर । कढोंलागलेसप्तसमुद्र । वैकुंठकैलासपदेंसमग्र । डोलोंलागलींतेधवां २६ थरथरांकांपेअंबर । नक्षत्रेंरिचवतीअ
पार । सौमित्रमारुतिआणिवानर । नेत्रोदकेंटांकिती २७ ह्मणतीअग्निमुखींहूनिपुढती । कैंचीदेखोंसीतासती । बोलतीहेकर्मगती । परमदुर्धरवाट
तसे २८ एकघटिकापर्यंत । अग्निमाजीजानकीगुप्त । तोंमस्तकींपुष्पेंघवघवित । अकस्मातनिघाली २९ पहिल्यारूपाहूनिआगळें । शतगुणींरू
पजाहलें । प्रभेनेंभूमंडळभरिलें । आश्चर्यजाहलेंतेवेळीं १३० मागेंअरण्यकांडींकथा । रेखेंतजाहलीगुप्तसीता । तेंस्वरूपप्रकटलेंआतां । मिषदि
व्याचेंकरूनी ३१ सीतास्वरूपजाहलाहोताअग्न । तेणेंराक्षसवनजाळून । आपल्यास्वरूपेंयेऊन । दिव्यमिषेंमिळाला ३२ सीतारामाचीशक्ती ।

तीभेटीचनाहींलंकेप्रती । हेखूणसंतजाणती। जेवेदांतीसज्ञानी ३३ असोजानकीदेखतांसाचार। झालाएकचिजयजयकार । अठरापद्मेंवानरसमग्र । नमस्कारघालिती ३४ मगपुष्पांचेसंभार । सीतेवरीटांकितीसुरवर । ह्मणतीसीतासतीपवित्र । सर्वत्रदेवनमस्कारिती ३५ सौमित्रसुग्रीवविभीष ण । जानकीसघालितीलोटांगण । हनुमंतेंनमूनचरण । आनंदेंपूर्णनाचतसे ३६ असोश्रीरामाकडेसीतासती । चालिलीतेव्हांहंसगती । मगउठो नियांरघुपती । उभाठाकलातेवेळे ३७ श्रीराममुखविलोकून । सीताकरीहास्यवदन । धांवूनिदृढधरिलेचरण । जगद्गुरूचेतेकाळीं ३८ मगजानकी सउठवोनी । क्षेमदेतकोदंडपाणी । वामांकावरीघउनी। रघुनाथतेव्हांबैसला ३९ नवमेघरंगरघुवीरविराजत । जानकीविद्युल्लतातळपत । तयांसि देखोनिसमस्त । जयजयकारकरितीहो ५४० सुरासुरांचींवाद्येंसकळीं । महागजरेंगर्जोंलागलीं । आज्ञाध्यावयातेकाळीं । देवउदीतजाहले ४१ सदाशिवह्मणेरघूत्तमा । पुराणपुरुषापूर्णब्रह्मा । आनंदकंदानिजसुखधामा । पूर्णकामासर्वेशा १४२ रविकुळभूषणाजलजनेत्रा । जनकजामातानी ळगात्रा । सच्चिदानंदासुहास्यवक्त्रा । धन्यलीलादाविली १४३ चराचरजीवपालका । अनंतब्रह्मांडनायका । तूंकृपाकटाक्षेंसकळिकां । निजभक्तां सीजीवविसी ४४ युगायुगींधरूनिअवतार । वधिलेपापीदुष्टअसुर । परिहेअवतारींचेंचरित्र । अगाधदाविलेंश्रीरामा ४५ माझ्यामनींचेआर्तबहु त । केव्हांमीदेखेनरघुनाथ । तुझेनामेंसकळशांत । हळाहळझालेंसे ४६ आतांसीतेसहितश्रीरामचंद्रा । सत्वरजावेंअयोध्यापुरा । ऐसेंबोलतांकर्पू रगौरा । रामचंद्रकायबोलत ४७ ह्मणेमाझेंतूंआराध्यदैवत । अनादिसिद्धकैलासनाथ । विश्वंभरतूंविश्वातीत । करणीअद्भुतदाविसी ४८ ब्रह्मांडजाळी हळाहळ । तेंतुवांकंठींधरिलेंतत्काळ । लोकसुखीरक्षिलेसकळ । परमदयाळूतूंहोसी ४९ माझीस्तुतिमांडिलीदयाळा । मीकायआहेंतुजवेगळा । ऐसें श्रीरामवदतांतेवेळां । बोलताझालाकमलोद्भव ५० ह्मणेक्षीराब्धिवासियानारायणा । मधुकैटभारीभवभंजना । अनंतवेषाअनंतवदना । अनंतनयना अनंता ५१ परमात्मयातूंमाझातात । नाभिकमळींउपजलोंयथार्थ । सृष्टिरचिलीहेसमस्त । तवआज्ञेकरूनी ५२ सृष्टीमाजीमाजलेअसुर । रावण कुंभकर्णक्रूर । मगतुवांधरिलाअवतार । अयोध्येमाजीराघवा ५३ पितृआज्ञेचेंकरूनमिष । काननाआलासिपरमपुरुष । सीतेचेमिमित्तेंराक्षसांस । व धोनिभक्तरक्षिले ५४ राघवह्मणेकमलासना । विश्वजनकावेदपालना । सकळललाटपटलेखना । जाणसीखुणासर्वहीतूं ५५ तुझांआह्मांसिवेगळे पण । मूळापासूनिनाहींपूर्ण । परस्परेंठाउकीखुण । तरीबाहेरस्तुतिकिमर्थ ५६ पौर्णिमेसउचंबळेसमुद्र । तैसाबोलताझालादेवेंद्र । हेअयोध्यानाथ जगदोद्धार । ब्रह्मानंदापरात्परा ५७ अह्मांवरीउपकारकेलेबहुत । तेंवेदांसहिनोहेगणित । बंधछेदकतूंरघुनाथ । अपरमितगुणतुझे ५८ तरीमा

झियामनींचीआर्त । तेतूंपूर्णकरींरघुनाथ । कांहींआज्ञामजत्वरित । केलीपाहिजेयेकाळीं १५९ मीदासानुदासअनन्य । मजसांगावेंकांहींकारण ।
तुझीआज्ञामस्तकींवंदीन । मुकुटमणीजयापरी १६० ऐसेंबोलतांदेवेंद्र । परमसुखावेरामचंद्र । ह्मणेसहस्राक्षातूंबहुचतुर । समयींउपकारकेलाकीं
१६१ रणींपाठविलादिव्यरथ । तोआह्मांसिउपकारबहुत । आह्मीजयपावलोंअद्भुत । त्याचरथींबैसोनी १६२ इंद्रह्मणेश्रीरामा । भक्तका
मकल्पद्रुमा । तुझियाप्रसादेंमंगळधामा । आह्मीस्वपदींसुखीअसों ६३ रथपाठविलासमयासी । ह्मणूनिउपकारमानिसी । चकोरांनींकायचंद्रा
सी । तृप्तकरावेंकवण्यागुणें ६४ चातकेंतृप्तकेलाजलधर । चक्रवाकांनींदिवाकर । समुद्राचीतृप्तिथिल्लर । कवण्यागुणेंकरीलपैं ६५ वैरागरापुढेंठे
विलीगार । क्षीराब्धिपुढेंठेविलेंतक्र । परमधनाढ्यकुबेर । त्यासिकवडीसमर्पिली ६६ आतांअसोहेशब्दरचना । मजकांहींतरीद्यावीआज्ञा । ह्मणो
निइंद्रलागलाचरणा । प्रेमादरेंकरूनियां ६७ मगइंद्रासतेव्हांउठवून । बोलेश्रीरामचंद्रसुहास्यवदन । जेणेंकरूनियांकर्ण । सकळांचेतृप्तहोती ६८
ह्मणेवेदशास्त्रबहुत । धर्माधर्मींनिवडितीपंडित । परीएकचिगोष्टींतसमस्त । पापपुण्यनिवडिलें ६९ परोपकारपुंण्यअद्भुत । परपीडापापयथार्थ ।
शोधितांवेदशास्त्रेंबहुत । श्रुतिइत्यर्थहाचिपैं ७० तरीऐसाजोपरोपकार । वानरांघडलाअपार । मजसाह्यहोऊनिसमग्र । यशबहुतजोडलें ७१
समरांगणींदिधलेप्राण । असंख्यपडिलेप्रेतेंहोऊन । परीत्यांचींकुटुंबेंआप्तजन । शोकार्णवींबुडतील ७२ तरीतेमाझेसखेवानर । पुनःजीववावेसम
ग्र। कोणाचेआंगावरीअणुमात्र । घायक्षतदिसोंनये ७३ अवघेआरोग्यहोऊन । सुखीअसोतबहुतदिन । त्यांचेंजेंजेंवसतेंवन । सदासुफळअसावें ७४
तरीहीचआज्ञासत्वरा । सिद्धीपाववींअमरेश्वरा । ऐसेंबोलतांपरात्परसोयरा । आनंदझालासमस्तांसी ७५ इंद्रेंचरणींमाथाठेवून । ह्मणेजीव
वितोंनलागतांक्षण । याउपरीसीतारमण । आज्ञादेतसकळांसी ७६ देवबैसोनिचालिलेविमानीं । धडकतीदुंदुभींच्याध्वनी । दिव्यघंटावाजतीगग
नीं । नादेंअंबरकोंदलें ७७ शक्राचीआज्ञाहोतांसत्वरीं । पीयूषमेघवोळलाअंबरीं । गंभीरगर्जनातेअवसरीं । करिताझालाबलाहक ७८ पश्चिमे
सढगउचलत । त्यांतसौदामिनीलखलखित । रणमंडळलक्षोनिसमस्त । पीयूषवृष्टीजाहली ७९ घटिकाएकपर्यंत । अपारवर्षलेंअमृत । वानर
उठिलेसमस्त । निद्रिस्थजागेहोतजैसे ८० श्रीरामापुढेंजाऊन । समस्तघालितीलोटांगण । पर्जन्यगेलाउघडोन । सहस्रनयनआज्ञेनें ८१
आक्षेपघेतीश्रोतेचतुर । वानरआणिरजनीचर । एकेठायींपडिलेसमग्र । तरीअसुरकांनऊठती ८२ वक्ताह्मणेनाटकरामायण । तेथेंहीकथाआहेसंपू
र्ण । स्वयेंबोलिलाअंजनीनंदन । अप्रमाणकोणह्मणे ८३ तेंसमस्तपाहूनिसाचार । प्रत्युत्तरदेतश्रीधर । तरीशंकरेंभूतावळीसमग्र । आधींचहोत्यापाठ

विल्या ८४ त्यांसिआज्ञापिलेंशंकरें । नभक्षावींकपींचींशरीरें । राक्षसांचींचकलेवरें । तुह्मींनिवडूनभक्षिजे ८५ खोट्यांतूनिखरेंनिवडे । कींतांदुळांतून
काढिजेखडे । हिऱ्यांमधूनिगारतुकडे । परीक्षकनिवडिती ८६ तैसीभूतावळीनिश्चिती । राक्षसकलेवरेंभक्षिती । सागरींभिरकाविल्याअस्थी । नउरे
क्षितींकांहींच ८७ पीयूषवृष्टिहोतांअपार । उठिलेअवघेहीवानर । ऐसेंऐकतांप्रत्युतर । श्रोतेपंडितसुखावती ८८ ह्मणतीवक्ताहोयचतुर । शो
धकदृष्टीतुझीअपार । संशयनिरसलासमग्र । जैसाअंधारसूर्योदयीं ८९ ग्रासामाजीहरळकाढून । पुढेंचालेजैसेंभोजन । तैसासंशयनिरसलापूर्ण ।
अनुसंधानऐकापुढें ९० रघुनाथह्मणेविभीषणा । आतांआह्मांसिद्यावीआज्ञा । ऐसेंबोलतांरामराणा । विभीषणदाटलागहिंवरें ९१ तोनूतनलंका
नाथ । स्फुंदस्फुंदोनितेव्हांरडत । श्रीरामचरणींमिठीघालित । पदेंक्षाळीतनयनोदकें ९२ ह्मणेलंकाराज्यमजदेऊन । श्रीरामातूंजातोसिटाकून । अ
नंतराज्येंओंवाळून । चरणांवरूनितुझियाटांकावीं ९३ तुझियाभजनावरून । मोक्षसांडावाओंवाळून । तेथेंलंकेचेंराज्यतृण । मजकायहेंकरावें ९४
मीअयोध्येसियेईनसांगातें । सेवाकरूनराहीनतेथें । ऐसेंबोलतांरघुनाथें । हृदयींधरिलेंविभीषणा ९५ प्राणसखयातुझेहृदयीं । मीवसतोंसर्वदाही ।
परितूंअयोध्येसियेईं । समागमेंबोळवित ९६ अयोध्येचासोहळापाहून । तूंआणिमित्रनंदन । मगतेथोनिपरतोनिदोघेजण । जावेंआपुल्यानगरासी ।
९७ परमसंतोषेविभीषण । आणविलेंपुष्पकविमान । अत्यंतविशाळगुणगहन । आज्ञापाळीतप्रभूची ९८ चंद्राहूनिप्रभाअत्यंत । मुख्यसिंहासन
विराजित । दिव्यनवरत्नमंडित । झालरशोभतमुक्तांची ९९ पृथ्वीसांठवेसंपूर्ण । ऐसेंक्षणेंहोयविस्तीर्ण । इच्छाहोतांचिसंकोचून । धाकुटेंहोयतेव्हां
ची २०० ऐसेंविमानतेकाळीं । सेवकेंआणिलेंरामाजवळी । निघावयाचीतयारीझाली । नगरलोकपाहती १ सीतेचीअंगुलीधरून । दिव्यहिऱ्या
चेंसोपान । त्याचिमार्गेंरघुनंदन । वरीचढलातेकाळीं २ सीतेसमवेतरघुनाथ । मुख्यसिंहासनींबैसत । अष्टादशपद्मेंसमस्त । वानरवरीबैसले ३
छप्पन्नकोटीगोलांगुळ । बहात्तरकोटीरीसंसकळ । विभीषणाचेंअसंख्यदळ । वरीआरूढतेधवां ४ अष्टादशमहाअक्षौहिणी । लागलीवाद्यांचीध्वनी ।
अष्टजुत्पतीअष्टकोणीं । राघवापासींउभेराहिले ५ मृगांकवर्णचामरेंघेऊन । अंगदआणिलक्ष्मण वरीविराजतीदोघेजण । समसमानदोहींकडे ६
असोआतांरघुनाथ । लक्षोनियांअयोध्येचापंथ । राजाधिराजसीताकांत । जाताझालातेकाळीं ७ रामविजयरत्नखाणी । उत्तरकांडमुकुटमणी । पुढें
श्रवणकरावेंसज्जनीं । ब्रह्मानंदेंकरूनियां ८ ब्रह्मानंदयतीश्वर । पूर्णज्ञानाचासमुद्र । त्याचेचरणाब्जींभ्रमरश्रीधर । अभंगरुंजीघालित ९ स्वस्ति
श्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मिकीनाटकाधार । सदापरिसोतपंडितचतुर । चतुस्त्रिंशतितमोध्यायगोडहा २१० । अ० ३४ । ओ० २१० । छ ।

श्रीगणेशायनमः । । श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । देहबुद्धीलंकाघेऊन । मारिलाअहंकृतीरावण । स्थापूनिभावविभीषण । छत्रधरिलेंतयावरी १ ज्ञा
नकळाजनकतनया । भेटलीयेऊनरघुराया । मगस्वानंदविमानींबैसोनियां । आत्मारामचालिला २ लागलावाद्यांचागजर । राघवकीर्तिगातीवानर ।
योजनेंदोनसहस्त्र । विमानतेव्हांउंचावलें ३ जैसापौर्णिमेचारोहिणीवरं । पश्चिमेसजायसत्वर । कींसमुद्रींजाहाजथोर । लोटतसमीरवेगेंसी ४ तै
सेंवेगींजातविमान । घंटावाजतीघणघण । दिव्यमणिमयप्रभाघन । उत्तरपंथेंजातसे ५ ऐसाजातसेरविकुळमंडण । जोअसुरकुळकाननखंडण । वा
मांगींअवनिजादिव्यरत्न । सौदामिनीमेघींजैसी ६ तीप्रतिबोलेरघुनंदन । कांतेखालींपाहेंविलोकून । लंकादिसेदैदीप्यमान । हेमवर्णविशाळ ७ पै
लपाहेंनिकुंबिळा । येथेंशक्रजितसौमित्रेंमारिला । आह्मींराहिलोंहोतोंतेचसुबेळा । प्राणवल्लभेविलोकीं ८ पैलपाहेंरणमंडळ । येथेंयुद्धझालेंतुंबळ । आ
टिलेराक्षससकळ । माहावीरपराक्रमी ९ वज्रदंष्ट्रीविरूपाक्षअकंपन । मत्तमहामत्तप्रहस्तप्रधान । भयानकविशाळकुंभकर्ण । येथेंचआटलेइंदुवदनें
१० देवांतकनरांतकमहोदर । कुंभनिकुंभत्रिशिराअसुर । येथेंआटलेसमग्र । जनकतनयेपाहेंपां ११ युद्धकरूनिसप्तदिन । येथेंचपडिलादशव
दन । हासमुद्रपाहेंविलोकून । सेतुनळेंबांधिला १२ ऐलउत्तरतीरींदर्भशयनं । येथेंसमुद्रभेटलायेऊन । पुढेंमलयाचलविंध्याद्रिपूर्ण । किष्किंधापा
हेंराजसे १३ पैलतेंपंपासरोवर । येथेंभेटलावायुकुमर । येस्थळींवाळीवीर । सुग्रीवकैवारेंवधियेला १४ येथेंशबरीचाकेलाउद्धार । येथेंकबंधवधिला
साचार । पैलदिसेगौतमीतीर । खरदूषणवधिलेयेथें १५पैलपंचवटीआहेगजगमनें । तेथोनितुजनेलेंद्विपंचवेंदनें । ऋषींचेंआश्रमपद्मनयने । पाहेंगौ
तमीतटींहे १६ शरभंगसुतीक्ष्णमंदकर्णी । हासिंहाद्रीराजसेपाहेंनयनीं । येथेंदत्तात्रेयअनुसूयाअत्रिमुनी । भेटलींहोतींपाहेंपां १७हाअगस्तीचाआ
श्रमपाहें । पुढेंचित्रकूटदिसताहे । भारद्वाजआश्रमजनकतनये । पुढेंतीर्थराजप्रयाग १८ पैलनंदिग्रामदिसत । येथेंप्राणसखाआहेभरत । पैलशृंगवे
रींमहाभक्त । किरातगुहकवसतसे १९ खंजनाक्षीपाहेंसादर । शरयूतीरींअयोध्यानगर । घवघवीतपरमसुंदर । वास्तव्यस्थळआमुचें २० पर
मस्नेहादरेंकरूनी । जानकीसदावीचापपाणी । तोंअगस्तीचेआश्रमींमोक्षदानी । क्षणेकराहूंइच्छित २१ श्रीरामेंआज्ञापितांविमान । खालींआलेंन
लगतांक्षण । पद्मजताततेव्हांवचन । पद्माक्षीप्रतिबोलत २२ आजिभेटेलघटोद्भवमुनी । तुजलोपामुद्रानेईलसदनीं । आणिकऋषिपत्न्यामिळोनी
तुजपुसतीलसाक्षेपें २३ रावणेंतुजनेलेंकैसेरीतीं । कैसालंकेसिआलारघुपती । पुसेललोपामुद्रातुजप्रती । कथाकैसीवर्तलीते २४ सांगेंसकळवर्तमान । प

---

१ चंद्र. २ वायूच्यावेगानें. ३ सूर्यवंशासभूषणदेणारा ४ अरण्य ५ पृथ्वीचीकन्यासीता. ६ इंद्रजित. ७ चंद्रवदने. ८ देवस्थानविशेष. ९गोदावरी. १० दशमुखी रावण.

रिजेंकेलेंसागरबंधन । हीकथातिजलागून । सर्वथाहीसांगूंनको २५ हेकथासांगसीलपूर्ण । तुजसीयेईलहीनपण । ऐसेंराघवसांगेतंवाविमान । आश्र
मासमीपउतरलें २६ होतसेवाद्यांचागजर । दणाणिलेंतेणेंअंबर । शिष्यधांवूनियांसत्वर । अगस्तीप्रतिसांगती २७ स्वमीविमानआलेंपृथ्वी
वरी । भरलेंरीसअसुरवानरीं । तोंअगस्तीउठिलाझडकरी । ह्मणेरघुवीरपातला २८ मगशिष्यघेऊनअपार । रामचंद्रासआलासमोर । पा
तलाआश्रमाबाहेर । कलशोद्भवतेधवां २९ ऋषिमेळाश्रीरामेंदेखतां । उतरलाविमानाखालता । पुढेंयेतांकमलोद्भवपिता । कलशोद्भवेंदेखिला ३०
अगस्तीसनधरवेधीर । भूमंडळक्रमीसत्वर । तंवरघूत्तमेंनमस्कार । साष्टांगघातलाऋषीसी ३१ अगस्तीनेंधांवूनित्वरित । हृदयींधरिलाश्रीर
घुनाथ । जैसावाचस्पतिआलिंगित । शचीवरासीआदरें ३२ सवेंचिसौमित्रासिदिधलेंआलिंगन । तोंरघूत्तमबोलेहांसोन । आजिआश्रमसोडून ।
कांस्वामीआलेतबाहेरी ३३ मागेंअरण्यकांडींकथागहन । सीताघेऊनिगेलादशवदन । तेव्हांपरतोनिरामलक्ष्मण । अगस्तीआश्रमापैंआले ३४ ते
वेळींअगस्तीनेंजाणोन । घेतलेंनाहींश्रीरामदर्शन । परतविलेदारींहून । दोघेदाशरथीतेकाळीं ३५ तीगोष्टआठवूनिरघुपती । ह्मणेतोचमीरामतूंअ
गस्ती । तेव्हांअनादरआतांप्रीती । बिशेषदिसेविप्रोत्तमा ३६ ऐसेंबोलतांसीताधव । प्रत्युत्तरदेतकलशोद्भव । तूंस्त्रीबिरहितराघव । नाहींवैभवतेध
वां ३७ विपरीतकाळजाणोन । नाहींघेतलेंतुझेंदर्शन । आतांतूंस्त्रीयुक्तसीतारमण । ह्मणोनिआलोंसामोरा ३८ स्त्रियेसदेतीअवघेमान । तूंनिर्विका
ररघुनंदन । मानापमानविरहितजाण । सच्चिदानंदपरब्रह्म ३९ तूंअजअजितनिष्काम । निरुपाधिकनिर्मळअनाम । नानाविकारसमविषम । स्त्री
चेसर्वहीराघवा ४० ऐकूनिअगस्तीचेंउत्तर । आनंदमयझालारघुवीर । मगआश्रमाप्रतिसीतावर । कलशोद्भवेंनेलापैं ४१ तोंतेलोपामुद्रायेऊन ।
जनकजेसिकरींधरून । गेलीआश्रमांतघेऊन । करूनिपूजनपुसतसे ४२ विदेहतनयेतुजसींप्रीती । अत्यंतकरितोकींरघुपती । किंवाविरक्तअसेचि
त्तीं । सांगस्थितिकैसीते ४३ वनींविचरतांरघुनंदन । तोषवीतअसेकींतुझेंमन । तूंभागलीसह्मणोन । समाधानकरितसेकीं ४४ याउपरीविदेहनंदिनी
त्रिभुवनपतीचीपट्टराणी । श्रीरामप्रतापवाखाणी । ब्रह्मानंदेंकरूनियां ४५ ह्मणेपरमदयाळूरघुनाथ । मजवरीस्नेहकरीअत्यंत । तूंह्मणसीस्त्रीलंप
टबहुत । जनकजामाततैंसानव्हे ४६ तरीअत्यंतदयाळूश्रीराम । मजवरीस्नेहकरीपरम । विरक्तसदानिष्काम । रूपनामनाहींतया ४७ मगघेऊनि
गेलारावण । दयासागरतोरघुनंदन । करूनियांनानाप्रयत्न । मजसोडविलेंश्रीरामें ४८ तोंलोपामुद्राह्मणेसीते । तुजकैसेंनेलेंलंकानाथें । मगयेऊ
नजनकजामातें । सोडविलेंकैसेरीतीं ४९ हर्षेंसांगतसेजानकी । मीइच्छिलीमृगकंचुकी । तेंजाणोनिएकाएकीं । अयोध्याप्रभूधांविन्नला ५० मागेंअ

तिंथिवेषेंघेऊन । मजघेऊनगेलारावण । माझियाबियोगेंरामआपण । वृक्षपाषाणआलिंगी ५१ मजनिमित्तराजीवनेत्र । मित्रकरूनिचंडांशपुत्र । श
क्रसुतावधोनिसर्वत्र । कपिवीरसखेकेले ५२ मगलोकप्रांणेशनंदन । धाडिलामाझेशुद्धीलागून । तेणेंकरूनलंकादहन । रघुनंदनआणिला ५३ अष्टा
दशपद्मेंवानर । संगेंघेऊनिआलाश्रीरामचंद्र । वेढोनियांलंकापूर । युद्धअपारपैंकेलें ५४ संततीसमवेतरावण । रणींमारीरविकुळभूषण । राज्यींस्थापू
नियांविभीषण । पुष्पकांरूढमगझाले ५५ खालींमीजोंविलोकींपूर्ण । तोंअद्भुतकेलेंसेतुबंधन । लंबायमानशतयोजन । आणोनिपाषाणबांधिला ५६
समुद्रबांधिलापाषाणीं । आश्चर्यमजवाटलेंमनीं । ऐसेंजानकीनेंविसरुनी । सेतुचरित्रकथियेलें ५७ तंवतेलोपामुद्राबोलत । कायसांगसीगोष्टअद्भुत ।
पाषाणींबांधिलासरितानाथ । कायपुरुषार्थकेलाहा ५८ टांकोनियांएकशर । कांशोषिलानाहींसागर । नलागतांक्षणमात्र । पतीनेंमाझेप्राशिला ५९
ऐसेंअगस्तीजाँयाबोलतां । क्षणेकहोयतटस्थसीता । ह्मणेइणेंउणेंआणिलेंरघुनाथा । आतांउत्तरइयेसदेऊं ६० ह्मणेरघूत्तमाचाजातांबाण । सप्तस
मुद्रजातीलआटोन । बिंदुमात्रनउरेजीवन । जीवसंपूर्णमरतील ६१ रामाजवळीवानरगण । आहेतपरमबळसंपन्न । सप्तसमुद्रांचेंआचमन । एकदां
चकरितील ६२ ह्मणसीकांकेलेंनाहींआचमन । तरीतुझ्यापतीचेंमूत्रपूर्ण । नशिवतीवानरगण । मगप्राशनकेवीकरितील ६३ रघुनाथदाससोवळे
बहुत । ह्मणोनिशिळींबांधिलासेत । नाहींतरीसरितानाथ । प्राशितेक्षणनलागतां ६४ ऐसेंबोळतांजनर्कतनया । उगीचराहिलीजाया । असोजान
कीचीपूजाकरूनियां । संतोषविलेंतेकाळीं ६५ अगस्तीनेंपूजोनिरघुनंदना । सर्वेचिॠषीचीघेऊनआज्ञा । पुष्पकींबैसेअयोध्याराणा । सीतेसहिततेकाळीं ६६ पुष्पकचालिलेंतेथोनी । अयोध्यापंथलक्षोनी । तोंभारद्वाजआश्रमींयेउनी । उतरलेंतेव्हांप्रयागीं ६७ मनांतविचारीरघुनंदन । घ्यावेंभा
रद्वाजदर्शन । यालागींउतरलेंविमान । इच्छाजाणोनिप्रभूची ६८ भारद्वाजासहितअपार । धांवतीचहूंकडोनिमुनीश्वर । जैसेमहानद्यांचेपूर । सिंधू
सजातीभेटावया ६९ रघूत्तमेंखालतीउतरून । ॠषीससाष्टांगकेलेंनमन । भारद्वाजेंदिधलेंआलिंगन । प्रेमेंकरूनतेधवां ७० ह्मणेआजिधन्यदि
वस । घराआलाअयोध्याधीश । झालींवर्षेंचतुर्दश । चवदादिवसअधिकपैं ७१ लक्ष्मणादिकांलागून । भारद्वाजेंदिधलेंआलिंगन । तेदिवसींरघुनंद
न । आपुलेआश्रमींराहविला ७२ मगतोजगदात्मारघुनाथ । स्नेहेंहनुमंतासीसांगत । ह्मणेआह्मींआजराहिलोंयेथ । प्रीतीस्तवॠषींचे ७३ तरी
पुढेंजाऊनित्वरित । त्वांभरतासकरावेंश्रुत । शृंगवेरींगुहभक्त । त्यासहीविदीतकरावें ७४ ऐसीआज्ञाहोतांचिपूर्ण । वंदोनियांरघुवीरचरण । वायुसु

१ भिक्षुकाच्या रूपानें २ सुग्रीव. ३ वालीस. ४ मारुति ५ पुष्पक नामे विमान. ६ समुद्र. ७ स्त्री. ८ सीता.

तेंकेलेंउड्डाण । पित्याहूनचपळत्वें ७५ गगनींहूनिरवीउतरत । तैसागुहकाश्रमींहनुमंत । येऊनिबोलेअकस्मात । अयोध्यानाथआलाहो ७६ जोजग
दानंदमूळकंद । भरतहृदयारविंदमिलिंद । तोरघुनाथभक्तजनवरद । जवळीआलाजाणिजे ७७ परमनंदउदारघन । अंतरंगमनमोहन । परात्परसोय
राजाण । तोजवळीआलाकीं ७८ विश्वात्मकविश्वपाळक । विश्वमनउदारक । जनहृदयचाळक । तोजवळीआलाकीं ७९ ऐसेंगुहकेंऐकतांवचन
वोसंडलाआनंदेंकरून । धांवूनिमारुतीचेचरण । धरिलेसद्गदहोऊनी ८० ओळखोनिपरमभक्त । त्यासिहृदयींधरीहनुमंत । गुहकमागुतीलोळत । चरणां
वरीमारुतीचे ८१ ह्मणेहनुमंताधन्यधन्य । कायतुजहोऊंउत्तीर्ण । मगफळेंसुमनेंआणून । हनुमंतगुहकेंपूजिला ८२ गुहकासिह्मणेहनुमंत । चालनंदिग्रा
मासीत्वरित । स्वामीआलाकरूंश्रुत । भरताप्रतिजाऊनियां ८३ दोघेहीउठिलेतेचक्षणीं । एकमेकांचेहातधरूनी । दोघेहीभक्तशिरोमणी । वेगेंकरूननि
घाले ८४ तोंनंदिग्रामींभरत । बोटानेंदिवसमोजित । ह्मणेआतांनयेचिरघुनाथ । चतुर्दशवर्षेंलोटलीं ८५ भरतसर्वगुणींसंपन्न । तोभजनसमुद्रींचामीन ।
कींवैराग्यगिरींचापूर्ण । अमोलिकहिराहा ८६ विवेकगंगेचालोटथोर । कींज्ञानार्काशींचाभास्कर । कींक्षमाधरितासहस्रवक्र । कींसरोवरनिश्चयाचा ८७
किंवादयेचापर्वतपूर्ण । कींगुणागुणनिर्गुण । कींउपरतीचानंदन । कींवामेघआकाशींचा ८८ ऐसातोभरततेवेळीं । ह्मणेयावयाचीसीमाझाली । रामप्रे
मळाचीमाउली । अजूनदृष्टींपडेना ८९ आतांहादेहटांकून । धुंडीतजाईनरघुनंदन । तत्काळचिकुंडरचून । चेतविलाअग्निकैकेयीसुतें ९० मार्गपा
हिलादोनप्रहर । अग्नींतघालावयाशरीर । सिद्धझालाभरतवीर । परमाप्रियकरराघवाचा ९१ कुंडापासींउभाराहून । अंतरींआठविलेंश्रीरामध्यान । मुकुट
कुंडलेंआकर्णनयन । सुहास्यवदनसाजिरें ९२ उडीघालावीजोंआंत । तोंसमीपआलावायुसुत । ह्मणेआलाजीरघुनाथ । दशमुखांतकजगदात्मा ९३
आलासुरांचाकैवारी । आलाभक्तांचासाह्यकारी । भरतनेत्रउघडीतेअवसरीं । तोंमारुतीघालीनमस्कार ९४ उष्णकाळअत्यंत । घोंथाळरणींउदक
स्मरत । त्यासिजीवनपाजिजेअकस्मात । तैसाभरतसुखावे ९५ चकोरअसतांक्षुधाक्रांत । अवचितउगवेदिशानाथ । तैसाआनंदलाभरत । हनुमं
तासिदेखोनी ९६ उचलोनियांपरमप्रीतीं । हृदयींआलिंगिलामारुती । ह्मणेकोठेंआहेरघुपती । दावींमजप्राणसखया ९७ प्राणजातांअमृत । एका
एकींघालिजेमुखांत । तैसीशुभवार्ताअकस्मात । आलासिघेऊनकपींद्रा ९८ मगहनुमंतासिबैसवून । पुसिलेंसकळवर्तमान । अमृतवर्षावकरीघन ।
तैसेंयेरेंकथियेलें ९० ह्मणेकृपासिंधूरघुनंदन । क्षणक्षणांतुमचीआठवण । करूनिह्मणेकेंव्हांजाईन । भरताप्रतिभेटावया १०० धन्यतुमचेंबंधूपण । श



१ वायु. २ उचंबळला. ३ उतराई. ४ फुलें. ५ मासा. ६ ज्ञानरूप. ७ सूर्य. ८ शेष. ९ पश्चात्ताप. १० पुत्र. ११ आई. १२ देवांचा. १३ जखमा झालेला.

ऋपदातुल्यराज्यटांकून। सकळमंगेळभोगत्यजून । नंदिग्रामींबैसलेती १ भरतह्मणेहोमारुती । मृगजीवनींबुडेलअगस्ती । तमार्णवींपडेलदिनपती । दोबेंभागीरथीजरीलिंपे २ शेषजरीभागेलधरितांक्षिती । मर्यादाटांकीलसरितापती । तरीराज्यवासनामारुती । मजहोईलजाणपां ३ असोशत्रुघ्ना सिह्मणेभरत । तूंअयोध्येसिजायत्वरित । वसिष्ठमाताआणिसुमंतँ । तयांसीश्रुतकरींवेगें ४ अरुणोदयहोतांसत्वर । प्रजासेनाघेऊनिसमग्र । जगद्वंद्या सीसामोर । गजरेंकरूनयेईंजे ५ ऐसीआज्ञाहोतांशत्रुघ्न । अयोध्येसिगेलाधांवून । टवटवीतप्रसन्नवदन । सुमंतासीभेटला ६ ह्मणेकायपाहतांउठा त्वरित । जवळीआलेश्रीरघुनाथ । नंदिग्रामींआलाहनुमंत । पुढेंसत्वरसांगावया ७ हरुषेंधांवतसुमंत । आनंदनमायेगगनांत । दुंदुभीत्राहाटिल्या त्वरित । आलारघुनाथह्मणोनियां ८ दणाणिल्याराजभेरी । नादनसमायेअंबरीं । शत्रुघ्नेंराजसदनावरी । कळसचढविलेलवलाहें ९ सूर्योदयींअक स्मात । पृथ्वीवरीकिरणेंधांवत । तैसीनगरींप्रगटलीमात । आलारघुनाथह्मणोनियां १० आळोआळींजनधांवती । आंगींरोमांचउभारती । सुख नसमायेचित्तीं । नयनींलोटतीप्रेमबिंदू ११ सोळापद्मेंदळभार । सिद्धझालेतेव्हांसत्वर । कुंजरभेरीचवदासहस्र । एकसरेंठोकिल्या १२ शत्रुघ्नआणि सुमंत । आलेकौसल्येचेसदनांत । ह्मणतीमातेआलेरघुनाथ । सीतासौमित्रासहितपैं १३ कौसल्यासुमित्रादोघीजणी । उचंबळल्याआनंदेंकरूनी । सुखाश्रुलोटलेनयनीं । बैसल्यावहनींसत्वर १४ वसिष्ठापासींजाऊन । आनंदेंसांगेशत्रुघ्न । स्वामीआलेजीरघुनंदन । चलासत्वरसामोरे १५ आळाऐ कतांरघुनाथ। स्वानंदेंउचंबळेब्रह्मसुत। चतुरंगदळसमस्त। नगराबाहेरनिघाले १६ विद्युत्प्रायध्वजझळकती । मकरबिरुदेंपुढेंचालती । अष्टादशप्रजा धांवती । नगराबाहेरसत्वर १७ कैकेयीसुमित्राकौसल्या । सुखासनारूढचालिल्या । मंगळवाद्यध्वनीलागल्या । तोसोहळानवर्णवे १८ वसिष्ठशत्रु घ्नसुमंत। दिव्यरथींबैसलेत्वरित । आनंदमयजनसमस्त । श्रीरघुनाथपाहावया १९ थोडीउरतांलग्नघडी । वेगींधांवतीजैसेवऱ्हाडी । कींगंगेचियाथ डीं । तृषाक्रांतयेतीत्वरेनें २० तेवीब्रह्मानंदेंकरून । पुढेंधांवतीअयोध्याजन । इकडेभरतसीताशोकहरण । सूर्योदयींउठिलेपैं २१ नित्यनेमसारून पुढेंचालिलेदोघेजण । भरतह्मणेआजिधन्यनयन । श्रीरामनिधानदेखती २२ इकडेभारद्वाजाचीआज्ञाघेऊन । पुष्पकींबैसेरघुनंदन । सत्वरचालिलें विमान । अयोध्यापट्टणलक्षित २३ तोंभरतासिह्मणेहनुमंत । ऊर्ध्वपंथेंपाहाजीत्वरित । भरतजोंऊर्ध्वविलोकित । तोंअद्भुतदेखिलें २४ भरतह्मणेह नुमंतासी । हेंकायअसंभाव्यआकाशीं । वाद्येंवाजतीमानसीं । आश्चर्यमजवाटतें २५ हनुमंतह्मणेपुष्पकविमान । सेनेसहितसीतारमण । वरीयेता

१ शुभ. २ मृगजलीं ३ अंधाररूप समुद्रांत. ४ सूर्य. ५ समुद्र. ६ प्रधान. ७ बाजविल्या. ८ नोबती. ९ गगनीं. १० बातमी ११ आनंदानें आंगावर कांटा येणें.

तिबैसोन । परमवेगेंकरूनियां २६ ऐसेंसांगतांवायुनंदन । भरतेंघातलेंलोटांगण । मागुतीऊर्ध्ववदनकरून । पुनःविमानविलोकिलें २७ आणीकसा
ष्टांगनमस्कार । प्रेमेंघालीभरतवीर । चंद्राकडेपाहेचकोर । ऊर्ध्वपंथेंप्रीतीनें २८ मारुतीचाहस्तधरून । पुढेंचालेकैकेयीनंदन । तोंराघवइच्छेंकरून । पु
ष्पकउतरेभूमीवरी २९ सीतेसहितरघुनंदन । विमानाखालींउतरून । अयोध्येसिसाष्टांगनमन । राजीवनयनकरीतेव्हां ३० जन्मभूमीजान्हवीज
ननी । सद्गुरुस्थळपवित्रअवनी । शिवहरिप्रतिमासंतदेखोनी । साष्टांगनमनकरावें ३१ तपस्वीवेदज्ञवृद्धब्राह्मण । यज्ञप्रसिद्धध्वजदेखोन । वंदावें
समाधिस्थान । महापुरुषवंदावे ३२ सत्यव्रतीश्रीरघुनाथ । ह्मणोनिअयोध्येसिनमस्कारित । तोंहनुमंतासमवेत । जवळीभरतदेखिला ३३ दाट
लाअष्टभावेंकरून । घालीतयेतसेलोटांगण । श्रीरामवियोगेंकरून । शरीरकृशजाहलें ३४ भस्मलाविलेंशरीरासी । वल्कलेंवेष्टिततोतापसी । ऐसाभ
रतदेखोनिमानसीं । सीतावरकळवळला ३५ चरणींक्रमितभूमंडळ । पुढेंचालेतमाळनीळ । तानयावत्सालागींस्नेहाळ । धेनुंहंबरतजैसीकां ३६
भरतेंकैसेंदेखिलेंरघुनाथा । बहुतदिवसगेलापिता । तयासीकुमरदेखतां । धांवेजैसास्नेहभरें ३७ भरतेंवेगेंधांवोनी । मिठाघातलीश्रीरामचरणीं । जैसा
धनलोभीधांवोनी । धनालागींआलिंगी ३८ कींजन्मांधासिआलेनयन । कींमृत्युसमयींअमृतपान । कींदरिद्रीयासीनिधान । अकस्मातप्राप्तझा
लें ३९ किंवामारितांतस्करीं । अकस्मातधांवलाकैवारी । तोजेवींसुखावेअंतरीं । भरतासीतैसेंवाटत १४० राघवेंउचलोनितेसमयीं । भरतदृढध
रिलाहृदयीं । दोघांचेनयनींलवलाहीं । प्रेमोदकलोटलें ४१ हरिहरदोघेभेटले । शशिमित्रएकवटझाले । कींक्षीराब्धीचेएकवटले । लोटजैसेएकलें
४२ कींवेदांतग्रंथींचेअर्थ । ऐक्यत्वापरस्परेंयेत । तैसेश्रीरामआणिभरत । एकपणेंमिळाले ४३ समसंतोषसमप्रीती । सोडावेंहेंनवाटेचित्तीं । वि
योगंव्यथादिगंतराप्रती । जातीझालीतेधवां ४४ आलिंगनदेऊनिवेगळेहोती । परीअंतरींनव्हेचतृप्ती । तोसोहळाडोळांपाहती । सुग्रीवआणिंवि
भीषण ४५ ह्मणतीभरतआणिरघुपती । अद्भुतयादोघांचीप्रीती । एकासिएकआवडती । प्राणाहूनिपलीकडे ४६ बंधुसाधूविरक्तभक्त । चारित्र
कारेंवंद्यभरत । राज्यटाकूनिअरण्यांत । चतुर्दशवर्षेबैसला ४७ नाहींतरीआमुचेंबंधुपण । एकमेकांचेघेतलेप्राण । आतांरघुनाथदासह्मणून । वंद्यझा
लोंत्रिलोकीं ४८ परीधन्यवालीआणिरावण । त्यांचेविरोधप्रसंगेंकरून । सखाजोडलारघुनंदन । सच्चिदानंदरूपजो ४९ असोभरतसप्रेमेंकरू
न । वंदीजनकंकन्येचेचरण । जैसेंवत्सप्रीतीनेंधांवोन । रिघेधेनूचेकांसेसी १५० यावरीभरतआणिलक्ष्मण । उचंबळतीप्रेमरसेंकरून । एकमेकां

१ भरत. २ भागीरथी. ३ पुण्यभूमि. ४ मूर्ति. ५ वेद जाणणारा. ६ सालीचीं वस्त्रें. ७ गाय. ८ पुत्र. ९ चंद्र व सूर्य. १० वियोगसंबंधीं दुःख. ११ देशांतरास.

सीआलिंगन । देतेझालेतेधवां ५१ सुग्रीवआणिविभीषण । उभयतांसिह्मणेरघुनंदन । भरतासिक्षेमालिंगन । द्यावेंआतांयेसमयीं ५२ ऐसेंऐकतां दोघेजण । भरतासिकरितीसाष्टांगनमन । सुग्रीवासिउठवून । भरतेंआधींआलिंगिला ५३ सवेंचिउठवोनिविभीषण । हृदयींधरिलाप्रीतीकरून । यावरीनळनीळवालिनंदन[1] । जांबुवंतादिभेटले ५४ याउपरीगुहकभक्त । तोहीभरताऐसाव्रतस्थ । तेणेंप्रेमेंदंडवत । केलेंतेव्हांरामासी ५५ सर्वां ससमानरघुनाथ । गुहकासितेव्हांहृदयींधरित । आनंदनसमायेगगनांत । गुहकाच्यातेकाळीं ५६ मगगुहकभरतासमवेत । विमानींबैसलारघुना थ । विमानमागुतीउंचावत । चालिलेंअद्भुतवायुवेगें ५७ क्षीराब्धितटींजाऊन । बैसेजैसाविष्णुवहन[2]। तैसेंनंदिग्रामासमीपविमान । उतरलेंअसेते काळीं ५८ सीताआणिश्रीरघुनाथ । पुष्पकाखालींउतरत । वानरअसुर[3]समस्त । क्षणनलागतांउतरले ५९ राघवह्मणेपुष्पकासी । आतांतुवांजा वेंकुबेरापासीं । चिंतिलेल्यासमयासी । आह्मांपासींयेईजे ६० ऐसीआज्ञाहोतांतत्काळिक । ऊर्ध्वपंथेंगेलेंपुष्पक । धनपतीपासींजाऊनिदेख । स्थीर[4] झालेंतेकाळीं ६१ नंदिग्रामासमीपअरण्यांत । उतरताझालारघुनाथ । वानरदळराक्षसदळसमस्त । सेनातेथेंबैसली ६२ इकडेअयोध्येबाहेर । नि घालेंजाणदळपरिकर । रथशृंगारिलेसुंदर[5] । आनंदेंबहुतचालिले ६३ चवदासहस्रकुंजरभेरी[6] । दणाणिल्यातेअवसरीं । सोळापद्मेंदळेंसीझडकरी । शत्रुघ्नयेतभेटावया ६४ भरतह्मणेजीरघुराया । शत्रुघ्नसुमंतआलेभेटावया । आणिमातायेतीलवलाह्या । होऊनियांस्नेहभरित ६५ जोतपेंज्ञानेंसम र्थ । जोशांतिक्षमेचापर्वत । तोवसिष्ठमुनीसद्गुरुनाथ । भेटावयायेतत्वरेनें ६६ आणिअयोध्येचेसकळब्राह्मण । अष्टादशप्रजासैन्यसंपूर्ण । असंभाव्य प्रीतीकरून । भेटावयायेतसे ६७ तोंसुमंतआणिशत्रुघ्न । रथाखालींउतरून । अवलोकूनसीताजीवन । लोटांगणेंघालिती ६८ देखोनिशत्रुघ्नसु मंत । भेटावयाउठेरघुनाथ । शत्रुघ्नचरणींमिठीघालित । नेत्रींउदकस्रवतसे ६९ रावणारीसद्गदहोऊन । शत्रुघ्नासिदेतआलिंगन । तोंसुमंतेंधरिले चरण । श्रीरामाचेतेधवां ७० बंधूंचेपरीआदरें । तोहीआलिंगिलारघुवीरें । परमप्रीतींसौमित्रें । सुमंतशत्रुघ्नआलिंगिले ७१ यावरीसकळजुत्प ती । सुग्रीवविभीषणनृपती । सुमंतशत्रुघ्नापरमप्रीतीं । भेटतेझालेतेधवां ७२ अक्षयसौभाग्यसरिता । दोघांहींवंदिलीजनकदुहिता । यावरीसुमं तह्मणेरघुनाथा । सद्गुरुवसिष्ठसमीपआले ७३ ऐसेंबोलतांसुमंत । सामोराधांवेरघुनाथ । तोंवहनाखालींब्रह्मसुत । श्रीरामदेखोनिउतरला ७४ नेत्रींदेखानिसद्गुरुनाथ । सद्गदझालाजनकजामात । दंडन्यायेंनमस्कारघालित । धांऊनिवसिष्ठउचलीप्रेमें ७५ ह्मणेजगद्वंद्यारघुनाथा । तुझेंदर्शनदुर्ले

---

१ अंगद. २ गरुड. ३ राक्षस. ४ कुबेर. ५ शोभायमान. ६ हत्तीवरील डंके ( नौबती. )

तेसमरींजिंकूनिसमस्त । मगवारूघेऊनित्वरित । जाऊंजननीदर्शना १ लहूह्मणेघालूनिपैज । ध्यावेंअयोध्येचेंराज्य । धरूनिआणावारघुराज । वाल्मीकचरणाजवळींपैं २ असोवृक्षींबांधोनिश्यामकर्ण । हातींघेऊनिधनुष्यबाण । अयोध्यापंथलक्षितपूर्ण । दोघेजणउभेअसती ३ घायाळ उरलेकिंचित । तेअयोध्येसिगेलेधांवत । राघवासीसकळमात । श्रुतकेलीतेधवां ४ दळभारासहितपूर्ण । रणींपडिलावीरशत्रुघ्न । विप्रबाळकदोघेज ण । द्वादशवर्षांचेअसतीपैं ५ यज्ञमंडपींरघुनंदन । बंधूचासमाचारऐकोन । टांकोनिहातींचेंअवदान । भूमीवरीउलंडला ६ नेत्रींढळढळांवाहेनीर गजबजिलेभरतसौमित्र । बिभीषणहनुमंतमित्रपुत्र । हडबडलेतेधवां ७ ह्मणतीयज्ञासिझालेंविघ्न । पडिलामहावीरशत्रुघ्न । सौमित्राप्रतिराजीवनयन । कायबालेतेधवां ८ ह्मणेशत्रुघ्नाऐसावीरराणा । ऋषिकिशोरेंआटिलारणां । तरीसवेंघेऊनिअपारसेना । धांवण्याधांवेबंधूच्या ९ श्रीरामचरणांबुज नमून । वायुवेगेंनिघालालक्ष्मण । सवेंचतुरंगसैन्य । अपारतेव्हांनिघालें ११० चवदांगांवेंरुंदथोर । मार्गींचालिलासेनासागर । वायुवेगेंउन्मिळांव र । रणमंडळासीपातला ११ तोंसेनापतीकाळजित । सौमित्रापासींपावलात्वरित । तोंदोघेदेखिलेअकस्मात । शशिआदित्यजापरी १२ श्याम सुंदरदोघेजण । द्वादशवर्षांच्यामूर्तिलहान । हातींघेऊनिधनुष्यबाण । धीटदोघेविलोकिती १३ पाहावयाबंधूचेंमानस । बोलताजाहलावीरकुश । ह्मणेसे नापातलींविशेष । प्रतापफारदिसतसे १४ सेनापतीक्रोधायमान । चपळयेतसेत्याचास्यंदन । तोयुद्धकरीलदारुण । आह्मांससर्वथानाटोपे १५ मग बोलिलालहुवीर । तूंपाठिराखाआलासीसत्वर । आतांमजबळअपार । येथोनियांविशेष १६ जैसीसाह्यहोतांसरस्वती । सकळकठिणार्थउमजती । तेवीआजिकरीननिर्वीरक्षिती । तुझ्याबळेंकरूनियां १७ तुजसींयुद्धींराहेसमोर । ऐसाकोणआहेवीर । जरीस्वयेंआलारामचंद्र । तरितूंत्यासीकदांना टोपसी १८ तोंवरीगर्जेजलार्णव । जोंदेखिलानाहींकलशोद्भव । तूंपंचाननहेसर्व । जंबुकयुद्धापातले १९ जरीतमजिंकीलसूर्यासी । कींभूतेंगिळती लकाळासी । तरीसमरंगणींयुद्धासी । तुजसीहेपुरतीकेवी १२० जरीआकाशबुडेलमृगजळीं । वाराकोंडिजेलभूगोळीं । तरीचतुजसीरणमंडळीं । भि डोंशकतीबंधुराया २१ परीएकेंसंशयेंगोविलें । जेंमाझेंधनुष्यभंगिलें । उपवनाजवळीयुद्धझालें । आसमासप्रथमची २२ मगसकळसैन्यभार । ध राधराह्मणतीकिशोर । आतांजातीलहेकोठवर । पाहूंनयनींआह्मींचकीं २३ वीरदोघेउभेठाकुनी । दळभारविलोकितीनयनीं । सैन्यजैसेंतृणप्रायक रूनी । उभेठाकतीतैसेचते २४ कुशह्मणेऐसियेसमयासी । कोणचापदेईलआह्मांसी । तरीआतांप्रार्थूंसूर्यासी । धनुष्यप्राप्तीकारणें २५ मगराघवेंयकरि

१ घोडा. २ आई. ३ जखमीझालेले. ४ आहुति. ५ पडला. ६ सुग्रीव. ७ कमलनेत्रश्रीराम. ८ चरणकमल. ९ चारकोसांचाएकगांव. १० लक्ष्मण. ११ चंद्रवसूर्य.

तीध्यान । एकनिष्ठेंमांडिलेंसूर्यस्तवन । ऊर्ध्ववदनेंकरून । सूर्यमंडळविलोकिती २६ जयजयतमनाशकासहस्त्रकिरणा । अंबरचूडामणीसूर्यनारायणा
राजीवमिलिंदबंधमोचना । हृदयकमलप्रकाशका २७ एकचक्रकनकभूषित । रथसुरेखवेगबहुत । निमिषार्धामाजीअपारपंथ । क्रमोनिजातमनोवृत्ती
२८ आदिपुरुषतूंनिर्विकार । ब्रह्माविष्णुमहेश्वर । हींस्वरूपेंतुझींचसाचार । सर्वप्रकाशकआदित्य २९ सकळरोगदुःखकारणा । विश्वपालनाविश्वदीप
ना । त्रिभुवनप्रकाशकागहना । काळात्मयाकाळरूपा ३० परिसोनिबालकांचीस्तुती । तत्काळप्रसन्नझालागभस्ती । अक्षयधनुष्यक्षितीं । ऊर्ध्वपंथेंटांकि
लें ३१ सूर्यासससाष्टांगनमून । घेतलेंतत्काळधनुष्यबाण । ह्मणतीवाल्मीकगुरूधन्य । सूर्यआराधनदिधलेंजेणें ३२ आह्मांसिसद्गुरुदयाअखंड । क्षणेंजिं
कूंहेंब्रह्मांड । लहूह्मणेआजिकोंड । पुरवीनयांचेंसंग्रामीं ३३ सूर्यदत्तकोदंडघेऊनसत्वर । सरसावलातेव्हांलहूवीर । तोंसौमित्राचेंदळसमग्र । चतुरंगलो
टलें ३४ अचुकलहूचेंसंधान । वायांनजायटांकिलाबाण । पदातीअश्वरथवारण । तोडूनिपाडितीएकसरें ३५ कोणीधनुष्याचीवोढीकाढित । तोंभुज
तोडीअकस्मात । मणगटेंअसिलतेसहित । तोडोनिपाडितीक्षितीवरी ३६ शिरांच्यालाखोल्यातेक्षणीं । भूलिंगासअर्पिल्यादोघांजणीं । रक्ताचेनद्यांतु
नी । जातीवाहूनकलेवरें ३७ वीरसंहारिलेअपार । काळजितासह्मणेसौमित्र । हेदोघेअसतांएकत्र । काळासहीनाटोपती ३८ तरीबहूतकटकघेऊन । ज्यं
ष्ठाधरींतूंवेढून । धाकट्याभोंवतेंआवरण । मीघालूनधरितोंतया ३९ मगदोनभागकटककेलें । दोघांसदोहींकडेफोडिले । चोवीसवेढेघातले । सभोंवते
सैन्याचेतेधवां १४० सौमित्रेंवेढिलालहूवीर । जैसातृणेंझांकिलावैश्वानर । कींअंजानींकोंडिलामहव्याघ्र । कींखगेश्वरसर्पांनीं ४१ परितोलहुप्रति
रघुवीर । चापासलावूनसोडीशर । फिरतफिरतचक्राकार । सोडीपूरबाणांचा ४२ धन्यवाल्मीकाचेदिव्यमंत्र । एकाबाणाचेकोटीशर । होवोनिशिरेंतो
डितीसत्वर । धन्यवीरराघवी ४३ रघुपतीचामंत्रीविशेष । रुधीनामेंधांवलाराक्षस । तोमहाबलिष्ठगगनास । उडोनिगेलातेधवां ४४ खालींअकस्मा
तउतरुनी । लहूचेंचापसत्वरहिरोनी । अंतरिक्षगेलाउडोनी । फळघेऊनपक्षीजैसा ४५ हातींचेंहिरूननेलेंचाप । लहुपाहेतटस्थरूप । तस्करापाठीं
लागतांसर्प । खंडीजैसाचरणातें ४६ व्यांळमूषकधरूंजातां । वणव्यांतसांपडेअवचितां । कींरिसामागेंधांवतां । बोरांटीआंगींअडकली ४७ निधा
नसाधावयासगेला । तोंविवसीपडिलीयेऊनगळां । तैसेंलहूसझालेंतेधवां । धनुष्यनेतांरुधीनें ४८ असोसीतासुतपरमरणधीर । जैसानिरालीउडे
खगेश्वर । तैसाउडोनियांसत्वर । रुधीराक्षसधरियेला ४९ हातींचेंधनुष्यहिरूनिघेतलें । असुराचीझोंटीधरिलीतेवेळे । गरगरांफिरवूनबळें । पृथ्वीवर

१ इच्छा. २ पायदळ. ३ तलवार. ४ सैन्य. ५ वेढा. ६ अग्नि. ७ शेळया, बकऱ्या. ८ गरुड. ९ कारभारी, प्रधान. १० सर्प. ११ उंदीर. १२ अस्वल.

आपटिला ५० मृत्तिकेचाघटफुटला । तेवीअसुरदेहचूरझाला । रुधीनेंप्राणसोंडिला । सकळांदेखतांतेकाळीं५१मागुतीकटकांतयेऊन । युद्धकरीसीता
नंदन । चोवीसवेढेसंहारून । टांकिलेतेव्हांसैन्याचे ५२ महाझुंजारयेऊन । हातींचींशस्त्रेंदेतीटांकून । धरूनितेव्हांलहूचेचरणं । ह्मणतीआमचेप्राण
रक्षीं ५३ एकपळतीरणसांडून । एकदांतींधरितीतृण । मगसिंहनादेंलक्ष्मण । गर्जोनपुढेंधांवला ५४ जैशापांचविजाअतितीक्ष्ण । तैसेसौमित्रें
पांचबाण । लहूवरीसोडिलेपूर्ण । महाक्रोधेंकरूनियां ५५ अतिचपळलहूवीर । तत्काळसोडीदिव्यशर । पांचबाणकेलेचूर । लोहपिष्टन्यायेंसी ५६
लहूसौमित्राप्रतिबोलत । त्वांपूर्वीमारिलाइंद्रजित । तीतुझीविद्यासमस्त । आजिदावींमजलागीं ५७ चतुर्दशवर्षेंनिराहार । काननींश्रमलासितूंफार
आजसमरींसाचार । सावकाशनिद्राकरीं ५८ सौमित्रह्मणेतूंकोणाचाकोण । तंवलहूबोलेहांसोन । तुजपुसावयाकायकारण । आलाबाणसांभाळीं ५९
लहूनिधडाप्रचंडवीर । सोडीएकसबळशर । रथासहितसौमित्र । आकाशपंथेंउडविला ६० गरगरांगगनींभोंवेरथ । भूमीवरीपडेअकस्मात । मगदुजे
रथींसुमित्रासुत । आरूढलालवलाहें ६१ जैसाकांवर्षेघनं । तैसाबाणसोडीलक्ष्मण । लहुत्याहूनित्रिगुण । शरसोडीतेकाळीं ६२ उन्मिळापतीचेबा
ण । तटतटांटांकीतोडून । मगमंत्रजपोनिलक्ष्मण । शरशोडोनिदेतसे ६३ त्याशरापासूनिएकदां । निघाल्याकोट्यावधीगदा । विमानारूढदेव
वृंदा । आश्चर्यतेव्हांवाटलें ६४ तोंलहूजपेगुरुमंत्र । चक्रेंसोडिलींतेव्हांअपार । गदाछेदोनिसमग्र । सर्वेंचगुप्तजाहलीं ६५ तोंसौमित्रेंसोडिलेंपर्व
तास्त्र । त्यावरीलहूसोडीवज्रास्त्र । फोडिलेअचलसमग्र । वज्रजातस्वस्थळा ६६ मंगळाचाभाचालहुवीर । सूर्यवंशमंडणाचाकुमर । शरमुखींद्वादशदिनकर
स्थापोनियांबाणसोडी ६७ निघतांद्वादशादित्यतेजाळ । प्रतापेंउजळलाविरिंचिगोळ । तेंदेखतांफणिपाळ । राहुअस्त्रसोडीतसे ६८ सूर्यआणिरा
हूअस्त्र । दोनीझालींअसतांएकत्र । सर्वेंचगुप्तझालींसमग्र । नलागतांक्षणतेकाळीं ६९ कामास्त्रसोडीअहिनायक । लहुवीरेंप्रेरिलेंकामांतक । कामास्त्र
दग्धझालेंतात्काळिक । नामेंपातकहरेजापरी १७० सौमित्रेंसोडिलेंतारकासुरास्त्र । लहूप्रेरीकार्त्तिकेयास्त्र । विघ्नास्त्रसोडीसौमित्र । हेरंबास्त्रलहूटांकी
७१ सौमित्रसोडीसरितापती । लहूत्यावरीप्रेरीअगस्ती । मगत्यावरीउन्मिळामती । पावकास्त्रप्रेरित ७२ लहुनेंमेघास्त्रटांकून । विझविलाप्रचंड
अग्न । जैसेंप्रकटतांआत्मज्ञान । जायवितळोनप्रेममोह ७३ वातास्त्रप्रेरीउन्मिळानाथ । लहुआडघालीपर्वत । साठअक्षौहिणीगणित । रामसेनापा
डिली १७४ आश्चर्यकरीलक्ष्मण । ह्मणेयाचापारनकळेपूर्ण । हस्तासनयेश्यामकर्ण । आतांयज्ञकायसा १७५ हेंअसतीकोणाचेकोण । हेंकदांनक

१ पाय. २ लोखंडाच्यापिठाप्रमाणें. ३ वनांत. ४ युद्धांत. ५ धैर्यवान. ६ लक्ष्मण. ७ पर्जन्य.

ळेवर्तमान । मजवाटेशिवआणिरमारमण । बाळवेषेंप्रकटले ७६ आणिकांचीनव्हेशक्ती । हेत्रिभुवनासिनाटोपती । लहुह्मणेसौमित्राप्रती । कांरेनि
वांतउगाचितूं ७७ तुझेसरलेअसतीलबाण । तूंजाईअयोध्येसपरतोन । तुझाकैवारीरघुनंदन । घेऊनियेईंसत्वर ७८ सौमित्रनेदीप्रत्युत्तर । विलोकी
बाळांचामुखचंद्र । मागुतीक्रोधउपजलाअपार । सोडिलेशरसौमित्रें ७९ भोगींद्रअवतारलक्ष्मण । हेंभूमिजासुतेंजाणोन । प्रेरिताझालानादास्त्र
बाण । नवलपूर्णवर्तलें ८० असंभाव्यनादमंजुळ । ध्वनीनेंभरलाब्रह्मांडगोळ । धनुष्यटांकूनिफणिपाळ । नादब्रह्मींमिसळला ८१ जेकनकबीजभ
क्षिती । त्यांचेअंगींसंचरेभ्रांती । उन्मिळापेतीचीगती । तैसीचजाहलीतेधवां ८२नादास्त्रबाणहृदयींभरला । जैसाविखारबिळींप्रवेशला । त्यावरीनाद
रंगेंव्यापिला । भूतळींपडिलामूर्च्छित ८३ इकडेसैन्याचेचोवीसआवर्त । कुशाभोंवतेघातलेअद्भुत । तेसंहारूनसमस्त । काळजितमारिला ८४ विभांडो
निदोनीदळें । दोघेबंधूएकवटले । रणअपारपाडिलें । कुंजरधांवतीसैरावैरा ८५ नाहींरथासीस्वामीसारथी । रितेरथतुरंगवोढिती । मनोवेगेंचौताळती
सव्यअपसव्यरणरंगीं ८६ अयोध्येंतकोदंडपाणी । सांगेभरताचेनिजकर्णीं । ह्मणेआणीकसेनाघेउनी । साह्यजाईंसौमित्रासी ८७ दारुणयोद्धालक्ष्मण
त्याप्रतिसांगेमाझेंवचन । तेबाळकदोघेजण । जितेचधरूनआणावे ८८ तयांजिवेंनमारावेंसर्वथा । आकांतकरीलत्यांचीमाता । तरीबाणआंगींनखु
पतां । मोहनास्त्रघालोनिधरावे ८९ त्यांचीमातापिताकोण । धनुर्वेददातापूर्ण । कांहिंडतातिरानोरान । वर्त्तमानसर्वपुसावें १९० त्यांचेस्वरूपाची
आकृती । कोणासारिखेदोघेदिसती । धरूनिआणात्वरितगती । रथावरीघालोनियां ९१ सौमित्राचाक्रोधदारुण । घेईलबाळकांचाप्राण । त्यांनीअन्या
यकेलापूर्ण । कृपाकरावीबाळकांवरी ९२ ज्याचेंहृदयपरमकोमल । तोदृष्टींदेखतांचिबाळ । स्नेहेंद्रवेलतात्काळ । अग्निसंगेंघृतजैसें ९३ बाळकाविणेंशू
न्यमंदिर । आमुचेंपडलेंकींसाचार । गुणसारितासीतासुंदर । विवेकनकरितांत्यागिली ९४ ऐसेंबोलतांरघुनाथ । कंठझालासद्गदित । नयनींवाहातां
अश्रुपात । प्रियाहृदयांतआठवली ९५ ऐसेंराजीवनेत्रबोलत । तोंघायळआलेधांवत । ह्मणतीसौमित्रआणिकाळजित । सैन्यासहितपाडिले ९६
ऐसेंएकतांकमळनेत्र । परमचिंतातुरझालेवानर । श्रीरामह्मणेसर्वेश्वर । अत्यंतकोपलाआह्मांवरी ९७ ब्रह्मानंदह्मणेश्रीधर । पुढेंवीरश्रीमाजेलअपार
तेंश्रवणकरोतश्रोतेचतुर । व्युत्पन्नआणिप्रेमळ ९८ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मिकीनाटकाधार । सदांपरिसोतपंडितचतुर । अष्ट
त्रिंशतितमोऽध्यायगोडहा १९९ ॥ ॥ अध्याय ३८ ओव्या १९९ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

१ लक्ष्मण. २ युद्ध. ३ रामचंद्र.

श्रीगणेशायनमः । ।श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । देवाधिदेवराजीवनेत्र । पुराणपुरुषघनःश्यामगात्र । लीलादाखविलीविचित्र । भक्तजनतारावया १
सौमित्रपाडिलारणांगणीं । श्रवणींऐकतांकोदंडपाणी । शोकाकुलितपडिलाधरणीं । सुमंतेंसांवरूनउठविला । तंवभरतआणिहनुमंत । दळघेऊनअप
रिमित । रणाप्रतिधांवलेत्वरित । पवनवेगेंकरूनियां ३ समागमेंघेऊनहनुमंत । रणविलोकीतभरत । तोंसीतासुतधांवत । दोघेहीपुढेंपातले ४ हनु
मंताचेकर्णींत्वरित । भरतसांगेगुह्यमात । ह्मणेहेराघवाऐसेदिसत । सीतासुतनिश्चयें ५ जानकीहोतीगर्भिणी । तैसीचरामचंद्रेंसोडिलीवनीं । हनुमं
तह्मणेमजहीमनीं । ऐसेंचगमेंनिश्चयें ६ वैरागरींवांचोनिरत्न । सहसानहोयनिर्माण । हेजानकीचेनंदंन । मजहीपूर्णकळोंआलें ७ तोंलहूसिह्मणेकु
शवीर । पैलतेनरआणिवानर । हळूचकरितातविचार । तेंतुजकांहींसमजलें ८ आह्मांदोघांसींयुद्धींगोंवुनी । श्यामकर्णन्यावासोडोनी । हेंचत्यांणींधरि
लेंमनीं । सांगतीकानींएकमेकां ९ तरीतूंरक्षीश्यामकर्ण । त्यांसियुद्धकरितोंमीनिर्वाण । ऐसेंकुशवीरबोलोन । सरसावूनपुढेंआला १० धनुष्यासि
लावूनबाण । भरताप्रतिबोलेवचन । तूंवडीलकायलक्ष्मणाहून । तुझेंआंगवणथोरदिसे ११ तुझेंनावकायसांगसत्वर । पितातुझाकोठीलनृपवर । त्वांपूर्वी
युद्धदुर्धर । कोणासिकेलेंसांगपां १२ माझेंनामपुससीलयेक्षणीं । तरीमीवीरकुशेंद्रचूडामणी । याउपरीभरतवाणी । कायबोलताजाहला १३ ह्मणेलें
कुरातूंजाययेथोन । तुजमीदीधलेंजीवदान । भरतेंसोडिलेंह्मणोन । सांगआपुलेमातेसी १४ मगकुशबोलेहांसोन । तुझेबंधूपडलेदोघेजण । त्याचासूड
घ्यावयाश्रीरामेंपूर्ण । पाठविलेंतुजरणासी १५ युद्धसांडूनिसांगसीगोष्टी । बंधूचासूडघेउठाउठीं । आतांरणींदावूनपाठी । अयोध्येसीपळूनजा १६ मी
पाठमोऱ्यासीनमारींजाण । तुजसीअभयदीधलेंपूर्ण । कोणतुझाआहेरघुनंदन । त्यासघेऊनयेईंवेगें १७ ऐसेंबोलतांसीतानंदन । भरतेंचापासिला
वूनिबाण । आकर्णपर्यंतवोढीवोढून । कुशावरीसोडिलावेगें १८सीतात्मजेंशरटाकून । मध्येंचतोडिलातोबाण । सवेंचशरजाळघालून । कंटकबहुतसंहारि
लें १९ भरतनेंजेंअस्त्रसोडित । तेंतेंनमानीसीतासुत । युद्धविद्याबळेंयथार्थ । सीतासुतनाटोपे २० भरतसोडीकार्तवीर्यास्त्र । सहस्त्रकरांचेप्रकटलेवीर । बाण
सोडितिअपार । हांकेंअंबरगाजविती २१ ऐसेंदेखोनिराघवकुमरें । भार्गवास्त्रसोडिलेंत्वरें । कार्तवीर्यएकसरें । आटोनिगेलेनिःशेष । मगभरतप्रेरी
काळरात्री । तमेंदाटलींसर्वधरित्री । तंवसीतापुत्रेंतेअवसरीं । द्वादशसूर्यप्रकटविले । त्याप्रकाशेंतेवेळां । ब्रह्मांडगोळतपोंलागला । भरतह्मणेहाकालि
काळा । सर्वथाहीनाटोपे २४ भरतेंसोडिलेमहिषासुर । कुशेंटांकिलीशक्तिअनिवार । भरतयोजीत्र्यंबकास्त्र । येरेंभस्मासुरास्त्रसोडिलें २५ मगकुशेंद्रेंतेवे

१ श्रीराम. २ शोकानेंव्याकुळ. ३ सुमंतनामें प्रधान. ४ लहुवकुश. ५ गुप्तगोष्ट. ६ रत्नांचीखाण. ७ पुत्र. ८ गुंतवून. ९ पुरुषार्थ, शक्ति. १० सैन्य.

ळा । सूर्यमुखतोबाणकाढिला । जैसीमेघांतूननिघेचपळा । तैसागेलात्वरेनें २६ भरताचेहृदयींयेऊन । खडतरलातोदिव्यबाण । स्यंदनावरूनउ
लथोन । भरतखालींपडियेला२७दळपूर्वींचपाडिलेंबहुत । दृष्टींदेखोनिहनुमंत । घेऊनएकविशाळपर्वत । कुशेंद्रावरीधांवला २८भोवंडूनबळेंभिरका
विला । कुशेंद्रेंवज्रमुखबाणसोडिला । अचलफोडोनिपिष्टकेला । धुळोराउडालाचहूंकडे २९ मारुतीचेंहृदयलक्षोन । सोडिलातेव्हांवज्रबाण । वज्रदे
हीहीमूर्च्छायेऊन । धरणीवरीपडियेला ३० इकडेबिभीषणआणिरघुनंदन । बिचारकरीतबैसलेपूर्ण । बाळकहेकवणाचेकोण । युद्धनिर्वाणकरिताती
३१तोंअकस्मातआलीमात । रणींपडिलावीरभरत । मूर्च्छनायेऊनिहनुमंत । रणांगणींतळमळी ३२ तोंबिभीषणह्मणेरघुनाथा । आतांकासयायज्ञकरि
तां । परमाश्चर्यतत्वतां । जाऊनियांपाहावें ३३ रघुवीरतेव्हांबोलेवचन । काळकैसापरमकठिण । बंधूपडिलेतियेजण । कुळक्षयपूर्णमांडिला३४परमक्रोधा
वेरघुनंदन । तोडोनिटांकिलेंयज्ञकंकण । होमद्रव्येंउलंडून । सीतारमणउठिलासे३५हडबडलीअयोध्यासर्व । निशाणींघातलाघाव । रथारूढहोऊनि
सर्व । पवनवेगेंधांवले ३६बिभीषणसुग्रीवजांबुवंत । नळनीळशरभवालीसुत । अयोध्येचेंदळसमस्त । परमवेगेंधांवतसे ३७वर्षाकाळींगंगेचेपूर ।
सागराप्रतिजातीसत्वर । तेवीनरवानरांचेभार । रणसिंधूजवळीआले ३८ तिघेबंधूपडिलेरणीं । नयनींविलोकीचापपाणी । कींनमस्कारघातलेधर
णीं । तिघेमिळूनएकदां ३९तुझेकन्येसगांजिलेंयथार्थ । ह्मणोनिपृथ्वीसनमस्कारकरित । असोप्रेतेंदेखोनिरघुनाथ । मनींपरमक्षोभला४०तोंदोघेदेखि
लेनयनीं । श्यामसुंदरबाळेंतेक्षणीं । एकाकडेएकपाहोनी । गोष्टीकरितीकौतुकें ४१ कौपीनमौंजीयज्ञोपवीत । शोभतीकिशोरअद्भुत । माथांचियाशिखा
उडत । दृष्टीन्याहाळितीपरदळा ४२ असोवृक्षपाषाणघेऊन । धांवलेतेव्हांवानरगण । तोंदोहींधनुष्यचढवून । सरसावूनपुढेंआले ४३ आश्चर्य
करीरघुनंदन । सोडितबाणापाठींबाण । मृगेंद्राऐसेगर्जोन । दोघेवचनबोलती ४४ असंख्यघातलेंबाणजाळ । जर्जरकेलेंवानरदळ । शिळावृक्षफोडोनि
सकळ । परदळावरीटांकिती ४५ अनिवारबाळकांचामार । नसोसवतीदारुणशर । प्रेतेंपडलींअपार । उरलेवानरपळतीभयें ४६ मगहनुमंतभावी
मनांत । ऊर्ध्वपंथेंउतरूनअकस्मात । पुच्छेंबांधोनदोघेत्वरित । राघवापासींआणावे ४७ उडोनिपाहेजंवअंजनीकुमर । तोंकुशेंटांकिलासबळशर ।
त्याचेहृदयींआदळोनिसत्वर । बाणपृथ्वीवरीपडियेला ४८ कुशेंद्रबोलेगर्जोन । सर्कटाउंभाराहेएकक्षण । त्वांविध्वंसिलेंअशोकवन । तेंयेथेंनचालेसर्व
था ४९ टाकावेवृक्षपाषाण । हेंराक्षसीयुद्धनव्हेजाण । तोनव्हेरेगिरिद्रोण । उपटोनिबळेंन्यावया ५० गोवत्सपदजीवन । पुरुषार्थभोगिसीसमुद्रउ

१ अंगद. १ सैन्य. ३ युद्धभुमीरूप समुद्र. ४ श्रीराम. ५ सिंहाप्रमाणें ६ इच्छी. ७ शेंपटानें. ८ मारुती. ९ छाती. १० माकड. ११ नाश केला.

डोन। रावणाचेंनगरजाळिलेंपूर्ण । तेंयेथेंनचालेआह्मासीं ५१ हासंग्रामसिंधुपरमदुर्धर । येथेंजयनपावसीतूंवानर। आमचेजननींसअपार। स्नेहतुझाला
गलाअसे ५२ तेक्षणक्षणांआठवित। ह्मणोनितुजराक्षिलेंयथार्थ। उगाचराहेंनिवांत। अचंलवतहनुमंता ५३ तोंवृक्षघेऊनिसत्वर। पुढेंधांवलामित्रपुत्र।
बाणघातेंतरुवर। लहूनेंतोडिलाहातींचा ५४ ह्मणेऐकरेचंडांशुसुता। मागीलकाळराहिलाआतां। तुह्मांपतितांसीतत्वता। लावीनशिक्षाआजयेथें ५५
वालीज्येष्ठबंधूमारून। त्याचेस्त्रियेसींकरिसीगमन। ज्याचेबळेंकर्मकेलेंपूर्ण। त्याचेंज्ञानकळोंआलें ५६ तुह्मांमर्कटांसिकैंचेंज्ञान। परीतुजगुरुभेटला
सुजाण। उत्तमन्यायकरून। तारातुजदीधली ५७ गुरुअँपंथेंचालेसदा। मगकैंचीशिष्यासमर्यादा। असोप्रायश्चित्तएकदां। घेईंआजिरणांगणीं ५८
मगघालूनिसहस्त्रबाण। रणींपाडिलासूर्यनंदन। फणसफळावरीकंटकपूर्ण। तैसेशरभेदिले ५९ तोंपुढेंधांवलाजांबुवंत। तयाप्रतिकुशबोलत। ह्मणेआ
स्वलातूंनिर्बळबहुत। वृद्धअत्यंतदृष्टिहीन ६० सोडोनियांसहस्त्रबाण। तोहीपाडिलाउलथोन। तोंघेऊनिपाषाण। नळवानरधांविन्नला ६१ तयाप्र
तिलहूबोलेवचन। हेंनव्हेसागरींसेतुबंधन। पांचबाणसोडून। तोहीपाडिलारणभूमीं ६२ तंवअंगदधांवलासकोप। तयासिबोलेरविकुळदीप। रावणा
चासभामंडप। येथेंनाहींउचलावया ६३ आतांतूंयेईंमजशरण। तुझेपित्याचासूडघेईन। शत्रूचीसेवाकरितांपूर्ण। लाजनवाटेमर्कटा ६४ तुझेमाते
नेंकेलाव्यभिचार। त्याचेंप्रायश्चित्तदेईंनसत्वर। ह्मणोनिवेगेंपांचशर। टांकोनिअंगदपाडिला ६५ असोअष्टजुत्पतीआणिहनुमंत। रणींपाडिलेवीरस
मस्त। मगकोदंडँचढवूनित्वरित। बाणलावीतराघव ६६ वेगेंसोडिलेदशबाण। कुशेंशतसोढिलेनिर्वाण। सहस्त्रसोडीरघुनंदन। कुशेंद्रावरींतेधवां।
६७ कुशेंलक्षबाणसोडिले। राघवेंकोटीमोर्कलिले। बाणमंडपेंतेवेळे। झांकिलेंदोघींसूर्यबिंब ६८ रघुपतीचाहस्तवेगबहुत। त्याहूनिविशेषकुशवीरदा
वित। बाणांचेंतेव्हांगाणित। शेषातेंहीनकरवे ६९ अनिवारतेबाळकदोनी। नाटोपतीरामासीरणीं। याउपरीकोदंडपाणी। कायबोलेतयांसी ७० ह्मणे
ऋषिबाळहोऐकावचन। तुह्मांसभातुकेंदेईन। करावयासिदुग्धपान। धेनुदेईनसंवत्स ७१ मीतुह्मांसिझालोंप्रसन्न। जेंमागालतेंदेईनपूर्ण। सकल
दुःखदरिद्रहरून। देईनदानवाजीगज ७२ तंवतेदेतीप्रतिवचना। आह्मांसमागावयानसेवासना। तूंचमागमनकामना। पूर्णकरूंतुझीआह्मीं ७३ तु
झीतूंचभोगींसंपत्ती। आह्मीऐकिलीतुझीकीर्ती। शोधितांहेत्रिजगंती। निर्दयनाहींतुजऐसा ७४ तुजऐसानाहींकठोरकोण। वालीमारिलाकपटेंकरून।
जानकीसारिखेंचिद्रत्न। अन्यायावीणदवडिलें ७५ निष्पापजैसीभागीरथी। तैसीपवित्रसीतासती। घोरवनींटांकिलीहीख्याती। तुजनशोभेराघवा

१ प्रीति, ममता. २ पर्वताप्रमाणें. ३ सूर्यपुत्र सुग्रीव. ४ वाईटरीतीनें. ५ लहु. ६ माकडा. ७ धनुष्य. ८ सोडिले. ९ खाऊ. १० वांसरांसहित. ११ घोडे व हत्ति. १२ त्रिभुवन.

७६ ऐसेंदोघेहीबाळबोलती । प्रत्युत्तरदेतरघुपती । मनांतउपजेबहूप्रीती । कींदोघांप्रतिआलिंगावें ७७ बाळभाषणऐकोन । वाटेतयांसिद्यावेंचुंबन। याउपरीतेदोघेजण । ह्मणतीबाणसोडींवेगें ७८ तूंक्षत्रियह्मणविसीपूर्ण । गोष्टीसांगसीयुद्धटांकून । लीलावतारीरघुनंदन । कायबोलेयावरी ७९ तुह्मींदोघेकोणाचेकोण । झालेतिकोणेंवंशींनिर्माण । मातापितयांचीनामखूण । सांगासंपूर्णआह्मांसी ८० दोघांचेंहींदेव्हडेंठाण । विद्यादोघांचीसम समान । वेदशास्त्रपुराणरामायण । कोण्यागुरूनेंपढविलें ८१ धनुर्वेदमंत्रास्त्र । कलाकौशल्ययुक्तीविचित्र। सद्गुरुकोणतुमचापवित्र । नामत्याचेंसांग पां ८२ ऐसेंबोलतांरघुनाथ । दोघेगदगदांहांसत । रणींबंधूपडिलेसमस्त । यांचाखेदसांडिलायेणें ८३ विद्यासरलीतुझीसकळिक । रणींपुससी आतांसोयरिक । कींबंधूपडिलेहाधाक । मनींदचकबैसला ८४ तुजपुसावयाकायकारण । सोडींवेगेंनिर्वाणबाण । बंधूंचासूडघेईंपूर्ण । मगसो यरीकविचारीं ८५ ह्मणतीअयोध्येचान्टपवर । वधिलेरावणादिअसुर । तीअवघीविद्याबाहेर । काढींआजपाहूंदे ८६ आह्मीतंवअसोकिशोर । तूंपूर्वी चाजुनाटझुंजार । धनुर्वेदपढविलासमग्र । गुरुवसिष्ठेंतुजलागीं ८७ तुजएकपत्नीव्रतपूर्ण । सत्कीर्तिजानकीतेसोडून । अपकीर्तिकांवरिलीदाटून । हें तोंदूषणजाहलें ८८ युद्धकेल्यावीणसर्वथा । आह्मीतुजनसोडूंआतां। भयवाटतअसेलचित्ता।तरीपळूनजायअयोध्ये ८९ दारांकुटुंबतुजनाहीं ।आतां संन्यासघेऊनसुखेंराहीं । मगतोजनकाचाज्येष्ठजांवाई । कायबोलताजाहला९०तुह्मीसांगाआपलेंवर्तमान । मगमीतुह्मांसींझुंजेन । यावरीकुशबोले हांसोन। ऐकेंसावधानहोउनी ९१ जानकीउदरकमळशुद्ध। त्यांतदोघेजन्मलोंमिलिंद । शत्रुकाष्ठेंकोरूनसुबद्ध । पिष्टकरितोंरणांगणीं ९२वाल्मीकतातें गुरुपूर्ण । तेणेंआमुचेंकेलेंपालन । त्यानंतरेंमौंजीबंधन । करूनवेदपढविले ९३ सकळशास्त्रेंरामचरित्र। धनुर्वेदपढविलासमग्र । तोआमचेमातेचा तातपवित्र । वाल्मीकऋषिजाणपां ९४ मातेचेकैवारेंकरूनी । भांर्गवेंकेलीनिःक्षत्रियअवनी । तैसेंचआह्मींधरिलेंमनीं । करूंअवनीनिर्वीर ९५कीं मातेचेकैवारेंविनेंतासुत । उरगेंसंहारांतेव्हांसमस्त । तैसेंचकरणेंआजियेथ । आह्मांसहीनिर्धारें ९६ जैंबनींसांडिलीसीतासती । तैंचगळालीतुझी शक्ती । अविवेककेलानिश्चितीं । पुनःमागुतीआवरेना ९७ ऐसेंऐकतांरामचंद्र । सीताआठवूनिदयासमुद्र । हृदयपिटूनसर्वेश्वर । धरणीवरपडिये ला ९८ मूर्च्छासांवरोनिपुढती । मागुतीउठिलारघुपती । तोंपुढेंबिभीषणमारुती । तयांप्रतिपुसतसे ९९ ह्मणेकवणाचेहेनंदन । तंवतेबोलतीविचा रून । तुमचींप्रतिबिंबेंपरिपूर्ण। जानकीउदरींजन्मलीं १०० चारघटिकासंपूर्ण। निवांतराहिलारघुनंदन । सीतासोडिलीत्यादिवसापासून । संपूर्णदिव

---

१ दुःख. २ नातें. ३ राक्षस. ४ मुलें. ५ योद्धा. ६ बायको. ७ रामचंद्र. ८ भ्रमर ९ पिता. १० परशुराम. ११ पृथ्वी. १२ गरुड. १३ सर्प.

समोजिले १ द्वादशवर्षैंतीनमोसपूर्ण । गणीतकरीजानकीजीवन । तोंलहुकुशदोघेजण । एकाप्रतिएकबोलती २ ह्मणतीवृक्षाआडबैसोन । कायकरात
रघुनंदन । तोंकुशेंसोडिलाएकबाण । वृक्षछेदोनिपाडिला ३ हस्तकौसल्यदेखोन । हास्यकरीजगन्मोहन । ह्मणेहेआह्मांलागुन । वशनव्हेतकदापी ४
आतांयुद्धचिकरावेंयथार्थ । ह्मणोनिउभाराहिलारघुनाथ । जेजेबाणसोडित ।तेतेनिष्फळजातआकाशीं५विमानींइंद्रादिसुरवर ।आश्चर्यकरितीतेव्हांथोर ।
ह्मणतीरामाचेंसामर्थ्यअपार । कायझालेंयासमयीं ६ अकाळींचींअभ्रेंव्यर्थपूर्ण । तैसेनिष्फळजातीरामबाण । मगकुशेंमोहनास्त्रजाण । निजबाणीं
स्थापिलें ७ तेंमोहनास्त्रयेऊन । रघुनाथहृदयींभरिलेंपूर्ण । मोहेंविलोकितांपुत्रवदन । मूर्च्छायेऊनपडियेला ८ रघुनाथपडतांभूमंडळीं । एकचिहांक
चहूंकडेझाली । पर्वतघेऊनितेवेळीं । हनुमंतपुढेंधांविन्नला ९ त्यावरीटांकोनिवज्रबाण । मूर्च्छागतपाडिलानलागतांक्षण । तोंगदाघेऊनविभीषण ।
हांकदेतपुढेंआला १० तंवकुशेंबाणसोडिला । लंकापतीचेहृदयींबैसला । तोंहीमूर्च्छायेऊनपडियेला । नाहींउरलाकोणीतेथें११ मगलहुकुशदोघेजण ।
आलेरामाजवळीधांवोन । पितापाहिलाअवलोकून । वंदिलेचरणप्रेमभावें १२ रघुपतीचामुकुटकाढिला । कुशेंआपुलेमस्तकींघातला । कुंडलेंकौस्तुभ
कटींमेखळा । सर्वहीलेइलाकुशतेव्हां १३सौमित्राचींभूषणेंकाढोनी । लहुलेइलातेचक्षणीं । मगश्यामकर्णघेऊनी । दिव्यरथींबैसले १४ लहुह्मणेदादा
परियेसी । वानरधरूनआश्रमासी । नेऊनदाखवूंमातेसी । खेळावयाहोतीलआह्मां १५ मगनळनीळसुग्रीवमारुती । यांचींपुच्छेंधरूनहातीं । जांबुवंत
अंगदतेचरीतीं । वोढीतत्यांसीचालविलें १६ आंगेंखरडतीभूमीवरी । जांबुवंतह्मणेमारुतीअवधारीं । ऊठवेगेंझडकरी । युद्धकरूंतयांसीं १७ मगह्मणे
हनुमंत । पुढेंआहेबहुतकार्यार्थ । त्रिभुवननाथसीताकांत । तोहीमूर्च्छितपडियेला १८ आतांमेलियांचेंमिषघेऊन । राहाहोईलसीतादर्शन । शक्तीचें
सामर्थ्यदारुण । केलेंविंदाणअतर्क्य १९ आश्रमाआलेकिशोर । रथाखालींउतरलेसत्वर । अलंकारमंडितसुंदर । आश्रमामाजीप्रवेशले १२० कु
शसन्मुखदेखिला । जानकीसऐसाभावगमला । कींरघुनाथचिआला । सरसावलामगअंचल २१ तंवतेदोघेहीकुमर । साष्टांगघालितीनमस्कार । सीतें
सीदाटलागहिंवर । दोघेहीहृदयींधरियेले२२ सीतेचेकंठींमिठीघालून । दोघेसांगतीवर्तमान ।रामासहितबंधुचौघेजण । रणांगणींपाडिले२३ऐकतांचि
ऐसीमात । सीतापडिलीमूर्च्छागत । सवेंचउठलीआक्रंदत । हृदयपिटिततेवेळे २४ ह्मणेत्रिभुवनेश्वरसांवळा । तोरणींतुह्मांकैसापडिला । अरेपितृ
वधकैसाकेला । जाणोनियांबाळहो २५ मत्स्यंकैसासागरशोषिला । मृगेंद्रजंबुकेंकैसावधियेला ।दीपतेजेंकाळवंडिला । वासरमणीकैसाहो २६ तृणप्र

१ महिने. २ श्रीराम. ३ देव. ४ ढग. ५ बिभिषण. ६ बाप. ७ लक्ष्मण. ८ घरास' ९ रामचंद्र' १० निमित्त

हारें भंगिलें वज्र । कीं पतंगें गिळिला वैश्वानर । सर्षपभारें भोगींद्र । ग्रीवां कैसी दडपली २७ मक्षिकेचा पक्षवात सुटला । तेणें मेरू कैसा उलथोनि पडिला । मुंगीचे मुखवातें विदारला । प्रळयमेघ जैसा कां २८ तंदुळभारें ऐरावत । कैसा पडिला उलथोन दंत । पुष्पप्रहारें अद्भुत । पाताळीं कूर्म दुखावला २९ तों कुश तेव्हां बोलत । माते ते आहेत मूर्च्छागत । आतां उठतील समस्त । चिंता कांहीं न करावी १३० आह्मीं आणिलीं वानरें । उदयाचे ती बहुत सुंदरें । वृक्षास बांधिलीं समग्रें । पाहीं बाहेरी अंबे तूं ३१ मग जगन्माता येऊन पाहात । तों हनुमंत नळ नीळ जांबुवंत । वीर देखोनि समस्त । आश्चर्य करी अंतरीं ३२ ह्मणे बाळकांचें सामर्थ्य दारुण । महावीर आणिले धरून । आतां यांस वोळखी देतां पूर्ण । लज्जायमान होतील हे ३३ मग पुत्रांसि ह्मणे ते अवसरीं । अरे हे वानर ठेवुं नये घरीं । सोडा जाऊं देव नांतरीं । आपुलिया स्वस्थाना ३४ मग भोंवंडिले पुच्छें धरून । दूर दीधले भिरकावून । मग ते महावीर उठोन । राघवाकडे पळाले ३५ रणीं सावध झाला रघुवीर । तों पळत चि आले वानर । सांगती सर्ब समाचार । वाल्मीकाचे आश्रमींचा १३६ आह्मीं मूर्च्छेचें मिष घेउनी । जाऊनि पाहिली जनककंनंदिनी । श्यामकर्ण दोघींने उनी । आश्रमांगणीं पूजिला १३७ तुमचा मुकुट अलंकार । घेऊनि गेले दोघे कुमर । जैसा सुपर्णें जिंकिला श्रीधर । तैसें च येथें जाहलें १३८ कीं नंदीनें जिंकिला उमारमण । कीं आपुले फळभारें करून । वृक्ष जाय जैसा मोडोन । तैसें च येथें जाहलें ३९ सूर्यापासून झालें आभाळ । तेणें त्यास आच्छांदिलें तत्काळ । ऐसें बोलतां तमाळनीळ । उगा च राहिला क्षणभरी १४० इकडे वर्तला वृत्तांत । राजासीं झुंजले सुत । उपवना जवळी बहुत । अपार रण पढियेलें ४१ समाचार ऐकोनि विपरीत । तों पाताळाहून अकस्मात । वाल्मीक मुनी आला धांवत । आश्रमापासीं आपुल्या १४२ सीतेनें सांगीतलें सर्व वर्तमान । श्यामकर्ण आणिला धरून । मग वाल्मीक मुनी हांसोन । तेक्षणीं ऊठिला ४३ रणांगणा प्रति येऊन । अद्भुत करणी केली पूर्ण । कमंडलूचें उदक शिंपोन । दळ अवघें उठविलें ४४ लक्ष्मण भरत शत्रुघ्न । आदिकरून थोर लहान । निद्रिस्था परी उठोन । उभे ठाकले ते काळीं ४५ यावरी वाल्मीकें येऊन । श्रीरामासि दिधलें आलिंगन । ह्मणे राघवा तूं सर्वज्ञ । कर्तृत्व पूर्ण तुझें च हें ४६ सर्वां चा गर्व झाडावया । लीला केली त्वां रघुराया । येरवीं सीता तुज पासोनियां । दूर कोठें गेली पां ४७ अनंत ब्रह्मांडांचा कर्ता । तो तूं पुराणपुरुष रघुनाथा । लटकें च बाहेर आतां । नेणतपण धरिसी तूं ४८ श्रीराम ह्मणे युद्ध करूनी । दोघांसि जिंकी न समरंगणीं । म्यां आपुली निर्वाण करणी । दाविली नाहीं तयातें ४९ हांसोनि बोले वाल्मीक ऋषी । हस्ताचा ढका लागला नेत्रासी । तरी क्रोध धरून मानसीं । हस्त काय छेदावा ५० भोजन करितां न कळत । जिव्हे सि रुतला दंत । तरी कोणा

१ अग्नि. २ मोहरी. ३ शेष. ४ गळा, मान. ५ पंखाचा वारा. ६ शेंपटें. ७ सीता. ८ गरुड. ९ झांकलें. १० श्रीराम.

वरीक्षोभतेथ । करावासांगराघवा ५१ कनकेरुसेकांतीवेंरी । रत्नप्रभाघालूंइच्छीबाहेरी । काष्ठघेऊनियांमारी । वृक्षकायफळातें५२ गूळगोडीवरीरुस
ला । प्रवाहासिगंगाधरीअबोला । प्रभेवरीदीपकोपला । तैसादिसेविचारहा ५३ हेजगदात्मयाअयोध्यापती । तववीर्याचीअगाधगती । आत्मावैपुत्र
वदेनिश्चितीं । वेदश्रुतीराघवा ५४ वाल्मीकाचेबोलऐकोन । झालेंराघवाचेंसमाधान । तेदिवसींसीतारमण । राहिलातेथेंपरिवारेंसीं ५५ कुशलहु
भेटतीलरघुनंदना । तोसोहळापाहावयानयना । सकळराजयांसहितसेना । त्वरेंकरूनधांवती ५६ शत्रुघ्नसुमंतधांवती । हेमंमयशिबिरेंउभींकरिती ।
अयोध्याजनवेगेंयेती । महोत्साहपाहावया ५७ वसिष्ठादिमुनीश्वरें । कौतुकपाहूंआलेसत्वर । हेमांबरसभेसीरघुवीर । सकळांसहितबैसला ५८ नि
त्यनेमसारूनसत्वर । नूतनवस्त्रेंअलंकार । लेवोनियांश्रीरामचंद्र । सभामंडपींबैसला ५९ वाल्मीकेंआश्रमाप्रतिजाऊन । लहूकुशआणिश्यामकर्ण ।
राघवापासींआणून । उभेकेलेतेधवां १६० इंद्रादिदेवगणपाहती । सर्वत्रसादरविलोकिती । ह्मणतीकेवळरघूत्तमाच्यामूर्ती । दोघेपुत्रदिसतीहे ६१
श्यामसुंदरआकर्णनयन । विशाळभाळसुहास्यवदन । पुत्रांसहितरघुनंदन । समसमानमूर्तित्रय ६२ तोंझालीआकाशवाणी । राघवातवपुत्रह्मणोनी । ज
यजयकारकरूनी । मस्तकडोलवितीसुरवर ६३ वस्त्रालंकारमंडितपूर्ण । लहुकुशश्रीरामाजवळीयेऊन । हातींतैसेंचधनुष्यबाण । घालितीलोटांगणपि
त्यासी ६४ झालाएकचिजयजयकार । वृंदारकवर्षतीसुमनसंभार । रामासप्रार्थितीनृपवर । पुत्रांसीक्षेमदेईंजे ६५ मगउठोनियांरघुनंदन । हृदयीं
धरिलेनिजनंदन । मस्तकेंकरूनिअवघ्राण । पुढेंघेऊनिबैसला ६६ सकळवेदशास्त्रप्रवीण । वाल्मीकेंकेलेदोघेजण । शतकोटीरामायण । बाळह्मणो
नदाविती ६७ त्यावरीआरंभिलेंगायन । अवतारचरित्रेंगहन । तींऐकतांरघुनंदन । सप्रेमझालातेकाळीं ६८ चवदाविद्याचौसष्टीकळा । बाळांहींअभ्या
सिल्यासकळा । जैसाकरतळींचाआंवळा । आकळिल्याविद्यातैशाच ६९ वाल्मीकासह्मणेरघुनाथ । धन्यधन्यतुझेंगुरुत्व । विद्याभ्यासविधियुक्त । बा
ळकांसकरविला ७० वाल्मीकदेतप्रत्युत्तर । तुझेंवीर्यपरमतीव्र । माझेंगुरुत्वसाचार । कायकरीलनुसतेंची ७१ सौमित्रभरतशत्रुघ्न । सुमंतसुग्रीवविभी
षण । हनुमंतादिसकळसैन्य । सीताआणावयाचालिले ७२ आश्रमापुढेंयेऊन । घालितीसर्वलोटांगण । वाल्मीकेंबहुतप्रार्थून । सीताआणिलीबाहेरी
७३ सकळहीसद्गदहोऊन । धरितीजगन्मातेचेचरण । पुढेंठेविलेंसुखासन । जानकीसबैसावया ७४ सकळऋषिपत्न्यांचीपूजाकरूनी । जानकीआरूढे
सुखासनीं । समुद्रासभेटावयामंदाकिनी । वेगेंकरूनचालिलीजैसी ७५ जवळीदेखोनिरघुनाथा । खालींउतरलीजगन्माता । वाल्मीकयेऊनितत्वतां । र

१ सुवर्ण. २ शोभा. ३ श्रीराम. ४ सुवर्णाचीं. ५ घर, तंबू. ६ ऋषि. ७ सुवर्णाच्या वस्त्रांची सभा. ८ देव,

घुनाथाप्रतिबोलतसे ७६ पंचभूतेंशशीआदित्य । रामातूंसाक्षआहेसीहृदयस्थ । निष्पापजानकीनिश्चित । आदिमध्यअवसानीं ७७ माझीधर्मकुमा
रीजनककन्या । आजिवरीपाळिलीपरममान्या । आतांतवदर्शनेंझालोंधन्या । बैसवीअर्धांगींइयेतें ७८ मागुतीवदलीआकाशवाणी । सत्यसतीहेज
नकनंदिनी । मगश्रीरामेंआलिंगोनी ।अंकावरीबैसविली७९लागलावाद्यांचागजर । मगवाल्मीकासप्रार्थीरघुवीर । सर्वेंघेऊनिसकळऋषीश्वर । अयो
ध्येसीचलवें ८० पूर्णकरावामहायज्ञ । सकळिकांमानलेंतेंवचन । मागवाल्मीकादिमुनिजन । दिव्यवहनींबैसविले ८१ जानकीसहितरघुनंदन ।
रथींबैसेजैसाचंडकिरणं । दोघेदोहींकडेनंदनं । विराजमानपाहती८२मस्तकींविराजेदिव्यछत्र ।मित्रपत्रेंअतिविचित्र । निजभक्तचामरेंअपार । रघूत्त
मावरीढाळिती ८३ मकरबिरुदेंपुढेंचालती ।भाटसूर्यवंशवाखाणिती । परमगजरेंरघुपती । अयोध्येमाजीप्रवेशला८४कौसल्यासुमित्राप्रेमेंकरूनी । सीतेस
आलिंगितत्तियेक्षणीं । लहुआणिकुशावरुनी । मूदओंवाळीकौसल्या८५सामग्रीपूर्वीचसिद्धहोती । यज्ञदीक्षाघेऊनरघुपती । पूर्णकेलीपूर्णाहुती । यज्ञसमा
प्तजाहला ८६ वस्त्रालंकारदक्षिणाअपार ।देऊनिगौरविलेऋषीश्वर । तेवर्णीतरघुवीरचरित्र । आपुलेआश्रमाप्रतीगेले ८७रायांसदिधलीपाठवणी । श्रीरा
माचीआज्ञाघेउनी । सीतेचामहिमावर्णितवदनीं । निजनगराप्रतिगेले८८ बिभीषणसुग्रीवप्राणसखे । गौरवूनियांरघुनायकें । आपुलेस्वस्थळाप्रतिसुखें ।
पाठविलेतेकाळीं ८९ जानकीकुमरांसमवेत । अयोध्येचेंराज्यकरीरघुनाथ । हीकथाश्रवणकरितांबहुत । अक्षयसुखातेंपाविजे ९० परमसंकटहरि
णीहेकथा । विजयीहोयश्रोतावक्ता । पाहतांश्रीरामविजयग्रंथा । सर्वचिंताहरेपैं ९१यावरीकथागोडबहुत । लीलाकैसीदावीरघुनाथ । तोशेवटींचाअ
ध्यायथार्थ । सादरआतांपरिसावा ९२ चाळीसअध्यायअवघाग्रंथ । त्यांतएकउरलागोडबहुत । जैसामुकुटावरीमणीझळकत । तैसाअध्यायचाळि
सावा ९३ ब्रह्मानंदस्वामीसमर्था । श्रीधरवरदापंढरीनाथा । हाग्रंथवाचित्याभक्ता । तूंचरक्षींनिजांगें ९४ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवा
ल्मिकीनाटकाधार । सदांपरिसोतपंडितचतुर । एकोनचत्वारिंशत्तमोऽध्यायगोडहा १९५ श्रीकृष्णार्पणमस्तु । शुभंभवतु । अ० ३१ ओ० १९५ ।

१ चंद्रसूर्य. २ अंत, शेवटपर्यंत. ३ पतिव्रता. ४ मांडीवर. ५ सूर्य. ६ पुत्र. ७ मुखानें. ८ मोक्षपद.

श्रीगणेशायनमः । । श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः । जयजयरामादीनदयाळा । वृंदारकवंद्याअजितअमला । असुरदमनापरममंगला । अचलअढळ
अविनाशा १ मन्मथवारणविदारकमृगेंद्रा । क्रोधजलदविदारकसमीरा । मदतमनाशकाभास्करा । परात्परापरमानंदा २ मत्सरतृणदाहकवैश्वान
रा । दंभनगच्छेदकवज्रधरा । मायाचक्रचाळकाविश्वंभरा । भूमिजावराभयनाशका ३ अहंकारद्विपंचवक्त्रदर्पहरणा । मोहघटश्रोत्रसंहारणा । श
क्रजितगर्वहरणा । उन्मिळाजीवनांग्रजाश्रीरामा ४ तवकृपेच्याबळेंसमस्त । संपतआलाश्रीरामविजयग्रंथ । शेवटींचाअध्यायरसभरित । वदवींआतां
येथोनी ५ गताध्यायींकथानिरूपण । संपलेंलहुकुशाख्यान । जानकीआणूनयज्ञ । अश्वमेधसंपविला ६ याउपरीएकेदिनीं । सिंहासनींबैसलाको
दंडपाणी । बंधुवर्गकरजोडुनी । स्वस्थानींउभेराहिले ७तोंकृतांतभगिनीतीरवासी । द्विजप्रजापातल्यावेगेंसी । जैसेसुरक्षीरसागरासी । गाऱ्हाणेंजा
तीसांगावया ८ तंवभक्तजनसभाभूषित । मुक्तमंडपींबैसलारघुनाथ । जोकोटिकंदर्पांचातात । दीनबंधूगुणसिंधू ९ दूतजाणवितीरघुराया । दुःखेंप्र
जाआल्याभेटावया । येऊंद्याह्मणेलवलाह्या । कोणीपीडिल्यामाझ्याप्रजा १० तोंमुक्तमंडपासमोर । पातलेतेव्हांप्रजांचेभार । करूनियांजयजयकार ।
नमस्कारसर्वघालिती ११ उभेराहिलेसमोर । भ्रूसंकेतेंविचारीजगदोद्धार । ह्मणतीदैत्येंगांजिलेंयमुनातीर । क्रूरलवणासुरमाजला १२ महापातकी
अत्यंतनिष्ठुर । मरुदैत्याचाकुमर । भानुजेचेंपैलतीर । तेथेंअसुरवसेसदां १३ प्रजागाईआणिब्राह्मण । चांडाळभक्षितोनित्यमारून । रघुनाथात्या
सवधून । प्रजाजनसुखीकरीं १४ ऐसेंऐकतांकोदंडपाणी । कोदंडआणवीतयेक्षणीं । आरक्तताउदेलीनयनीं । क्रोधमनींनसांवरे १५ तोंशत्रुघ्नेंपुढेंयेउ
नी । मस्तकठेविलेंश्रीरामचरणीं । ह्मणेमजआज्ञादेउनी । लवणासुरवधविजे १६ घेऊनियांचतुरंगदळ । वेगेंजायह्मणेतमाळनीळ । लवणवधोनितत्का
ळ । प्रजासुखीराखिजे १७ मंत्रशक्तीदिव्यबाण । बंधूसदेतरघुनंदन । सीताधवाचेचरणवंदोन । शत्रुघ्नवीरचालिला १८ संग्रामसंकेतभेरी । सेव
कींठोकिल्यातेअवसरीं । तीनअक्षौहिणीदळबाहेरी । परमवेगेंनिघालें १९ नौकाआणोनियांअपार । भानुकन्येचेंलंघिलेंतीर । तोंचहूंकडूनअपार । ऋ
षीश्वरपातले २० ऋषिह्मणतीहादैत्यदारुण । पूर्वींमांधातरायासीमरण । याचेहस्तेंआलेंजाण । बळेंकरूननाटोपेहा २१ शत्रुघ्नतेव्हांबोलेवचन । या
चेंसंपूर्णसांगाकथन । ऋषिह्मणतीउमारमण । येणेंपूर्वींआराधिला २२ शंकरेंस्वहातींचादिधलाशूळ । तेणेंबळेंसंहारीविश्वसकळ । तरीतोशूळघेतांत
त्काळ । मरणत्यासतेणेंचिपैं २३ तोशूळठेवूनिमंदिरीं । आहारालागींहिंडेदिवसरात्रीं । श्वापदेंगोब्राह्मणामारी । शोधूनियांसाक्षेपें २४ तरितोकाळ

२ देव. २ दैत्य, राक्षस. ३ कामरूप हत्ती. ४ सिंह. ५ मेघ. ६ अहंकाररूप रावण याचा गर्व. ७ मोहरूप कुंभकर्ण. ८ इंद्रजित. ९ लक्ष्मणाचा वडील बंधु.

साधून । आधींघ्यावेंत्याचेंसदन । शूळहातींचढलियाजाण । बळक्षीणहोयत्याचें २५ त्याचियाभयेंकरून । वोसपडलेंमथुरापट्टण । शत्रुघ्नेंऋषिवाक्यऐकून । काळसाधूनचालिला २६ लवणासुरनसतांसदनीं । मंदिरतयाचेंउघडोनी । शूळठेविलाहोतापुजोनी । उचलीतेक्षणींदाशरथी २७ शूळघेऊनिकैकेयीनंदन । दळभारसिद्धकरीसंपूर्ण । उभाठाकलातोंलवण । वनाहूनपातला २८ गोब्राह्मणमारुनी । येतप्रेतभारमस्तकींघेउनी । तों सदनवेष्टिलेंदेखेनयनीं । मानववीरींतेधवां २९ देखोनियांमानवभार । परमआनंदलालवणासुर । ह्मणेईश्वरेंमजआहार । सदनाप्रतिपाठविला ३० कृतांतवतहांकफोडुनी । परमक्रोधेंआलाधांउनी । तोंशूळदेखिलानयनीं । शत्रुघ्नहातींतेधवां ३१ मगक्रोधावलालवण । ह्मणेतूंमनुष्याचानंदन । तुजमारूनअयोध्यापट्टण । क्षणमात्रेंघेईनआतां ३२ मातुळमाझारावण । रामेंमारिलाकपटेंकरून । परीत्याराघवासिआतांवधून । सीताआणीनबळेंची ३३ तुह्मांचौघांसमारून । मातुळाचासूडघेईन । आजिप्रथमअवदान । तुझेंचघेईनशत्रुघ्ना ३४ लवणासिह्मणेशत्रुघ्न । मशकातुजयेथेंचिवधीन । जैसामारावयामत्कुण । उशीरकांहींनलागेची ३५ तंववृक्षउपडोनिसत्वर । वेगींधांवलालवणासुर । तोंशत्रुघ्नेंसोडिलाशर । चापावरीलावूनियां ३६ तेणेंवृक्षछेदिला । असुरेंपर्वतभिरकाविला । तोही कैकेयीनंदनेंतोडिला । क्षणमात्रनलागतां ३७ कोटयानकोटीबाण । शत्रुघ्नेंमोकलिलेदारुण । परितोनमानीचलवण । बाणतृणवतण्याअसती ३८ जैसाअपारवर्षतघन । तैसालवणटांकीवृक्षपाषाण । तेवरचेवरबाणेंतोडोन । शत्रुघ्नवीरटांकीतसे ३९ मगशत्रुघ्नेंतयेवेळां । बाणविचारूनकाढिला । जोकमलासनेंनिर्मिला । मधुकैटभवधालागीं ४० रघुपतीसतोबाणतत्वता । कमलासनेंदिधलाहोता । तोलवणवधावयासिनिघतां । रामेंदिधलाशत्रुघ्ना ४१ तोबाणशत्रुघ्नेंयोजिला । जैसीअकस्मातप्रकटेचपळा । तैसाचापापासोनिसुटला । वेगेंआलालवणावरी ४२ तेणेंडळमळिलेंभूमंडळ । विमानींदेवांससुटलापळ । वज्रेंचूर्णहोयअचळ । तैसाहृदयींभेदला ४३ मेरूवरूनिपडेऐरावत । तैसाझालाअसुरदेहपात । प्राणनिघोमिगेलात्वरित । पडिलेंप्रेतधरेवरी ४४ विजयीझालाशत्रुघ्न । सुमनेंवर्षतीसुरगण । तत्काळमथुरापट्टण । प्रजानेऊनभरियेलें ४५ जैसेंअयोध्यापुरपट्टण । तैसेंचमथुरानगरजाण । देशभरलेसमग्रपूर्ण । दुःखदरिद्रपळालें ४६ जयपावलाशत्रुघ्न । कळलेंरघुपतीसवर्तमान । छत्रचामरादिसंपूर्ण । राजचिन्हेंपाठविलीं ४७ शत्रुघ्नावरीधरूनिछत्र । केलामथुरेचानृपवर । समुद्रपर्यंतसमग्र । देशतयासीदीधला ४८ तोंअयोध्येमाजीतेवेळे । एकनवलपरमवर्त्तलें । एकादशसहस्त्रवर्षेंकेलें । अयोध्येचेंराज्यश्रीरामें ४९ रामराज्यामाजीमृत्य

१ घर. २ शत्रुघ्न. ३ भक्ष्य. ४ आईचा बंधू मामा. ५ आहुति. ६ ढेकूण. ७ शत्रुघ्न. ८ सोडिले. ९ ब्रह्मदेवानें. १० पर्वत इत्यादि. ११ देव.

अकाळींनसेचसत्य । परीएकब्राह्मणाचासुत । मरणअकस्मातपावला ५० झालेंत्याचेंव्रतबंधन । तोंसवेंचपावलामरण । तंवपित्यानेंत्यासउचलोन
राजद्वाराआणिला ५१ राघवासह्मणेब्राह्मण । त्वांकायकेलेंदोषाचरण । अकाळींबाळपावलामरण । करींप्रयत्नलवकरीं ५२ परमचिंताक्रांतरघु
नाथ । तंवपातळाकमलोद्भवसुत । सीताकांतेंवृत्तांत । नारदासीसांगीतला ५३ नारदह्मणेजानकीपती । कोणीतपकरितोशूद्रजाती । त्यातपेंकरू
नानिश्चितीं । द्विजकुमारनिमाला ५४ तपकरणेंहाब्राह्मणाचाधर्म । इतरांसितोसहजचिअधर्म । शूद्रतपआचरतांपरम । अकाळींमरणहोयपैं ५५
ऐसेंबोलतांब्रह्मनंदन । रामचिंतीपुष्पकविमान । तोंतत्काळआलेंधांवोन । रामेंबांहिलेंह्मणोनी ५६ प्रधानसेनेसहिततात्काळ । वरीआरूढेतमाळे
नीळ । शोधूंलागलापृथ्वीमंडळ । गुहाअचलकठीणस्थानें ५७ जोतपस्वीदृष्टींदिसे । त्यासकोणजातीराघवपुसे । तंवतेबोलतीत्यासरसें । श्रे
ष्ठवर्णब्राह्मणपैं ५८ तयांसराघवनमून । मगकरीतयांचेंपूजन । याचपरीऊर्वीसंपूर्ण । रघुनंदनशोधीतसे ५९ मगदक्षिणपंथेंशोधीश्रीराम । तों
वृक्षलागलेपरम । गिरिकंदरींएकअधम । किराततपकरीतसे ६० आरंभिलेंधूम्रपान । तयासपुसेजनकजारमण । ह्मणेवदेंकांकोणवर्ण । तपकिमर्थ
आरंभिलें ६१ मगतोह्मणेमीकिरात । स्वर्गानिमित्ततपकरितोंयेथ । ऐकतांकोपलाजानकीकांत । ह्मणेहाआचरेपरधर्म ६२ बाणतीक्ष्णपरमचप
ळ । काढोनिछेदिलेंकंठनाळ । तोउद्धरूनितत्काळ । स्वर्गलोकपावला ६३ तोंविमानींबैसोनिअमरनाथ । रघुनाथासियेऊनिभेटत । ह्मणेबरावधिला
किरात । पुरलेमनोरथदेवांचे ६४ सीतावल्लभारघुनंदना । पुराणपुरुषागुणसंपन्ना । मजकांहींकरावीअज्ञा । तेमीसिद्धीपाववीन ६५ रघुनाथह्मणे
ऋषिनंदन । अयोध्येंतपावलामरण । तयासिद्यावेंजीवदान । सहस्रनयनअवश्यह्मणे ६६ मगइंद्रआज्ञेंकरून । परतलाद्विजपुत्राचाप्राण । जैसा
ग्रामाजातांपंथींहून । येईपरतोनमाघारा ६७ बहुतांचेसुतत्यावेळे । जेपूर्वींहोतेनिमाले । तेहिइंद्रेंआणोनिदीधले । तद्रूपतैसेचपूर्ववत ६८ जेवी
उसणीवस्तूनेत । तीपरतोनितैसीचदेत । तेवीतयांद्विजांचेसुत । अमरेश्वरेंदीधले ६९ असोइकडेअयोध्यापती । अगस्तीच्याकाननाप्रती । जाताझाला
सहजगती । वनेंउपवनेंविलोकित ७० तोंपुढेंदोनपक्षियेऊन । राघवासिघालितीलोटांगण । ह्मणतीआमचावादनिवडोन । पुढेंगमनकरावें ७०
तेंरघूत्तमेंऐकोन । स्थीरकेलेंपुष्पकविमान । तोंउलूकगृध्रदोघेजण । बोलतेझालेतेधवां ७२ दिवाभीतबोलेवचन । हेंगृहमाझेंपूर्वींहून । हागृध्रमज
दवडून । बळेंचयेथेंनांदतो ७३ मगगृध्रबोलत । उगेंचमजपीडीदिवाभीत । गृहमाझेंयथार्थ । बहुतकाळयेथेंची ७४ प्रधानासह्मणेसीतावर ।

१ मौजीबंधन २ नारद ३ मृत्युपावला ४ बोलाविलें ५ श्रीराम ६ विवरें पर्वत इत्यादि ७ पृथ्वी ८ कोळी ९ इंद्र.

यांचावादनिवडासत्वर । सत्यनिवडोनमंदिर । ज्याचेंत्यासदेइजे ७५ तोंगृध्रबोलेपापमती । जंवयेथेंपृथ्वीनवती । तंवयावृक्षावरीनिश्चितीं । गृह
माझेंम्यांरचियेलें ७६ दिवाभीतबोलेवचन । ईश्वरेंपृथ्वीकेलीनिर्माण । मगवृक्षवाढलापूर्ण । मगम्यांगृहनिर्मिलें ७७ प्रधानह्मणेगृध्रसत्य ।
बहुतकाळाच्यागोष्टीसांगत । ऐकोनिहांसलारघुनाथ । ह्मणेकेंविहाअनर्थनिवडिला ७८ पृथ्वीवृक्षासआधार । पृथ्वीचेआश्रयेंतरुवर । दुरात्मागृध्र
साचार । इलूकालागींपीडीतसे ७९ निवडोनियथार्थव्यवहार । श्रीरामउलूकासिदेतमंदिर । ह्मणेहागृध्रचांडाळसाचार । यासवधीनमीआतां ८०
बाणकाढिलातीक्ष्णतेक्षणीं । तंवगर्जेआकाशवाणी । ह्मणेहेरामकोदंडपाणी । यासिनमारींसर्वथा ८१ हापूर्वींभूपतीब्रह्मदत्त । गौतमऋषीचाअंकित ।
तोयाचेसदनाअकस्मात । भोजनासआलागौतमगुरू ८२ तयासियाणेंमांसदिधलें । देखोनिगुरूचेंमनक्षोभलें । तयानेंतत्काळयासशापिलें । गृध्रहोयह्म
णोनियां ८३ मगहालागलागुरूचेचरणीं । उश्शापबोलेगौतममुनी । रामदर्शनहोतांतयेक्षणीं । जासीउद्धरूनिस्वर्गासी ८४ ऐसेंदेववाणीजंव
बोलत । तोंविमानपातलेंअकस्मात । दिव्यदेहपावलाब्रह्मदत्त । भावेंनमीतरामचंद्रा ८५ स्तवोनियांकोदंडपाणी । तत्काळबैसलाविमानीं । रघुवी
रप्रतापेंकरुनी । दिव्यदेहपावला ८६ असोकलशोद्भवाचेआश्रमासी । येताजाहलाअयोध्यावासी । साष्टांगनमूनऋषीसी । राघवउभाराहिला ८७
बहुतकरूनआदर । आश्रमींपूजिलारघुवीर । हस्तकंकणएकसुंदर । ऋषीनेंदीधलेंराघवा ८८ पृथ्वीचेंमोलसंपूर्ण । एकएकजडलेंरत्न ।
सीतावल्लभेंदेखोन । घटोद्भवाप्रतिपुसे ८९ ह्मणेयासिनिर्मिताचतुरानन । हेस्वर्गवस्तुप्रभाघन । मनुष्यासिदुर्लभपूर्ण । तुह्मांसकैसीलाभली ९०
मगअगस्तीकथासांगत । पैलतेसरोवरींपाहेप्रेत । हाविदर्भदेशींचानृपनाथ । पुण्यवंततपोराशी ९१ दानकेलेंअपारिमित । श्रीरामातपआचरलाबहु
त । परीअन्नदानकिंचित । घडलेंनाहींत्यापासुनी ९२ स्वर्गासगेलातोनृपनाथ । परीक्षुधेनेंपीडिलाअत्यंत । मगतयासिह्मणेपद्मजात । नाहींभक्षा
र्थतुजयेथें ९३ तूंनाहींकेलेंअन्नदान । येथेंनपाविजेदीधल्यावीण । तरीतूंभूतलाजाऊन । आपुलेंप्रेतंभक्षींकां ९४ तूंतेंभक्षितांनित्यकाळ ।
मांसवाढेलबहुसाल । मगतोविमानींबैसोनभूपाळ । नित्यकाळयेततेथें ९५ आपुलेंप्रेतभक्षून । स्वर्गासजायपरतोन । अन्नोदकाएवढेंदान । दुजें
नाहींराघवा ९६ भाग्यतेंवैराग्यनिश्चित । दैवतएकसद्गुरुनाथ । शांतिसुखाहूनअद्भुत । दुजेंसुखनसेची ९७ तिर्थींमाजीद्वादशीश्रेष्ठ । कींमंत्रां
माजीगायत्रीवरिष्ठ । कींतीर्थांमाजीसुभट । प्रयागराजथोरजैसा ९८ तैसेंदानांमाजीअन्नदान । राघवाअत्यंतश्रेष्ठपूर्ण । असोत्यारायासिकमला

---

१ आकाश वाणी २ रामचंद्र ३ अगस्ति ४ घरीं ५ ब्रह्मदेव ६ तेजःपुंज ७ निर्जीवशरीर ८ राजा ९ श्रेष्ठ.

सन । बोलताझालातेकाळीं ९९ ह्मणेअगस्तीचेंदर्शन । होतांतुझेंकर्मखंडेलेंजाण । तोंएकेदिवसींयेऊन । प्रेतभक्षितसेनृपवंर १०० तेंम्यांअक
स्मातदेखिलें । कृपेनेंहृदयमाझेंद्रवलें । मगम्यांतयावरदानदिधलें । कर्मखंडलेंतयाचें १ मगतोवैदर्भराजातेथून । करीस्वर्गींअमृतपान । तेणेंगुरु
पूजेलागींपूर्ण । मजहेंकंकणदिधलें २ देवांचेअंशरत्नांवरी । चिंतितमनोरथसिद्धकरी । ऐसेंऐकोनिअयोध्याविहारी । घालीकरींकंकणतें ३ राघ
वह्मणेमहाऋषी । दंडकारण्यह्मणतीयासी । याचीपूर्वकथाअसेकैसी । तेंमजलागींसांगिजे ४ अगस्तीह्मणेमित्रकुळींदेख । मनूचापुत्रइक्ष्वाक । त
याचापुत्रदंडक । रावनिघालामृगयेसी ५ काननींऋषिआश्रमबहुत । दंडकजायपाहतपाहत । तंवभृगूचाआश्रमदेखत । शोभिवंतअत्यंतजो ६
तेथेंतोबैसलाक्षणभरी । तंवभृगुऋषिनव्हतामंदिरीं । घरींतयाचीहोतीकुमरी । अरजानामतियेचें ७ देखोनियांएकांत । कामातुरझालानृपनाथ ।
परीतेबाळकुमारीअसत । दशवर्षवयाची ८ दंडकेंधरूनियांबळें । ऋषिकन्येसीभोगिलें । शरीरतियेचेंअचेतनपडलें । दंडकगेलातेथुनी ९ भृगु
आश्रमाजंवयेत । तंवदेखेकन्यामूर्च्छित । ऋषीसवार्तासांगतीसमस्त । दंडकेंअनर्थकेलाहा ११० ऋषिक्षोभलाजैसाकृतांत । दंडकासितेव्हांशापित । ह्म
णेसेनाप्रजादेशसमस्त । वनेंपट्टनेंसर्वंही ११ वृक्षतोयेंतृणधान्य । तुझेवंशासहितप्रधान । चांडाळाजायरेभस्महोऊन । सप्तदिननलागतां १२
ऐसेंबोलिलाविप्रोत्तम । तैसेंचसर्वंहीझालेंभस्म । नाहींउरलेंवृक्षाचेंनाम । पक्षीतोयमगकैंचें १३ बहुतकाळपर्यंत । शून्यदेशपडलासमस्त । पुढेंनारदें
कलहबहुत । पर्वतामाजीलाविला १४ मेरूआणिविंध्याचळ । उंचावलेभांडतीसबळ । खळवळलेंसूर्यमंडल । हाहाःकारसृष्टीवरी १५ विंध्याद्रीनाटो
पेसाचार । सूर्याविणपडलाअंधकार । मगमिळोनिऋषिनिर्जर । मजप्रतियेऊनिप्रार्थिती १६ तुजवीणविंध्याचळ । कोणासिनाटोपेसबळ । तरीतूं
दक्षिणेसजायींतात्काळ । तीर्थयात्राकरावया १७ मगमीवाराणसीटाकूनित्वरित । दक्षिणेसआलोंऋषींसहित । मजदेखतांविंध्याचळपडत । पृथ्वीवरी
आडवा १८ तयासबोलिलोंवचन । जोंमीभाघारायेईनपतोन । तोंवरीनउठावेंयेथून । उठल्याशापीनक्षणार्धें १९ शापधाकेंपर्वत । अद्यापिनउठे
चयथार्थ । मगउगवलाआदित्य । लोकसस्तसुखीझाले १२० तेंहेंदंडकारण्यवोस । ऋषींसहम्यांकेलावास । इंद्राससांगूनबहुवस । मेघवृष्टीक
रविली २१ आणिधनधान्यबीजेंबहुत । तींहींवर्षलाअमरनाथ । मगहादेशवसलाअद्भुत । दोषदुष्काळनिमाला २२ त्यापासूनिदंडकारण्य । रा
घवाह्मणतीयालागुन । असोऋषीचीआज्ञाघेऊन । रघुनंदननिघाला २३ पुष्पकारूढहोऊन । अयोध्येसिआलापरतोन । तोंऋषीश्वरकुमरघेऊन । रा

१ तुटेल, नाहींसें होईल. २ राजा. ३ कळवळलें. ४ रामचंद्र. ५ सूर्यवंशीं. ६ पारध. ७ रान. ८ कन्या. ९ चळनवळनरहित. १० यम, काळ. ११ उदक.

मदर्शनापातले २४ ह्मणतीधन्यधन्यरघुवीराकेलें । मृतपुत्रांमाघारेंआणिलें । यशाचेपर्वतउंचावले । मेरूहूनिआगळे २५ मुक्तमंडपींरघुनाथ । शोभलातेव्हांजानकीसहित । भोंवतेबंधूवेष्टित । पुढेंहनुमंतउभासदां २६ श्रीरामविजयग्रंथपावन । उत्तरकांडसुरसगहन । पुढेंनिजधामागेलारघुनंदन । हेंअनुसंधानवर्णावें २७ तोंमाध्यान्हींप्रकटोनिरघुनाथ । ह्मणेयेथोनिग्रंथकरीसमाप्त । अवतारसंपलाहेंचरित्र । रामविजयींनसांगावें २८ मीजन्ममरणातीत । अभंगअक्षयशाश्वत । तोचमीब्रह्मानंदपंढरीनाथ । भीमातीरींउभाअसें २९ टांकोनियांचापशर । दोनीजघनींठेवूनिकर । समपादसमनेत्र । उभासाचारमीयेथें ३० ऐसीआज्ञाहोतांसत्वर । श्रीधरेंघातलानमस्कार । करूनियांजयजयकार । रामविजयग्रंथसंपविला १३१ चाळीसअध्यायग्रंथतत्वता । तुजप्रतिपावोपंढरीनाथा । ब्रह्मानंदपददेईंआतां । जगदात्मयाजगद्गुरू ३२ वाल्मीककृतमूळग्रंथ । हनुमंतकाव्यगोडबहुत । आणीकहीग्रंथींसत्यवंतीसुत । रामकथाबोलिला ३३ तेथींचींसंमतेंघेउनी । पंढरीनाथेंकृपाकरूनी । सांगीतलेंकर्णींयेउनी । तेंचलिहिलेंसाक्षेपें ३४ रामविजयवरदग्रंथ । याचाकर्तापंढरीनाथ । श्रीधरनामहेंनिमित्त । पुढेंकेलेंउगेंची ३५ याग्रंथासवरदान । पंढरीनाथेंदिधलेंआपण । वाचितीपढतीजेअनुदिन । होयज्ञानअद्भुततयां ३६ व्यासवोढवेसंकटमहाविघ्न । तरीतेणेंकरितांएकआवर्तन । तत्काळसंकटजायनिरसोन । वातेंकरूनअभ्रजैसें ३७ पांचआवर्त्तनेंकरितांपूर्ण । जायमहाव्याधीनिरसोन । संततीसंपत्तीधन । पावेलसत्यनिर्धारीं ३८ होऊनियांशुचिर्भूत । दहाआवर्तनेंकरितांसत्य । पोटींहोईलदिव्यसुत । रघुनाथभक्तप्रतापी ३९ जरिनहोयश्रवणपठण । नित्यकरितांग्रंथपूजन । त्यागृहींचेंसंकटपूर्ण । आंगेंहनुमंतानिवारी १४० अद्यापिचिरंजीवहनुमंत । जेरघुनाथकथावाचितीभक्त । त्यांसअंतरबाह्यरक्षित । उभातिष्ठतत्यांपासीं ४१ करितांरामकथाश्रवण । सप्रेमसदांवायुनंदनें । ग्रंथवाचितांपुढेंजाण । करजोडूनिउभाराहे ४२ शुचिर्भूतहोउनी । रामविजयउसांघेउनी । निद्राकरितांत्यासस्वप्नीं । मारुतिदर्शनदेतसे ४३ ऐसायाग्रंथाचाचमत्कार । जाणतीरामउपासकनर । आधिव्याधिदुःखदरिद्र । जायसमस्तग्रंथसंग्रहें ४४ बाळकांडआठअध्यायवरी । अयोध्याकांडअध्यायचारी । चारअध्यायनिर्धारीं । अरण्यकांडप्रचंड ४५ दोनअध्यायकिष्किंधाकांड । तेथोनिपांचअध्यायवितंड । तेंसुंदरकांडप्रचंड । लीलाचरित्रमारुतीचे ४६ दहाअध्यायसंपूर्ण । युद्धकांडरसाळगहन । सातअध्यायपावन । उत्तरकांडजाणावें ४७ ऐसेअध्यायचाळीस । मिळूनरामविजयझालासुरस । श्रवणकरितांआसमास । ब्रह्मानंदउचंबळे ४८ प्रथमाध्यायींमंगळाचरण । गणेशसरस्वतीगुरुस्तवन । वाल्मीकाचीउ

१ मोक्षपद. २ श्रीव्यास. ३ निरंतर. ४ पारायण, आवृत्ति. ५ वायु. ६ मारुति. ७ मनोदुःख व शरीररोग.

त्पत्तीसांगोन। प्रथमाध्यायसंपविला ४९ बंधूसहितनिश्चिती। सांगीतलीरावणाचीउत्पत्ती। दशरथलग्नाचीगती। द्वितीयाध्यायींनिरूपिली ५० श्रा
वणवधशृंगीचेंआगमन। योगदशरथेंकेलापूर्ण। यावरीहनुमंतजन्मकथन। तृतीयाध्यायींहेचिकथा ५१ कौसल्यासुमित्राकैकेयीप्रती। डोहळे
पुसोंगेलानृपती। श्रीरामजन्मध्यानस्थिती। चतुर्थाध्यायींहेचिकथा ५२ श्रीरामाचेंमौंजीबंधन। ब्रह्मचर्यतीर्थाटण। विश्वामित्रमागेरघुनंदन। हेंचि
निरूपणपंचमाध्यायीं १५३ योगवासिष्ठकथून। मायेनेंगाधिजंकेलादीन। वेदांतकेलानिरूपण। सहावासंपूर्णजाणावा ५४ ताटिकामर्दूनियाग
रक्षिला। अहिल्याउद्धारपुढेंकेला। सीतेचाजन्मसांगीतला। सातव्यामाजीसंपूर्ण ५५ आठव्यामाजीसीतास्वयंवर। अपमानिलादशकंधर।
लग्नलागोनिजिंकिलापरशधर। आलारघुवीरअयोध्ये ५६ राज्यींबैसतांरघुनाथ। कैकेयीनेंकेलाअनर्थ। त्याकरितांदुःखीदशरथ। नवमाध्यायींहेचि
कथा ५७ श्रीरामवनासीनिघाला। कौसल्येनेंशोककेला। जान्हवीतीराश्रीरामआला। दशमाध्यायींहेचिकथा ५८ मगदशरथेंत्यागिलाप्राण।
भरतआलामातुळगृहाहून। भक्तिरसदिव्यनिरूपण। गोडबहुतअकरावा ५९ चित्रकूटपर्वतींभेटलारघुनंदन। भरतेंबहुतकेलेंस्तवन। नंदिग्रामीं
भरतस्थापून। हेंचिकथनद्वादशाध्यायीं ६० बहुतऋषींचेंदर्शन। घेताझालारघुनंदन। अगस्तीचामहिमापूर्ण। तेराव्यांतकथियेला ६१ शूर्पनखेचें
विटंबन। वधिलात्रिशिराखरदूषण। दशमुखासिवर्त्तमान। हेचिकथाचवदाव्यांत ६२ मृगवधूंगेलारघुनंदन। सीताघेऊनिजायरावण। जटायूवधि
लाकपटेंकरून। पंधराव्यांतहेंचिकथा ६३ सीताविरहेंरामव्यापिला। त्यावरीजटायुउद्धरिला। पंपासरोवरींरामआला। सोळावाझालायेथूनी।
६४ वालिसुग्रीवांचीउत्पत्ती। शक्रसुतावधीरघुपती। सत्रावेंअध्यायींनिश्चिती। हेचिकथारसाळपैं ६५ तारेप्रतिबोधकरून। शुद्धीसगेलेवानर
गण। समुद्रतीरींसंपातिदर्शन। हेंनिरूपणअठराव्यांत ६६ समुद्रउल्लंघूनिलंकाशोधून। रावणसभाविटंबून। विजयीजाहलावायुनंदन। हेंचरित्र
एकूणिसाव्यांत ६७ हनुमंतासीतादर्शन। विध्वंसिलेंअशोकवन। वधिलाअखयाआणिराक्षससंपूर्ण। हेचिकथाविसाव्यांत ६८ इंद्रजिताचेंवि
टंबन। पुच्छेंकेलेंलंकादहन। किष्किंधेसिआलाअंजनीनंदन। हेचिकथाएकविसाव्यांत ६९ ब्रह्मपाशबंधन। मिषेंघेऊनिवायुनंदन। सागरीं
पुच्छविझवून। सुवेळेसीपातला ७० ब्रह्मपत्रावाचून। समुद्रतीराआलारघुनंदन। मगविभीषणेंबोधिलारावण। हेचिकथाबाविसाव्यांत ७१ म
गविभीषणभेटेश्रीरामासयेऊन। सागरदर्शनसेतुबंधन। सुवेळेसिआलारघुनंदन। हेंचिनिरूपणतेविसाव्यांत ७२ कापट्यदाविलेंसीतेसी। मंदो

१ यज्ञ. २ दशरथराजा. ३ श्रीराम. ४ विश्वामित्र. ५ रावण. ६ परशुराम. ७ भागीरथी. ८ हरिण मारायास. ९ वालीस. १० वालीची स्त्री ११ मारुति. १२ रावणाचा पुत्र. १३ सोंग

दरीभेटलीजनककन्येसी। मगसुग्रीवेंत्रासिलेंरावणासी। कथाहेचिचोविसाव्यांत ७३ अंगदआलारावणाबोधून । नंतरयुद्धझालेंदारुण। नागपा
शींबांधिलेरामलक्ष्मण। हेंचरित्रपंचविसाव्यांत ७४ प्रहस्तवधमंदोदरीनीती। मगयुद्धाआलालंकापती। तोपराभवलानिश्चितीं। हेंचरित्रसव्विसा
व्यांत ७५जागाकेलाकुंभकर्ण। त्यावरीयुद्धजाहलेंदारुण। समरींघटश्रोत्रेंदिधलाप्राण। हेंनिरूपणसत्ताविसाव्यांत७६नरांतकादिसाहाजणपाडिले
शक्रजितेंशरजाळसोडिलें। मारुतीद्रोणाचळआणीतेवेळे। अठ्ठाविसाव्यांतहेचकथा ७७ निकुंबळेसिजाऊन। वानरींहोमविध्वंसून। शक्रजितास
मारीलक्ष्मण। एकूणतिसाव्यांतहेकथा ७८ तिसाव्यांतसुलोचनागर्हिवर। एकतिसाव्यांतअहिमहीसंहार। शक्तीभेदोनिनिर्धार। बत्तिसावासंपू
र्ण ७९ रावणाचाहोमविध्वंसून। अपारमाजविलेंरण। रावणवधोनिस्थापिलाविभीषण। हेंचरित्रपूर्णतेहेतिसाव्यांत ८० जानकीसदिंव्यदेऊन।
मगइंद्रवर्षलाअमृतपर्जन्य। देवस्वस्थानागेलेस्तवून। हेकथाचौतिसाव्यांत ८१ पुष्पकींबैसोनिरघुनंदन। घेतलेंअगस्तीचेंदर्शन। त्यावरीभर
तभेटीपूर्ण। हेंचरित्रपस्तिसाव्यांत ८२ नंदिग्रामींराहिलाराघवेश। मगकेलाअयोध्याप्रवेश। राज्यींस्थापूनिश्रीरामास। वानरगेलेस्वस्थाना
८३ छत्तिसावेअध्यायींजाण। हेचिकथाअसेसंपूर्ण। त्यावरीतीनअध्यायगहन। लहुकुशाख्यानगोडपैं ८४ चाळिसाव्यांतरघुवीरें। मृत्युपाव
लींऋषींचींकुमरें। किंरातवधोनियांवरें। बाळेंमाघारींआणिलीं ८५ चाळीसअध्यायपर्यंत। रामविजयसंपूर्णग्रंथ। श्रवणमननेंपुरेअर्थ। जाणती
पंडितविवेकी ८६ रामविजयग्रंथनृपती। चाळीसअध्यायवीरनिश्चिती। दोषदळसंहारिती। प्रचंडप्रतापीवीरहे ८७ रामविजयग्रंथसुंदर। हेंचाळी
सखणाचेंमंदिर। सीतेसहीतरघुवीर। क्रीडाकरिततयावरी ८८ कींहेंचाळीसखणांचेंवृंदावन। रघुनाथकथातुळसीपूर्ण। दृष्टांततींपत्रेंजाण। आव
र्तनेंप्रदक्षिणाभक्तकरिती ८९ रामविजयग्रंथमंदिरें। चाळीसकोठड्याअतिसुंदर। साहित्यद्रव्यअपार। त्यामाजीभरलेंनगणवे ९० कींग्रंथहावा
सरमणी। वेष्टिलाअसेदृष्टांतकिरणीं। कींसाहित्यतारांगणीं। ग्रंथचंद्रवेष्टिला ९१ कींग्रंथहाचिरघुवीर। दृष्टांतत्याचेवानर। मारूनिअहंदशकंधर।
विजयरूपसर्वदा ९२ कींरामविजमांदुसआली। आंतहोतींचाळीसकोहळीं। नवरसद्रव्येंपूर्णभरलीं। मजदीधलींब्रह्मानंदें ९३ पळालेंभवदुः
खदरिद्र। भाग्यघराआलेंअपार। कींग्रंथहापंढरीनगर। दृष्टांतअपारयात्रातेथें ९४ रामविजयग्रंथखाणी। वर्णितांधन्यझालीवाणी। ब्रह्मा
नंदकृपेंकरूनी। ग्रंथसिद्धीसपावला १९५ आनंदसांप्रदायपूर्ण। वाढतआलेंमूळींचेंज्ञान। सृष्टीआदींचतुरांनन। उपदेशिलानारायणें।

१ शपथ. २ कोळी. ३ हेतु. ४ पारायण. ५ वर. ६ सूर्य. ७ नक्षत्रांनीं. ८ अहंकाररूप रावण. ९ थैली, पेटी. १० ब्रह्मदेव.

१६ पद्मोद्भवेंतेंचिज्ञान । अत्रीसदिधलेंसंपूर्ण । त्याचेपोटींआदिपुरुषजाण । दत्तात्रेयअवतरला १७ दत्तात्रेयेंतेंचिज्ञानशुद्ध । सांगूनिबोधिलास दानंद । तेथूनिरामानंदप्रसिद्ध । यतीश्वरअगाधजो १८ तेथोनिमंगळानंदईश्वर । गंभीरज्ञानानंददिवाकर । सहजानंदयोगेश्वर । कल्याणधामेंवा सीजो १९ तेथूनिपूर्णानंदयतिराज । जोमहाज्ञानीतेजःपुंज । तेथूनिदत्तानंदयतिराज । पूर्णदत्तात्रेयअवतार २०० त्यादत्ताचेहेंदयींशुद्ध । अवत रलाब्रह्मानंद । पिताआणिगुरुप्रसिद्ध । तोचिमाझाजाणिजे १ पंढरीहूनिचारयोजनेंदूरी । नैर्ऋत्यकोणींनाझरेनगरीं । तेथीलदेशलेखकअवधारी ब्रह्मानंदपूर्वाश्रमी २ मगश्रीपंढरीसयेऊन । विधीनेंकेलेंसंन्यासग्रहण । भीमातीरींसमाधिस्थपूर्ण । ब्रह्मानंदयतिराज ३ तोब्रह्मानंदपूर्णपि ता । सावित्रीनामेंमाझीमाता । वंदोनियांउभयतां । रामविजयग्रंथसंपविला ४ शकेसोळाशेंपंचवीस । सुभानुनामसंवत्सरास । भानुसप्तमीशुद्धवि शेष । श्रावणमासविख्यातपैं ५ पंढरीक्षेत्रींनिश्चयेसीं । रामविजयसंपविलातेदिवसीं । लेखकआणिश्रोतयांसी । असोकल्याणसर्वदां ६ सुभानु संवत्सरभानुवार । भानुवंशींजन्मलारघुवीर । भानुआणिरोहिणीवर । तोंवरीग्रंथअसोहा ७ ब्रह्मानंदापांडुरंगा । श्रीधरवरदापूर्णअभंगा । पुराण पुरुषाभक्तभवभंगा । श्रोतावक्तातूंचिपैं ८ स्वस्तिश्रीरामविजयग्रंथसुंदर । संमतवाल्मिकीनाटकाधार । सदांपरिसोतपंडितचतुर । चत्वारिंशत्तमो ध्यायगोडहा ॥ २०१ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ श्रीमज्जगदीश्वरार्पणमस्तु ॥ ॥ शुभंभवतु ॥ ७ ॥

---

१ स्वामी २ कल्याण गावीं राहणारा ३ पोटीं ४ सोळाकोस ५ देशपांडचे ६ रविवार व सप्तमी तिथी ७ लिहिणारा ८ रविवार ९ सूर्यवंशीं १० सूर्य ११ चंद्र

# रामविजयाचे प्रत्येक अध्यायाची ओंवीसंख्या

| अध्याय | | ओंव्या | | अध्याय | | ओंव्या | | अध्याय | | ओंव्या | | अध्याय | | ओंव्या | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अध्याय | १ | ओंव्या | २०६ | अध्याय | ११ | ओंव्या | २७० | अध्याय | २१ | ओंव्या | २१८ | अध्याय | ३१ | ओंव्या | २४७ |
| अध्याय | २ | ओंव्या | २३४ | अध्याय | १२ | ओंव्या | १७५ | अध्याय | २२ | ओंव्या | २२३ | अध्याय | ३२ | ओंव्या | २६२ |
| अध्याय | ३ | ओंव्या | २८९ | अध्याय | १३ | ओंव्या | २४२ | अध्याय | २३ | ओंव्या | २२५ | अध्याय | ३३ | ओंव्या | २२३ |
| अध्याय | ४ | ओंव्या | २७८ | अध्याय | १४ | ओंव्या | २४२ | अध्याय | २४ | ओंव्या | २१७ | अध्याय | ३४ | ओंव्या | २१० |
| अध्याय | ५ | ओंव्या | १९५ | अध्याय | १५ | ओंव्या | २४१ | अध्याय | २५ | ओंव्या | २६३ | अध्याय | ३५ | ओंव्या | २२१ |
| अध्याय | ६ | ओंव्या | २५५ | अध्याय | १६ | ओंव्या | २०६ | अध्याय | २६ | ओंव्या | २१९ | अध्याय | ३६ | ओंव्या | २०२ |
| अध्याय | ७ | ओंव्या | २५७ | अध्याय | १७ | ओंव्या | २१७ | अध्याय | २७ | ओंव्या | १८७ | अध्याय | ३७ | ओंव्या | २१३ |
| अध्याय | ८ | ओंव्या | ३११ | अध्याय | १८ | ओंव्या | २५४ | अध्याय | २८ | ओंव्या | २१७ | अध्याय | ३८ | ओंव्या | १९९ |
| अध्याय | ९ | ओंव्या | २३२ | अध्याय | १९ | ओंव्या | ११४ | अध्याय | २९ | ओंव्या | १९३ | अध्याय | ३९ | ओंव्या | १९५ |
| अध्याय | १० | ओंव्या | २४० | अध्याय | २० | ओंव्या | २२० | अध्याय | ३० | ओंव्या | २१२ | अध्याय | ४० | ओंव्या | २०९ |

एकंदर ग्रंथसंख्या ९०३३

हा ग्रंथ मुंबईत रा० रा० गोपाळ नारायण आणि कंपनी मालक यांच्याकरितां रामचंद्र कृष्ण पिंगे वरेरकर याणीं गोपाळ नारायण कंपनीच्या छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला· मिति आश्विन शुद्ध दशमी गुरुवार शके १८१२ विकृति नाम संवत्सरे ता० २३ माहे अक्टोबर सन १८९० कालिकादेवीरोड
आवृत्ति ५ वी·

